# श्री स्कन्दपुराण - सह्याद्रिखण्ड






संपादक

व्याकरणाचार्य गजाननशास्त्री गायतोंडे

भारतीय पुराणांच्या समृद्ध परंपरांत स्कन्द पुराणांतर्गत सह्याद्रिखंडाचें स्थान फार वरचें आहे. प्राचीनतेच्या दृष्टीनें त्याची तुलना काशी, कांची, अवन्तिकेच्या तोलाची व मोलाची आहे.

उत्तरेस भडोचपासून दक्षिणेस केरळमधील मोठ्या भागाचा समावेश असलेल्या सह्याद्रीच्या ह्या परिसरांत वास करणाऱ्या प्राचीन जातीजमाती, त्यांचे आचारविचार व चालीरीति, त्यांचीं तीर्थक्षेत्रें व देवस्थानें इत्यादींचे विस्तारपूर्वक उल्लेख, व त्याचबरोबर या निसर्गरम्य प्रदेशाचें सौंदर्यात्म वर्णन, या साऱ्यामुळें या ग्रंथाला सांस्कृतिक, वाङ्मयीन तसेंच इतिहाससंशोधनाच्या दृष्टीनें वेगळें व आगळें असें सर्वांगीण महत्त्व आहे.

पण केवळ एवढेंच नाहीं. दशावतारांतील सातवा अवतार, सप्तकोंकणांचा निर्माता, तेथील जमातींचा संस्थापक, दुर्जनांचा शासनकर्ता आणि अनाथांचा त्राता जो परशुराम, त्याचें अनेक स्वरूपांतील दर्शन, रौद्र तसेंच हृद्यही, याच ग्रंथांत घडतें.

अशा अंगांनीं नटलेला हा ग्रंथ मुद्रणकला भारतांत स्थायी झाल्यावरही दुर्मिळच होता. डॉ. जर्सन द कुन्हा सारख्या विजातीय पंडितांनी भगीरथ प्रयत्न करून १८७७ सालीं त्याची प्रथमावृत्ति छापली. पण खेदाची गोष्ट म्हणजे त्यानंतरही पुनः एकदां ह्या ग्रंथावर नामशेष होण्याची पाळी आली.

थोड्या दिवसांपूर्वी व्याकरणाचार्य गायतोंडे शास्त्री यांनी सर्व भारतभर पुनश्च संशोधन करून या दुर्मिळ ग्रंथाची पुनः उभारणी केली, व त्याला सोप्या मराठी भाषांतराची आणि व्यासंगी व विस्तृत प्रस्तावनेची जोड दिली. अशा प्राचीन पौराणिक ग्रंथाचा हा अमोल ठेवा मराठी वाचकांच्या हातीं देतांना श्रीकात्यायनी प्रकाशन संस्थेला आनंद वाटणें साहजिक आहे.

श्री

स्कन्दपुराण




# सह्याद्रिखण्ड

डॉ. जर्सन द कुन्हा संपादित ग्रंथाची
संशोधित संवर्धित आवृत्ति, मराठी अर्थासह

संपादक
**व्याकरणाचार्य गजाननशास्त्री गायतोंडे**

**श्री कात्यायनी पब्लिकेशन्स,**
६०३, अरुण चेंबर्स, ताडदेव रोड, मुंबई – ३४

## समर्पणम् ।

ज्यांच्या कृपाप्रसादानें व पूर्ण प्रोत्साहनानें हा सह्याद्रिखंड ग्रंथ
प्रसिद्ध झाला, त्या श्रीमत् सच्चिदानन्द सरस्वती
गौडपादाचार्य स्वामी महाराज यांचे चरणीं
नम्रतापूर्वक सादर समर्पण !

# श्रीसद्गुरुमहाराजांचा आशीर्वाद



अङ्कः २५९ शके १८९३
ता. ११-११-१९७१

श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य पदवाक्यप्रमाणपारावारपारीण यमनियमासन प्राणायाम प्रत्याहार ध्यानधारणासमाध्यष्टाङ्ग योगानुष्ठानगरिष्ठनिष्ठानादिगुरुपरम्पराप्राप्त निगमागमसार श्रुतिमार्गप्रकाशक सर्वतन्त्र स्वतन्त्र श्रीमज्जमदग्नितनुज तपस्स्वाध्यायाद्यर्थ विनिर्मित शूर्पारक महाक्षेत्र गोमन्ताचल गोमतीतीरसन्निहित कुशस्थलीनगर महामठादिप्रतिष्ठापनाचार्य सकलसुर-मुकुटमणिनीराजित दिव्यश्रीभवानीशङ्करपादारविन्दाराधक श्रीमदात्मानंदसरस्वतीकरकमलसंजात श्रीमत्पूर्णानंदसरस्वत्यनुगृहीत श्रीमत्सच्चिदानंदसरस्वती श्रीपादैः

अस्मदत्यन्तप्रेमास्पदीभूत श्रीमदुमारमणचरणारविन्द भक्तिपरायण शिष्यवर्य श्रियाविराजित राजमान्य राजश्री वे. मू. गजानन शास्त्री गायतोंडे, मुंबई निवासिषु कृतनारायणस्मरण-पूर्विकाशिषः समुल्लसन्त्वद्य शके १८९३ विरोधकृत नाम संवत्सरे कार्तिक व।। नवमी गुरु वासरावधि नरके ग्रामे कुशलिनः स्मः भवदीयानामनामयत्वमनुदिनमेधमानमाशास्महे ।। विशेषस्तु :-

प्रस्तुत पत्रास कारण आपलें दि. ७-११-७१ चें विनंती पत्र मिळालें. आपल्या विनंती-प्रमाणें आपण सह्याद्रिखंडाचा उत्तरार्ध मराठी भाषांतरासह प्रसिद्ध करणार हें समजून संतोष वाटला. सह्याद्रिखंड हें स्कंदपुराणांतर्गत असून तें सध्यां तरी दुर्मिळ झालें होतें. यांत पंचगौड, पंचद्राविड व इतर ज्ञातींची माहिती असून ही माहिती असलेला यासारखा अन्य जुना ग्रंथ नाहीं. या पुस्तकाच्या प्रकटीकरणानें ज्ञातिवर्गाची माहिती देणाऱ्या ग्रंथाची उणीव दूर झाली आहे. आपणांस दीर्घायुरारोग्य प्राप्त होऊन सर्वांचें निरंतर कल्याण व्हावें, यद्विषयीं श्रीसंस्थानाराध्यदैवत श्रीभवानीशंकरचरणीं प्रार्थना करून गंधाक्षत प्रसाद पाठविला आहे. तसेंच श्रीसंस्थान देवतेचेही शुभाशिर्वाद आहेत. सुज्ञेषु किंबहुना लेखनेन इतिनारायणस्मरणम्.



श्रीमत्परमहंस-परिव्राजकाचार्य-श्रीसच्चिदानन्द-
सरस्वती-गौडपादाचार्य-पूज्यपादाः।
कैवल्यपूर - गोमन्तक

# प्रस्तावना

## सह्याद्रिखंड

सह्याद्रि हा कुलपर्वतांपैकीं एक असून हिमालयाच्या खालोखाल त्याचाच विस्तार आहे. सह्याद्रीची मुख्य रांग तापीतीरापासून कन्याकुमारीपर्यंत पसरलेली आहे. त्याची लांबी सुमारें अकराशें मैल आहे. सह्याद्रीचें उत्तरेकडील शिखर कळसूबाई हें असून दक्षिणेकडील अखेरचें शिखर महेंद्र पर्वत आहे. शंकर हा सह्याद्रीचा स्वामी व परशुराम हा अपरान्ताचा. या दोहोंमध्यें त्र्यंबकेश्वर, भीमाशंकर, महाबळेश्वर, अगस्त्यमलै, इ. शिखरें आहेत.

हिमालय देवतात्मा तर सह्याद्रि वीरात्मा. म्हणून सह्याद्रि (सह्य+अद्रि) हें त्याचें नांव सार्थ होय. सागर आपल्या प्रचंड लाटांनीं सह्याद्रीच्या तटावर आवेशानें धडाका मारीत आहे. तरीही सह्याद्रि कोसळला तर नाहींच, उलट त्यानेंच सागराला माघार घ्यावयास लावलें आहे. सह्याद्रीच्या शिखरांवरून परशुरामाच्या बाणांच्या प्रभावामुळें सागरच दोन पावलें मागें हटला, व त्यानें सह्याद्रीला अपरान्ताचा प्रदेश खंडणीदाखल दिला. म्हणून सह्याद्रीची मुख्य रांग समुद्राला प्रत्यक्ष अशी कोठेंही भिडलेली नाहीं. हेच गुण येथील रहिवाशांमध्यें उतरलेले आहेत. अनेक आक्रमकांनीं सह्याद्रीवर धडाका मारल्या पण सह्याद्रि डरला नाहीं व नमलाही नाहीं. म्हणून सह्याद्रि हा वीरात्मा !

वरील भागाच्या व तेथील लोकांच्या माहितीनें पूर्ण अशा स्कंद पुराणांतर्गत सह्याद्रिखंडाचें नांव सर्वश्रुत आहे. सह्याद्रि-परिसराचें, विशेषतः गोमंतकाचें, तीर्थक्षेत्रदृष्ट्या प्राचीन इतिहासाचें एकमेव साधन ह्या दृष्टीनें सह्याद्रिखंडाचें महत्त्व वादातीत आहे. यांत सह्याद्रीच्या परिसरांत वास करणाऱ्या विविध वर्णजातींची माहिती आलेली असून, शिवाय वेगवेगळ्या प्रदेशांचें वर्णनही उपलब्ध आहे. यांत प्राचीन समाजाच्या आचारविचारांची, चालीरीतींची व देव-स्थानांची विस्तारपूर्वक नोंद असल्यानें या पौराणिक ग्रंथाला थोडेंसें सांस्कृतिक इतिहासाचें स्वरूप प्राप्त झालें आहे. म्हणून समाजशास्त्राच्या दृष्टिकोणांतूनही या ग्रंथाचा अभ्यास उपयुक्त होईल. यांतील गोमंतकांतील तीर्थक्षेत्रांचें व देवस्थानांचें वर्णन वाचल्यावर 'गोमन्तकं काश्या यवाधिकं पुण्यम्।' हें सिद्ध होतें.

कोंकणांची उत्पत्ति परशुरामानें कशी व कां केली, हे यांत रसाळ व मार्मिक रीतीनें वर्णिलें आहे, तसेंच तेथील जातीजमातींच्या आचारविचारांचेंही निरीक्षण केलें आहे.

सध्यां उपलब्ध असलेला मुद्रित सह्याद्रिखंड अपूर्ण आहे. कारण यांत सह्याद्रीच्या उत्तर टोंकांच्या भडोच इ. चें वर्णन करणारें आमलिकाग्राममाहात्म्य व दक्षिण टोंकाचें वर्णन करणारें केरलमाहात्म्य यांचा समावेश नाहीं. यापैकीं आमलिकाग्राममाहात्म्य मुद्रित नाहीं मुद्रित सह्याद्रिखंडांत चिपळूण, गुहागर, गोमंतक, करहाट, करनाट व तुलदेश यांचें वर्णन आहे. याचे आदिरहस्य व उत्तररहस्य असे दोन भाग असून त्यांत सुमारें सात हजार श्लोक आहेत.

केरलोत्पत्ति व अप्रकाशित ग्रंथभाग एकत्र केल्यास संपूर्ण सह्याद्रिखंडाची श्लोकसंख्या सुमारें चौदा हजार होईल.

१ माहेश्वर, २ वैष्णव, ३ ब्राह्म, ४ काशी, ५ अवन्ती, ६ नागर, ७ प्रभास, इत्यादि खंडांइतकेंच हें सह्याद्रिखंड प्राचीन आहे. कारण स्कंदपुराणांतील षट्संहितेमध्यें पन्नास खंडांची जी अनुक्रमणिका दिली आहे, त्यांत सह्याद्रिखंडाचा उल्लेख आहे. स्कंदपुराणाची श्लोक-संख्या एक्याऐंशीं हजार आहे व त्याच्या उपपुराणांची श्लोकसंख्या एक लक्ष आहे.

## पुराणांत सह्याद्रिखंडाचें स्थान

महापुराण व उपपुराण असे स्कंदपुराणाचे दोन भाग आहेत. व्यंकटेश्वर स्टीम प्रेसमध्यें छापलेल्या स्कंदपुराणाच्या प्रास्ताविकांत पुढील उतारा आहे :

स्कांदं नाम पुराणं तावद् द्विविधम् – एकं स्कान्दं महापुराणं द्वितीयं च स्कान्दं नाम उपपुराणम् । महापुराणपरिगणनायां ब्रह्मवैवर्ते श्रीकृष्णजन्मखंडे ( १३२ ) अध्याये त्रयोदशं स्कांदं पुराणमुद्दिश्य —

**" एकाशीतिसहस्रं च परमेन शताधिकम् ।**
**वरं स्कन्दपुराणं च सद्भिरेव निरूपितम् ॥**
**स्कंदाह्वयास्तत्र खंडाः सप्तैव परिकल्पिताः ।**
**एकाशीतिसहस्रं तु स्कान्दं सर्वाघकृन्तनम् ॥ "**

अथ च यत्स्कान्दं नाम अन्यदपि एकं पुराणं षट्संहितात्मकं पंचाशत्खंडमंडितं लक्षग्रंथ-श्लोकसंख्योपनिबद्धं समुपलक्ष्यते तत्तु स्कान्दं नाम उपपुराणम् इति निश्चयेनावगन्तव्यम् ।

**तथाच –**
**क्षेत्रखंडः प्रथमतो द्वितीयस्तीर्थखंडकः ।**
**वर्षेऽस्मिन् भारते यानि तीर्थक्षेत्राणि सत्तमाः ॥ १४ ॥**
**काशीखंडस्तृतीयस्तु खंडः सह्याद्रिसंज्ञकः ॥ १५ ॥**
**सह्याद्रिखंडे सह्याद्रेः प्रभावः परिकल्पितः ॥ २१ ॥**
**......... ५२ ॥ ...... कालिकाखंडे प्रथमोऽध्यायः ।**

मुद्रणकला अस्तित्वांत आल्यावर प्रायः सर्व प्राचीन पुराणेतिहास ग्रंथांचें मुद्रण करण्यांत आलें. स्कंदपुराण व उपपुराणही मुद्रित केलें गेलें; पण सह्याद्रिखंडाची दखल मात्र कोणीच घेतली नाहीं ! फार काय, सह्याद्रिखंडाची एक सलग, अखंड व संशोधित प्रत देखील मिळूं शकली नाहीं ! म्हणून एक खिस्ती पं. डॉ. जर्सन द कुन्हा यांना अनेक ठिकाणीं विखुरलेल्या वेगवेगळ्या दुर्मिळ प्रती गोळा करून नवीन प्रत तयार करावी लागली. ( प्रस्तावना पृ. २८ पहा )

डॉ. कुन्हा यांनीं हें पुस्तक १८७७ सालीं प्रसिद्ध केलें. पण आज हेंही पुस्तक दुर्मिळ झालें आहे. रॉयल एशियाटिक सोसायटीसारख्या कांहीं ग्रंथालयांत तें अत्यंत जीर्ण अवस्थेंत आढळतें.

डॉ. कुन्हा–संपादित सह्याद्रिखंडांत व्याकरणदोष, छन्दोदोष व भाषादोषही आढळतात ; कारण त्याचें संशोधन केलें गेलेलें नाहीं. वस्तुतः अशा प्रकारचे दोष अन्य पुराणांत संशोधना-

नंतरही आढळतात. महाभारतांत तर कांहीं असेही श्लोक आहेत कीं, त्यांचा वाच्यार्थानें शाब्दबोधही होत नाहीं. या दोषांबरोबरच प्रक्षिप्ततेच्या आरोपांतून महाभारतादि ग्रंथही सुटूं शकलेले नाहींत. कांहीं जातींचा उत्कर्ष सहन न होऊन त्यांची निंदा करण्यासाठीं हा सह्याद्रिखंड ग्रंथ निर्माण केला गेला असेंही अलीकडे म्हणण्यांत येतें ( सह्याद्रि, लेखक स. आ. जोगळेकर, पृ. ४९० ). इथें या विधानाचा परामर्श घेण्याचा उद्देश नाहीं. एवढें बरिक खरें कीं १८ व्या शतकाच्या पूर्वीही सह्याद्रिखंड ग्रंथ प्रसिद्ध होता ! अत्यंत अप्रसिद्ध अशा पद्ये इ० जातीविषयीं माहितीसुद्धां आली आहे. तसेंच सह्याद्रि प्रदेशांतील हविक् , तामीळ, तुळु, मल्याळी इत्यादि सर्व ब्राह्मणांची ( व उत्तरभारतांतील ब्राह्मणांचीही ) माहिती या ग्रंथांत क्रमानें आली आहे.

अलीकडे सिंधी निर्वासितांसारख्या पूर्वीही राजकीय व सामाजिक घडामोडी होऊन अनेक नवीन नवीन वसाहती भारतांत व महाराष्ट्रांत निर्माण झाल्या. शक-हूण इत्यादिकांच्या भारतावर स्वाऱ्या झाल्या व तेही नंतर भारतांतच राहिले. दळणवळणांचीं साधनें अत्यल्प ! त्यामुळें खऱ्या-खोट्या वार्ता, समज-गैरसमज यांना एक प्रकारचा ऊत आला तर त्यांत आश्चर्य कसलें ? प्राचीन कालांत परदेशांतून भारतांत आलेली अशा लोकांची पदपंक्ति परत भारताच्या बाहेर गेलेली दिसत नाहीं. गंगेस मिळालेल्या नद्या गंगारूप झाल्या !

जातीय श्रेष्ठतेचा वाद सांप्रत इतिहासजमा झाला आहे. जग पुढें जात आहे. यासाठीं या पुस्तकाकडे केवळ इतिहासाकरितां इतिहास याच दृष्टीनें पाहिलें पाहिजे.

## सह्याद्रिखंडाचा काल

सामान्यतः अगोदर घटना घडतात व नंतर तद्वाचक शब्द वाङ्मयामध्यें प्रचारांत येतात. शब्दपूर्वक घटना होणें क्वचित. ‘वाचमर्थोऽनुधावति’ ही उक्ति वाल्मीकींच्या रामायणापुरतीच आहे. सर्व पुराणग्रंथ समकालीन नाहींत. म्हणून सह्याद्रिखंडांत आलेल्या शब्दांवरून त्याच्या कालाचा विचार केल्यास तें अयोग्य होणार नाहीं.

परशुरामानें सप्तकोंकणांची निर्मिति केल्यावर तेथें क्रमानें विशेषतः ब्राह्मणांची वसाहत केली. भार्गव, नागर, चित्पावन, कऱ्हाडे, सारस्वत, हविक् व नंबुद्री हे ते ब्राह्मण होत. सह्याद्रिखंडांत दशविध ब्राह्मण सांगितले आहेत :—

**द्राविडाश्चैव तैलंगाः कर्नाटा मध्यदेशगाः ॥**
**गुर्जराश्चैव पंचैते कथ्यन्ते पंचद्राविडाः ॥ २ ॥**
**सारस्वताः कान्यकुब्जा उत्कला मैथिलाश्च ये ॥**
**गौडाश्च पंचधा चैव दश विप्रा प्रकीर्तिताः ॥ ३ ॥**

चित्पावन, कऱ्हाडे, पद्ये इत्यादि ब्राह्मणांचा अंतर्भाव पंचद्राविडांत केला जातो, पण वरील पंचद्राविडांच्या यादींत हीं नांवें नाहींत. प्राचीन संस्कृत ग्रंथांतही हे शब्द नाहींत. प्रचारांत मात्र हे शब्द आहेत. वैदिक कर्मांगांसाठीं योग्यायोग्य ब्राह्मणांचा विचार ज्यांत केलेला आहे, अशा ग्रंथांतही हे शब्द नाहींत. उदा.

**अंगवंगकलिंगांश्च सौराष्ट्रान् गुर्जरांस्तथा ।**
**आभीरान् कौंकणांश्चैव द्राविडान् दाक्षिणायनाम् ।।**
**आवन्त्यान् मागधांश्चैव ब्राह्मणांश्च विवर्जयेत् ।। सौरपुराण**
**त्रिशंकून् बर्बरानान्ध्रान् द्रविडकोंकणांस्तथा ।**
**कर्नाटकांस्तथाभीरान् कलिंगांश्च विवर्जयेत् ।। हेमाद्रिमात्स्य**

—धर्मसिंधु ( निर्णयसागर, पृ. ३९९–४०० )

चित्पावन, कऱ्हाडे, पद्ये इत्यादि जातिवाचक शब्द केव्हांपासून प्रचारांत आले ? या शब्दांचा सह्याद्रिखंड पुराणाशीं संबंध असेल काय ? याहीपेक्षां महत्त्वाचा शंकाप्रश्न अनुत्तरित राहतो तो हा कीं, हे अध्याय प्रक्षिप्त–कल्पित मानल्यास या जातींचीं अगोदरचीं नांवें कोणतीं ? प्राचीन पुस्तकांत ' महाराष्ट्र ' शब्दाऐवजीं ' मध्यदेश ' हा शब्द आलेला आहे. सह्याद्रिखंडांत महाराष्ट्र शब्द एकदाच आला आहे. अर्थात् हा विषय भाषाशास्त्रीय इतिहाससंशोधकांचा आहे. एवढें निश्चित कीं, सह्याद्रिखंडाचा काल या शब्दांच्या अनुसंधानानें निश्चित करतां येईल.

मुसलमानांनीं यादवांचें देवगिरीचें राज्य बुडविलें तेव्हां प्रतापबिंब राजानें अपरान्तांत महिकावतीस नवीन स्वतंत्र राज्य स्थापन केलें. पैठणहून बागलाणांतून अनहिलवाड्यावरून इकडे येतांना त्यानें सोमवंशी क्षत्रिय पाठारे व यजुर्वेदी ब्राह्मण बरोबर आणले व त्यांच्या योग-क्षेमाची तजवीज केली असा इतिहास आहे. पाठारे हे प्रतिहार. मुसलमानांनीं कनोज काबीज केल्यावर ते दक्षिणेंत आले, व यादवांच्या सैन्यांत सामील झाले. देवगिरीच्या पाडावानंतर गंगथडी सोडून ते अपरान्तांत स्थायिक झाले. सह्याद्रिखंडांत याबाबत पुढील श्लोक आहे :

**पैठणे पत्तने शप्ता मया कोपवशात् किल ।**
**पाठारीयाः प्रसिद्धा ये पैठणाख्या भवन्तु ते ॥ आदिरहस्य**

ही घटना ६ व्या शतकांतील आहे.

तसेंच सह्याद्रिखंडांत मयूरशर्म्याचाही उल्लेख आहे. मयूरशर्म्याचा[1] राज्यकाल अनुमानानें इ. स. ३४५ ते ३७० असा निश्चित करण्यांत आलेला आहे. या दोन उल्लेखांवरूनही सह्याद्रि-खंडाचा रचनाकाल ठरवितां येतो.

अकराव्या शतकाच्या आरंभीं मुसलमानांनीं उत्तर हिंदुस्तानवर अफगाणिस्तान व इराणमधून वरचेवर हल्ले केले. या हल्ल्यांच्या वेळीं १२ व्या शतकाच्या उत्तरार्धात देवशर्मा ब्राह्मणानें कोंकणचा रस्ता सुधारला. तो काश्यप गोत्री व यजुर्वेदी ब्राह्मण सत्यवादी व जितेंद्रिय असून वेदवेदांगांत पारंगत होता.

**जान्हवीतीर संभूतो वेदवेदांगपारगः । श्रुताध्ययनसंपन्नः सत्यवाणी जितेंद्रियः ॥**
**काश्यपो देवशर्मेति ब्राह्मणो ब्रह्मवित्तमः । यजुषां पारगो दान्तः षट्कर्मनिरतोऽभवत् ॥**
**तुरुष्कोपप्लवात्तत्त कौंकणं समगादयम् ।।** ( Mem. Sawantwaree State, p. 302 )

---

१ सह्याद्रि, ले. जोगळेकर, पृ. ३२९

वरील शिलालेख व सह्याद्रिखंड, मांगीशमाहात्म्य अ. ६ यांत आलेला देवशर्मा ब्राह्मणाचा उल्लेख यांवरून सह्याद्रिखंडाचा काल १२ व्या शतकानंतरचा आहे, असें कांहीं लोक समजतात; पण हें मत बरोबर नाहीं. कारण सह्याद्रिखंड अध्याय ६ मधील देवशर्मा वत्सगोत्री ऋग्वेदी आहे. अद्यापही मंगेश देवस्थानांत देवशर्मा या मूळपुरुषाची पूजा वत्सगोत्री सारस्वत ब्राह्मणच करतात.

सह्याद्रिखंड, अध्याय १२, श्लोक ४२ यांत माध्वमताचा उल्लेख आहे. मध्वाचार्यांचा काल तेरावें शतक (११९९ ते १२९४) आहे. यावरून सह्याद्रिखंडाचा रचनाकाल १३ व्या शतकापूर्वी असूं शकत नाहीं, किंवा तेवढा भाग प्रक्षिप्तही असूं शकतो. यावरून आपण सामान्यतः सह्याद्रिखंड हा पुराणग्रंथ अन्य पुराणांइतकाच प्राचीन होय, एवढें म्हणूं शकतों.

## श्रीपरशुराम[1]

**कंकणवद्धृतगंगं कोंकणसिद्धाय दर्शितस्वांगम् ।**
**कंकणशोभिभुजंगं कोंकणनाथं नमामि साष्टांगम् ॥**

सत्त्व, रज व तम या त्रिगुणांनीं युक्त अशा परमेश्वरी शक्तींपैकीं विश्वाचें पालन करणाऱ्या सात्त्विक शक्तीची देवता विष्णु याचा सहावा अवतार; श्रीशंकराचा श्रेष्ठ भक्त म्हणून शिवविष्णूंचें अद्वैत; "अग्रतश्चतुरो वेदाः" व "पृष्ठतः सशरं धनुः" अशी ज्याची दिव्य मूर्ति, म्हणून ब्राह्म व क्षात्र या दोन तेजांचा सुंदर संगम; सह्याद्रीच्या अपरान्त भागाचा अर्थात् सप्तकोंकणांचा निर्माता; स्वयंनिर्मित भूमींत स्वयंप्रेरित जमातींचा संस्थापक; दुर्बलांचा रक्षणकर्ता व 'क्षतात् किल त्रायत इत्युदग्रः क्षत्रस्य शब्दो भुवनेषु रूढः' या क्षत्रिय जातीच्या ब्रीदाला पराङ्मुख झालेल्या क्षत्रियाधमांचा संहारकर्ता; एवंगुणविशिष्ट, पुराणप्रसिद्ध श्रीपरशुराम ही कोंकणांची अधिष्ठात्री मंगलदेवता होय.

पवित्र नर्मदातीरावर भृगुकुलोत्पन्न जमदग्नीचा आश्रम होता. तेथें परशुरामाचा जन्म त्रेता व द्वापार यांच्या संधिकालांत वैशाख शुद्ध तृतीयेला झाला. त्याची आई रेणुका ही क्षत्रियकन्या होती. पितृसावर्ण्यामुळें तो ब्राह्मण ठरला. त्याचे आजोबा ऋचीक यानीं विश्वामित्राच्या सत्यवती नामक बहिणीशीं विवाह केला होता. म्हणजे परशुरामाचे आजोबा ब्राह्मण व आजी क्षत्रिय होती. परशुरामाला रुमण्वत, सुषेण, वसु व विश्वावसु असे चौघे भाऊ होते. परशुराम हा सर्वांत धाकटा, पण पराक्रमांत सर्वांत मोठा !

परशुराम मोठा बुद्धिमान् होता. उपनयनानंतर शाल्ग्रामपर्वतावर जाऊन त्यानें कश्यपाकडून मंत्रोपदेश घेतला. थोड्याच कालांत तो विद्याप्रवीण झाला. त्याची धनुर्विद्येवर विशेष भक्ती होती. नंतर त्यानें गंधमादन पर्वतावर जाऊन शंकराची आराधना केली व त्यापासून सर्व प्रकारचीं अस्त्रें व परशूही प्राप्त करून घेतला. या परशूचें वैशिष्ट्य म्हणजे त्याची धार कधींच बोथट होत नसे.

---

१ ही कथा परशुरामविजय व अन्य पुस्तकांच्या आधारें ग्रथित केलेली आहे.




परशुराम कसा दिसत होता, याविषयींचें वर्णन वाल्मीकि रामायणांत केलें आहे.

**ददर्श भीमसंकाशं जटामंडलधारिणम् ॥**
**भार्गवं जामदग्न्येयं राजा राजविमर्दनम् ॥ १७ ॥**
**कैलासमिव दुर्धर्षं कालाग्निमिव दुःसहम् ॥**
**ज्वलन्तमिव तेजोभिर्दुर्निरीक्ष्यं पृथग्जनैः ॥ १८ ॥**
**स्कन्धे चासज्य परशुं धनुर्विद्युद्गणोपमम् ॥**
**प्रगृह्य शरमुग्रं च त्रिपुरघ्नं यथा शिवम् ॥ १९ ॥ ( बालकांड, अ. ७४ )**

जटामंडलामुळें भव्य दिसणाऱ्या परशुरामाला पाहून दशरथ राजाला वाटलें कीं, जणुं पंचमहाभूतांपैकीं तेज हें तत्त्वच मूर्तिमंत समोर ठाकलें आहे ! राजाला तो कैलासाप्रमाणें दुर्धर्ष व कालाग्नीप्रमाणें दुःसह वाटला. त्याच्या खांद्यावर परशु होता व जणुं विजेच्या लोळासारखें धनुष्य होतें. त्याच्या हातांत तीक्ष्ण बाण होता. त्रिपुरांतक शिवासारखा तो दिसत होता.

एकदां रेणुका नदीवर पाणी आणण्यासाठीं गेली होती. त्याचवेळीं तेथें स्त्रियांसह जलविहार करीत असलेल्या चित्ररथ गंधर्वाला पाहून तिचें मन थोडेंसें विचलित झालें. तिच्या मनाची ही अवस्था जमदग्नीला अंतर्ज्ञानानें कळून चुकली. म्हणून त्यानें क्रोधान्ध होऊन आपल्या एकामागून एक चारही मुलांना रेणुकेचा वध करण्याची आज्ञा केली. पण त्यांपैकीं कोणीही तिच्या वधासाठीं हात उचलला नाहीं. परशुराम मोठा मातृपितृभक्त होता. ‘ आज्ञा गुरूणां ह्यविचारणीया ’ या तत्त्वाचा मोठा आदर्शच ! त्यानें ती वडिलांची आज्ञा ताबडतोब कृतींत आणली ! नंतर पित्यानें त्यास ‘ वर माग ’ असें म्हणतांच ‘ आपली माता जिवंत व्हावी ’ असाच वर मागितला. जमदग्नीनेंही प्रसन्न होऊन रेणुकेला पुनश्च सजीव केलें.

जमदग्नीच्या समकालीं नर्मदेच्या उत्तरतीरावर हेहयकुलोत्पन्न कार्तवीर्य राजा राज्य करीत होता. त्याला सहस्र बाहु ( साथीदार ? ) होते म्हणून त्यास सहस्रबाहु असेंही म्हणत. त्याला साम्राज्यसत्तेचा मद चढला होता. तो देवब्राह्मणांना जुमानीत नसे. एके दिवशीं त्यानें वसिष्ठाचा आश्रम नाहक जाळून टाकला. तेव्हां वसिष्ठानें त्याला शाप दिला कीं भार्गव राम तुझे सहस्र बाहू तोडून तुझा वध करील ! म्हणून भार्गवांच्या सामर्थ्याचा अंदाज घेण्यासाठीं तो जमदग्नीच्या आश्रमांत आला व त्यानें जमदग्नीची सवत्स कामधेनु जबरदस्तीनें पळवून नेली. त्यावेळीं परशुराम आश्रमांत नव्हता. तो परत आल्यावर त्याला ही सर्व हकीगत समजली. लगेच त्यानें कार्तवीर्याच्या वधाची प्रतिज्ञा केली; नर्मदेच्या तीरावर येऊन त्यानें कार्तवीर्याला युद्धाचें आव्हान दिलें व द्वंद्वयुद्धांत त्याला ठार केलें. कार्तवीर्याचे पुत्र परशुरामावर धावून आले; त्यांचाही त्यानें समाचार घेतला. त्यापैकीं पांच पुत्र जीव घेऊन पळाले व हिमालयाच्या कुशींत जाऊन लपले.

विजय संपादून व कामधेनु घेऊन परशुराम आश्रमांत आला, तेव्हां जमदग्नीनें त्यास क्षात्रवधाबद्दल दोष देऊन बारा वर्षें तीर्थयात्रेस पाठविलें.

परशुराम तीर्थयात्रेस गेल्याची संधि साधून कार्तवीर्याच्या वधाचा सूड घेण्यासाठीं हैहयांनीं भार्गवाश्रमावर छापा घातला, त्यावेळीं जमदग्नि ध्यानस्थ होता. तशा स्थितींतच त्याचा वध करून आणि त्याचें शिर तोडून घेऊन हैहय माहिष्मतीकडे निघून गेले. ह्या घोर प्रकाराचें वृत्त परशुरामाच्या कानावर गेलें. तो तप सोडून त्वरेनें आश्रमाकडे आला. त्याला पाहतांच रेणुकेनें हंबरडा फोडला व पतीच्या कलेवरावरील एकवीस जखमा पुत्राला दाखवून तिनें एकवीस वेळां ऊर बडवून घेतला ! त्याच क्षणीं परशुरामानें घोर प्रतिज्ञा केली कीं, "ह्या क्रूर वधाबद्दल मी २१ वेळां पृथ्वी निःक्षत्रिय करीन !"

मग तो कावडीच्या एका पारड्यांत जमदग्नीचें प्रेत ठेवून व दुसऱ्या पारड्यांत माता रेणुकेला बसवून कान्यकुब्जाश्रमांतून निघाला आणि अनेक तीर्थें, क्षेत्रें व अरण्यें ओलांडून सह्याद्रीवरील मल्लकी नामक दत्तक्षेत्रांत आला. एवढ्यांत आकाशवाणी झाली कीं 'तूं इथेंच पित्याचा अग्निसंस्कार कर." मग परशुरामानें तेथें जमदग्नीच्या प्रेताला मंत्राग्नि दिला. रेणुका त्या प्रसंगीं सती गेली. (रेणुकामाहात्म्य) मल्लकी (अलकी–आमलिका) म्हणजे हैदराबाद राज्यांतील माहूर क्षेत्र होय. हें स्थान सातमाळ श्रेणीच्या पश्चिम किनाऱ्यावर आहे. तेथें डोंगरावर दत्तात्रेयाचें स्थान व रेणुकेचें मंदिर आहे. त्यांत रेणुकेची मूर्ति नाहीं, फक्त मुखवटा आहे.

परशुराम मोठा शूर व दृढप्रतिज्ञ होता. मातापित्यांची उत्तरक्रिया केल्यावर तो थेट कार्तवीर्याच्या प्रदेशांत शिरला व त्यानें सहस्रार्जुनाच्या सर्व पुत्रांना कंठस्नान घातलें. यानंतर विविध देशांत क्षत्रियाधमांनीं उठाव केला. पण प्रत्येक वेळीं परशुरामानें त्यांचा पूर्ण विध्वंस केला. अंग, वंग, कलिंग, विदेह, काश्मीर, दरद, कुंती, शिबि, क्षुद्रक, ताम्रलिप्ति, वीतिहोत्र, त्रिगर्त, मार्तिकावर्त, मालव वगैरे देशांच्या उन्मत्त राजांचा त्यानें संहार केला. त्यानें शेवटचें युद्ध समंतपंचकावर केलें, क्षत्रियरक्ताच्या डोहांत आपला परशु धुतला व शस्त्र खालीं ठेवलें. क्षत्रियांच्या रक्तानें त्यानें आपल्या पितरांचें तर्पण केलें ! (महाभारत, अरण्यपर्व) या क्षत्रियविजयामुळें तो पृथ्वीचा सर्वसत्ताधीश झाला. म्हणून त्यानें तीनदां पृथ्वीप्रदक्षिणा करून अश्वमेध यज्ञ केला. यज्ञांत कश्यप अध्वर्यु होता. त्या यज्ञाची वेदी सुवर्णाची होती. ती दहा वांव लांब व नऊ वांव उंच होती. यज्ञाच्या अखेरीस परशुरामानें दक्षिणा म्हणून रणयज्ञांत संपादिलेल्या समस्त भूमीचें दानोदक कश्यपाच्या हातावर सोडलें. त्यामुळें क्षणापूर्वींचा पृथ्वीपति परशुराम अकिंचन झाला; पण पृथ्वीचें दान घेतलेल्या कश्यपास विवंचना पडली ! कारण क्षत्रिय नाहींसे झाल्यामुळें दुष्टांचा शास्ता राहिला नाहीं. दुष्ट लोक उपद्रव करूं लागले. पृथ्वी अनाथ झाली. क्षत्रिय प्रकट होण्यास घाबरूं लागले. यास्तव कश्यप परशुरामास म्हणाला कीं, 'यज्ञांत तूं दान दिल्यामुळें ही पृथ्वी माझी झाली आहे. म्हणून तुला या पृथ्वीवर राहण्याचा अधिकार नाहीं.'

कश्यपाची ती आज्ञा मानून परशुराम आर्यावर्तांतून निघून महेंद्रगिरीवर वास्तव्याला गेला. नंतर कश्यपानें जागोजाग क्षत्रियकुळांची स्थापना करून मूळचीं त्यांचीं त्यांचीं राज्यें त्यांना त्यांना देऊन टाकलीं. म्हणून पृथ्वीस काश्यपी हें अभिधान प्राप्त झालें.

## परशुरामनिर्मित प्रदेश

महेंद्रगिरीवर राहात असतां परशुरामानें समुद्र हटवून स्वतःचें परशुरामक्षेत्र निर्माण केलें. सह्याद्रीच्या उत्तर टोंकावर साल्हेरचा डोंगर आहे, तेथें एक मध्ययुगीन गड असून त्यांच्या एका टोंकावर परशुरामाचें मंदिर आहे. मंदिराच्या उत्तरेस शंभर हातांवर मनुष्याच्या पावलांच्या चौपट आकाराचीं दोन पावलें खोदलेलीं आहेत. बाण मारतांना मनुष्य ज्या पावित्र्यांत पावलें ठेवील त्या पावित्र्यांत त्यांची योजना केलेली आहे. या ठिकाणीं उभें राहून परशुरामानें समुद्रावर बाण मारला व समुद्र मागें हटविला, असें सांगतात. तसेंच दक्षिणेस सह्याद्रीच्या अंतिम टोंकाला तिरुवितांकुर जिल्ह्यांत महेंद्रगिरि नांवाचा डोंगर आहे. हें परशुरामाचें कायमचें वासस्थान आहे, असें मानतात. केरल माहात्म्यामध्येंही अगस्त्यमलै नजीक महेंद्रपर्वतावरून शरसंधान करून केरल प्रांत निर्माण केल्याचें सांगितलें आहे. त्र्यंबकेश्वर येथील पर्वतावरून तसेंच भीमाशंकरहून धनुष्यावर दोन दोन शर ठेवून परशुरामानें भयंकर पाशुपतास्त्र समुद्रावर सोडलें. त्यामुळें सहा योजन लांब समुद्र शुष्क होऊन तेवढा भूभाग मोकळा झाला. अशा रीतीनें भार्गवानें सात वेळां शरसंधान करून सात प्रदेश ( सात त्रिकोण ) निर्माण केले.

केरलाश्च तुळुंगाश्च तथा सौराष्ट्रवासिनः ॥ ४७ ॥
कोंकणाः करहाटाश्च करनाटाश्च बर्बराः ॥
इत्येते सप्त देशा वै कोंकणाः परिकीर्तिताः ॥ ४८ ॥

सह्याद्रीच्या पश्चिमेकडील याच प्रदेशाला अपरांत अशीही संज्ञा आहे. अपर ( पश्चिम ) देशाच्या पश्चिमेकडील अखेरचा प्रदेश होय. कच्छ, काठेवाड, सौराष्ट्र, अबू, माहीम खोरें, भडोच व नाशिक यांचा समावेश पौराणिक अपरांतांत करण्यांत येत होता. कोंकण हें अपरान्ताचें प्राकृत अभिधान आहे. बृहत्संहिता, पद्मपुराण इ. ग्रंथांत कोंकणाचा उल्लेख आहे. समुद्रकांठच्या प्रदेशांतील हीं सात खंडें काठेवाडांतील सोमनाथपासून कन्याकुमारीपर्यंत पसरलीं आहेत. सौराष्ट्र, बर्बर, कोंकण, करहाट, करनाट, तुळुंग व केरळ असा हा सप्तकोंकणाचा क्रम आहे.

कोंकण हें खरें नांव नसून तो कुकोण चा अपभ्रंश असावा. कु + कोण म्हणजे पृथ्वीचा कोण, असें ' परशुरामविजय ' या पुस्तकांत सांगितलें आहे.

शतयोजनदीर्घं तु विस्तृतं च त्रियोजनम् ॥
रोपित्वा तत्र बीजानि कदल्यादिविशेषतः ॥ ५७ ॥
नारिकेली सतांबूली सपूगाः पनसास्तथा ॥
सचूतैः कंदमूलाद्यै रोपित्वा चाद्भुतं ददौ ॥ ५८ ॥
गौतम्या दक्षिणे भागे शतार्धं योजनान्वितम् ॥
कुकोणं तु स्थलं ज्ञेयं रामेण प्रतिपादितम् ॥ ५९ ॥
तदुत्तरार्धस्य तथा तौलं कर्नाटकं क्रमात् ॥
तथा ते पांड्यता चैव रामेण कृतभूमिका ॥ ६० ॥

अद्यारभ्य भविष्यंति नाम्ना कुकोणसंज्ञितम् ।।
व्यवहारेषु सर्वेषु प्रख्यातं च भविष्यति ।। ६१ ।।

"षट्पंचाशत् देशविभागः शक्तिसंगमतंत्रपुस्तकम् (iii)" या पुस्तकांत कांहीं कोंकणांच्या प्रदेशमर्यादा दर्शविल्या आहेत :

१ सौराष्ट्र — कोंकणात्पश्चिमं तीर्त्वा समुद्रप्रांतगोचरः ।
हिंगुलाजान्तको देवि शतयोजनमाश्रितः ।।
सौराष्ट्रदेशो देवेशि नाम्ना तु गुर्जराभिधः ।।

२ बर्बर — श्रीकोंकनादधोभागे तापीतः पश्चिमोत्तरे ।
आभीरदेशो देवेशि विन्ध्यशैले व्यवस्थितः ।।

३ कोंकण — (अ) अथ षट्कं समारभ्य कोटीशस्य तु मध्यगः ।।
समुद्रप्रांतदेशो हि कों (कौं) कणः परिकीर्तितः ।।
(आ) अथाभ्यंगं समारभ्य कटिदेशस्य मध्यदेशगः ।
समुद्रप्रांतदेशो हि कोंकणः परिकीर्तितः ।।

४ कर्नाटक — कर्नाटदेशो देवेशि साम्राज्यभोगदायकः ।
ताम्रपर्णीसमारभ्य शैलार्धे (?) रुत्तरार्धतः ।।

५ केरल — सुब्रह्मण्यं समारभ्य यावद्देशो (वो) जनार्दनः ।
तावत्केरलदेशःस्यात् तन्मध्ये सिद्धिकेरलः ।।
रामेश्वरो व्यंकटेशो हंसकेरलबोधकः ।
अनंत शैलमारभ्य यावत्स्यादुडुपं पुरम् ।।
तावत्सर्वेशनामा तु केरलः परिकीर्तितः ।।

या ग्रंथांत तौलव प्रदेशाचें वर्णन नाहीं. पण तुळु भाषा बोलणारे लोक कोचीन, उडुपी व त्रावणकोर संस्थानांत बहुसंख्य आहेत. हाच तौलव प्रदेश होय. करहाट हा भाग महाराष्ट्रांतर्गत आहे. महाराष्ट्र पुढीलप्रमाणे आहे —

त्र्यंबकं च समारभ्य मध्ये चोज्जयिनी शिवा ।
मार्जारतीर्थं राजेंद्र कोलापुरनिवासिनी ।
तावद्देशो महाराष्ट्रः कर्नाटस्याभिगोचरः ।।

गोमन्तक —

ततश्च्युता गमिष्यामः सह्यस्य विवरे गिरिम् ।
गोमन्तमिति विख्यातं नैकशृंगविभूषितम् ।। १४ ।।

हरिवंश, विष्णुपर्व, अ. ३९

पर्वतेऽत्र भगवती गोमतीरूपेण राजते ।
गोमन्ते गोमती देवी मंदिरे कामचारिणी ।। ५७ ।।

देवी भागवत, ७।३९

गोमंताची दक्षिणोत्तर लांबी ६१ मैल, पूर्वपश्चिम रुंदी ४५ मैल व क्षेत्रफळ १०६२ चौ. मैल आहे. येथें गोवा वेटांत गोमांचल पर्वत आहे. हा प्रसिद्ध गोमंतपर्वत सह्याद्रीचाच एक भाग असून तो अनेक शिखरांमुळे फार सुंदर दिसतो. तेथेंच भगवती देवी 'गोमती' या नांवानें वास करीत आहे. उत्तर कर्नाटकाच्या अगदीं उत्तर टोंकाला गोमंतकाच्या सरहद्दीवर काळी नदी (गंगावली) चा उगम आहे. तेथेंच तिच्या दोन शाखा होतात. एकीचे नांव पांढरी (उजळी) व दुसरीचे नांव काळी. काळी नदी कुवेशी घाटावरून खालीं जोरानें उतरते. तेथें तिला 'दूध सागर' हें अभिधान प्राप्त झालें. ह्या धबधब्याचा प्रवाह गोमन्तपर्वतावरून वाहतो म्हणून किंवा तेथें गोमती देवी आहे म्हणून ह्या प्रवाहाला गोमती नदी हें अन्वर्थक नांव मिळालें आहे. ही नदी सत्तरींतील मादय (महादायी) नदीशी संगम पावते. तिचा एक फांटा जुवें, कुंभारजुवें, पानवेल, रायबंदर व पणजीच्या बाजूनें समुद्राला जाऊन मिळतो, आणि दुसरा फांटा आगशी (अघाशी), कुडाळ (कुशस्थळी), मुर्गांव मार्गें समुद्राला जाऊन मिळतो. गोमंतकांतील सर्व नद्यांत प्रमुख अशा ह्या गोमती नदीनें आपले दोन्ही हात पसरून तीसवाडी–साष्टीचा ९६ गांवांचा सुंदर व पवित्र भाग जणुं काय आपल्या हृदयाशीं धरला आहे! हें वर्णन सह्याद्रिखंडांत (चंद्रचूडमाहात्म्य) वाचा —

इयं कुशवती पुण्या जाता चोभयतोमुखी ।
शृण्वाना परमां पुण्यां लवणोदधिगर्जनाम् ॥
सेव्यमाना कुशवती ह्यघसंचयहारिणी ॥ १२–१३ ॥

मुसलमानी अमदानींत ह्या गोमती नदीच्या कांठावर असलेल्या गोवें शहरांतील मानडबीं (जकातीचें ठिकाण) वरून पोर्तुगीज लोकांनी गोमतीला (Mandovi*) मांडोवी हें नांव दिलें. तिचें प्राचीन अस्सल नांव गोमती हेंच आहे.

प्राचीन काळीं गौडपादाचार्यांचा प्रमुख मठही **गोमती**तीरस्थ कुशस्थळीमध्यें होता, याविषयीं मठांतील परंपरागत पत्राचा मायना —

श्रीमत्परमहंस–परिव्राजकाचार्य–पदवाक्यप्रमाणपारावारपारीण–यमनियमासन–प्राणायाम–प्रत्याहार–ध्यानधारणासमाध्यष्टाङ्ग–योगानुष्ठानगरिष्ठनिष्ठानादिगुरुपरम्पराप्राप्त – निगमागमसार – श्रुतिमार्गप्रकाशक–सर्वतन्त्र–स्वतन्त्र–श्रीमज्जमदग्नितनुज–तपस्स्वाध्यायाद्यर्थ–विनिर्मित–शूर्पारक–महाक्षेत्र–गोमन्ताचल–गोमतीतीरसन्निहित–कुशस्थलीनगर–महामठादिप्रतिष्ठापनाचार्य –सकल–सुरमुकुटमणिनीराजित–दिव्यश्रीभवानीशङ्करपादारविन्दाराधक–श्रीमदात्मानंदसरस्वतीकरकमल–संजात–श्रीमत्पूर्णानंदसरस्वत्यनुगृहीत–श्रीमत्सच्चिदानंदसरस्वती–श्रीपादैः—

*An Historical and Archaeological Sketch of the City of Goa by J. N. Da Fonseca, Bombay, 1878 PP. III 191. Note I "Mondovi is called Gomati by Hindus. The custom house during the Muhammedan Government was called Mandvi or Mandovi, a name which was subsequently given to the adjoining river.

सूतसंहितेंत गोमंतकाला ' गोवा ' असेंही म्हटलें आहे ---

गोकर्णादुत्तरे भागे सप्तयोजनविस्तृतम् ॥
तत्र गोवापुरी नाम नगरी पापनाशिनी ॥ १ ॥

परशुराम ही असामान्य शक्तीची अलौकिक व्यक्ति होऊन गेली. परशुरामाला विष्णूच्या अवतारांत व सप्त चिरंजीवांत स्थान मिळालें आहे. परशुरामाचा अंत कसा झाला, हें पुराणांत नमूद नाहीं म्हणून चिरंजीव हें विशेषण त्याला मिळालें ! हा एक वाङ्मयसंकेत असावा असें दिसतें. तसेंच त्यानें २१ वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली हा वदतो व्याघात होय. म्हणून २१ वेळां क्षत्रियांशीं युद्धें केली, असा त्याचा अर्थ केला पाहिजे. तो क्षत्रिय जातीचा वैरी नव्हता. कारण प्रतिज्ञा पूर्ण केल्यावर त्यानें क्षत्रियांना अस्त्रविद्या शिकविल्याचा पुराणांत उल्लेख आहे.

त्यानें सहस्रार्जुनाचा संहार केला, याचा अर्थ त्याच्या हजार साथीदारांचा संहार केला. सर्वत्र विजय प्राप्त झाल्यावर त्याला पृथ्वीचें राज्य मिळालें. पण त्याचा उपभोग न घेतां सर्व पृथ्वीदानाचें पाणी कश्यपाच्या हातावर सोडलें, यांत त्याच्या क्षत्रियसंहाराची पार्श्वभूमि लक्षांत येण्यासारखी आहे.

क्षत्रियसंहारानंतर त्यानें आपलें लक्ष दलितोद्धारावर केंद्रित केलें. अपरान्तांतील अनार्य व त्याचे स्थानिक पुरोहित यांच्या आर्यीकरणाचा पायंडा परशुरामानेंच घातला. अपरान्त प्रदेश कृषियोग्य करून त्या ठिकाणीं त्यानें वसाहती स्थापन केल्या. थोडक्यांत, परशुरामानें दुर्जनांचा संहार करून संस्कृतिसंवर्धनाचें कार्य केलें.

## परशुरामाचा काल

श्रीपरशुरामाच्या कालाविषयीं अनेक मतें आहेत. तीं येथें दिलीं आहेत.

१. त्रेता व द्वापार या दोन युगांच्या संधिकालांत परशुरामाचा अवतार झाला, असें सह्याद्रिखंडांत सांगितलें आहे.

विचार्यैवं जगामाशु पारावारस्य संनिधिम् ।
त्रेताद्वापारयोः सन्धौ समुद्रस्योदरे स्थिताम् ॥
भूमिं ययाचे वासाय पारावारं स्वयं हरिः ॥

मांगीशमाहात्म्य, अ. २-११-१२

२. त्रेतायुगांत दाशरथि राम व द्वापारांत राम-कृष्ण यांचे अवतार झाले. दाशरथि रामाच्याही पूर्वी परशुरामाचा अवतार झाला. म्हणून त्रेतायुगाचीं १२ लक्ष ९६ हजार, द्वापारयुगाचीं ८ लक्ष ६४ हजार आणि कलियुगाचीं चालू वर्षें मिळून सुमारें २५ लक्ष वर्षें परशुरामाच्या अवतारास होतात.

३. अधिकारः विश्वसृजामयने मनुष्याणामेव संवत्सरशब्दस्य दिवसपरत्वात् । ( मीमांसा सूत्र अ. ६ पा. ७ अधिकरण १३. सूत्रें ३१ ते ४०, शाबरभाष्य ) या मीमांसाशास्त्रांत

मनुष्याच्या बाबतींत संवत्सर शब्द दिवसपरत्वें मानलेला आहे. म्हणून युगकल्पना पुढील-प्रमाणें मानतात.

संध्यंशांसह कृतयुग ४८००; त्रेतायुग ३६००; द्वापारयुग २४०० व कलियुग १२०० वर्षें. अशा या चार युगांचें मिळून एक महायुग किंवा चतुर्युग बनतें. याची एकंदर संख्या बारा हजार वर्षें होते. या दृष्टीनें विचार केल्यास त्रेता + द्वापार + कलि मिळून सामान्यपणें परशुरामाच्या अवतारास सात हजार वर्षें होतात.

४. ब्राह्मणशासक परशुरामानें मलबारमध्यें आपला शक सुरू केला व पेरुमल राजाला राज्यावर बसविलें. ही वेळ तेथील वाटाच्या पूर्वेला एका शिळेवर पुढील शब्दांत नोंदलेली आहे--

'भूमन्भूपोऽयं प्राप्यं = १२११४०४ ( कलिसावनदिन, कटपयादि पद्धतीनें अथवा २१६ इ. स. या शकाचें वर्ष सौर असून सिंहमासापासून त्याचा वर्षारंभ होतो. त्याचें संवत्सर एक हजार वर्षांचें असून सांप्रत चौथें चक्र चालू आहे. याला कोल्लम शक असेंही म्हणतात. ( परशुराम चरित्र, श्री. म. माटे, १९३८ )

शके १८३६ सालीं कै. राजवाडे यांनी "चित्पावन ब्राह्मण" हा निबंध लिहिला. ( भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणें, द्वितीय संमेलन वृत्तांत–लेख, आषाढ १८५९ ) या निबंधांत त्यांनीं परशुरामाचा काल दिला आहे.

मलबारांत परशुरामशक कलिवर्ष १९२७ मध्यें सुरू झाला. म्हणजे त्याला आज ३०८८ ( + २३ ) वर्षें लोटलीं. [ एवढ्यावरून चित्पावनांचे १४ मूळ पुरुष ३०८८ + २३ वर्षांमागें कोंकणांत आले, हें सिद्ध होतें. ] नंबुद्री ब्राम्हणांची वसाहत मलबारांत त्या काळीं झाली. ह्यांची वसाहत केल्याबरोबर परशुराम शकही चालू केला, असें निश्चित म्हणतां येणार नाही. अर्थात् त्या सुमारास शक सुरू झाला; म्हणजे त्यापूर्वीही परशुराम होता. रामाच्या पूर्वी परशुरामाचें कार्य संपलें होतें; तरी परशुराम हा रामावतारांत व कृष्णावतारांतही होता. शकपूर्व सुमारें ३॥ हजार वर्षें श्रीकृष्णाचा अवतार झाला, हें मत ग्राह्य धरलें तर रामचंद्राचा काल याच्या मागें निदान एक हजार वर्षें जातो; मागल्या अवतारांतील अंतर उत्तरोत्तर कमी होत जातें म्हणणें सयुक्तिक आहे. असें दिसत असल्यामुळें परशुरामाचा काळ रामाच्याही मागें ५०० वर्षें धरावयास हरकत नाहीं. प्रत्यक्ष भृगुऋषींनीं ऋग्वेदांत एक ऋचा लिहिली आहे. परशुराम हा भृगुऋषीचा पणतू हे लक्षांत घेतां दाशरथि रामाच्या मागें कांहीं शतकें गेल्यावर आपणास परशुरामाचा काल लागेल, हें स्पष्ट आहे. अर्थात् निदानपक्षीं परशुरामाचा काल सुमारें सात हजार वर्षांच्या पूर्वीचा असावा.

## वंशपरंपरेनुसार परशुरामाच्या कालाची स्थूल कल्पना

वरुण
|
भृगु = पौलोमी
|
च्यवन = सुकन्या
|
अप्रवण = ऋची — प्रमति = घृताची — दधीच = सरस्वती

अप्रवण = ऋची
|
और्व
|
ऋचीक = सत्यवती
|
जमदग्नि = रेणुका
|
परशुराम

इक्ष्वाकु ( चंद्रवंश )
|
भीम
|
कांचन
|
सुहोत्र
|
जन्हु = कावेरी
|
सुहोत्र
|
अजक
|
बलाकाश्व
|
कुशिक
|
गाधि = पौलकुशी
|
१ सत्यवती २ विश्वामित्र

### चंद्रवंश

१ विवस्वत्, २ मनु, ३ पुरूरवा, ४ नहुष, ५ ययाति, ६ पुरु, ७ अहंयाति, ८ देवातिथि, ९ अंत्यनार, १० इलील, ११ दुष्यंत, १२ भरत, १३ सुहोत्र, १४ हस्ती, १५ अजमीढ, १६ सविरण, १७ कुरु, १८ अनश्वन, १९ परिश्रवस्, २० शंतनु, २१ विचित्रवीर्य, २२ पांडु-धृतराष्ट्र, २३ अर्जुन-कर्ण, २४ अभिमन्यु, २५ परिक्षित्, २६ जनमेजय

### सूर्यवंश

१ इक्ष्वाकु, २ दिलीप, ३ रघु, ४ अज, ५ दशरथ, ६ राम, ७ लव-कुश, ८ अतिथि, ९ निषध, १० नल, ११ नभ, १२ पुंडरीक, १३ क्षेमधन्वा, १४ देवानिक, १५ पारियात्र, १६ अहित, १७ सहस्राक्ष, १८ बल, १९ स्थल, २० उक्थ, २१ वज्रनाभ, २२ खगन, २३ विधृति, २४ युषिताश्व, २५ विश्वसह, २६, हिरण्यनाभ, २७ पुष्य, २८ ध्रुवसंधि, २९ सुदर्शन, ३० अग्निवर्ण, ३१ शीघ्र, ३२ मेरु, ३३ प्रसुश्रुत, ३४ सुसंधि, ३५ अमर्षण, ३६ सहस्वत, ३७ विश्वसाव्ह, ३८ प्रसेनजित्, ३९ तक्षक, ४० प्रसेनजित्, ४१ बृहद्बल

परशुरामाची व दशरथाची भेट, तसेंच परशुराम व रामचंद्र यांची भेट व युद्धही झालें होतें. ख्याति व प्रचार यांचा विचार करतां रामायणाचा काळ महाभारतापूर्वी एक हजार वर्षें असला पाहिजे. महाभारतांत अभिमन्यूनें रामानंतरचा कोसल सिंहासनावरील ३६ वा पुरुष बृहद्बल यास ठार मारलें असा उल्लेख आहे. भारतीय युद्धापूर्वी ३६ पिढ्यापूर्वी राम नांवाची ऐतिहासिक व्यक्ति होऊन गेली, असा याचा अर्थ होतो. (द्रोणपर्व अ. ४७)

अथ कोसलराजस्तु विरथःखड्गचर्मभृत् । इयेष फाल्गुनेः कायात् शिरो हर्तुं सकुंडलम् ॥
स कोसलानामधिपं राजपुत्रं बृहद्बलम् । हृदि विव्याध बाणेन सभिन्नहृदयोऽपतत् ॥२२॥

या दृष्टीनें विचार करतां वंशपरंपरा वर्षें ... ... (?)
कलियुग वर्षें ३१०२ +
इसवी सन वर्षें १९७१
} = परशुरामकाल

पिढी सामान्यतः किती वर्षांची समजावी, हाही एक प्रश्न आहे.

त्रेतायुगाच्या शेवटीं राम व द्वापारयुगाच्या शेवटीं कृष्ण झाला.

वरील यादीवरून संपूर्ण द्वापारयुगांत चंद्रवंशीय राजे २६ व सूर्यवंशीय राजे ४१ होऊन गेले, असा याचा अर्थ होतो. ही यादी रामायण, रघुवंश, महाभारत इत्यादि प्रमाणभूत ग्रंथांवरून सिद्ध केलेली आहे. यावरून हेंही सिद्ध होतें कीं, द्वापारयुग ८ लक्ष वर्षांचें नसून सामान्यतः चौवीसशें वर्षांचें असलें पाहिजे.

## कटपयादि पद्धति

नञावचश्च शून्यानि, संख्या कटपयादयः ।
मिश्रे तूपान्तहल्संख्या, न च चिन्त्यो हलः स्वरः ॥

न आणि ञ तसेंच सर्व स्वर म्हणजे ०; क, ट, प, य हे संख्यारंभ आहेत. जोड व्यंजन असल्यास उपांत्य व्यंजन घ्यावें. व्यंजनांतील स्वर विचारांत घेऊं नये.

या कटपयादि पद्धतीनें नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥ १ ॥

या मंगल श्लोकांत मोठ्या कुशलतेनें भारताचा काल, पर्वें व श्लोकसंख्या इत्यादि सर्व सांगितलें आहे.

(क) १, ख २, ग ३, घ ४, ङ ५, च ६, छ ७, ज ८, झ ९, ञ ०
(ट) १, ठ २, ड ३, ढ ४, ण ५, त ६, थ ७, द ८, ध ९, न ०
(प) १, फ २, ब ३, भ ४, म ५,
(य) १, र २, ल ३, व ४, श ५, ष ६, स ७, ह ८

म म्हणजे पांचपट करावी. चैव म्हणजे नारायणं नमस्कृत्य इत्यादिकांत नमस्कृत्य याची पुनरुक्ति करावी.

**अंकानां वामतो गतिः ।**

| | |
|---|---|
| ना रा य णं न × म (स्कृत्य) | ० ५ १ २ ० × ५ |
| न रं × म = | ० २ ० × ५ |
| न रो त्त मं × म = | ० ५ ६ २ ० × ५ |
| दे वीं × म = | ० ४ ८ × ५ |
| स र स्व तीं × म = | ० ६ ४ २ ७ × ५ |
| | १ ७ २ ३ ५ (१+७+२+३+५=१८ वर्षे) |
| | × ५ |
| | ८ ६ १ ७ ५ महाभारताची श्लोकसंख्या |

यांतील ततः ह्या शब्दाकडे कालाचें महत्त्व देऊन पाहिल्यास निश्चित काळवेळ सांपडतो. 'जयमुदीरयेत्' ह्याचा अर्थ जसा 'मी जय (काव्य) लिहिलें' असा होतो, तसा 'हें पुस्तक केव्हां लिहिलें, हा अर्थ हीं पदें सांगतात', असाही होतो.

कटपयादी पद्धतीनें जयमुदीरयेत् = १२८५१८ कलिसावन दिवस येतात. यांची वर्षें ३५१ म. १० दि. १८ होतात. यांत वर्षें सौर व महिने चांद्र होत. कारण पूर्ण वर्षें सौर (Solar) पद्धतीनें आणि महिनें व दिवस चांद्र (Lunar) पद्धतीनें घेतले आहेत. यावरून माघ बहुला तृतीया व कलियुगाचें ३५२ वें वर्ष सिद्ध होतें. कलियुग इ. सनापूर्वी ३१०२ वर्षी सुरू झालें. त्यांतून ३५१ व. १० म. १८ दिवस वजा केल्यानें खिस्तपूर्व २७५१ सालीं माघ महिन्याच्या १८ व्या दिवशीं जय हें महाकाव्य प्रसिद्ध झालें. श्लोकाचा अन्तर्गत पूर्ण अर्थ असा :

एकूण श्लोकसंख्या ८६१७५ व त्याची १८ पर्वें असलेला भारत-जय इतिहास मीं कलिसावन दिन १२८५१८ म्हणजे कलियुगाच्या ३५२ व्या वर्षीच्या माघ महिन्याच्या १८ व्या दिवशीं अर्थात् वद्य तृतीयेला पूर्ण केला.

त्याचप्रमाणें कृष्ण निजधामाला गेल्याचा दिवस —

ततो राजन् भगवानुग्रतेजा नारायणः प्रभवश्चाव्ययश्च ।
योगाचार्यो रोदसी व्याप्य लक्ष्म्याः स्थानं प्राप्य स्वं महात्माऽप्रमेयम् ॥

मौसल पर्व ५-२८

हे राजा, नंतर प्रचंड तेजस्वी, विश्वाचें मूल कारण, अव्यय व योगाचार्य नारायण भगवान् कृष्ण हे आकाश व पृथ्वी व्यापून असलेल्या आपल्या अगाध निजधामांत विलीन झाले.

स्थानं प्राप्य स्वं = ४१२०७ दिवस म्हणजे ११२ वर्षें, १० महिने व ३ तिथि. यावरून कृष्ण कलियुगाच्या ११३ व्या वर्षी माघ शुक्ल तृतीया या दिवशीं निजधामास गेले. तृतीयासुद्धां बरोबर आहे. कारण वृष्णी यादवांच्या नाशानंतर कृष्ण तीर्थयात्रेस निघाला होता. तो दिवस पुष्य अमावास्या असूनही पवित्र मानला जातो.

नाधर्मश्चरितः कश्चिद् राजपुत्र्या परंतप ।
कारणं किं नु तद् ब्रूहि यद् कृष्णा पतिता भुवि ॥

राजकन्या द्रौपदीनें कोणतेंही पापाचरण केलें नव्हतें, मग कोणत्या कारणामुळें द्रौपदी जमिनीवर मरून पडली तें सांग.

आत्मनः सदृशं प्राज्ञं नैषोऽमन्यत कंचन ।
तेन दोषेण पतितो विद्वान् एष नृपात्मजः ॥

हा विद्वान् राजपुत्र सहदेव आपल्यासारखा कोणीही शहाणा नाहीं असें समजत असे. त्या दोषामुळें तो मरून पडला.

द्रौपदी व सहदेव यांचा मृत्यु 'पतिता भुवि' व 'पतितो विद्वान्' या शब्दांत दिला आहे.

| | | वर्षें | म. | दिन |
|---|---|---|---|---|
| पतिता भुवि = ४४६६१ | } | १२२ | ४ | ११ |
| पतितो विद्वान् = ४४६६१ | } | | | |

अर्थात् कलियुगाच्या १२३ वर्षी आषाढ शुद्ध ११ या दिवशीं एकट्या युधिष्ठिरास सोडून सगळे पांडव निजधामास गेले.

भीष्माचा निर्वाणदिन, अनुशासनपर्व, अ १६८. श्लो. ३–४

इदमाश्चर्यमासीच्च मध्ये तेषां महात्मनाम् ।
सहितैर्ऋषिभिः सर्वैस्तदा व्यासादिभिः प्रभो ॥ ३ ॥
यद्यन्मुंचति गात्रं हि स शन्तनुसुतस्तदा ।
तत्तद् विशल्यमभवद् योगयुक्तस्य वै क्रमात् ॥ ४ ॥

तेथें जमलेल्या सर्व महात्म्यांमध्यें जी आश्चर्यकारक घटना घडली, ती व्यासादि महर्षींनीं पाहिली. शंतनुनंदन भीष्म यौगिक क्रियेच्या द्वारा आपला प्राणवायु ऊर्ध्वभागीं नेऊं लागले. तो प्राणवायु जो जो अवयव सोडून जात असे, त्या प्रत्येक अवयवांतून बाण गळून पडत असे व त्याचा घाव भरून येत असे. याप्रमाणें शरीर बाणरहित होऊन, प्राण ब्रह्मरंध्र भेदून गेले. मुंचति गात्रं = २३६६५ अहर्गण येतात; म्हणजे कलियुगाच्या ६५ व्या वर्षी ( ६४ व. १० म. ५ दि. ) भीष्म मरणोन्मुख झाले.

भृगु–आंगिरस हे गणित व नक्षत्रविद्येंत प्रवीण होते. म्हणून कटपयादि पद्धति त्यांना सुलभ होती. केरळमधील परंपरागत चालही हेंच दर्शवीत आहे. केरळचा मूळ इतिहासग्रंथ 'केरलोत्पत्ति' असून तो सह्याद्रिखंडाचाच भाग आहे. तेथील संस्कृत संस्कृति ही प्रथम तेथील मूळचे नंबुद्रि ब्राह्मण यांनीं आणलेली आहे. येथें नंबुद्रींची प्रथम वसाहत परशुरामानें केली, आणि त्यांची संस्कृति भृगु–आंगिरस यांच्यापासून आली असली पाहिजे. परशुराम हा महाभारताच्या अगोदरच्या काळांतील होता. ही संख्याशास्त्राची पद्धति भृगु संस्कृतीचें आवश्यक अंग होय; म्हणून नंबुद्रींनीं ही पद्धति आपल्याबरोबर आणली, असें म्हणण्यांत काय गैर आहे ?

भारतीय विद्या भवन या संस्थेनें भारतीयांच्या दृष्टिकोनांतून भारताचा इतिहास प्रसिद्ध केला आहे. त्याच्या प्रथम भागांत डॉ. पुसाळकर यांनी Historical Traditions या सदरांत प्रमुख व्यक्तींचे काळ दिले आहेत, ते असे :

| | | |
|---|---|---|
| ययाति ( देवयानीचा पति—यदुवंशी ) | इ. सन पूर्वकाल | ३००० — २७५० |
| परशुराम | ... ... | २५५० — २३५० |
| श्रीकृष्ण | ... ... | १९५० — १४०० |
| भारतीय युद्ध | ... ... | १४०० — ...... |

अर्थात् परशुरामाचा काल इतिहासदृष्ट्या अडीच हजार वर्षे म्हणजे आजपासून साडेचार हजार वर्षांपूर्वीचा ठरतो.

नारायणं पद्मभवं वसिष्ठं शक्तिं च तत्पुत्रपराशरं च ।
व्यासं शुकं गौडपदं महान्तं गोविंदयोगींद्रमथास्य शिष्यम् ॥
श्रीशंकराचार्यमथास्य पद्मपादं च हस्तामलकं च शिष्यम् ।
तंत्रोटकं वार्तिककारमन्यान् अस्मद्गुरून्संततमानतोऽस्मि ॥ १ ॥

या गुरुपरंपरेच्या श्लोकावरून दाशरथि राम व कृष्ण-पांडव यांच्यामध्यें चारच पिढ्या झाल्या असें दिसतें.

या सर्व कालनिर्देशांचा समन्वय केल्यानेंच योग्य काल निश्चित करणें शक्य होईल. पुराणाचा जो काल किंबहुना परशुरामाचा जो काल तोच काल या स्कंदपुराणाचा असें अनुमान काढणें ठीक !

## प्रयोजन

सप्त कोंकणांत स्थायिक झालेल्या मानववंशावर लक्ष केंद्रित करणारा आणि भौगोलिक, सामाजिक, देवस्थानांचा व तीर्थस्थानांचा इतिहास सांगणारा हा एकमेव प्राचीन पुराणग्रंथ दुर्मिळ झाला; आणि कालांतरानें सत्यसृष्टींतील ही वस्तु निश्चित खपुष्प बनूं नये यासाठीं या सह्याद्रिखंडाचें भाषांतरासह पुनर्मुद्रण करण्यांत येत आहे.

या पुस्तकाच्या संशोधनाच्या कामांत विद्वान् व साक्षेपी संशोधक श्री. अ. का. प्रियोळकर यांनीं ठिकठिकाणच्या ग्रंथसंग्रहांत असलेलीं हस्तलिखितें पाहून सह्याद्रिखंड शुद्ध करावें, असें सांगून तीं पुस्तकें कोठें पहावयास मिळतील याविषयीं मार्गदर्शन केलें. त्याप्रमाणें हस्तलिखिताच्या कॅटलॉगमध्यें दर्शविलेल्या कांहीं ठिकाणीं जाऊन मी तीं हस्तलिखितें प्रत्यक्ष पाहिलीं. त्यांचा संक्षिप्त वृत्तांत पुढीलप्रमाणें आहे :

( १ ) रॉयल एशियाटिक सोसायटी, डॉ. भाऊ दाजी लाड स्मारकम्, मुंबई,
यांत १ ते २१ अध्याय ( उत्तररहस्य ) आहेत. अशुद्धता फार.

( २ ) बॉम्बे युनिव्हर्सिटी लायब्ररी, मुंबई,
येथील हस्तलिखितांत १०० अध्याय आहेत. त्यावर “ प्रतिलिपिकालः शके

१ The Vedic Age ( भा. वि. भ. ) by Dr. Pusalkar, पृ. ३७१ व ३०१

१७४०. सर्वजित् नाम संवत्सरे आश्विनमासे शुद्ध ५ म्यां तिथौ समाप्तः।"
असा उल्लेख आहे.

( ३ ) राजा सरफोजी भोंसले–स्थापित सरस्वती महल, तंजावर, तामिळनाडु
हें संस्कृत हस्तलिखितांचें फार मोठें भांडार आहे. ह्यांत १ लाखावर हस्तलिखितें आहेत. येथें मला 'इषुपातक्षेत्रमाहात्म्यम्। सह्याद्रिखंडारंभः। ग्रंथसंख्या २३२ व क्रमांक १०२६९' हें नवीन पुस्तक सांपडलें. येथें मुद्रित सह्याद्रिखंडाचा कोणताही भाग मिळाला नाहीं.

( ४ ) सरस्वती भवन, वाराणसी येथें १॥ लाख प्राचीन संस्कृत हस्तलिखितें आहेत. त्यांपैकी कांहीं संवत् ११८१ पासूनचीं आहेत.

यांतील सह्याद्रिखंडाचीं हस्तलिखितें :

( अ ) क्र. १४५३४. पत्रसंख्या ९. अपूर्ण. ४ अध्याय. परशुरामक्षेत्र निर्माण, गोमांचल क्षेत्रमाहात्म्य, ८१ वा अध्याय चित्पावनोत्पत्ति व ८२ वा अध्याय काराष्ट्रोत्पत्तिः असे आहेत.

( ब ) क्र. १५९८३, पत्रसंख्या १–३, ११–१५, २० अशी आहे. इषुपात क्षेत्रवर्णनम्। अध्याय १० वा पूर्ण; ११ वा अपूर्ण.

( क ) क्र. १६०९०, पत्रसंख्या १०, पृष्ठें २० अपूर्ण.

( ड ) क्र. १६५१८. सह्याद्रिखंड अध्याय १ ते ७० अपूर्ण. ह्यांत १ आमलीग्राममाहात्म्यम्। २ दक्षिण मानसयात्रावर्णनम्। ३ रेणुकामाहात्म्यम्। इत्यादि विषय आहेत. अक्षर स्पष्ट व स्वच्छ. यांतील कोणताहि भाग मुद्रित संस्कृत सह्याद्रिखंडांत नाहीं. प्रतिलिपिकाल संवत् १९३३.

( इ ) क्र. १४२५८ हें एक मोठें हस्तलिखित आहे. अध्याय ८४, पृष्ठसंख्या ३८२. यांतील रेणुकाचरित्राशिवाय कोणताही भाग मुद्रित सह्याद्रिखंडांत नाही. प्रतिलिपिकाल संवत् १९२० असून पुष्कळ पानें गहाळ झालेलीं आहेत. यांतील श्लोकसंख्या चार हजारांहून अधिक आहे. कांहीं विषय: मांडव्याख्यान, दत्तात्रेयप्रादुर्भाव, सह्याद्रिभूगोलवर्णन, आमलिकाग्रामवर्णन, दत्तात्रेयाश्रमवर्णन, गौतमीतीर्थ, पद्मतीर्थ, गदातीर्थ, चक्रतीर्थ, लक्ष्मीतीर्थ, नवदुर्गातीर्थ, कपिलतीर्थ, मेरुमाहात्म्य, मातृतीर्थ, दक्षिण मानसयात्रा, रेणुकावतार, परशुराम चरित्र, माहिष्मती वर्णन, पृथ्वीदान, अगस्तिब्राह्मण संवाद, मातुरालयमाहात्म्य इत्यादि अनेक विषय असून ८२ व्या अध्यायांत चित्पावनोत्पत्ति आहे.

( ५ ) राष्ट्रीय पुस्तकालय ( National Library ), कलकत्ता. यांत सह्याद्रिखंडाचीं हस्तलिखितें असल्याचें समजतें.

( ६ ) रॉयल एशियाटिक सोसायटी, कलकत्ता. या पुस्तकालयांत दोन लाख हस्तलिखितें आहेत. येथील सह्याद्रिखंडाचीं हस्तलिखितें :

( क ) क्र. १०१०३ पंचद्राविडोत्पत्तिः। ( च ) क्र. १०१०४ काराष्ट्राश्चित्पावनाश्च।

( ट ) क्र. १०१०७ चित्पावनोत्पत्तिः। ( त ) क्र. ३१०७ सप्तकोटीश्वराख्यानम्। ( अपूर्ण ).

( ७ ) श्रीगौडपादाचार्य मठ, संस्थान-पुस्तकालय, कवळें, गोवा, सह्याद्रिखंड. जीर्ण, खंडित व अशुद्ध.

नेपाळ सरकारची दरबार लायब्ररी आणि इंडिया ऑफिस लायब्ररी, लंडन येथेंही सह्याद्रिखंडाच्या पोथ्या आहेत. लंडन येथें तेलगू लिपींतही सह्याद्रिखंड असल्याचें समजतें. एक विदेशी संशोधक सह्याद्रिखंडाचें संशोधन करीत आहेत. त्यांनीं इंडिया ऑफिस लायब्ररी, लंडन, यांत असलेल्या संस्कृत सह्याद्रिखंडाच्या हस्तलिखितांविषयीं मला लिहिलेल्या ता. २०–१–७१ च्या पत्रांत म्हटलें आहे :

Secondly, I might note that there is much indication that the *Uttarardha* was once much bulkier than it is at present. One of the manuscripts from the India Office Library, although it omits most of the chapter numbers, numbers chapter 7 at one point as chapter 19, and at another point numbers the second of two chapters inserted between 7 and 8 as chapter 20. (This manuscript makes a number of distinct starts.) Another manuscript in Telugu script, also from the India Office Library, numbers chapter 9 to 19 as 88-90, 191-193, 174, 175, 194, 124, and 125, though they appear in the same order as in the edition. The India Office Catalogue also notes for this manuscript as *Amalakīgramamāhātmya*, which is not in the edition, being listed as Chapters 57-70, etc. Certainly, in the beginning, Chapters 9.2-4 and 9.10-11 refer back to something which is not in the edition or most manuscript copies.

कोंकण–गोमंतकवासी लोकांच्या दृष्टीनें उत्तररहस्यच्च महत्त्वाचें असल्यानें तोच भाग पुनर्मुद्रणासाठीं घेतला आहे. तसेंच मराठी वाचकांसाठीं सामान्यतः मूळ ग्रंथाला अनुसरून भाषांतरही दिलें आहे. पण थोडा भाग विशेष स्वारस्य न वाटल्यामुळें भाषांतरित केला नाहीं. जेथें वाक्य किंवा वाक्यांश याचा योग्य शब्दबोध झाला नाहीं त्या ठिकाणीं * हें चिन्ह दिलें असून नवीन श्लोकांना + हें चिन्ह दिलें आहे. मूळ ग्रंथ व्याकरणदृष्ट्या शुद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे; तरीसुद्धां कांहीं चुका राहून गेल्या असणें शक्य आहे.

## ऋणनिर्देश

या सह्याद्रिखंडाच्या संशोधनापासून प्रकाशनापर्यंतच्या कामांत ज्या संस्थांचें व उदार गृहस्थांचें अमोल साहाय्य लाभलें त्यांचीं नांवें —

१. परमपूज्य काशीमठाधीश श्रीमत्सुधींद्रतीर्थ स्वामीमहाराज यांनीं सक्रिय प्रोत्साहन देऊन तंजावर येथें येण्याजाण्याचीही उत्तम व्यवस्था केली.

२. परमपूज्य श्रीविश्वेशतीर्थ स्वामीमहाराज, श्रीपेजावरमठ, उडपी, S. K. यांनीं या पुस्तकास स्वयंस्फूर्त साहाय्य केलें आहे.

३. सरस्वती महल, तंजावर, येथील विद्वान् संशोधक पं. ना. श्री. देवनाथाचार्य यांनीं मला आपल्या संशोधनज्ञानाचा लाभ दिला; संस्थेचे प्रधानाध्यक्ष व्ही. गोपाळ अय्यंगार यांनीं ग्रंथालयांत माझी उत्तम सोय केली. तसेंच तेथील प्रसिद्ध डीन, डॉ. M. V. Bhatt, M. S., F. T. G. S. यांनींही आपल्याकडे उत्तम व्यवस्था करून मदत केली.

४. सरस्वती भवन, वाराणसी येथें उपग्रंथाध्यक्ष व श्रीमान् चंद्रभानु पांडे यांनीं अनेक प्रकारें मदत केली.

५. रॉयल एशियाटिक सोसायटी व राष्ट्रीय पुस्तकालय, कलकत्ता. येथील पुस्तकें उपलब्ध करून देणें वगैरे कामांत सौ. निर्मला बॅनर्जी, प्रो. दीपक बॅनर्जी व श्री. ना. बा. मराठे यांनीं साहाय्य केलें.

६. मुंबई येथील गौ. सा. ब्रा. देवालयाच्या धर्मादाय समितिकडून या पुस्तकाच्या संशोधन वगैरे कार्यासाठीं भरपूर प्रोत्साहन व मदत मिळाली.

७. गोमंतकीय विद्वान् संशोधक श्री. अ. का. प्रियोळकर यांनीं संशोधनासाठीं प्रोत्साहन देऊन त्यासाठीं आवश्यक हस्तलिखितें मिळवून देण्याचें मार्गदर्शन केलें.

८. श्रीमत्सच्चिदानंद सरस्वती स्वामीमहाराजांनीं सह्याद्रिखंडाचें प्रकाशन करावयाचें आहे, असें म्हणतांच श्रीगौडपादाचार्य संस्थानाचे प्रमुख चिटणीस श्री. शांताराम व्यंकटराव पिकळे, ॲड्व्होकेट, सुप्रीम कोर्ट यांनीं हा ग्रंथ कात्यायनी प्रकाशन संस्थेतर्फे आम्ही प्रकाशित करतों. असें आनंदपूर्वक आश्वासन दिलें. लगेच गुढीपाडवा शके १८९३ रोजीं कात्यायनी संस्थेच्या कचेरींत समारंभपूर्वक पुस्तकप्रकाशनाचा निश्चय केला, आणि त्याच दिवशीं स्वामी-महाराजांच्या सार्वजनिक पाद्यपूजेच्या समारंभाच्या शुभप्रसंगीं तो जाहीर केला. वैशाख शुद्ध अक्षय्य तृतीया शके १८९३ रोजीं श्रीपूर्णानंद हाउसिंग सोसायटीचाही पायाभरणीचा मोठा समारंभ केला. अशा रीतीनें थोड्या अवधींत श्रीसंस्थानच्या इतिहासांत प्रथमच हे दोन शुभप्रसंगाचे योग श्री. पिकळे यांनीं जुळवून आणून आपल्या कर्तबगारीचा परिचय करून दिला आणि स्वामीमहाराजांस दिलेल्या आश्वासनास या ग्रंथरूपानें मूर्त रूप दिलें.

प्राध्यापक श्री. अ. वि. बेन्द्रे, भारतीय विद्या भवन, यांनीं आस्थापूर्वक या पुस्तकाची मुद्रणप्रत तयार केली.

श्री. व. बा. खळे, संचालक, बॉंबे नॅशनल प्रिंटर्स यांनीं व तेथील कामगारांनीं काळजी-पूर्वक छपाई केली, व श्री. पां. भा. रांगणेकर यांनीं केवळ प्रुफ तपासणीच नव्हे, तर अनेक उपयुक्त दुरुस्त्या करून आपल्या ज्ञानाचा लाभ मला दिला आहे. याबद्दल वरील सर्वांचे कृतज्ञतापूर्वक व मनःपूर्वक आभार मानतों.

शेवटीं वाचकांस नम्र विनंती—

तरी न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें ।<br>
करूनि घ्यावें हें तुमतें । विनवितु असें ॥

**गजाननशास्त्री गायतोंडे**

# ADVERTISEMENT

The subjoined text of the Sahyadri-Khanda, a part of the Skanda Purana, has been drawn from fourteen MSS. from various parts of India, each MS, being marked with an initial syllable in Devanagari, indicative of the source from whence it has been derived, thus को. stands for Cochin, सि. for Sidhapura, etc.

The following are the copies collated:—

को. from Cochin. This MS, was kindly lent by Swami Bhuvanendratirth, the Prelate of the Vaishnava sect. It contains ninety chapters.

जु. from **Junner**. This copy was borrowed from Mr. Raghunath Sharma. It consists of a hundred chapters.

सो. from the **Bombay Branch of the Royal Asiatic Society,** noted 22-b-14 in the catalogue of its library. It is divided into two sections, the first section containing eighty-eight chapters, and the second thirty-two.

सो. Another copy belonging to the same Society, is marked 22-e-31. It is incomplete, consisting of one section only. It is apparently written by a **Gujarathi Brahman,** who often substitutes स for श, ब for भ and vice-versa.

को. from **Kota,** a village in the Karnataca. It consists of hundred and eleven chapters, with several lacunae.

सि. from **Sidhapura,** another village in the Karnataca. It consists of one section, its chapters being left undivided in number,

चें. from **Chempi,** also a village in the same district. Several chapters are wanting about the middle of this copy.

गो. from **Gomantak** or Goa. It consists of two sections in hundred and eight chapters, and bears the date 1700 A.D.

का. from **Kasi** or **Benaras.** This MS. contains a hundred chapters in all.

मुं. These are five MSS. copies collected from several gentlemen in Bombay. Although possessing slight peculiarities of their own, their likeness is very striking, and they coincide to the extent of seeming rather to be copies of copies, with errors heaped upon errors. Each of these copies is noted क, ख, ग and thus in order.

With the exception of the MS. चें. which is written in the Kanarese character, all the others are in Devanagari script. They are also, with one exception, undated.

तिनें पित्याच्या अनुज्ञेनें जमदग्नीच्या कंठांत मोठ्या आदरानें रत्नमाला घातली. २५. त्यावेळीं सर्वत्र हाहाःकार झाला. हजारों राजे व ऋषि रागानें त्याच्यावर तुटून पडले. २६.

# अध्याय ११ वा

## जमदग्नीचा पराक्रम

स्कंद म्हणाला, नंतर नगारे तुताऱ्या निनादूं लागल्या व अकस्मात् मोठा पुष्पवर्षाव झाला. १. गंधर्व आनंदानें गाऊं लागले. सुरांगना नर्तन करूं लागल्या व वीणादि वाद्यांच्या स्वरांनीं सर्व विश्व भरून गेलें. २. त्या स्वयंवरांत सर्व ऋषि व देव यांनीं जमदग्नीसह त्या भाग्यवती एकवीरेची स्तुति केली. ३. तो सोहळा पाहून सर्व प्रक्षुब्ध राजांनीं रेणुराजाच्या वधासाठीं त्याच्यावर शस्त्रास्त्रें सोडलीं. ४. रेणुराजासुद्धां रथ, हत्ती, घोडे व पायदळ यांसह हत्तीवर आरूढ होऊन युद्धासाठीं निघाला. ५. रेणुराजाचें त्या राजेलोकांबरोबर घनघोर व रोमहर्षक युद्ध जुंपलें. कमळाच्या देठानें पर्वतावर कितीही आघात केले, तरी पर्वत अचलच राहतो. तसा तो रेणुराजा अचल राहिला. त्यानें त्यांची शस्त्रास्त्रें मोडून बाणांनीं त्या वीरांना ठार केलें. ७–८. त्यांची ती लढाई पाहून तो तपस्वी जमदग्नीही धनुष्यबाण घेऊन तावडतोब युद्धासाठीं निघाला. ९. त्याला पाहतांत ते सर्व वीर घाबरले व अग्नींत पतंग भस्मसात् व्हावे, तसे ते त्याच्या त्या विविध शस्त्रांनीं गतप्राण झाले. १०. मंत्रानें सापाचें निवारण करावें, त्याप्रमाणें क्रुद्ध जमदग्नीनें त्यांच्या शस्त्रांचें निवारण केलें. ११. त्याच्या बाणांनीं कित्येक योद्धे छिन्नविच्छिन्न होऊन जमिनीवर पडले, कित्येकांचीं मस्तकें तुटलीं, कित्येकांचे चेहरे विद्रूप होऊन ते पळसाच्या फुलाप्रमाणें दिसूं लागले. १२–१३. रथ, हत्ती, घोडे इत्यादि सर्व नाश पावले. याप्रमाणें जमदग्नीनें तें रणांगण भयानक करून सोडलें. १४. त्यांना जमदग्नि अजिंक्य वाटला व ते हतबल होऊन भीतीनें रेणुराजाला शरण गेले. १५. अतिक्रुद्ध तपस्वी जमदग्नि त्या सैन्यांत अग्नीसारखा संचार करूं लागला. १६. अरण्यांत अग्नि वृक्षनाश करतो, त्याप्रमाणें त्याच्या योद्धयांनीं योद्धे, रथांनीं रथ, घोड्यांनीं घोडे नष्ट केले. १७. रक्ताच्या नदींत रक्ताच्याच लाटा निर्माण झाल्या व थरकाप करणारी रक्ताची भयानक नदी वाहूं लागली. १८. तेथें नरास्थींची वाळू व मेदमज्जेचा चिखल भरला होता. सर्वत्र भयंकर आवाज होत होते. त्यामुळें सर्व प्राणिमात्र भिऊन गेले. १९. याप्रमाणें जमदग्नीनें आपलें सैन्य ठार केलेलें पाहून सर्व राजे दशदिशांना पळून गेले. २०.

# अथ द्वादशोऽध्याय ।

## जमदग्निरेणुकाविवाहः ।

स्कन्द उवाच –

जितेषु नृपवर्येषु हतशेषेषु रेणुकः । विवाहं कारयामास कन्यायाः सविधानतः ॥ १ ॥
पुण्येऽहनि सुनक्षत्रे रेणुको विधिवत्तदा । रेणुकां रूपसंपन्नां प्रददौ जमदग्नये ॥ २ ॥
रथानां कांचनांगानां किंकिणीजालमालिनाम् । तस्मै दशसहस्राणि प्रददौ रेणुकस्तदा ॥ ३ ॥
गजानां मदमत्तानां सादिभिः समधिष्ठिताम् । मेघाभानां ददौ भूपस्त्वयुतं तु विचक्षणः ॥ ४ ॥
स श्रीमान् प्रददौ तस्मै गवामयुतमादरात् । गवां माथुरदेश्यानां दोग्ध्रीणां हेमवर्चसाम् ॥ ५ ॥
एकतः श्यामकर्णानामश्वानामयुतं तथा । स्त्रीणां सहस्रं गौरीणां सुवेषाणां ददौ नृपः ॥ ६ ॥
सुवर्णनिष्ककंठीनामरोगाणां सुवर्चसाम् । परिचर्यासु दक्षाणां प्रददौ रेणुकः सुताम् ॥ ७ ॥
एवं रत्नानि वासांसि बहूनि विविधानि च । विवाहे प्रददौ राजा प्रीत्यर्थं जमदग्नये ॥ ८ ॥
एवं सत्कृत्य तं राजा जमदग्निं स रेणुकः । अलंकृत्य ददौ कन्यां विधिदृष्टेन कर्मणा ॥ ९ ॥
ततः प्रणम्य विधिवदृचीकमृषिसत्तमम् । भक्त्या संपूजयामास वस्त्रालंकरणैः शुभैः ॥ १० ॥
ऋषे रत्नान्वितस्याथ रेणुकां पापनाशिनीम् । स तामंके समारोप्य रेणुको वाक्यमब्रवीत् ॥ ११ ॥
स्नुषेयं ते मुनिश्रेष्ठ रूपेणाप्रतिमा भुवि । धर्मे पाहि प्रयत्नेन सर्वज्ञानविदां वर ॥ १२ ॥

ऋचीक उवाच –

धन्योऽस्मि कृतकृत्योऽस्मि यस्येयं मे स्नुषा बभौ । यस्याः संदर्शनादेव सर्वकर्मफलं लभेत् ॥
यन्नामकीर्तनादेव विप्लुताखिलपातकाः । प्रयांति दुर्लभां सिद्धिं परमाममरैर्नराः ॥ १४ ॥
यथेयं रूपसंपन्ना गुणज्येष्ठा भविष्यति । आदावेव नृपश्रेष्ठ ज्ञातं तज्ज्ञानचक्षुषा ॥ १५ ॥
इयं पुत्रवती कन्या पतिभक्तिपरायणा । त्रैलोक्यवंदिता पुण्या भविष्यति न संशयः ॥ १६ ॥

राजोवाच –

अद्य मे सफलं जन्म पुण्यैर्जातं मुनीश्वर । यस्येश्वरः स जामाता जमदग्निरभून्मम ॥ १७ ॥
त्वं हि सत्यव्रतश्चैव सत्यवादी जितेंद्रियः । ऋषे जातोऽसि पुण्येन पिता मम न संशय ॥ १८ ॥

ऋचीक उवाच –

आश्रमं गंतुमिच्छामि स्वस्ति तेऽस्तु नराधिप । पुत्रेणानेन सहितस्तदनुज्ञातुमर्हसि ॥ १९ ॥
इति श्रीस्कन्दपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

# अध्याय १२ वा

## जमदग्नि–रेणुकाविवाह

स्कंद म्हणाला, याप्रमाणें कित्येक राजे जिंकले गेले व कित्येक राजे ठार झाले. नंतर रेणुराजानें आपल्या कन्येचा विधियुक्त विवाह केला. १. चांगल्या मुहूर्तावर त्यानें आपली रूपसंपन्न रेणुका जमदग्नीला विधिपूर्वक अर्पण केली. २. त्यानें जमदग्नीला सोन्यानें मढविलेले दहा हजार रथ दिले. हे रथ घंटा व माळा यांनीं सुशोभित केले होते. ३. तसेंच मेघतुल्य, कांतिमान व मदोन्मत्त असे माहुतांसह दहा हजार हत्ती त्यास दिले. ४. शिवाय मधुरेच्या दहा हजार दुभाळ गाई त्यास दिल्या; त्यांची कांति सोन्यासारखी होती. दहा हजार श्यामकर्ण घोडे दिले. एक हजार सुंदर स्त्रिया अर्पण केल्या. त्या सर्व गौरवर्णी होत्या. त्यांच्या गळयांत सोन्याचे कंठ असून त्या सर्व सेवादक्ष होत्या. ५–७.

अशा रीतीनें त्या राजानें जमदग्नीला विविध रत्नें व वस्त्रें दिलीं. ८. रेणुराजानें ती कन्या सालंकृत व विधिपूर्वक जमदग्नीला दिली व ऋचीक ऋषीला नमस्कार करून त्याचीही भक्तिपूर्वक वस्त्रालंकारांनीं पूजा केली. ९–१०. नंतर पापनाशिनी रेणुकेला त्याच्या मांडीवर बसवून राजा त्यास म्हणाला, हे मुनिश्रेष्ठा, आजपासून ही रेणुका तुमची सून झाली आहे. पृथ्वीतलावर हिचें सौंदर्य अप्रतिम आहे. तुम्ही हिचें रक्षण प्रयत्नपूर्वक करा. ११–१२. ऋचीक म्हणाला, जिच्या केवळ दर्शनानें मानवाच्या सर्व इच्छा सफल होतात, ती ही माझी सून झाल्यानें मी आज धन्य झालों आहें, कृतकृत्य झालों आहें. १३. हिच्या नामसंकीर्तनानें सर्व पापें नष्ट होतात, व पुरुषांना दुर्लभ सिद्धि प्राप्त होते. १४. हे नृपश्रेष्ठा, ही कन्या रूपसंपन्न व गुणसंपन्न असणार, हें सर्व मीं अंतर्ज्ञानानें जाणलें होतें. १५. ही पुत्रवती व पवित्र पतिव्रता त्रिभुवनाला आदरणीय होईल यांत बिलकूल संशय नाहीं. १६.

राजा म्हणाला, ऋषी हो, माझ्या पूर्वपुण्याईनें आज माझा जन्म सफल झाला, कारण जमदग्नि माझा जामात झाला. १७. हे ऋषे, तू सत्यव्रत, सत्यवादी व जितेंद्रिय आहेस. माझ्या पुण्याईनेंच तुम्ही मला पिता म्हणून लाभलांत. १८.

ऋचीक म्हणाला, हे राजश्रेष्ठा, मी आतां पुत्रासह माझ्या आश्रमांत जाऊं इच्छितों. मला जाण्यास अनुज्ञा द्यावी. १९.

# अथ त्रयोदशोऽध्यायः ।

## परशुरामजन्म ।

स्कन्द उवाच –

ऋचीकेनैवमुक्तस्तु रेणुको मुनिपुंगवाः । नानुजज्ञे महात्मानमृचीकं ससुतं तदा ॥ १ ॥
ततः स रेणुको राजा बलेन चतुरंगिणा । कांबोजदेशमगमत्सहितो जमदग्निना ॥ २ ॥
स तस्मै सुबहून्देशान्कौशलादीन्महायशाः । दर्शयित्वा मुदा युक्तो रेणुर्जामातृवत्सलः ॥ ३ ॥
दत्वा राज्यं पुरे रम्ये कान्यकुब्जे न्यवेशयत् । एकवीरां च सत्कृत्य वस्त्रालंकरणैः शुभैः ॥ ४ ॥
राजा स्वरथमारुह्य दृष्ट्वा स्वभुवनं ययौ । ततः शक्रः स्वयं प्रीत्या रेणुकायै सुरैर्वृतः ॥ ५ ॥
प्रादात्कल्पतरुं पुण्यं कामधेनुं मुनीश्वराः । त्वष्टश्चिंतामणिस्पर्शं प्रददौ सिद्धपादुके ॥ ६ ॥
नानारत्नयुते दिव्ये वस्त्राण्याभरणानि च । रेणुकां जमदग्निं च सत्कृत्याभिप्रणम्य च ॥ ७ ॥
सर्वतीर्थोदकैः पुण्यैरभ्यषिंचत्सुरेश्वरः । नंदनात्पारिजातादींस्तरूनानीय देवराट् ॥ ८ ॥
फलपुष्पान्वितानिंद्रोऽस्थापयद्रेणुकाश्रमे । तथा चंदनवृक्षांश्च स्थापयामास चाश्रमे ॥ ९ ॥
प्रीत्या च परया युक्तो रेणुकायाः पुरंदरः । एवमभ्यर्च्य सन्माय वस्त्रालंकरणादिभिः ॥ १० ॥
रेणुकां जमदग्निं च शक्रः स्वभुवनं ययौ । ततो भागीरथीतीरे पुरे तस्मिन्महोदये ॥ ११ ॥
मुनिभिः संवृतस्तस्थौ जमदग्निः प्रियान्वितः । तस्याश्रमे द्विजश्रेष्ठा ऋषयः सुरकिन्नराः ॥१२॥
सिद्धविद्याधराद्याश्च तस्थुराश्रित्य रेणुकाम् । नित्यमग्नित्रयोपास्तिं कुर्वन्भक्त्या[1] महातपाः ॥१३॥
जमदग्निः स्त्रिया[2] सार्धं गृहधर्ममपालयत् । देवान्हव्येन कव्येन पितृनन्नादिकादिभिः ॥ १४ ॥
तर्पयामास दीनार्तान् रेणुका विकलेंद्रियान् । प्रणम्याभ्यर्च्य तां भक्त्या कामधेनुं मुनीश्वराः ॥१५
नित्यं प्रार्थयते कामान् तस्यै सर्वान्प्रयच्छति । स्पर्शकल्पद्रुमाद्यास्ते ददुस्तस्मै महर्षये ॥१६॥
तथाभिलषितार्थांस्तान् रेणुकाज्ञापितास्तदा । कुर्वंतो जमदग्निस्तु गृहधर्मं मुनीश्वराः ॥ १७ ॥
त्रैलोक्यमगमत्तृप्तिं ह्यातिथ्येन भृशं ततः । जमदग्नेस्ततस्तस्यां रेणुकायां सुरोत्तमाः ॥ १८ ॥
बभूवुः पंच पुत्रास्ते वन्हींद्रार्कानिलाच्युताः । वसुनामा नलो जज्ञे वायुर्विश्वावसुः सुतः ॥१९॥
बृहद्भानुः स्वयं सूर्यो बृहत्कण्वः शतक्रतुः । इति नामानि पुत्राणां रेणुकायाः शुभानि च ॥२०॥
श्रुत्वा चैव नरा नार्यः मुच्यन्ते सर्वपापतः । गर्भाधानादिकं तेषां जमदग्निश्चकार सः ॥ २१ ॥
वस्वादीनां हि पुत्राणां वेदशास्त्रादिकं ततः । चत्वारस्ते महात्मानो गुरुभक्तिपरायणाः ॥२२॥
विप्राणामग्निहोतॄणां शुश्रूषां चक्रिरे सुताः । कदाचिदास्थितामंबां कल्पद्रुमसमीपतः ॥ २३ ॥
नारायणसमादेशान्नारदस्तामुपागमत् । दृष्ट्वा तां रेणुतनयामशेषाघौघनाशिनीम् ॥ २४ ॥
प्रणम्य शिरसा भूमौ कृतांजलिरभाषत ।

नारद उवाच –

देवि नारायणस्याद्य संदेशं शृणु मन्मुखात् ॥ २५ ॥

---

१ भक्ता । २ प्रिया ।

# अध्याय १३ वा

## नारदाचें आगमन व परशुरामजन्म

स्कंद म्हणाला, मुनिश्रेष्ठांनो, ऋचीक जाण्यास निघाला, पण त्या राजानें त्यास अनुमति दिली नाहीं. १. नंतर तो रेणुकराजा चतुरंगसेना घेऊन जमदग्नीसह कांबोज देशाला गेला. २. कोशलादि विविध देश त्याला दाखवून तो जामातृवत्सल रेणुकराजा आनंदित झाला. ३. त्यानें जमदग्नीला सुंदर राज्य दिलें व एकवीरेला वस्त्रालंकारांनीं अलंकृत करून त्या उभयतांची राहण्याची व्यवस्था कान्यकुब्जांतच केली ४. स्वतः रथांत बसून तो आपल्या घरीं गेला. हें सर्व पाहून इंद्रानें रेणुकेला कल्पवृक्ष, कामधेनु व चिंतामणि दिला. रत्नखचित पादुका व वस्त्रालंकार दिले. नंदनवनांतून पारिजातक व चंदनाचें झाड आणून रेणुकेच्या आश्रमांत लावलें. अशा प्रकारें इंद्रानें रेणुकेचा आस्थेनें व भक्तीनें सन्मान केला. ५–१०. रेणुका व जमदग्नि भागीरथीच्या तीरावरील आश्रमांत राहूं लागले. जमदग्नि आपल्या प्रियपत्नीच्या व मुनींच्या समवेत राहिला. त्याच्या आश्रमांत द्विजश्रेष्ठ, ऋषि, देव किंन्नर आणि सिद्ध विद्याधर रेणुकेच्या आश्रयास राहिले. जमदग्नि रोज तीन अग्नींची उपासना करीत असे. जमदग्नीनें पत्नीसह गृहस्थधर्माचें पालन करून देव व पितर यांना हव्य-कव्यादि आहुती देऊन संतुष्ट केलें. ११–१४. रेणुका अंध, बहिरे इत्यादि अपंगांची सेवा करीत असे. तसेंच कामधेनूची भक्तिपूर्वक पूजा करीत असे. १५. कामधेनु, चिंतामणि व कल्पवृक्ष जमदग्नीची कामना पूर्ण करीत असत. १६. जमदग्नि रेणुकेच्या सर्वच इच्छा सफल करून गृहकर्तव्य पार पाडीत असे. १७. जमदग्नि व रेणुका यांच्या आतिथ्यानें संपूर्ण त्रिभुवन तृप्त झालें. १८. तिला अग्नि, इंद्र, सूर्य, वायु व नारायण असे पांच पुत्र झाले. अग्नीचें नांव वसु, वायूचें नांव विश्वावसु, सूर्याचें नांव बृहद्भानु व इंद्राचें नांव बृहत्कण्व. अशीं त्या रेणुकेच्या पुत्रांचीं नांवें होतीं. १९–२०. यांच्या केवळ नामस्मरणानें सर्व स्त्री–पुरुषांचीं पापें नाश पावतात. जमदग्नीनें यांचे गर्भधानादि संस्कार केले. २१. हे चौघेही वेदशास्त्रसंपन्न व गुरुभक्त होते. २२ यांनीं अग्निहोत्री ब्राह्मणांची सेवा केली. एकदां त्यांची आई कल्पवृक्षाजवळ बसली होती. इतक्यांत तेथें विष्णूच्या आदेशानुसार नारद आला, आणि पापनाशीनी रेणुतनयेला पाहून नमस्कार करून म्हणाला, देवी, तूं माझ्याकडून विष्णूचा आदेश ऐक. २३–२५

जगतामुपकाराय तव गर्भं प्रयास्यतः । पुरा वामनरूपोऽहमुदराल्पतयादितेः ॥ २६ ॥
जातस्तस्मात्कियद्रूपमुदरे धारयिष्यसि । कथयस्व कियद्रूपं धर्तुं त्वमुदरे क्षमा ॥ २७ ॥
तावद्रूपसमायुक्तो भवामि तव गर्भगः। मद्रूपमखिलं गर्भे का धर्तुं क्षमतेऽगना ॥ २८ ॥
यन्नाभिनालविस्तारं न वेद कमलोद्भवः । तस्मात्कथय सामर्थ्यमात्मनो धारणे क्षमम् ॥२९॥
श्रुत्वा तथैव तत्सर्वं करोमि कलुषापहे । ऋषिभाषितमाकर्ण्य नारायणसमीरितम् ॥ ३० ॥
प्रहस्य वचनं प्राह गजदुर्द्धारकारिणी[1] ।

श्रीदेव्युवाच –

जानाति तत्पुनर्वक्तुं बालत्वादीश्वरस्य च ॥ ३१ ॥
त्वमपि[2] ज्ञानिनां श्रेष्ठो न विचार्योक्तवानसि । पुत्रा मातरमापृच्छ्य भवेयुर्गर्भगामिनः ॥३२॥
कथेयं नूतनाऽश्रावि तत्त्वज्ञानवतां वर । न मया नान्यया स्त्रीणां श्रावितं तु कदाचन ॥३३॥
नारायणसमादेशाद्यत्त्वयाऽभाषि मे पुरः । तथाप्याकर्ण्य तद्वाक्यं त्वत्तो नारायणेरितम् ॥३४॥
सद्भाषितमिदं तस्य नारदाद्य निवेदय । या शक्तिः परमा तस्य तया सह जनार्दनः ॥३५॥
प्रविश्यांतः प्रभावज्ञः प्रभुर्भवितुमर्हति । तद्भाषितमिदं वाक्यमाकर्ण्य द्विजसत्तमाः ॥ ३६ ॥
नारदः पादयोस्तस्याः प्रणामं शिरसाऽकरोत् । नारायणसमादेशादागतं नारदं तदा ॥ ३७ ॥
विसृज्य जगदानंदकंदभूताविशद्गृहम् । तया विसर्जितो वेगान्नारदो वैष्णवं पदम् ॥ ३८ ॥
आगम्य वेदयांचक्रे रेणुकायास्तथोदितम् । आकर्ण्य रेणुकावाक्यं विस्मितो विससर्ज तम् ॥
चिंतयामास परमां शक्तिं विश्वसमाश्रिताम् । तमात्मनि समाधाय तया युक्तो जगत्पतिः ॥
जगत्त्राणाय विष्णुस्तामेकवीरामचिंतयत् । चिंतयित्वा स्वयं विष्णुर्मह्यां तां विश्वमातरम् ॥४१॥
स रेणुकायास्तत्पुण्यादुदरं प्राविशत्तदा । स्वयं प्रकाशयन्विश्वं हरिस्त्रिभुवनेश्वरः ॥ ४२ ॥
यदा मातुः स्थितो गर्भे तदाभूत्कौतुकं महत् । धारयंती यदा गर्भे रामं कमललोचनम् ॥४३॥
पदं प्रादात्सुललितं चचालोर्वी ससागरा । चेलुस्ते गिरयः सर्वे वनान्यपि चकंपिरे ॥ ४४ ॥
दिशो दशाभवन्पुण्याः सुप्रभाताऽभवन्निशा । ततस्त्वदितिनक्षत्रे तृतीयायां तु माधवे ॥४५॥
रेणुकायास्तदा गर्भादुदितः स हरिर्बभौ । पुष्पवृष्टिरभूत्तत्र रामदेवस्य मूर्धनि ॥ ४६ ॥
सुरदुंदुभयो नेदुर्मुदं[3] जग्मुः सुरर्षयः । शंखतालनिनादाश्च वीणावैणुकनिस्वनाः ॥ ४७ ॥
बभूवुः सहसा तत्र गंधर्वास्ते जगुर्हरिम् । क्षत्रियाः पृथिवीपाला निर्दग्धा इव वन्हिना ॥
सर्वे संत्रस्तमनसस्तेऽभवन्भयशंकिताः । सहस्रमेकं बाहूनामर्जुनस्य चचाल ह ॥ ४९ ॥
जाते रामे प्रचंडेन वातेनैव वनं महत् । तन्महत्कौतुकं दृष्ट्वा मातरं हैहयाधिपः ॥ ५० ॥
भयसंविग्नहृदयो वचनं चेदमब्रवीत् ।

अर्जुन उवाच–

अकस्मादेव मातर्मे कंपंते बाहवो भृशम् । भयं हृदि समुत्पन्नं वेपथुर्मे महानभूत् ॥ ५१ ॥
बभ्रमुर्मे दिशः सर्वाः सूर्यो नैव प्रदृश्यते । पृथिवी दृश्यते सर्वा तिमिरेणैव संवृता ॥ ५२ ॥

---

१ जगदोद्धारकारक । २ त्वयापि । ३ मदं ।

जगदुद्धारासाठीं तुझ्या उदरीं मी जन्म घेणार आहें. पूर्वी मीं अदितीच्या गर्भात तें उदर लहान असल्यामुळें वामनरूपानें अवतार घेतला होता. २६. म्हणून आतां तूं माझें केवढें रूप धारण करण्यास समर्थ आहेस, ते सांग. २७.

म्हणजे मी तेवढेंच रूप घेऊन तुझ्या उदरांत राहीन! माझें संपूर्ण रूप धारण करण्यास कोणती बरें स्त्री समर्थ होईल? कारण माझ्या नाभीचें मूळ ब्रह्मदेवालाही समजलें नाहीं! नारदाचें हें भाषण ऐकून देवी हंसून म्हणाली, "कोणती गोष्ट कशी विचारावी, हें तुला समजत नाहीं व बालवयामुळें देवालाही समजत नाही. २८–३१. तू श्रेष्ठ ज्ञानी आहेस, पण तूं सुद्धां विचार न करतांच बोलतोस. मूल का कधीं आईला विचारून गर्भात प्रवेश करीत असतें! ३२. हें नवीन तत्त्वज्ञान मीं किंवा अन्य स्त्रियांनीं ऐकलेलें नाहीं! ३३. हे आद्यमुनि नारदा, तूं नारायणाचा निरोप मला येऊन सांगितलास, तसाच माझाही निरोप तूं जाऊन नारायणाला सांग कीं, तूं तुझ्या सर्व शक्तींसह माझ्या उदरीं प्रवेश करून माझा प्रभु हो." हें रेणुकेचें वचन ऐकून नारदानें तिला प्रणाम केला व तिचा निरोप घेऊन तो आनंदकंद नारायणाच्या गृहीं अर्थात् वैष्णवभुवनांत आला. ३४–३८.

रेणुकेचें हें बोलणें नारदानें येऊन नारायणाला सांगितलें. तें ऐकून नारायण आश्चर्यचकित झाला. नंतर त्यानें नारदाला निरोप दिला. ३९. जगत्पति नारायणानें जगदाधार अशा आद्य शक्तीचें चिन्तन केलें व त्या शक्तीसह विष्णूनें जगाच्या कल्याणासाठीं त्या एकवीरेचें चिंतन केलें. ४०–४१. त्यानें स्वतः तिच्या उदरांत प्रवेश केला व त्रिभुवन प्रकाशित केलें. ४२. तिनें कमललोचन विष्णूला आपल्या गर्भात धारण केलें, तेव्हां समुद्रासह सर्व पृथ्वी कंपायमान झाली. वनें व पर्वत हालूं लागले! दश दिशा पवित्र झाल्या. सर्व रात्रि प्रकाशमान झाल्या. वैशाखमहिना. तृतीया तिथि व अदिति नक्षत्र यावेळीं रेणुकेच्या उदरीं विष्णूचा जन्म झाला. ४३–४५. रामदेवाच्या मस्तकावर पुष्पवृष्टि झाली. देवदुंदुभी वाजूं लागल्या. देवर्षि आनंदित झाले. शंख, वीणा, व वेणु यांचे आवाज होऊं लागले. गंधर्व गाऊं लागले, क्षत्रियराजे अग्नीनें जळून गेल्यासारखे झाले. त्यांचें मन भयभीत झालें. प्रचंड वाऱ्यानें अरण्याची दुर्दशा व्हावी त्याप्रमाणें राम जन्मतांच अर्जुनाचे सहस्र बाहु थरथरले! हें मोठें अद्भुत पाहून घाबरलेला हैहयाधिप आपल्या मातेला म्हणाला, आई, अकस्मात् माझे सर्व हात कांपत आहेत, मन भयग्रस्त झालें आहे व मनाचा मोठा थरकांप होत आहे. ४६–५१. सर्व दिशा फिरत आहेत, सूर्य दिसत नाहीं. सर्व पृथ्वी अंधारानें व्यापली आहे. ५२.

जनन्युवाच –

मा विषादं विशालाक्ष[1] नहि ते विद्यते भयम् ।
यस्माद् बिभ्यति ते देवास्तस्य कस्माद्भयं भवेत् ॥ ५३ ॥

ब्राह्मणैः सह दर्पेण विरोधः कुपितैरपि । न कर्तव्यस्त्वया विप्रा वंदनीया विशेषतः ॥ ५४ ॥
ब्राह्मणो नावमंतव्यः कदाचित्केनचित्क्वचित् । यस्मिंस्देवाश्च ऋषयः पितरश्च प्रतिष्ठिताः ॥५५॥
इत्युक्त्वा तं समाश्वास्य पुत्रं राकावती तदा । निषसादासने रम्ये पुत्रेण सहिता शुभा ॥५६॥
इति श्रीस्कन्दपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये परशुरामोत्पत्तिर्नाम त्रयोदशोऽध्यायः ॥१३॥

# अथ चतुर्दशोऽध्यायः ।

## रामप्रस्थानम् ।

स्कन्द उवाच –

तस्मिन्जाते ततो रामे जमदग्निर्महातपाः । ब्राह्मणेभ्यो ददौ गावो रत्नानि सुबहूनि च ॥१॥
ततोऽचिरेण कालेन ववृधेऽतीव सुंदरः । रूपेणाप्रतिमो रामो रेणुकायाः प्रभावतः ॥ २ ॥
कालेन महता रामो पितरं मातरं बली । आनंदयद्गृहे बालो वर्धमानः शशी यथा ॥ ३ ॥
रामं कमलपत्राक्षमेकवीरां पतिव्रताम् । राजानो ऋषयः सर्वे दृष्ट्वा ते विस्मयं ययुः ॥ ४ ॥
चारणानां तदा वाचः समंतात्सहसोत्थिता । राम त्रिभुवनं पाहि कुरु निःक्षत्रियां महीम् ॥५॥
कंदर्प इव रूपेण तेजसाऽग्निरिव प्रभुः । समुद्र इव गांभीर्ये क्षमया पृथिवीसमः ॥ ६ ॥
मातापित्रोः प्रसादेन रामः सर्वगुणाकरः । कालेन ववृधेऽतीव सितपक्षे शशी यथा ॥ ७ ॥
परिचर्यां पितुर्मातुः कुर्वन्रामः सुभक्तितः । पितॄणां मुनिदेवानां बभूव प्रियदर्शनः ॥ ८ ॥
ततः प्रणम्य तां भक्त्या रेणुकां पितरं तथा । उवाच प्रहसन् रामः कृतोपनयनोऽग्रतः ॥९॥

राम उवाच –

शृणु मद्वचनं मातः स्वामिनि त्वं सुरेश्वरि । ऋषिणानेन सुव्यक्तमुत्पन्नोऽहं तवोदरे ॥१०॥
न चोत्पन्नस्य मे श्रेयो गुरुशुश्रूषया विना । मातापित्रोः परं तीर्थं त्रिषु लोकेषु न श्रुतम् ॥११॥
अनुज्ञातस्त्वया मातः कैलासं पर्वतोत्तमम् । तपः कर्तुं गमिष्यामि स्वस्ति तेऽस्तु शुभेक्षणे ॥१२॥
तपसाऽऽराधितस्तत्र शूलपाणिरुमापतिः । समग्रां मे धनुर्विद्या सरहस्यां प्रदास्यति ॥१३॥

एकवीरोवाच –

पुत्र गच्छ मुनिं दृष्ट्वा पितरं भूरिवर्चसम् । क्षिप्रमागम्यतां ज्ञात्वा धनुर्विद्यां करांतिकाम् ॥१४॥
इति श्रीस्कन्दपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

---

१ विशालाक्षिन्नहि ।

जननी म्हणाली, विशालनेत्रा, दुःख करूं नकोस! तुला बिलकूल भीति नाहीं. ज्याला सर्व देव भितात, त्याला भीति कशाची! ५३. तूं मात्र ब्राह्मण रागावले तरी त्यांच्याशीं विरोध करूं नकोस. कारण ते वंदनीय आहेत. ५४. कोणत्याही माणसानें ब्राह्मणांचा अवमान करूं नये. कारण त्यांचे ठिकाणीं सर्व देव, ऋषि व पितर यांचा वास असतो. असें बोलून माता राकावतीनें त्याला धीर दिला व ती आपल्या पुत्रासह रम्य आसनावर बसली. ५५-५६.

# अध्याय १४ वा

## परशुरामाचें तपश्चर्येसाठीं प्रस्थान

स्कंद म्हणाला, रामजन्म झाल्यावर त्या तपस्वी जमदग्नीनें ब्राह्मणांना पुष्कळ गाई व रत्नें दिलीं. १. तो रेणुकेचा राम लौकरच अप्रतिम रूपानें वृद्धिंगत होऊं लागला. २. वर्धिष्णु चंद्राप्रमाणें त्या बलवान् रामामुळें घरांतील आनंद वाढूं लागला. ३. कमलाक्ष राम व पतिव्रता एकवीरा यांना पाहून सर्व राजे व ऋषि आश्चर्यचकित झाले. ४. "हे राम, ही पृथ्वी निःक्षत्रिय करून त्रिभुवनाचें रक्षण कर." अशी भाटांची वाणी आसमंतांत दुमदुमली! ५. तो राम मदनाप्रमाणें रूपवान्, अग्नीप्रमाणें तेजस्वी, समुद्राप्रमाणें गंभीर व पृथ्वीप्रमाणें क्षमाशील होता! तो सर्वगुणसंपन्न राम जणुं गुणांचा सागर, पूर्ण चंद्राप्रमाणें असलेल्या आईवडिलांच्या कृपेनें वाढूं लागला. ६-७. त्यानें आईवडिलांची भक्तिपूर्वक शुश्रुषा केली. तो उपनीत प्रियदर्शन राम जननीला नमस्कार करून हंसत म्हणाला, हे सुरेश्वरी, स्वामिनी, माझें म्हणणें ऐक. ह्या स्त्रीपासून मी तुझ्या उदरीं जन्म घेतला. ८-१०. तिन्हीं लोकांत मातापित्याहून श्रेष्ठ तीर्थस्थान असल्याचें ऐकण्यांत नाहीं. गुरुशुश्रुषेवांचून माझें कल्याण होणें शक्य नाहीं. ११. तूं मला अनुज्ञा दे. मी पर्वतोत्तम कैलास पर्वतावर जाऊन तपश्चर्या करतों. तुझें कल्याण असो. १२. उमेसह श्रीशंकराची आराधना मी करणार. तो मला सरहस्य संपूर्ण धनुर्विद्या देईल. १३. एकवीरा म्हणाली, 'बाळ, वडिलांना भेटून जा, व धनुर्विद्या संपादन करून लवकर परत ये.' १४.

# अथ पंचदशोऽध्यायः ।

## रामतपश्चर्या ।

स्कन्द उचाव –

जगन्मात्रा स रामस्तु प्रहितः पितरं मुदा । दृष्ट्वा प्रणम्य कैलासमगमन्मुनिपुंगवाः ॥ १ ॥

तमागतमभिप्रेक्ष्य प्रमत्तास्ताः सुरांगनाः । निपेतुः स्रस्तवसनास्ता रामेण विमोहिता ॥ २ ॥

कामबाणहताः सद्यो रूपवत्यः सुरांगनाः । रामस्यावाहनं चक्रुर्नेत्राकारैस्तु शंकिताः ॥ ३ ॥

ब्रह्मचारी जितक्रोधो वेदवेदांगपारगः । पार्वत्या सहितो यत्र रामस्तत्रागमद्धरः ॥ ४ ॥

हरांतिकमुपागम्य रामः सत्यव्रतस्थितः । हरमाराधयद्भक्त्या वायुभक्षो जितेंद्रियः ॥ ५ ॥

ऊर्ध्वपादस्तु पंचाग्नीन्प्रज्वाल्याधस्ततोंऽबरे । तपसाऽराधयद्देवमिदं स्तोत्रमुदीरयन् ॥ ६ ॥

नमः शिवाय सकलाय महेश्वराय । विश्वेश्वराय वरदाय जगद्धिताय ।

गौरीश्वराय गिरिजांगविभूषणाय । शर्वाय कामदलनाय हराय तुभ्यम् ॥ ७ ॥

भस्मांगरागभुजगाधिपभूषणाय । गंगाशशांकगिरिजाहिजटाधराय ।

गौरीप्रियाय वरदाय महाव्रताय । दैत्यांतकाय वरदाय नमो नमस्ते ॥ ८ ॥

स्कन्द उवाच –

तेनैवं संस्तुतो देवस्तपसाऽऽराधितो हरः । वरदः प्राह तं रामं प्रत्यक्षः प्रहसन् द्विजाः ॥९॥

शिव उवाच –

यत्प्रार्थयसि विप्रेंद्र तपसानेन सुव्रत । तुष्टोऽहं तत्प्रदास्यामि ब्रूहि यत्तेऽभिवांछितम् ॥१०॥

राम उवाच –

धनुर्वेदं समग्रं हि शस्त्राण्यस्त्राणि शंकर । त्वत्तोऽहं ज्ञातुमिच्छामि त्वं शिक्षापय मां प्रभो ॥११॥

शंकर उवाच –

को भवानिह संप्राप्तः साक्षादिव हरिः स्वयम् । धनुर्वेदं किमर्थं त्वं मत्तः प्रार्थयसे वद ॥१२॥

राम उवाच –

भृगुवंशसमुत्पन्नं विद्धि मां ब्राह्मणं प्रभो । जमदग्निसुतं रामं रेणुकायाः प्रियंकरम् ॥ १३ ॥

ब्रह्मक्षत्रं सदा ज्ञेयमिति निश्चित्य शंकर । आराधितोऽसि तपसा धनुर्विद्यार्थसिद्धये ॥ १४ ॥

ईश्वर उवाच –

ज्ञातोऽसि न मया वाच्यं योऽसि सोऽसि द्विजेश्वर । धनुर्वेदं समग्रं त्वां राम शिक्षापयाम्यहम्

इति श्रीसह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

# अध्याय १५ वा

## परशुरामाची तपश्चर्या

स्कंद म्हणाला, जगन्मातेचा निरोप घेऊन व वडिलांना प्रणाम करून राम आनंदानें कैलास पर्वतावर गेला. १. तेथें त्या तरुणाला पाहून उन्मत्त स्त्रिया मोहित झाल्या व त्यांची वस्त्रें गळून पडलीं! २. रूपवती सुरांगना काममोहित झाल्या. त्यांनीं आपल्या नेत्रकटाक्षांनीं रामाला आवाहन केलें! ३. ब्रह्मचारी, क्रोधिष्ठ व वेदान्तपारंगत रामाजवळ पार्वतीसह शंकर आला. ४. तेव्हां वायुभक्षण करणाऱ्या सत्यनिष्ठ व जितेंद्रिय रामानें शंकराच्या जवळ जाऊन त्याची भक्तिपूर्वक आराधना केली. ५. पंचाग्नि प्रज्वलित केले व पाय वर करून त्यानें त्याची स्तुति केली. ६. हे गौरीपते, तूं जगद्धितकर्ता असून विश्वाला वर देणारा आहेस. गिरिजाभूषण, मदनारि, शर्व अशा शंकरा तुला नमस्कार असो. ७. भस्म व भुजंग धारण करणारा, जटेंत गंगा व चंद्रकोर असलेला, गौरीप्रिय महाव्रती अशा दैत्यविनाशक शंकरा, तुला नमस्कार असो. ८.

स्कंद म्हणाला, त्याची ही स्तुति ऐकून प्रत्यक्ष शंकर प्रकट झाला व त्याला हंसत म्हणाला, हे द्विजश्रेष्ठा, मी प्रसन्न झालों आहें. इष्ट वर माग. मी तुला तो देतों. ९. १०. राम म्हणाला, हे प्रभो, मला संपूर्ण धनुर्विद्या व अस्त्रविद्या द्या. ११. शंकर म्हणाला, साक्षात् हरीला माझ्याकडून धनुर्विद्या घेण्याची इच्छा व्हावी, असें काय घडलें आहे! १२. राम म्हणाला, हे प्रभो, मी भृगुवंशीय ब्राह्मण आहे. जमदग्नि व रेणुका यांचा राम नांवाचा मी पुत्र आहें. १३. ब्रह्मविद्या व क्षात्रविद्या संपादन करावी व धनुर्विद्येंत सिद्धि मिळवावी अशा निश्चयानें मीं तुमची आराधना केली आहे. १४. शंकर म्हणाला, हे द्विजेश्वरा, तूं कोण आहेस हें मला समजलें आहे. तें कांहींही असो. मी तुला संपूर्ण धनुर्विद्या देतों. १५.

# अथ षोडशोऽध्यायः ।

## परशुरामस्यास्त्रप्राप्तिः ।

स्कंद उवाच –

सर्कंकणभुजाभ्यां च राममुत्क्षिप्य सुंदरम् । हरः प्रीत्या परिष्वज्य धनुस्तस्य करे ददौ ॥ १ ॥
पिनाकं स धनुर्दिव्यं सर्वरत्नपरिष्कृतम् । दत्त्वाशिक्षापयद्रामं धनुर्विद्यां यथाक्रमाम् ॥ २ ॥
सरहस्यां सकल्पां च धनुर्विद्यां मुनीश्वराः । शंकराज्ज्ञातवान्रामः समस्तामचिराद्बली ॥ ३ ॥
हरः पाशुपतादीनि शस्त्राण्यस्त्राणि चैव हि । प्रददौ रामदेवाय ततः प्रीत्यर्थमादरात् ॥ ४ ॥
हरमाराधितुं याते रामदेवे शुभव्रते । प्रौढपुत्रा ऋषिश्रेष्ठा रेणुका बालमैक्षत ॥ ५ ॥
पतिशुश्रूषणादूर्ध्वं निर्व्यापारा शुभानना । कालं गमयितुं चक्रे चेतो बालकखेलने ॥ ६ ॥
ततोऽचिरेण कालेन दिव्याभरणभूषिता । क्रीडाकुमारीं त्रिकुलां रेणुका मनसाऽकरोत् ॥ ७ ॥
कुलं मम च पत्युर्मे स्वभर्तुरपि पुत्रिका । पावयिष्यति लोके वै त्रिकुलेति भविष्यति ॥ ८ ॥
तया कुमार्या क्रीडन्ती[1] यावद्रेणुसुता स्थिता । तावदागमने बुद्धी रामस्यासीद्द्विजोत्तमाः ॥९॥
ततोऽचिरेण कालेन रामः सत्यपराक्रमः । स तां ज्ञात्वा धनुर्विद्यां समग्रां हरमब्रवीत् ॥ १० ॥
दर्शनार्थं पितुर्मातुर्गच्छामि त्रिपुरांतक । धनुर्विद्या मया ज्ञाता त्वत्प्रसादान्न संशयः ॥ ११ ॥
पुनरेष्यामि देवेश नमस्कृत्य गुरून्क्रमात् । गुरूणां चैव सर्वेषां जननी जनको गुरुः ॥ १२ ॥

स्कन्द उवाच –

एवमुक्त्वा प्रणम्येशं गणेशं रेणुकासुतः । गुरूणां दर्शनाकांक्षी मातुर्गृहमुपागमत् ॥ १३ ॥
स स्नेहाद्रेणुकां क्षिप्रं पितरं परिरभ्य च । नमस्कृत्य ततो भ्रातॄन् पितरं वाक्यमब्रवीत् ॥१४॥
त्वत्प्रसादेन हे तात गत्वा कैलासपर्वतम् । सरहस्या मया प्राप्ता धनुर्विद्या हरार्पिता ॥ १५ ॥
शस्त्राण्यस्त्राणि दिव्यानि कवचानि महांति च । तुष्टेनैव प्रदत्तानि तात तेन हरेण मे ॥ १६ ॥
सुप्रसन्नो हरः साक्षाज्ज्ञानगम्यः स मां प्रति । येन स्नेहेन गुरुणा धनुर्विद्या समर्पिता ॥ १७ ॥

जमदग्निरुवाच –

तव रूप बलं धैर्यं तपः परमदारुणम् । केन तद्वर्ण्यते वत्स त्वं हि ज्ञानवतां वरः ॥ १८ ॥
क्षत्रियाणां च दुष्टानां क्षेत्रै[2]मुत्सादयिष्यसि । गमिष्यंत्यरयो नाशं शलभा इव पावके ॥ १९ ॥

स्कन्द उवाच –

स्नेहाकुलेन मनसा रेणुका पापनाशिनी । राममंके समारोप्य परिष्वज्येदमब्रवीत् ॥ २० ॥

रेणुकोवाच –

वत्स मद्वचनात्स्वस्थश्चिरं जीव सुखी भव । वर्धस्व प्रजया राम त्वयाहं सुखिनी सदा ॥२१॥
ते धन्यास्ते महात्मानः पुण्यवंतो न संशयः । येषामेको भवेत्पुत्रस्तव तुल्यो गुणाकरः ॥२२॥

राम उवाच –

देवि त्वां मातरं प्राप्य न तच्चित्रतमं मम । जमदग्निं च पितरं धन्यः को मे समो भवेत् ॥२३॥
इति श्रीस्कान्दे सह्याद्रौ रेणुकामाहात्म्ये षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

---

१ संक्रीडन्त्या २ क्षत्र ।

# अध्याय १६ वा

## परशुरामाला अस्त्रप्राप्ति

स्कंद म्हणाला, शंकरानें आपल्या कंकणधारी हातांनीं सुंदर रामाला उचलून प्रेमानें आलिंगन दिलें व त्याच्या हातांत धनुष्य दिलें. १. पिनाक नांवाचें रत्नजडित दिव्य असें धनुष्य देऊन शंकरानें त्यास यथासांग धनुर्विद्या शिकविली. २. त्या बलवान् रामानें शंकरापासून लवकरच सरहस्य व सकल्प धनुर्विद्या आत्मसात् केली. ३. शंकरानें रामाला पाशुपतादि शस्त्रास्त्रें सुद्धां आदरपूर्वक दिलीं. ४. शुभव्रत रामदेव तपश्चर्येसाठीं गेला व अन्य पुत्रही प्रौढ होते. पतिसेवेनंतर तिला कांहींच काम नव्हतें. त्यामुळें रेणुकेला वेळ घालविण्यासाठीं लहान मुलाची आवश्यकता वाटली. ५–६. यासाठीं रेणुकेनें दिव्यालंकारयुक्त त्रिकुला नांवाची क्रीडाकुमारी आपल्या मनानें निर्माण केली. ही पुत्रिका आपल्या पतीचें कुल, माझें कुल व माझ्या पतीचें कुल अशा तीन कुळांना पवित्र करणारी व्हावी अशा विचारानें पुत्रिकेचें त्रिकुला असें नामकरण केलें. ७–८. एकदा रेणुका त्या कुमारीसह खेळत असतां तिच्या मनांत रामाच्या आगमनाविषयींचा विचार आला; लगेच तिकडे कैलास पर्वतावर संपूर्ण धनुर्विद्या शिकलेला राम शंकराला म्हणाला, त्रिपुरांतका, आपल्या कृपेनें मला संपूर्ण धनुर्विद्या अवगत झाली. आतां मी आईवडिलांचें दर्शन घेण्यास जातों. ९–११. कारण मातापिता हेच सर्व गुरूंचे गुरु होत. देवेशा, मी परत येणार आहें. असें बोलून नमस्कार करून गुरुदर्शना-साठीं रेणुकासुत मातृगृहीं गेला. १२–१३. त्यानें प्रेमानें रेणुकेला व वडिलांना आलिंगन दिलें व त्यांना नमस्कार करून तो आपल्या भावांना व वडिलांना म्हणाला, १४. हे तात, आपल्या कृपेनें मी कैलास पर्वतावर जाऊन धनुर्विद्या शिकलों. १५. आणि शंकरानें संतुष्ट होऊन मला दिव्य शस्त्रास्त्रें, धनुर्विद्या व महान् कवचें दिलीं आहेत. १६–१७. जमदग्नि म्हणाला, हे वत्सा, तुझें रूप, बळ, धैर्य व तप फार मोठें आहे. तूंच ज्ञानी लोकांत श्रेष्ठ आहेस. दुष्ट क्षत्रियांचा तूं संहार करशील. अग्नीमध्यें पतंग नाश पावतात, त्याप्रमाणें तुझे शत्रु नाश पावतील. १८–१९.

स्कंद म्हणाला, रेणुकेनें रामाला मोठ्या प्रेमानें आपल्या मांडीवर बसवून त्याला आलिंगन दिलें व ती म्हणाली, हे वत्सा, तूं माझ्या आशीर्वादानें चिरंजीव व सुखी हो. तुझ्यामुळेंच मी सुखी झाल्यें आहें. २०–२१. ज्यांना तुझ्यासारखा गुणसागर एक पुत्र लाभतो, ते खरोखर पुण्यवंत होत यांत संशय नाहीं. २२.

राम म्हणाला, आई, तुझ्यासारखी माता व जमदग्नीसारखा पिता असल्यावर माझ्या-सारखा भाग्यवान् कोण आहे !

# अथ सप्तदशोऽध्यायः ।

## रामस्य परशुप्राप्तिः ।

स्कन्द उवाच –

एवमुक्त्वा प्रणम्याथ पितरं मातरं तथा । शंभोर्दर्शनमाकांक्षन् रामः पप्रच्छ ताविदम् ॥ १ ॥

राम उवाच –

गच्छामि तात तन्मातः शंभोर्भवनमुत्तमम् । आराधयामि विघ्नेशं ज्ञानार्थं परशोरिति ॥ २ ॥

इत्युक्त्वा स तयोः कृत्वा नमस्कारं प्रदक्षिणाम् । रामस्ताभ्यामनुज्ञातः कैलासमगमज्जवात् ।३

ततः कैलासमागम्य रामः सत्यव्रते स्थितः । हरं प्रणम्य विघ्नेशं तपसाऽराधयत्तदा ॥ ४ ॥

ततस्तुष्टाव तं देवं गणेशं वरदं शुभम् । ऊर्ध्वपादस्थितो रामः पंचाग्नीनभितोमुखी ॥ ५ ॥

राम उवाच –

विघ्नेश्वराय वरदाय सुरप्रियाय लंबोदराय सकलाय जगद्धिताय ।

ईभाननाय श्रुतियज्ञविभूदिताय गौरीसुताय गणनाथ नमो नमस्ते ॥ ६ ॥

भक्तार्तिनाशनपराय गणेश्वराय सर्वेश्वराय सुखदाय सुरेश्वराय ।

विद्याधराय विकटाय च वामनाय देवप्रसन्नवदनाय नमो नमस्ते ॥ ७ ॥

त्वां देव विघ्नदलनेति च सुंदरेति भक्तप्रियेति सुखदेति फलप्रदेति ।

विद्याप्रदेत्यघहरेति च ये स्तुवंति तेभ्यो गणेश वरदो भव नित्यमेव ॥ ८ ॥

खंडद्विजेति वरसर्पविभूषणेति भक्तिप्रियेति शशिशेखरनंदनेति ।

सर्वेश्वरेति विमलेति च ये स्तुवंति तान्देव नित्यमघहन्परिपाहि सर्वान् ॥ ९ ॥

स्कन्द उवाच–

तेनैवं संस्तुतो भक्त्या तपसाऽऽराधितस्तथा । रामेण वरदः प्राह गणेशश्च मुनीश्वराः ॥ १०॥

गणेश्वर उवाच–

तुष्टोऽहं तव विप्रेश वरं वरय सुव्रत । प्रार्थितं तव दास्यामि ब्रूहि यत्तेऽभिवांछितम् ॥ ११ ॥

मया ज्ञानेन विप्रेश सोऽयं विष्णुरिति स्वयम् । ज्ञातोऽसि दर्शनादेव प्रार्थयस्व यथेप्सितम् ॥

राम उवाच–

शंकरात्स धनुर्वेदो मया सम्यगुपार्जितः । दिव्यां मे परशोर्विद्यां देहि देव नमोऽस्तु ते ॥१३॥

विघ्नराज उवाच–

गृहाण परशुं दिव्यमनेन शिरयोऽरयः । गमिष्यंति क्षयं विप्र निहताश्चैव तत्क्षणात् ॥ १४ ॥

ततस्तां परशोर्विद्यां रामदेवं गणेश्वरः । तुष्टः शिक्षापयामास तं कृत्वात्मस्वरूपिणम् ॥ १५ ॥

लंबोदरस्वरूपेण रामो जग्राह तत्त्वतः । गणेशात्परतो विद्यां सरहस्यां हरांतिके ॥ १६ ॥

इति श्रीस्कन्दपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

# अध्याय १७ वा

## परशुरामाला गणेशाकडून परशुप्राप्ति

स्कंद म्हणाला, असें बोलून रामानें आईवडिलांना नमस्कार केला व पुनः शंकराच्या दर्शनास जावें अशा इच्छेनें तो त्यांना म्हणाला, मी शंकराच्या निवास-स्थानीं जातों, कारण मला परशूच्या ज्ञानासाठीं गणेशाची आराधना करावयाची आहे. १-२. परशुरामानें त्यांना नमस्कार केला व त्यांची अनुज्ञा घेऊन तो कैलास पर्वतावर गेला. ३. शंकराला नमस्कार करून तो सत्यनिष्ठ राम कैलास पर्वतावर राहूं लागला. तेथें त्यानें तपश्चर्या करून गणेशाची आराधना केली. ४. त्यानें पंचाग्नींच्या मध्यभागीं एक पाय वर करून तपश्चर्या केली व वरद गणेशाची स्तुति केली. ५.

हे विश्वेश्वर, वर देणारा, देवप्रिय, लंबोदर, सर्वहितकर्ता, ईभानन, श्रुतियज्ञभूषण, गौरीपुत्र व गणनाथ अशा देवा, तुला नमस्कार असो. ६. भक्तार्तिनाशन, गणेश्वर, सर्वेश्वर, सुखद, सुरेश्वर, विद्याधर, विकट, वामन व प्रसन्नवदन अशा देवा तुला नमस्कार असो. ७. विघ्नहर्ता, सुंदर, भक्तप्रिय, सुखफलद, विद्यादाता, पापनाशन अशी तुझी स्तुति जे करतात, त्यांना तूं नेहमींच वर देतोस. ८. खंडद्विज, वरसर्पभूषण, भक्तिप्रिय, शंकरपुत्र, सर्वेश्वर व विमल अशा नामांनीं तुझी स्तुति जे करितात त्यांचें पाप नष्ट करून तूं त्यांचें रक्षण करतोस. ९.

स्कंद म्हणाला, मुनिश्रेष्ठांनो, त्यानें अशी भक्तिपूर्वक स्तुति व तप केल्यावर गणपति त्याला म्हणाला, हे विप्रश्रेष्ठा, मी तुला प्रसन्न झालों आहें. इच्छित वर माग. मी देतों. तुला पाहतांच मला समजलें कीं, तूं स्वतः विष्णु आहेस. १०-१२.

राम म्हणाला, मला शंकरापासून धनुर्विद्या मिळाली आहे. देवा, तूं मला दिव्य परशुविद्या दे. तुला प्रणाम असो. १३.

गणेश म्हणाला, हा दिव्य परशु घे. ह्या परशूच्या योगानें क्षणांत शत्रुनाश होतो. १४. असें बोलून संतुष्ट गणेशानें त्याला परशुविद्या दिली, व त्याला आत्मस्वरूपही केलें. १५. त्यामुळें लंबोदरस्वरूप रामानें शंकरापासून रहस्यासह श्रेष्ठ विद्या संपादन केल्या. १६.

# अथ अष्टादशोऽध्यायः ।

## नारदस्य आगमनम् ।

स्कन्द उवाच–

ततः प्रीतमना रामं परिष्वज्य महेश्वरः । प्रहस्योवाच वचनमिदं मधुरया गिरा ॥ १ ॥

ईश्वर उवाच–

शृणु राम कथां रम्यामशेषाघौघनाशिनीम् । यस्याः श्रवणमात्रेण नरः सिद्धिमवाप्नुयात् ॥२॥
पूर्वमासीदिदं विश्वं दह्यमानं च वन्हिना । ज्वालामालाकुलं सर्वं घोररूपं भयावहम् ॥ ३ ॥
ततोऽचिरेण कालेन ज्वलनाग्निसमप्रभा । काचिद् दृष्टा मया नारी सर्वाभरणभूषिता ॥ ४ ॥
सा तु पृष्टा मया राम कासि त्वमसि सुंदरि । किमर्थमाश्रितो वन्हिर्ब्रूहि किं करवाण्यहम् ॥
न प्रोवाचानवद्यांगी किंचिन्मां जलजानना । विशालोत्फुल्लनयना ज्वलनेन समावृता ॥ ६ ॥
कालकूटसमो वन्हिज्वालामाली तपोमया । भक्षितस्तत्क्षणात्तीव्रः सा तु विस्मयमागता ॥७॥
प्रहस्य मामुवाचेदं वचनं श्लक्ष्णया गिरा । नारी सर्वगुणोपेता द्वितीया गिरजा इव ॥ ८ ॥

नारी उवाच–

किमिदं साहसं स्वामिन् भक्षितोऽयं त्वयाऽनलः ।
येन दग्धमिदं विश्वं जगत् स्थावरजंगमम् ॥ ९ ॥

विश्वमेकं त्वमेवैकः किमात्मानं न बुध्यसे । जमदग्निरिति ख्यातिं गमिष्यसि न संशयः ॥
त्वत्कृतेऽहं तपस्तसुमागतास्मीह सुंदर । तेजस्त्वदुदरं मत्वा प्रविष्टं यत्तपोर्जितम् ॥ ११ ॥
तन्मे भव पतिः क्षिप्रं यदि जानासि मां प्रभो । इति प्रार्थयतीं राम मयोक्तमिदमुत्तरम् ॥१२॥
त्वां करिष्याम्यहं भार्यां पितृदत्तां स्वयंवरे । हिमवान् रेणुको भूत्वा विचरिष्यति भूतले ॥१३॥
तपसाऽऽराधयन्नित्यं मां तथोग्रेण सुव्रत । राज्ञस्तस्य गृहे पुण्ये ह्यनेकमणिशोभने ॥ १४ ॥
मत्कृते वन्हिकुंडे तु तव जन्म भविष्यति । भार्गवोऽहं भविष्यामि जमदग्निरिति श्रुत ॥ १५ ॥
पुण्ये गंगातटे रम्ये ऋचीकस्य गृहे शुभे । इत्युक्ता सा मया नारी तत्रवांतरधीयत ॥ १६ ॥
तस्याः श्रवणमात्रेण नरः पापात्प्रमुच्यते । सेयं ते जननी देवी रेणुका पापनाशिनी ॥ १७ ॥
जमदग्निरयं राम ऋचीकस्यात्मजः प्रियः । वसुर्वन्हिस्तव भ्राता बृहकण्वः शतक्रतुः ॥ १८ ॥
बृहद्भानुर्दिनकरो वायुर्विश्वावसुः स्मृतः । चत्वारो भ्रातरस्त्वेते जघन्यस्त्वं सुरेश्वरः ॥ १९ ॥
सर्वे वेदविदः शूराः सर्वे शास्त्रविशारदाः । पंचमो भगवान् रामः क्षत्रमुत्सादयिष्यसि ॥२०॥
इत्येवं नारदेनोक्तं पुरा कृतयुगागमे । अजः परात्परस्त्वेको जगद्धाता जगन्मयः ॥ २१ ॥
पुरुषस्त्वमनंतश्च शाश्वतश्च चिदात्मकः ।

राम उवाच –

किं मोहयसि मां देव हरिस्त्वमिति च ब्रुवन् ॥ २२ ॥

# अध्याय १८ वा

## नारदाचें आगमन, जमदग्नि नांवाची व्युत्पत्ति

स्कंद म्हणाला, नंतर महेश्वरानें रामाला प्रेमानें आलिंगन देऊन हंसत मधुर वाणीनें म्हटलें, हे राम, एक मनोरंजक व पवित्र कथा ऐक. ही ऐकल्यानें पुरुषाला सिद्धि प्राप्त होते. १–२. पूर्वी हें विश्व अग्नीनें जळत होतें. अग्नीच्या प्रचंड ज्वाळांमुळें तें भयानक दिसत होतें. ३. इतक्यांत एक स्त्री दिसली. ती ज्वालेसारखी तेजस्वी व सर्वालंकारांनीं अलंकृत होती. ४. मी तिला प्रश्न केला; हे सुंदरी, तूं कोण आहेस? तूं अग्नीजवळ कां आहेस? मी तुझ्यासाठीं काय करूं सांग. ५. ती कमलमुखी व विशालाक्षी स्त्री अग्नीनें वेढली होती! ती सुंदरी माझ्याशीं कांहीं बोलली नाही. ६. तो अग्नि तर कालकूटासारखा होता, व त्यांतून ज्वाला निघत होत्या. मी तो तीव्र अग्नि खाऊन टाकला! हें पाहून तिला आश्चर्य वाटलें. ८ ती सर्वगुणसंपन्न नारी, जणुं पार्वतीच मला गोड शब्दांत म्हणाली. ८.

स्त्री म्हणाली, अहो स्वामिन्, केवढें हें तुमचें साहस! सर्व विश्व ज्यानें जाळून टाकलें, तो अग्निच तुम्ही खाऊन टाकला! ९. सर्व विश्व एक आहे, तुम्हीही एकच आहांत. तुम्हांला स्वतःचें ज्ञान कसें नाहीं? तुम्ही जमदग्नि या नांवानें प्रख्यात व्हाल! १०. प्रियदर्शना, मी तुमच्यासाठींच जें तप येथें केलें आहे त्या तपाचें तेज तुमच्या उदरांत प्रविष्ट झालें आहे, असें वाटून मी तुमच्याजवळ आलें आहे. ११. हे प्रभो, तुम्ही मला ओळखत असाल तर माझे व्हा. हे राम, तिची ही प्रार्थना ऐकून मी तिला म्हणालों, तुझा पिता मला स्वयंवरांत तुला देईल तर मी तुला माझी भार्या करीन. हिमालय पर्वत रेणुराजा होऊन पृथ्वीवर राहील. १२-१३. उग्र तप करून माझी आराधना करील. त्या राजाच्या रत्नमय प्रासादांत तुझा जन्म होईल आणि पवित्र गंगातीरावर भृगुवंशीय ऋचीक ऋषीच्या घरीं माझा जन्म होईल. असें मी बोलतांच ती स्त्री तथेंच अंतर्धान पावली. १४–१६.

जिच्या केवळ नामश्रवणानें पुरुष पापमुक्त होतो, तीच पापनाशिनी रेणुका तुझी माता होय. ऋचीकाचा प्रिय पुत्र जमदग्नि हा तुझा पिता व अग्निपासून वसु, इंद्रापासून बृहत्कण्व, सूर्यापासून बृहद्भानु व वायूपासून विश्वावसु असे हे तुझे चार भाऊ होत. त्यांचा तूं कनिष्ठ भाऊ आहेस. १७–१९. हे सर्व वेदवेत्ते व सर्वशास्त्रपारंगत आहेत. पांचवा भगवान् राम क्षत्रियसंहार करील. २०. असें पूर्वी कृतयुगीं नारद म्हणाला होता. जन्मरहित, परात्पर, जगत्कर्ता, जगद्रूप, अनंत, शाश्वत व चित्स्वरूप पुरुष हा एकच आहे. २१. राम म्हणाला, हे देवा, तूंच अशा प्रकारचा हरि आहेस. व्यर्थ मला कां मोहित करतोस! २२.

न मे मोघमभूज्ज्ञातं त्वत्प्रसादात्सुरेश्वर । अविद्यया जितो नाहं जानन्नात्मानमात्मना ॥२३॥
कारणं प्रसमीक्ष्येत्र कोऽपि मोहेन गृह्यते ।

स्कन्द उवाच –

एवं ब्रुवति रामे च नारदो भगवान् प्रभुः ॥ २४ ॥

कैलासमगमद्यत्र संस्थितस्तौ रामशंकरौ । तयोः प्रदक्षिणां कृत्वा प्रणम्याभ्यर्च्य नारदः ॥२५॥
उवाच वचनं तत्त्वमिदं मधुरया गिरा ।

नारद उवाच –

कृतेन सुकृतेनाद्य दृष्टौ रामहरौ मया ॥ २६ ॥

धन्यो न मत्तः पुरुषः सुरेष्वप्यसुरेषु च । ब्रह्मापि ध्यानयुक्तस्तु ययोः स्थानं महात्मनोः ॥२७॥
चिंतयन्न विजानामि दृष्टौ तौ रामशंकरौ ।

इति श्रीस्कांदे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये नारदागमनं नामाष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

# अथ एकोनविंशतितमोऽध्यायः ।

## आश्रमवर्णनम् ।

ईश्वर उवाच –

आगतोऽसि मुनिश्रेष्ठ कुतः स्थानात्त्वरान्वितः । ब्रूहि सर्वमशेषेण त्वं हि ज्ञानविदां वर ॥१॥

नारद उवाच –

आगतोऽहं महादेव जमदग्नेर्महात्मनः । आश्रमाद्यत्र सा देवी रेणुका कामधुक् स्वयम् ॥२॥
अष्टाशीतिः सहस्त्राणां मुनीनां भावितात्मनां । यक्षगंधर्वसिद्धानां चारणांना सदाश्रमे ॥ ३ ॥
अतिथीनागतानेका दिव्याभरणभूषिता । भोजयत्यादराद्देवी तापसान् शंसितव्रतान् ॥ ४ ॥
अन्नैरुच्चावचैः पेयैः पायसैर्मधुसर्पिभिः । लेह्यचोष्यगुडाद्यैश्च भोजयत्यतिथीन्बहून् ॥ ५ ॥
तस्याग्निहोत्रशालायां येऽभिप्रायाः पृथक् पृथक् । दृश्यंते बहवः शंभो यत्र देवर्षयोऽमलाः ॥६॥
ऋग्यजुःसामसंपूर्णा होमधूमसमाकुलाः । ऋषेस्तस्याश्रे रम्ये तापसैरुपशोभिते ॥ ७ ॥
नानाद्रुमलताकीर्णे स्वादुमूलफलावृते । ऋतुमंडपसंघाते नानामृगसमाकुले ॥ ८ ॥
स तस्मिन्नाश्रमे पुण्ये जमदग्नेर्महात्मनः । यथर्तु वर्षा पर्जन्यः सस्यानि सुबहूनि च ॥ ९ ॥
सुरसिद्धर्षिगंधर्वविद्याधरगणैः सदा । पूज्यते कामधुक् पुण्या सा कामान्दुदुहे ऋषेः ॥ १० ॥
तत्र कल्पद्रुमः पुण्यश्चिंतामणिरकल्मषः । संतानः पारिजातश्च तथा कामलताः प्रभो ॥ ११ ॥
रेणुकायाः प्रभावेण जमदग्नेर्महात्मनः । जगत्प्रमोदमगमत् प्राणिनः सुखिनोऽभवन् ॥ १२ ॥

हे सुरेश्वरा, तुझ्या कृपेनें मला झालेलें ज्ञान खोटें नव्हे! माझ्यावर अविद्येचा प्रभाव नाहीं, कारण मला आत्मज्ञान झालें आहे. आत्मज्ञानहीन पुरुषच मोहग्रस्त होऊं शकतो! २३.

स्कंद म्हणाला, याप्रमाणें रामाचें भाषण झाल्यावर भगवान् नारद यानें कैलासावर जाऊन राम व शंकर ह्यांना प्रदक्षिणा घातली व नमस्कार करून गोड वाणीनें तो म्हणाला, माझ्या पुण्याईनें मला आज राम व शंकर यांचें दर्शन झालें. देवांमध्यें व राक्षसांमध्यें माझ्या-सारखा भाग्यवान् पुरुष नाहीं. ब्रह्मदेवाला सुद्धां ध्यानद्वारा ज्याचें दर्शन होत नाहीं, त्या राम-शंकरांचें दर्शन मला घडलें. २४-२७.

## अध्याय १९ वा

## जमदग्नीच्या आश्रमाचें वर्णन

ईश्वर म्हणाला, हे मुनिश्रेष्ठ नारदा, तूं कोठून आला आहेस? तूंच सर्व वृत्तांत सांग. कारण तूंच श्रेष्ठ ज्ञानी आहेस. १. नारद म्हणाला, मी महात्मा जमदग्नीच्या आश्रमांतून आलों आहे. तेथें देवी रेणुका व कामधेनु आहे. २. त्या आश्रमांत ८८ हजार श्रद्धामय मुनि, यक्ष व गंधर्व आहेत. ३. तेथें आलेल्या सर्व अतिथींना व तापसांना दिव्य अलंकारांनीं नटलेली ती एकटी देवीच आदरानें भोजन देत असते. ४. त्यांच्या त्या भोजनांत सर्व प्रकारचें अन्न, पेय, पायस, मध, तूप, लेह्य, चोष्य, गुड इत्यादि पदार्थ असतात. ५. त्याच्या त्या होमशाळेंत विविध विषयांवर विचार चालतात. तेथें ऋक्, यजुस् व साम या वेदांनीं संपन्न असे पुष्कळ महर्षि आहेत. ६. सर्वत्र होमधूम पसरलेला असतो. ऋत्विजनांमुळें त्या आश्रमाला शोभा आली आहे. ७. वृक्ष-वेली, गोड फळ-मूळें, यज्ञमंडप व विविध हरणें यांनीं तो सदैव भरलेला असतो. ८. जमदग्नीच्या त्या पवित्र आश्रमांत ऋतुकालानुसार योग्य पाऊस पडतो व पुष्कळ धान्य पैदा होतें. ९. त्याच्या त्या पवित्र कामधेनूची पूजा देव, सिद्ध, ऋषि, गंधर्व व विद्याधर करीत असतात, व ती कामधेनु सर्वांची इच्छा पूर्ण करीत असते. १०. तेथें कल्पवृक्ष, चिंतामणि, संतान, पारिजातक व कामलता आहेत. ११. त्यांच्या प्रभावानें रेणुका, महात्मा जमदग्नि व प्राणिमात्र सुखी झाले आहेत. १२.

ईश्वर उवाच –

शृणु नारद वक्ष्यामि किंचिच्चित्रं महाद्भुतम् । पुरुषस्यास्य तत्पुण्यं येन विश्वमिदं ततम् ॥१३॥

पुरा कृतयुगे प्राप्ते दैत्यदानवराक्षसैः । परिभूय सुरान् सर्वान् जितं त्रिभुवनं बलात् ॥ १४ ॥

विषादमगमन्देवास्तथा सर्वे महर्षयः । शरणं मामनुप्राप्ता मया चाश्वासिता भयात् ॥ १५ ॥

मया पुरुषसूक्तेन चिंतितो यो जगत्पतिः । प्राप्तः क्षीरार्णवात्तूर्णमिदमाह ततो हि माम् ॥१६॥

आहूतोऽहं महादेव किं निमित्तं महर्षयः । नष्टसंज्ञा भवन्सर्वे ब्रूहि किं करवाण्यहम् ॥ १७ ॥

मयोक्तोऽयं हरिः क्षिप्रं रामो भूत्वा महीतले ।
घातयस्व दितेः पुत्रान् राक्षसान्पिशिताशिनः ॥ १८ ॥

तथेति चोक्त्वा भगवांस्तत्रैवांतरधीयत । पश्यतां सर्वदेवानामृषीणामूर्ध्वरेतसाम् ॥ १९ ॥

सोऽयं रामः समुत्पन्नश्चतुर्भिर्भ्रातृभिः सह । असुराणां विनाशाय रेणुकायाः शुभोदरे ॥ २० ॥

नारद उवाच –

न जानेऽहमिमं रामं तत्त्वतो वृषभध्वज । पश्यन्नपि न पश्यामि नित्यमात्मानमात्मना ॥२१॥

पुरुषस्य मनो यादृग्विषयैर्व्यावृतं भवेत् । तादृग्यजति तद्ध्यानात्तादृग्वदति नान्यथा ॥ २२ ॥

सर्वभूतेषु गूढो यः सर्वदाऽऽस्ते सनातनः । ज्ञातव्यः स कथं विष्णुः एकेन मनसा विभो ॥२३॥

चंचलं तन्मनो बुद्ध्या सम्यगुच्चारणं नहि । ज्ञातव्यः सोऽच्युतः शांतश्चैकेन मनसा कथम् ॥२४॥

इंद्रियाणि तु सर्वाणि व्याप्रियंते सदा बहिः । योगिभिर्भक्तियोगेन पूज्यते यः सदा प्रभो ॥२५॥

सोऽयं रामः समुत्पन्नः समुद्धर्तुं जगत्त्रयम् ।

राम उवाच –

किं नारद मुधा भक्त्या मां भ्रामयसि संस्तुवन् ॥ २६ ॥

नाहं स भगवान्विष्णुर्ब्रह्मचारी सत्राडवः । यत्त्वया प्रार्थितं मत्तस्तत्तथा न तदन्यथा ॥ २७ ॥

त्रयाणामपि लोकानां पूजनीयो भविष्यसि ।

इति श्रीस्कांदे सह्याद्रौ रेणुकामाहात्म्ये एकोनविंशतितमोऽध्यायः ॥ १९ ॥

# अथ विंशतितमोऽध्यायः ।

## भागीरथीवर्णनम् ।

स्कन्द उवाच –

इति स्तुत्वाथ तं रामं नारदो भगवान्मुनिः । परिरभ्य प्रणम्याशु यथास्थानं जगाम ह ॥ १ ॥

ततो वैश्रवणो नाम गंधर्वः स्मररूपधृक् । दिव्यं विमानमारुह्य क्रीडार्थं स निरैद्वनम् ॥ २ ॥

भ्रममाण इमां पृथ्वीं प्रमदाभिः समावृतः । रम्यां भागीरथीं गंगां स ददर्शालकेश्वरः ॥ ३ ॥

अनेकवनदुर्गम्यां तापसैरुपशोभिताम् । हंसबर्हिणकारंडभेरुंडशुकमंडिताम् ॥ ४ ॥

ईश्वर म्हणाला, ज्यानें हें विश्व निर्माण केलें त्या पुरुषाची एक अद्‌भुत कथा सांगतों, ऐक. १२. पूर्वी कृतयुगांत राक्षसांनीं आपल्या बळानें सर्व देव जिंकून त्रिभुवनावरही विजय मिळविला. १४. म्हणून भीतिग्रस्त सर्व देव व ऋषि मला शरण आले. १५.

मी पुरुषसूक्त म्हणून देवाचें चिंतन करतांच जगत्पति नारायण क्षीरसागरांतून बाहेर येऊन मला म्हणाला, हे महादेवा, तूं मला कां बोलाविलें? सर्व महर्षि तर मूर्छित झाले आहेत! बोला, मी काय करूं? १६–१७. मी म्हणालों, तूं लवकर राम होऊन पृथ्वीवर जा व दितिपुत्रांचा वध कर. १८. ठीक आहे. असें बोलून तेथेंच सर्व देव व ऊर्ध्वरेत ऋषि यांच्या समक्ष देव अंतर्धान पावला. १९. तोच हा राम चार बंधूंसह असुरसंहारासाठीं रेणुकेच्या उदरीं जन्मला. २०. नारद म्हणाला, हे वृषभध्वजा, मी रामाला तत्त्वतः जाणत नाहीं. नेहमीं त्यास पहात असून मला त्याचें ज्ञान नाहीं. २१. आपल्या मनामध्यें जें विषय असतात तेच विषय आपल्याला सर्वत्र दिसतात व त्याच विषयांविषयी त्याला बोलणें आवडतें. जो ईश्वर सर्वत्र व्याप्त व गूढ आहे, त्याचें ज्ञान केवळ मनानें होणें कसें बरें शक्य आहे? २३. मन बुद्धीपेक्षां चंचल असतें! ज्या विष्णुदेवाचें वर्णन वाणीलाही करतां येत नाहीं, त्या शांत विष्णूचें ज्ञान केवळ मनाला कसें बरें होईल? २४. जो ईश्वर इंद्रियांना अन्तर्बाह्य व्यापून असतो, म्हणून योगीजनांना ज्याची पूजा भक्तिद्वारा करावी लागते, २५. तोच हा परमेश्वर त्रैलोक्याच्या उद्धारासाठीं रामरूपानें अवतरला आहे!

राम म्हणाला, खोटी स्तुति करून तूं मला कां भ्रमांत टाकतोस! मी भगवान् विष्णु नाहीं किंवा वडवाग्निही नाहीं! तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व कांहीं निश्चित होईल व तूं तिन्ही लोकांत पूज्य होशील. २६–२७.

# अध्याय २० वा

## वैश्रवण गंधर्वाची भागीरथीमध्यें जलक्रीडा

स्कंद म्हणाला, अशा प्रकारें त्या रामाची स्तुति करून नारदानें देवाला आलिंगन दिलें व नमस्कार करून लगेच तो इष्टस्थानीं निघून गेला. १. याच वेळीं वैश्रवण नांवाचा एक गंधर्व दिव्य विमानांत बसून क्रीडा करण्यासाठीं वनांत गेला होता. २. तरुण स्त्रियांसह पृथ्वीवर फिरत असतां त्या अलकेश्वराला रमणीय भागीरथी नदी दिसली. ३. अनेक अरण्यांमुळें ती गंगा दुर्गम झाली होती, आणि तपस्वी लोक, हंस, मोर बदक इत्यादि पक्ष्यांमुळें सुंदर दिसत होती. ४.

पुष्पकादवतीर्याथ प्रमदाभिर्विभूषितः। भागीरथ्यां जलक्रीडां चकार द्विजसत्तमाः ॥ ५ ॥
काश्चित्कुंकुमदिग्धांग्यः प्रमदाः प्रेमलालसाः। परिरभ्य बलाद्बालास्तं गायंत्योऽभितः स्थिताः ॥
सिषिंचुस्तं मुदा काश्चिद्वारिणा पापहारिणा। सिषिंचुश्चंदनैः काश्चित्कर्पूरैश्च सुगंधिभिः ॥ ७ ॥
वंशवीणाविवाद्यानि वादयंत्यस्तथापराः। अपरा हारकंठ्यश्च ननृतुस्तास्तदग्रतः ॥ ८ ॥
प्रेम्णा संत्यक्तवसना व्याकुलीकृतलोचनाः। चलितांग्यः प्रियेत्येवमूचुः शशिनिभाननाः ॥ ९ ॥
इति चित्तचमत्कारास्तन्वंग्यो जलजेक्षणाः। सिषिंचुश्चंदनोन्मिश्रैर्वारिभिस्तं पतिं मुदा ॥१०॥
स कंदर्पवपुर्धारी कुबेरो नरवाहनः। संहृष्टो वचनं श्रीमानुवाचैतत्प्रहर्षयन् ॥ ११ ॥
कुबेर उवाच –
इयं भागीरथी गंगा सिद्धगंधर्वसेविता। क्रीडार्थं तपसारण्ये निर्मिता हरिणा पुरा ॥ १२ ॥
ते धन्यास्ते महात्मानो विपाप्मानः सुरूपिणः। प्रमदाभिर्जलक्रीडां कुर्युर्गंगाजले तु ये ॥१३॥
देवपत्न्य ऊचुः–
सुरदुंदुभिनिर्घोषः श्रूयते क्वापि शोभनः। वीणातालस्वनैर्मिश्रैर्भूषणानां च निस्वनः ॥ १४ ॥
स्फुरत्प्रभामणिशतैर्नीलैः पश्य विवस्वतः। बिंबमेतदधौ काश्यं लज्जयैव सुखेचर ॥ १५ ॥
कुबेर उवाच –
योऽयं मृदंगनिर्घोषः श्रूयते सहसा महान्। सवाद्यभूषणानां च व्यक्तं हरिहरांतिके ॥१६॥
हरस्तृष्टजटाजूटघंटिकाभिरलंकृतः। शूली व्याली शिरोमाली नूनमत्रागमिष्यति ॥ १७ ॥
अथ चैव हरिः साक्षाद्यस्मादेषाघनाशिनी। तयोर्विहारदेशोऽयं नूनमत्रागमिष्यति ॥ १८ ॥
स्कन्द उवाच –
ततस्तस्य वचः श्रुत्वा कुबेरस्य वरस्त्रियः। वीक्षमाणा दिशः सर्वास्तिर्यगूर्ध्वमधःस्थिताः ॥१९॥
कुबेरेण प्रेर्यमाणाः प्रेक्षमाणा दिशः स्त्रियः। ददृशुर्यन्महद्रूपं तद्वाक्यं श्रूयतां द्विजाः ॥ २० ॥
इति श्रीस्कन्दपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये विंशतितमोऽध्यायः ॥ २० ॥

## अथ एकविंशतितमोऽध्यायः।

### जमदग्निक्रोधः।

स्कन्द उवाच –
कैलासाद्रिं गते रामे जमदग्नेर्वराश्रमे। विश्वक्षोभकरं घोरमभवत्कौतुकं महत् ॥ १ ॥
ऋषय उवाच –
कीदृशं तदभूत्स्वामिन्परं कौतूहलं प्रभो। ब्रूहि तच्छ्रोतुमिच्छामो रेणुकन्याकथामृतम् ॥ २ ॥

तो गंधर्व पुष्पक विमानांतून खालीं उतरला व प्रमदांसह गंगेंत जलक्रीडा करूं लागला. ७. त्या प्रमदांच्या शरीराला केशराची उटी लावली होती. त्या प्रेमातुर ललना त्याला आलिंगन देऊन त्याच्या सभोंवार गात उभ्या राहिल्या होत्या. कित्येक स्त्रियांनीं पवित्र पाण्यानें त्याला स्नान घातलें, कांहींनीं त्याला चंदन लावलें, कांहींनीं कर्पूरादि सुगंधि पदार्थ लावले. कांहीं स्त्रिया वीणा, वेणू वाजवूं लागल्या, कित्येक स्त्रिया त्याच्यासमोर नृत्य करूं लागल्या. कांहीं स्त्रिया विवस्त्र होऊन प्रेमानें त्याच्याकडे नेत्रकटाक्ष टाकीत होत्या, तर कांहीं चंद्रमुखी त्याला प्रियकर असें संबोधीत होत्या. अशा रीतीनें मनोवेधक, तन्वंगी व कमलाक्षी अशा त्या स्त्रिया आपल्या पतीला चंदनजलानें स्नान घालीत होत्या. ८–१०.

मदनशरीर धारण केलेला तो कुबेर संतुष्ट होऊन आनंदानें म्हणाला, पूर्वी विष्णूनें जलक्रीडेसाठीं ही भागीरथी नदी निर्माण केली होती. ११-१२. विद्वान् , सुंदर, महात्मे व पवित्र अशा ज्या पुरुषांनीं आपल्या स्त्रियांसह या गंगाजलांत क्रीडा केली ते धन्य होत. १३. देवस्त्रिया म्हणाल्या, हा गोड दुंदुभिध्वनि कोठून बरें येत आहे? वीणेच्या आवाजांत दागिन्यांचा आवाजही आहे. १४. ज्याचें शेकडों नीलमण्यांसारखें तेज पाहून लाजेनें सूर्यबिंब-सुद्धां कृश झालें असा हा कोण आहे? १५. कुबेर म्हणाला, ह्या मृदंगांच्या व भूषणांच्या ध्वनीमुळें असें वाटतें कीं, जटाधारी व घंटाभूषण असा तो शूली व शिरोमाली शंकर आतां येथें निश्चित येणार आहे. १६–१७. किंवा विष्णुसुद्धां येथें निश्चित येईल. कारण ही पापनाशिनी गंगा त्यांचें क्रीडास्थान आहे. १८.

स्कंद म्हणाला, त्याचें तें बोलणें ऐकून कुबेराच्या प्रिय स्त्रियांनीं वर, खालीं व सभोंवार पाहिलें. १९. तेव्हां त्या स्त्रियांना एक सुंदर दृश्य दिसलें. २०.

## अध्याय २१ वा

## रेणुका–वधाचें कारण

स्कंद म्हणाला, राम कैलास पर्वतावर गेल्यावर जमदग्नीच्या आश्रमांत एक भयंकर गोष्ट घडली. १. ऋषींनी विचारलें, काय घडलें? प्रभो, आम्ही रेणुकन्येची कथा ऐकूं इच्छितों. २.

स्कन्द उवाच –

ततः कालेन महता रेणुकाघौघनाशिनी । बभौ रजस्वला सांबा रामदेवस्य वै शुभा ॥ ३ ॥
ततो दिनत्रयस्यांते गंगायामुदिते रवौ । रेणुका स्नातुमगमत्सा दिव्यांबरधारिणी ॥ ४ ॥
दिव्यचंदनदिग्धांगी दिव्याभरणभूषिता । स्नात्वा तस्थौ भागीरथ्यां रेणुका स्त्रीभिरावृता ॥५॥
सा ददर्श ऋतुस्नाता क्रीडमानं जले शुभे । तदा चित्ररथं देवी प्रौढनारीशतावृतम् ॥ ६ ॥
दृष्ट्वा तं चारुसर्वांगी विस्मयोत्फुल्ललोचना । चिंतयामास भर्तारं जमदग्निं पतिव्रता ॥ ७ ॥
यद्यस्माभिः परिवृतो जमदग्निर्मुनीश्वरः । क्रीडत्यस्मिन्जलक्रीडां गंगाया विमले जले ॥८॥
तदा स्यात्सार्थकं तीर्थमिति सा मनसाब्रवीत् । ब्रुवत्येवं तदा देवी जगत्स्था जगदंबिका ॥
परिधाय दुकूलं तद्वस्त्रं स्नात्वांगनावृता । भीता सा त्वरिता भर्तुस्ततः स्वाश्रममागमत् ॥१०॥
गृहद्वारे स्थितां दृष्ट्वा जमदग्निः प्रियां शुभाम् । रोषेण महताऽऽविष्टो युगांताग्निसमोऽभवत् ॥
एकवीरां महाभागामृषिः प्रस्फुरिताधरः । रक्तपर्याप्तनयनः क्रोधादिदमुवाच ह ॥ १२ ॥

जमदग्निरुवाच–

निर्गच्छ भवनादस्मात्स्वैरिणि त्वं न संशयः । मया दुश्चारिणी दुष्टा न त्वं हंतुं स्वयं क्षमा ॥
अग्निहोत्रस्य कालोऽयं व्यतीतश्चाभवच्छुभः । देवतातिथिपूजा मे बभौ मोघा न संशयः ॥
त्वं ज्ञातासि मया मूढे नूनं त्वं व्यभिचारिणी । नहि मे धर्ममुद्दिश्य भार्या भवितुमर्हसि ॥१५॥
कुलं संप्राप्तया पुण्यं कुले महति जायते । अकार्यं किं त्वया कार्यमेव पत्न्या विगर्हितम् ॥

स्कंद उवाच–

भर्तुस्तद्वचनं श्रुत्वा रेणुका सा पतिव्रता । शनैरुवाच भर्तारं भीता मधुरया गिरा ॥ १७ ॥

एकवीरोवाच–

भवंत एव मे नित्यं हृदि तिष्ठंति नापरः । मनसापि न वांछामि भवद्भयोऽन्यतरं प्रभो ॥
मम नारायणः पुत्रः पौत्रो ब्रह्मान्यजंतवः । प्रपौत्रास्तेषु कस्मान्मे ह्यभिलाषः प्रवर्तते ॥१९॥
भर्ता मान्यो गुरुः श्लाघ्यो गुरूणां परमो गुरुः । तदृते का गतिः स्वामिन्नारीणामिह जायते ॥
सर्वदेवमयो भर्ता पूज्यः स्त्रीणां गृहे गृहे । तस्मिंस्तुष्टे भवेयुस्ते संतुष्टाः पितरः सुराः ॥२१॥
भर्ता नाम परं स्त्रीणां भूषणं भूषणैर्विना । न कदाचिद्भवेत्तासां विना भर्त्रा भवेद्दिवि ॥२२॥
भर्ता गुरुः सदा मान्यो भर्ता धर्मः सनातनः । भर्तरि प्रीयमाणे वै प्रीताः स्युः सर्वदेवताः ॥
न कामयेऽहं मनसापि चापरं पूज्या भवंतो मम विश्वरूपिणः ।
सत्यं मया चोक्तमिदं न चान्यथा यथोचितं तत्क्रियतां स्वधर्मतः ॥ २४ ॥

इति श्रीस्कांदे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये एकविंशतितमोऽध्यायः ॥ २१ ॥

---

१ प्रीतिमानें

स्कंद म्हणाला, चंद्र मावळला होता व सूर्योदय होत होता, अशा वेळीं ती पापनाशिनी रजस्वला रेणुका दिव्य वस्त्रें धारण करून स्नानासाठीं गंगेवर गेली. ३–४. आणि स्नान करून सुगंधी दिव्य चंदन व दिव्य अलंकार धारण करून गंगातीरावर स्त्रियांसमवेत उभी राहिली. इतक्यांत तिला प्रौढ स्त्रियांसह जलक्रीडा करीत असलेला चित्ररथ गंधर्व दिसला. ५-६. त्याला पाहून त्या सर्वांगसुंदर पतिव्रतेनें जमदग्नीचें चिंतन केलें, ७. व मनांत म्हणाली, जमदग्नीनें माझ्यासह या निर्मल गंगेंत क्रीडा केली असती, तर माझाही जन्म सफल झाला असता ! असा विचार करीत ती रेशमी वस्त्र परिधान करून पतीच्या भीतीनें घाईनेंच आश्रमांत आली. ८–१०. दरवाजांत प्रियेला पाहून जमदग्नीचा क्रोधाग्नि भडकला. ११. आरक्तनेत्र जमदग्नि त्या एकवीरेला म्हणाला, तूं निःसंशय स्वैरिणी आहेस. जा, तूं माझ्या घरांतून चालती हो. दुष्ट स्त्रिये, तुझा वध झालाच पाहिजे ! कारण अग्निहोत्राची पवित्र वेळ टळून गेली व माझी अतिथिपूजा व देवपूजाही राहिली ! तूं सहचारिणी होण्यास सर्वथा अयोग्य आहेस. पवित्र व कुलीन पत्नीमुळें पुण्यलाभ होत असतो व तुझ्यासारख्या अपवित्र पत्नीमुळें पापच लागत असतें ! १२–१६.

स्कंद म्हणाला, हें पतिवचन ऐकून पतिव्रता रेणुका आपल्या पतीला सावकाश व गोड आवाजांत म्हणाली, पतिदेवा, माझ्या हृदयांत सतत आपलीच मूर्ति असते, दुसरी कोणतीच नाहीं ! हे प्रभो, मी माझ्या मनानें सुद्धा दुसऱ्या कोणाचाच भोग इच्छिला नाहीं ! नारायण माझा पुत्र, ब्रह्मा माझा पौत्र व इतर सर्व माझे प्रपौत्र आहेत ! मग माझ्या मनांत त्यांच्या विषयीं अभिलाषा कशी बरें निर्माण होईल ? माझा पति गुरूंचाही गुरु असून स्तुतिपात्र आहे. स्त्रियांना पतीवांचून गति कशी मिळेल ? पति हाच स्त्रीचा देव आहे. पति संतुष्ट झाल्यावर सर्व देव व पितर संतुष्ट होतात. पति हाच स्त्रीचा अलंकार आहे. पतीवांचून स्त्रीला स्वर्गप्राप्ति नाहीं. पति हाच स्त्रीचा गुरु व धर्म होय. पतिभक्तीनेंच सर्व देव प्रसन्न होतात. फार काय मनानें सुद्धां मी अन्य पुरुषाची इच्छा केलेली नाहीं. मी हें सत्यच सांगत आहें. याउपर आपण स्वधर्मोचित कार्य करावें. १७–२४.

# अथ द्वाविंशतितमोऽध्यायः ।

## जमदग्नेः पुत्रेभ्य आदेशः ।

स्कंद उवाच–

तथैवं मधुरेणापि जरदग्निः प्रसादितः । वचसा धर्मयुक्तेन रेणुकां कुपितोऽब्रवीत् ॥ १ ॥

जमदग्निरुवाच–

वधार्हाऽसि न संदेहस्त्वमनार्या सती मम । किं ब्रवीषि वचो धर्म्यं कृत्वा कर्म विगर्हितम् ॥

इत्युक्त्वा रेणुकां हंतुं जमदग्निर्महातपाः । क्रोधेन महताविष्टो ज्येष्ठं पुत्रमथाब्रवीत् ॥ ३ ॥

वत्स मद्वचनात्तूर्णं रेणुकां व्यभिचारिणीम् । शिरश्छिन्ध्यविचारेण गृहीत्वा च लतामिव ॥४॥

इयं दुश्चारिणी दुष्टा कुलधर्मबहिष्कृता । प्रत्यक्षेण मया शस्त्रैर्हंतव्या पुत्र नान्यथा ॥ ५ ॥

वसुरुवाच –

एतत्तव वचस्तात न करिष्याम्यहं ध्रुवम् । अस्वर्ग्यं लोकविद्विष्टमधर्म्यं निरयावहम् ॥ ६ ॥

कस्तु स्वजननीं हन्याद्यादृशः क्रूरकर्मकृत् । रेणुकां तु विशेषेण देवीमव्यभिचारिणीम् ॥७॥

जनको जननी तीर्थं भुक्तिमुक्तिफलप्रदम् । पुत्रस्य नापरं किंचित्त्रिषु लोकेषु विद्यते ॥ ८ ॥

दुर्लभा जननी लोके दुर्लभो जनक प्रियः । दुर्लभाः साधवस्तात बांधवाश्चातिदुर्लभाः ॥ ९ ॥

एतेषामपि पुत्रस्य निस्नेहा निर्गुणापि सा । न दुष्टापि भवेद्वध्या भर्तुश्चपि विशेषतः ॥१०॥

स्वगर्भे जननी देवी या धारयति यत्नतः । यं पुत्रं स कथं तात मातरं तां जिघांसति ॥११॥

पिबेद्यस्याः पयो नित्यं भूतले च विवर्धते । स पुत्रो मातरं हन्यात्तस्माद्दुष्टो न चापरः ॥१२॥

स्कन्द उवाच –

ततः पुत्रस्य वचनात्क्रोधसंरक्तलोचनः । वसुं पुत्रमुवाचेदं जमदग्निर्मुनीश्वराः ॥ १३ ॥

जमदग्निरुवाच –

पिता मान्यः पिता पूज्यः पिता पुत्रस्य दैवतम् । न कुर्याद्यः पितुर्वाक्यं रौरवं नरकं व्रजेत् ॥

जीवतो वाक्यकारणात्प्रत्यब्दं भूरिभोजनात् । गयायां पिंडदानाच्च त्रिभिः पुत्रस्य पुत्रता ॥

इत्युक्त्वा तूर्णमुत्थाय शप्त्वा क्रोधयुतः सुतम् । जमदग्निर्वसुं तीव्रं पातयामास भूतले ॥१६॥

शप्तोऽथ ऋषिणा तेन पपात सहसा भुवि । स वसुः प्रथमः पुत्रश्छिन्नमूल इव द्रुमः ॥१७॥

निश्चेष्टो भूतले दीनो रेणुकायास्तदा सुतः । पपात मुनिना शप्तः शीघ्रमग्निवसुर्भुवि ॥१८॥

ततस्तं पवनं पुत्रं मुनिर्विश्वावसुं द्विजाः । आदिदेश वधे तस्या रेणुकायाः स भार्गवः ॥१९॥

जमदग्निरुवाच –

वत्स घातय शस्त्रेण निशितेन ममाग्रतः । शीघ्रं दुश्चारिणीमेव भक्त्या मद्वचनादिमाम् ॥२०॥

---

१ पाताला॑श्च ।

# अध्याय २२ वा

## जमदग्नीची पुत्रांस मातृवधाची आज्ञा

स्कंद म्हणाला, त्या धर्मपर व गोड भाषणानें जमदग्नीचें समाधान झालें नाहीं. म्हणून तो रागानें म्हणाला, तूं निःसंशय वधार्ह आहेस. तूं अनार्या आहेस, निंद्य कर्म करून वर धर्माच्या गोष्टी सांगतेस. १-२. असें बोलून क्रोधान्ध जमदग्नि आपल्या ज्येष्ठ पुत्रास म्हणाला, हे पुत्रा, रेणुका लतासुकुमार असली तरी व्यभिचारिणी आहे. हिचा माझ्या आज्ञेनें शिरश्छेद कर. ३-४. ह्या दुश्चारिणी स्त्रीचा वध झालाच पाहिजे. पुत्रा, मला दुसरा मार्ग नाहीं. ५. वसु म्हणाला, बाबा, हें कर्म मी करणार नाहीं, ह्यामुळें मी स्वर्गाला मुकणार, शिवाय जगांत माझी निंदाही होईल. ६. स्वजननीला क्रूरपणें कोण बरें ठार करील? विशेषतः देवीतुल्य, अव्यभिचारिणी मातेला कोण बरें मारूं शकेल? ७. मुलाला त्रैलोक्यांत माता-पिता हेंच ऐश्वर्य व मुक्ति देणारें तीर्थ आहे! दुसरें तीर्थ नाहीं. ८. जगांत प्रिय जननी, पिता, साधुजन व बांधव अत्यंत दुर्लभ असतात. ९. म्हणून कोणीही स्त्रीवध करूं नये. विशेषतः पुत्रानें आपली माता, पतीनें आपली पत्नी कितीही स्नेहहीन, गुणहीन व दुष्ट असली तरी तिचा वध करूं नये. १०. ज्या जननीनें पुत्राला आपल्या गर्भात धारण केलें, तिला तिच्या त्या पुत्रानें कसें ठार मारावें? ११. जिचें आपण स्तनपान केलें, जिनें आपल्यास सतत वाढविलें, अशा जननीला जो ठार मारतो, त्याच्यासारखा दुष्ट दुसरा कोणी नाहीं. १२. स्कंद म्हणाला, पुत्राचें तें बोलणें ऐकून रक्तनेत्र जमदग्नि वसूला म्हणाला, पिता हाच पूज्य होय व पिता हेंच पुत्राचें दैवत होय. पित्याची आज्ञा न पाळणारा पुत्र रौरव नरकांत जातो. १४. पिता जिवंत असेतों त्याची आज्ञा पाळणें, पिता मृत झाल्यावर त्याला उद्देशून गयेंत पिंडदान करणें व प्रतिवर्षी ( पित्याला उद्देशून ) अन्नदान करणें, हीं तीन कर्में जो करतो तोच खरा पुत्र होय. असें बोलून जमदग्नीनें वसूला शाप दिला व त्यास जमिनीवर पाडलें. १३-१७. याप्रमाणें वसूरूप अग्नि मुनिशापानें निश्चेष्ट होऊन जमिनीवर पडला. १८. नंतर भृगुवंशीय जमदग्नि पवनपुत्र विश्वावसूला म्हणाला, पुत्रा, माझ्या आज्ञेनें ह्या दुश्चारिणीचा तीक्ष्ण शस्त्रानें वध कर. १९-२०.

पुत्र उवाच –

गुरूणामेव सर्वेषां जननी परमो गुरुः । तां हत्वा मातरं पुत्रः कां गतिं तात गच्छति ॥२१॥
पितुरभ्याधिका माता गौरवेण प्रशस्यते । आत्मानं सृजते गर्भे यस्याः स चात्मनः ॥ २२ ॥

जमदग्निरुवाच –

न जानासि परं धर्मंधर्मं च ममाग्रतः । कस्माद्वदसि मूढ त्वं नृशंस पितृनिंदक ॥ २३ ॥
तमप्यपातयच्छीघ्रं भूमावेव मुनीश्वराः । पुत्रं विश्वावसुं शप्त्वा वज्राहतमिवाचलम् ॥ २४ ॥
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रौ रेणुकामाहात्म्ये द्वाविंशतितमोऽध्यायः ॥ २२ ॥

# अथ त्रयोविंशतितमोऽध्यायः ।

## जमदग्निशापः ।

स्कन्द उवाच –

देवश्रेष्ठौ सुतौ शप्त्वा नष्टसंज्ञौ ततो मुनिः । पातयित्वा धरापृष्ठे तयोरनुजमाह्वयत् ॥ १ ॥
बृहत्कण्वमुवाचेदं वचनं क्रोधमूर्च्छितः । वधार्थं चैकवीराया पुत्रं चैव शतक्रतुम् ॥ २ ॥
सत्यसंधोऽसि धर्मज्ञ गुरुभक्तोऽसि पुत्रक । स्वहस्तेनासिना दुष्टां रेणुकां हंतुमर्हसि ॥ ३ ॥
अहं तव गुरुः पूज्यः पिता मान्यो न संशयः । क्षिप्रं घातय मद्भक्त्या रेणुकां व्यभिचारिणम्

पुत्र उवाच –

मनसापि न शक्तोऽस्मि मातरं हंतुमुत्तमाम् । यस्याः पादाब्जयुगलं नित्यं ध्यायंति योगिनः ॥५॥
वंदनीया सदा मान्या जननी पापनाशिनी । यस्याः संदर्शनादेव पुत्रः पापात्प्रमुच्यते ॥ ६ ॥
इमां गुणवतीं देवीमेकवीरां पतिव्रताम् । स्वहस्तेन कथं तात हंतुमिच्छामि चासिना ॥७॥

स्कन्द उवाच–

तस्यापि च वचः श्रुत्वा चुकोप मुनिपुंगवः । त्रिशिखां भृकुटी चक्रे सुतं प्रति मुनीश्वराः ॥८॥
अथ शप्त्वा ऋषिः क्रोधान्मध्यमं पुत्रमुत्तमम् । अग्रतो रेणुकायाश्च पातयामास भूतले ॥ ९ ॥
बृहद्भानुरिति ख्यातं पुत्रमाहूय सत्वरम् । जमदग्निस्ततः क्रोधादिदं वचनमब्रवीत् ॥ १० ॥

जमदग्निरुवाच –

कुरुष्व वचनं पुत्र यदि भक्तिर्ममास्ति ते । घातयस्व सुतीक्ष्णेन खड्गेनानेन रेणुकाम् ॥ ११ ॥
विहाय चैकवीरेयं गृहे मां जननी तव । ऋतुस्नाता त्वसौ मूढा गंधर्वं प्रति लालसा ॥ १२ ॥
सर्वथेयं निहंतव्या सुदुष्टा व्यभिचारिणी । न शक्ष्याम्यग्रतो द्रष्टुमिमां घातय पुत्रक ॥ १३ ॥

पुत्र उवाच –

धिगिदं वचनं तात परुषं वक्तुं नार्हसि । मातेयं जगतोऽप्येका सा हंतव्या कथं मया ॥ १४ ॥
सुरमौलिभिर्यद् घृष्टं पादाब्जयुगलं सदा । नित्यं विधिर्हृदि ध्यायेत्सा हंतव्या कथं मया ॥१५॥

विश्वावसु म्हणाला, बाबा, माता म्हणजे गुरूंचीही गुरु आहे. अशा मातेचा वध करणाऱ्या पुत्रास कोणती बरे गति मिळेल ? २१. जगांत पित्याहून माता श्रेष्ठ मानिली जाते ! कारण भर्ता स्वतः आत्मरूपानें तिच्या गर्भात जन्म घेत असतो. २२. जमदग्नि म्हणाला, पितृनिंदका मूर्खा, तूं माझ्यासमोर धर्माधर्माच्या गोष्टी सांगतोस ? तुला धर्माधर्माचें काय ज्ञान आहे ? २३. मुनींनो, असें बोलून वज्राघातानें पर्वत पाडावा त्याप्रमाणें जमदग्नीनें शाप देऊन लगेच विश्वावसूला जमिनीवर पाडलें. २४.

# अध्याय २३ वा

## जमदग्नीचा शाप

स्कंद म्हणाला, त्या मुनीनें त्या देवश्रेष्ठ पुत्रांना शाप देऊन मूर्छित केलें व त्यांच्या धाकट्या भावांना बोलाविलें. १. प्रक्षुब्ध जमदग्नि बृहत्कण्वरूप इंद्राला प्रथम म्हणाला, हे पुत्रा, तूं सत्यवादी, धर्मज्ञ व गुरुभक्त आहेस. यासाठीं तूं स्वतःच्या हातांनीं या दुष्ट रेणुकेचा वध कर. ३. मी तुझा गुरु व पूज्य पिता आहें. म्हणून माझ्या आज्ञेनें तूं ताबडतोब ह्या व्यभिचारिणीला ठार मार. ४. पुत्र म्हणाला, योगिजनसुद्धां जिच्या चरणाची प्रतिदिन पूजा करतात, त्या मातेचा वध मनानेंसुद्धां करण्यास मी तयार नाहीं. ५. जिच्या केवळ दर्शनानें पुत्र पापमुक्त होतो, ती पापनाशिनी माता सदैव वंदनीयच आहे. ६. बाबा, ह्या गुणवती, पतिव्रता एकवीरेवर मी स्वतःच्या हातांनीं कसा आघात करूं ? ७. स्कंद म्हणाला, मुनिश्रेष्ठांनो, पुत्राचें हें बोलणें ऐकून अधिकच क्रुद्ध अशा जमदग्नीनें त्याच्याकडे रागीट दृष्टीनें पाहिलें, ८. व त्यालाही शाप देऊन रेणुकेच्या समक्षच त्याला भूमीवर पाडलें. ९. नंतर लगेच बृहद्भानूला हांक मारून जमदग्नि क्रोधानें त्याला म्हणाला, पुत्रा, माझ्यावर तुझी भक्ति असेल, तर ह्या तीक्ष्ण तरवारीनें रेणुकेला ठार मार. १०-११. ही तुझी मूर्ख ऋतुस्नात माता मला घरीं ठेवून नदीवर गेली व तेथें गंधर्वावर मोहित झाली. १२. ही दुष्ट व्यभिचारिणी स्त्री वधार्ह आहे ! मला ही माझ्या दृष्टीसमोर नको. पुत्रा, हिचा वध कर. १३. पुत्र म्हणाला, बाबा, धिक्कार असो तुमच्या ह्या बोलण्याला ! असें कठोर बोलणें योग्य नव्हे. ह्या जगन्मातेला मी कसा ठार करूं ? १४. जिच्या चरणावर देवमुकुट नम्र होतात व देव जिची आराधना करतात, त्या मातेचा वध मी कसा करूं ? १५.

सर्षिद्वीपवनां पृथ्वीं या बिभर्ति कन्दुकवत् । एकवीरा महाभागा सा हंतव्या० ॥ १६ ॥
तासेकां वेदवेद्यां च स्वयं ब्रह्मापि रेणुकाम् । चिंतयन्न विजानाति सा हंतव्या० ॥ १७ ॥
रेणुकस्य सुता राज्ञस्तत्र भार्या महात्मनः । एकवीरा महाभागा सा हंतव्या० ॥ १८ ॥
यस्या दानोदकान्नेन तृप्तिं यांति महर्षयः । नित्यं सर्वाणि भूतानि सा हंतव्या० ॥ १९ ॥
अद्वैतवादिनां विद्या ह्यानंदकला नु किं । कल्पवृक्षस्य शाखेयं सा हंतव्या० ॥ २० ॥
या वंद्या जननी देवी योगिनां हृदयेषु या । सर्वभूतयुते शुक्ला सा हंतव्या० ॥ २१ ॥
त्यक्ष्यामि देहमिममाशु न संशयोऽत्र देवीं तु मातरमिमां न तु घातयामि ।
अग्निं विशामि जलधिं च चतुर्विधं वा तिग्मं पिबामि च विषं जननीं न हन्मि ॥ २२ ॥
तीक्ष्णेन देहमधुना तिलशः करिष्ये शस्त्रेण मातरमिमां न तु घातयामि ।
इति श्रीस्कन्दपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये त्रयोविंशतितमोऽध्यायः ॥ २३ ॥

१ शाकेयं

# अथ चतुर्विंशतितमोऽध्यायः ।

## परशुरामस्यागमनम् ।

स्कन्द उवाच–

ततस्तस्यापि पुत्रस्य तदेवं वचनं मुनिः । श्रुत्वा न्यपातयद्भूमौ तं शप्त्वात्रैव तत्क्षणात् ॥१॥
सुरश्रेष्टास्ततः पुत्राश्चत्वारो जमदग्निना । शप्ताः सुर्वगुणैर्युक्तास्तेऽभवन् भस्मराशयः ॥ २ ॥
ततो हाहाकृताः सर्वे मुनयः सुरचारिणः । चिंतामवापुः पश्यंतस्तद्दषेश्चरितं महत् ॥ ३ ॥
स शप्तेषु चतुर्ष्वेव पुत्रेषु प्रमृतेषु च । जमदग्निर्हरिं रामं दध्यौ कैलाससंस्थितम् ॥ ४ ॥
रामरामेति रामेति त्रिभिरुच्चैः स्वयं मुनिः । जमदग्निः प्रियं पुत्रं कैलासात्क्षिप्रमाह्वयत् ॥ ५ ॥
सप्लुतस्वरसयुक्तं पितुः शब्दं मुनीश्वराः । रामस्तमशृणोद्वीरः कैलासाचलसंस्थितः ॥ ६ ॥
रामः प्रणम्य तं दृष्ट्वा कैलासपतिमीश्वरम् । स्कंधे परशुरामो हि धनुर्गृह्य निरद्बली ॥ ७ ॥
ततः संधाय नाराचानाकृष्य विपुलं धनुः । स रामस्तत्क्षणादेव पितुः स्थानं ययौ जवात् ॥८॥
सकंकणभुजाभ्यां च स्नेहादुत्क्षिप्य मातरं । पितरं च परिष्वज्य रामस्तामभ्यवादयत् ॥९॥
स ददर्श ततो भ्रातॄन् गतासून्पतितान्क्षितौ । क्रुद्धं च पितरं रामः प्रसन्नां चैव रेणुकां ॥१०॥
करांजलिपुटं कृत्वा विनयेन मुनीश्वराः । प्रसाद्यैव च तं रामस्ततो वचनमब्रवीत् ॥ ११ ॥
राम उवाच –

तवाद्य वचनात्तात कैलासादागतोऽस्म्यहम् । त्वमाज्ञापय मां तूर्णं ब्रूहि किं करवाणि ते ॥१२॥
पितुर्वचनकर्तारः सर्वे ते गुरवो मम । त्वं मत्तुल्यो गुरुः साक्षात्स्वयं देवः पिनाकभृत् ॥ १३ ॥

जी रेणुकादेवी द्वीपांसह सर्व पृथ्वी चेंडूसारखी धारण करते, त्या मातेचा वध मी कसा करावा ? १६. ज्या वेदसंपन्न रेणुकेचें चिन्तन स्वतः ब्रह्मदेव करीत असतो, तरीपण त्याला जिचें ज्ञान होत नाहीं अशा ह्या मातेचा वध मी कसा करावा ? १७.

रेणुराजाची कन्या व आपली धर्मपत्नी अशा ह्या भाग्यवती एकवीरेचा वध मी कसा करावा ? १८. जिच्या अन्नोदकाच्या योगानें सर्व महर्षि व सर्व प्राणिमात्र तृप्त होतात, तिचा वध मी कसा करावा ? १९.

जी माझी माता अद्वैतवाद्यांची विद्या आहे, त्यांच्या हृदयांतील एक आनंदकला आहे, किंवा कल्पवृक्षाची एक शाखाच आहे, त्या ह्या माझ्या मातेचा वध मी कसा करूं ? २०. जी वंदनीय माता योगिजनांच्या हृदयांत वास करते, जी सर्व प्राणिमात्रांत असते, तिचा वध मी कसा करावा ? २१. ह्या देवीतुल्य मातेचा वध करण्याऐवजीं मी स्वदेहत्याग करीन, अग्निप्रवेश करीन, जलप्रवेश करीन किंवा तीव्र विषप्राशन करीन, पण ह्या माझ्या मातेचा वध करणार नाहीं. २२. तीक्ष्ण शस्त्रानें मी माझ्या शरीराचे तिळाएवढे बारीक तुकडे करीन, पण माझ्या मातेचा वध करणार नाहीं. २३.

## अध्याय २४ वा

## परशुरामाचें आगमन

स्कंद म्हणाला, पुत्राचें हें बोलणें ऐकून मुनीनें त्यालासुद्धां शाप दिला व एका क्षणांतच त्याला जमिनीवर पाडलें. १. अशा रीतीनें जमदग्नीच्या शापामुळें देवाप्रमाणें श्रेष्ठ व सर्वगुणसंपन्न असे चारही पुत्र नाश पावले. २. तें भयंकर दृश्य पाहून सर्व ऋषि चिंतातुर झाले व सर्वत्र हाहाःकार उडाला. ३. शापानें ते चारही पुत्र मृत झाल्यावर जमदग्नीला कैलास पर्वतावर असलेल्या रामाची आठवण झाली. ४. ताबडतोब हे राम, हे राम अशी मोठ्यानें हांक मारून त्यांनीं आपल्या प्रिय पुत्राला कैलास पर्वतावरून बोलाविलें ! ५. पित्यानें तार स्वरांत उच्चारलेला तो शब्द रामाला कैलास पर्वतावर ऐकूं आला ! तो बलवान् रामही लगेच शंकराला नमस्कार करून व खांद्यावर धनुष्य ठेवून निघाला; ७. व आपलें सज्ज धनुष्य घेऊन तो आपल्या पित्याजवळ पोहोंचला. ८. आपल्या कंकणधारी हातांनीं मातेला प्रेमानें उचलून व वडिलांना आलिंगन देऊन रामानें उभयतांना वंदन केलें. ९. त्याला बंधु मृत झालेले, पिता क्रुद्ध झालेला, पण माता प्रसन्न असलेली दिसली ! १०. तो राम हात जोडून नम्रतापूर्वक जमदग्नीला म्हणाला, "आपल्या आज्ञेप्रमाणें मी कैलासपर्वतावरून येथें आलों आहे. मला आज्ञा करा, बोला मी काय करूं ? ११–१२. पित्याची आज्ञा पाळणारे सर्व लोक माझे गुरु आहेत. तुम्ही माझे गुरु आहांत, तुम्ही साक्षात् शंकरच आहांत ! १३.

न त्वया सदृशः कश्चित्त्रिषु लोकेषु विद्यते। त्वं ब्रह्मा सत्यमोंकारस्त्वमग्निस्त्वं च चंद्रमाः ॥
सर्वदेवमयस्त्वं च नास्ति किंचित्त्वया विना। ब्रूहि तात यदर्थं मे तूर्णमावाहनं कृतम् ॥ १५ ॥
तव तत्संप्रदानाय क्षोभये भुवनत्रयं।
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये चतुर्विंशतितमोऽध्यायः ॥ २४ ॥

# अथ पंचविंशतितमोऽध्यायः।

## रेणुकावधः।

स्कन्द उवाच –

ततः पुत्रस्य वचनात्संप्रहृष्टतनूरुहः। जमदग्निः प्रियं पुत्रं रामं वचनमब्रवीत् ॥ १ ॥

जमदग्निरुवाच –

त्वं मे पूर्वं सखा वत्स हरिस्त्रिभुवनेश्वरः। स्वर्गे राम सुपुत्रस्त्वं संप्राप्तोऽसीह भूतले ॥ २ ॥
त्वदृते देह आत्मा च जीवितं च मुधा भवेत्। शंभुतेजःसमुद्भूतं ऋषयः सुरकिन्नराः ॥ ३ ॥
ब्रूयुर्यं कश्यपं गंगामदितिं रेणुकामुमाम्। इयं तु जननी राम यस्या गर्भे तवोद्भवः ॥ ४ ॥
अनया स भागीरथ्यां गंधर्वः स्मररूपधृक्। अवेक्षित इति ज्ञातं मया भावेन नान्यथा ॥ ५ ॥
देवतातिथिदीनार्ततृप्तिकालोऽनया सुत। त्यक्तस्तस्माच्च हंतव्या नूनं नास्त्यत्र संशयः ॥ ६ ॥
त्वमिमां रेणुकां वत्स राम स्वच्छधनुर्धर। क्षिप्रं दुश्चारिणीं दुष्टां शस्त्राग्रेणैव घातय ॥ ७ ॥
इत्युक्तः स तदा रामः पित्रा तेन मुनीश्वराः। तत्क्षणादेकवीरां तामंबां परशुनाऽच्छिनत् ॥८ ॥
ततः पपात सा देवी रेणुका पापनाशिनी। निहत्य ऋषिपुत्रेण छिन्नेव कदली यथा ॥ ९ ॥
ततोंऽबरात्पुष्पवर्षः सहसा ह्यपतच्छुभः। रेणुकायां हतायां च रामदेवस्य मूर्धनि ॥ १० ॥
जमदग्निर्महातेजाः सुतं धर्मभृतां वरम्। प्रशशंस मुदा रामं भक्तिं दृष्ट्वाऽतुलां तदा ॥ ११ ॥

ऋषिरुवाच –

रामराम महाबाहो भृगुवंशविवर्धन। तव तुष्टोऽस्म्यहं वत्स ब्रूहि यत्तेऽभिवांछितम् ॥ १२ ॥
प्राकृतं नहि मन्ये त्वां पुत्रं गुणवतां वरम्। धन्योऽस्मि कृतकृत्योऽस्मि यस्य मे त्वं सुतो महान् ॥ १३ ॥
यः करोति पितुर्वाक्यं नित्यं मातृहिते रतः। स पूज्यो वंदनीयश्च देवानां पितृवद्भवेत् ॥१४॥
त्वं हि सत्यव्रतश्चैव गुरुभक्तिपरायणः। अचिंत्योऽसि न संदेहः सुराणामपि चेश्वरः ॥ १५ ॥
वरं दास्यामि ते राम गुरुभक्तिपरायण। तत्त्वं ब्रूहि महाबाहो यत्ते मनसि वर्तते ॥ १६ ॥

राम उवाच –

यदि तुष्टोऽसि मे तात सह मात्रा मुनीश्वराः। उत्तिष्ठंत्वनघाः क्षिप्रं भ्रातरो भस्मराशयः ॥
इत्युक्तस्तेन रामेण जमदग्निर्महातपाः। शीघ्रमुत्थापयामास पुत्रान्क्षिप्त्वाऽमृतेन तान्॥ १८॥

ह्या तिन्ही लोकांत मला आपल्या इतका पूज्य कोणीही नाहीं ! तुम्हीच ब्रह्म, सत्य, ॐकार, अग्नि व चंद्र आहांत. १४. तुम्हीच सर्व देवांप्रमाणें आहांत. तुम्हीं नाहीं अशी वस्तूच नाहीं. बाबा, तुम्ही मला ज्या कार्यासाठीं बोलाविलें, तें कार्य सांगा. " १५.

# अध्याय २५ वा

## रेणुकावध व जमदग्नीचा उःशाप

स्कंद म्हणाला, पुत्राचें हें बोलणें ऐकून जमदग्नीच्या शरीरावर रोमांच उभे राहिले व तो आपल्या प्रिय पुत्राला म्हणाला, " बाळ राम, पूर्वी स्वर्गांत जो माझा मित्र त्रिभुवनेश्वर हरि होता तोच तूं माझा भूतलावर प्रिय मित्र झाला आहेस. १–२. तुझ्यावांचून माझा देह, आत्मा व जीवन हें सर्व मला व्यर्थ आहे. शंभुतेजापासून तुझा जन्म झाला आहे. हे सर्व ऋषि देव-किन्नर आहेत. गंगा अदिति आहे. जिच्या गर्भात तुझा जन्म झाला ती रेणुका उमा आहे. ३–४. हिनें भागीरथी नदीवर चित्ररथ गंधर्वाला मदनाच्या रूपांत पाहिलें असल्याचें मला अंतर्ज्ञानानें समजलें. ५. हे बाळ, हिनें देव, अतिथि, दीन व दुर्बल यांना तृप्त करण्याची सन्धि घालविली आहे, यासाठीं आतां तिचा वध केलाच पाहिजे. हे राम, ताबडतोब ह्या दुश्चारिणीला शस्त्रानें ठार कर. ६–७. मुनींनो, पित्याच्या मुखांतून हे शब्द बाहेर पडतांच रामानें एका क्षणांत आपल्या एकवीरा मातेला परशूनें ठार मारलें. ८. त्या शस्त्राघातानें कदलीवृक्षाप्रमाणें ती पापनाशिनी रेणुका एकदम जमिनीवर कोसळली. ९. त्यावेळीं रामाच्या मस्तकावर व मृतरेणुकेवर अकस्मात् पुष्पवृष्टि झाली. १०. ही रामाची अद्वितीय भक्ति पाहून जमदग्नि आनंदित झाला व त्यानें श्रेष्ठधर्मज्ञ रामाची स्तुति केली. ११. जमदग्नि म्हणाला, हे राम, तूं भृगुवंशाचा उत्कर्ष करणारा प्रतापी पुत्र आहेस. मी प्रसन्न झालों आहें. तुला पाहिजे तो वर माग. १२. तुझ्यासारखा दुसरा गुणी पुत्र नाहीं. तुझ्यामुळें मी धन्य झालों. १३. जो पुत्र पित्याचा आज्ञाधारक व मातृहितकर्ता असतो, तो देवांनासुद्धां पित्यासारखा पूज्य वाटतो. १४. तूं सत्यव्रत व गुरुभक्त आहेस. तूं अचिन्त्य अशा देवांचाही देव आहेस, यांत शंका नाहीं. १५. हे गुरुभक्त रामा, तुला वर देण्यास मी तयार आहें. हे महाबाहो, तुझी इच्छा सांग. १६. राम म्हणाला, तुम्ही माझ्यावर प्रसन्न आहांत, तर मातेसह माझे सर्व बंधु सत्वर जिवंत व्हावेत हीच माझी इच्छा आहे. १७. हें रामवचन ऐकून तेजस्वी जमदग्नीनें लगेच अमृतसिंचन करून त्या सर्व पुत्रांना जिवंत केलें. १८.

सिक्तास्तेनामृतेनाशु वस्वाद्यास्ते सुतादयः । उत्थिताः सहसा दृष्ट्वा पितरं चाभ्यवादयन् ॥१९॥
बाहुभ्यां संपरिष्वज्य स्वांके चारोप्य तान्सुतान् । पुनरेव सुतं स्नेहाद्रामं वचनमब्रवीत् ॥२०॥
जमदग्निरुवाच –
अन्यं वरय भद्रं ते यमिच्छसि वरं सुत । वांछितं ते प्रदास्यामि यद्यपि स्यात्सुदुर्लभम् ॥२१॥
राम उवाच –
इयं मे जननी देवी रेणुकाऽव्यभिचारिणी । अज्ञात्वा स्ववधं तात क्षिप्रमुत्तिष्ठतु स्वयम् ॥२२॥
यस्याः पादाब्जयुगलं ध्यायंति मुनयः सदा । योगिनश्च जगन्मातुस्त्वद्भक्त्या सा हता मया ॥
तथा मातृवधो घोरो न भविष्यति मे प्रभो । मया हतेति मातेयं न जानाति तथा कुरु ॥२४॥
जमदग्निरुवाच –
यथा वदसि धर्मज्ञ तत्तथा न तदन्यथा । क्रोधेनेदं कृतं वत्स दुष्कृतं वै मयाऽशुभम् ॥२५॥
स्कन्द उवाच –
एवमुक्त्वा महातेजा जमदग्निः प्रियं सुतम् । पीयूषेणाथ तां सिक्त्वा क्षिप्रमुत्थापयत्स्वयम् ॥
सर्वभूषणसंपन्नां सर्वाभरणभूषिताम् । उत्थाय भूतलात्स्वस्था सा पुत्रान्परिषस्वजे ॥ २७ ॥
ततः प्रणम्य तामंबां पंच पुत्रा मनोरमाः । पप्रच्छुरमलां देवीं परिष्वज्येदमुत्तमाः ॥ २८ ॥
पुत्रा ऊचुः –
मातस्त्वं ब्रूहि केनाथ कारणेन चिरं शुभे । पुत्रान्विहाय नः सर्वान्सुप्तासि धरणीतले ॥२९॥
न मुहूर्तमपीच्छामो जीवितं च त्वया विना । त्वया जीवंति भूतानि धार्यते च त्वया जगत् ॥
एतस्मिन्नंतरे तत्र पुष्पवर्षो महानभूत् । रेणुकायास्तदा मूर्ध्नि दुंदुभीनां च निःस्वनः ॥ ३१ ॥
दृष्ट्वा तामुत्थितां देवीमृषयः सुरकिन्नराः । स्तुवंतो योगिनः सर्वे परं हर्षमुपागमन् ॥ ३२ ॥
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये पंचविंशतितमोऽध्यायः ॥ २५ ॥

## अथ षड्विंशतितमोऽध्यायः ।

### जमदग्निक्रोधः संवादः ।

स्कन्द उवाच –
ततः समुत्थितां देवीमेकवीरां पतिव्रताम् । ऋषिः सत्कारयामास वस्त्रालंकारभूषणैः ॥ १ ॥
त्यज देवि प्रिये सर्वं दुःखं दैन्यं च भामिनि । भद्रे क्रोधवशादेतत्तव कष्टं मया कृतम् ॥ २ ॥
ध्रुवं गुणवती चासि पुत्रिण्यव्यभिचारिणी । पतिभक्तिरता चासि त्वमेव मम वल्लभा ॥ ३ ॥
जननी सर्वदेवानां त्वमेव सकलेश्वरी । मया ज्ञातासि सा नूनं वंदनीया पतिव्रता ॥ ४ ॥
इत्युक्त्वा तां परिष्वज्य स्नेहान्मुनिरुदारधीः । स्वांके पुत्रैर्वृतां हृष्टो देवीमारोपयत्तदा ॥ ५ ॥
ततस्ते सुरगंधर्वाः सिद्धाश्च परमर्षयः । वस्त्रालंकरणैः पुष्पैः एकवीरामपूजयन् ॥ ६ ॥

वसु इत्यादि सर्व पुत्र त्वरित उठले व त्यांनीं वडिलांना नमस्कार केला. १९. जमदग्नीनें त्या मुलांना आलिंगन देऊन आपल्या मांडीवर बसविलें व पुनः पुत्रप्रेमानें तो रामाला म्हणाला, पुत्रा, तूं आणखी एक वर माग. तो अतिदुर्लभ वर देखील मी तुला देईन. २०–२१.

राम म्हणाला, माझी पवित्र माता रेणुका त्वरित जिवंत व्हावी व तिला स्ववधाची स्मृति राहूं नये ! २२. मुनिजन देखील हिच्या चरणांची पूजा करतात. ही जगन्माता आहे. हिचा वध केवळ पितृभक्तीमुळें माझ्याकडून घडला. २३. मातृवधाचें भयंकर पाप मला लागणार नाहीं व मी तिला ठार मारल्याचें स्मरण आईला होणार नाहीं, असें करा. २४.

जमदग्नि म्हणाला, धर्मज्ञा, तुझ्या इच्छेप्रमाणेंच सर्व कांहीं होईल. बाळ, क्रोधामुळें हें अशुभ दुष्कृत्य माझ्याकडून घडलें आहे. २५.

स्कंद म्हणाला, असें बोलून महातेजस्वी जमदग्नीनें स्वतः अमृतसिंचन करून रेणुकेला जिवंत केलें. २६. लगेच सर्व अलंकारसंपन्न रेणुका हिनें उठून पुत्रांना जवळ घेतलें. २७. त्या पांचही पुत्रांनीं आईला नमस्कार केला व विचारलें, आई, आम्हां मुलांना टाकून तूं जमिनीवर इतका वेळ कां झोंपली होतीस ? २८–२९. तुझ्याशिवाय क्षणभरसुद्धां आम्हांला जगण्याची इच्छा नाहीं. तुझ्यामुळेंच सर्व प्राणीमात्र जिवंत आहेत, व तुझ्यामुळेंच हें जग आहे. इतक्यांत त्यांच्यावर पुष्पवर्षाव झाला, व दुंदुभी निनादूं लागल्या. ३१. रेणुका जिवंत झालेली पाहून सर्व ऋषि तिची स्तुति करूं लागले व सर्वांना अत्यानंद झाला. ३२.

# अध्याय २६ वा

## जमदग्नि व क्रोध यांचा संवाद

स्कंद म्हणाला, नंतर जमदग्नीनें जिवंत झालेल्या त्या पतिव्रता एकवीरेचा वस्त्रालंकारांनीं सत्कार केला. १. तो एकवीरेला म्हणाला, "प्रिये, सर्व दुःख व दैन्य यांचा त्याग कर. क्रोधाच्या आवेशांत मी तुला पुष्कळ कष्ट दिले आहेत. २. तूं गुणवती, अव्यभिचारिणी व पतिव्रता आहेस. तूंच मला फार प्रिय आहेस. ३. हेंही मला माहीत आहे कीं, तूं देवमाता असून वंदनीय आहेस." ४. असें बोलून जमदग्नीनें तिला प्रेमानें आलिंगन दिलें व आपल्या मांडीवर बसविलें. ५. यावेळीं सर्व देव, गंधर्व, सिद्धपुरुष व ऋषि ह्या सर्वांनीं वस्त्रालंकार देऊन तिची पूजा केली. ६.

ततः क्रोधमुवाचेदं जमदग्निर्महातपाः । क्रोधेन महताऽऽविष्टो मुनिः संसदि संस्थितः ॥७॥

जमदग्निरुवाच –

रे रे क्रोध दुराचार क्रूर चांडाल निर्घृण । मच्छरीराच्च त्वं गच्छ स्त्रीवधोऽयं कृतस्त्वया ॥८॥

पितृमातृवधो नूनं स्त्रीवधश्चापि तिष्ठति । बालब्रह्मवधो घोरो भविष्यति न संशयः ॥ ९ ॥

असंभाष्यस्त्वमस्पृश्यः क्रूरः प्राणिवधोद्यतः । न कदाचित्त्वया दुष्ट मम कार्यं भविष्यति ॥१०॥

स्कन्द उवाच –

इत्युक्तः स तदा क्रोधः प्रहस्यांतर्गस्थितः । जगदग्निमुवाचेदं वचनं श्लक्ष्णया गिरा ॥११॥

क्रोध उवाच –

त्रैलोक्यमखिलं ब्रह्मन्वर्तते न मया विना । अहं यज्ञेषु दानेषु संस्थितेषु तपस्विषु ॥ १२ ॥

मयेदं धार्यते विश्वं शीघ्रं संन्हीयते प्रभो । अहं देवेषु सर्वेषु नास्ति किंचिन्मया विना ॥१३॥

जमदग्निरुवाच –

त्वं मत्कलेवराद्दुष्ट नृशंस प्राणिहिंसक । क्षिप्रं निर्गच्छ चांडाल त्वया मे न प्रयोजनम् ॥१४॥

क्रोध उवाच –

त्वच्छरीरान्न गच्छामि सत्यमेतन्मयोदितम् । भविष्यति तव ब्रह्मन् किंचित्कार्यं मयाग्रतः ॥१५॥
त्यक्तुं नार्हसि मां विप्र न सिद्धिश्च मया विना ।

जमदग्निरुवाच –

त्वया रे क्रूर पापिष्ट न मे किंचित्प्रयोजनम् । शरीरान्मे विनिर्गच्छ ब्रूहि यत्ते हृदि स्थितम् ॥१६॥

स्कन्द उवाच –

तेनैवमुक्तो ऋषिणा मुनेर्देहान्निरैद्मुदा । काककोकिलकृष्णांगः क्रोधस्ताम्रारुणेक्षणः ॥ १७ ॥

नीलकौपीनवासाश्च क्रूरदृष्टिर्भयंकरः । करालरूपदेहश्च लंबौष्ठो विकृताननः ॥ १८ ॥

ततः परिलिहन्वक्त्रं जिव्हया विकृतेक्षणः । स ऋषेरग्रतः क्रोधस्तस्थौ दग्धनगोपमः ॥ १९ ॥

ततः करांजलिं कृत्वा नमस्कृत्य मुनीश्वरम् । प्रविश्योवाच स क्रोधः प्रश्रयावनतो वचः ॥२०॥

क्रोध उवाच –

अवश्यमेव गंतव्यमिति बुद्ध्याविचिंतितम् । त्वया तद् ब्रूहि मां सत्यं गच्छाम्यहमसंशयः ॥

सत्यं सत्यं न चासत्यं नास्ति किंचिन्मया विना । सर्वोऽहं सर्वभूतस्थो देवानामहमीश्वरः ॥२२॥

इति श्रीसह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये स्कन्दपुराणे जमदग्निक्रोधसंवादो नाम
षड्विंशतितमोऽध्यायः ॥ २६ ॥

नंतर त्या सभेंत तपस्वी जमदग्नि अत्यंत क्रुद्ध होऊन क्रोधाला म्हणाला, हे क्रोधा, तूं दुराचारी, चांडाळ व निर्दय आहेस. तुझ्यामुळेंच माझ्याकडून स्त्रीवध झाला ! तूं माझ्या शरीरांतून निघून जा. ७–८. पितृवध, मातृवध, बालवध व ब्रह्मवध ह्या सर्व वधांमध्यें स्त्रीवध भयंकर आहे ! ९. प्राणिवधासाठीं उद्युक्त करणारा तूं क्रूर असल्यानें अस्पृश्य आहेस. हे दुष्टा, तुझ्यामुळें माझें कोणतेही कार्य सिद्धीस जात नाहीं. १०. स्कंद म्हणाला, जमदग्नीचें हें वाक्य ऐकून क्रोध त्याला हंसत म्हणाला, “ त्रैलोक्य व ब्रह्मादि देव यांचें सुद्धां माझ्याशिवाय चालत नाहीं. यज्ञ, दान व तपस्वी यांमध्यें सुद्धां माझा वास असतो. ११–१२. मी ह्या विश्वाचा आधार आहें. हे प्रभो, मी विश्वाचा संहारही करतों. मी नाहीं अशी वस्तूच नाहीं. ” १३. जमदग्नि म्हणाला, “ हे दुष्ट चांडाळा, प्राणिघातका, तूं त्वरित माझ्या शरीरांतून निघून जा. मला तुझा उपयोग नाहीं.” १४. क्रोध म्हणाला, “ मी तुझ्या शरीरांतून निघून जाणार नाहीं. मी सत्यच सांगतों; हे ब्रह्मन्, यापुढें माझ्यामुळें आपलें एक काम सिद्ध होणार आहे. १५. आपण माझा त्याग करूं नका. माझ्याशिवाय तुमचें काम यशस्वी होणार नाहीं. ” जमदग्नि म्हणाला, “ हे क्रूर पापिष्ठा, मला तुझी आवश्यकताच नाहीं. तूं माझ्या शरीरांतून चालता हो.” १६. स्कंद म्हणाला, जमदग्नि असें बोलतांच काक–कोकिळाप्रमाणें काळ्या रंगाचा, रक्तनयन, नीलवस्त्रधारी क्रोध त्याच्या शरीरांतून बाहेर पडला. त्याची दृष्टि, रुप व देहही भयंकर होता. त्याचे ओंठ लांब असून चेहरा विचित्र होता. १७–१८. जेव्हां तो क्रोध मुनीच्या समोर उभा राहिला, तेव्हां तो जळलेल्या काळ्या वृक्षासारखा भासला. १९. तो हात जोडून व नमस्कार करून मुनीला म्हणाला, “ तुमच्या आदेशाला अनुसरून मी निघून जातों. पण तुम्ही खरोखरच मला जाण्यास सांगितलें आहे ना ? मी खोटें बोलत नाहीं. मी खरोखर सांगतों. ज्यांत मी नाहीं असें जगांत कांहींच नाहीं. सर्व कांहीं मीच आहें व मी देवांचाही देव आहें ! ” २०–२२.

# अथ सप्तविंशतितमोऽध्यायः ।

## रावणपराजयः ।

स्कन्द उवाच—

एतद्वचनमाकर्ण्य क्रोधनस्य मुनीश्वराः । जमदग्निस्ततः शांतः कोपं वचनमब्रवीत् ॥ १ ॥

जमदग्निरुवाच—

नृशंस क्रूर पापिष्ठ क्षिप्रं क्रोध ममाश्रमात् । निर्गच्छ तव पंथानं प्रोक्ष्यामि कुशवारिणा ॥ २ ॥

क्रोध उवाच—

क्वचित्किंचित्त्वया कार्यं भविष्यति तव प्रभो । अत्याज्यं मां मुनिश्रेष्ठ न त्वं त्यक्तुमिहार्हसि ॥३॥

सिध्यंति सर्वकार्याणि क्रोधेण मुनिसत्तम । स क्रोधो बलवाञ्शूरः क्रोधो हंति रिपून् रणे ॥४॥

जमदग्निरुवाच—

न कदाचित्त्वया कार्यं क्वचित्किंचिद्भविष्यति । नूनं निर्गच्छ चांडाल शपामि त्वामसंशयम् ॥५॥

क्रोध उवाच—

उत्पन्नोऽस्मि मुनिश्रेष्ठ त्वं जानासि महेश्वरात् । योगिनां संस्थितोऽस्म्येको देवानां हृदयेष्वपि
अत्याज्योऽहं न संदेहः किल्बिषोऽपि मुनीश्वर । न बली मत्समः सत्यं यत्कृत्यं
तद्विधीयताम् ॥ ७ ॥

जमदग्निरुवाच—

त्वया क्रूरेण घोरेण त्रैलोक्यमखिलं बलात् । मोहितं क्रूर चांडाल शीघ्रं निर्गच्छ मद्गृहात् ॥८॥

अपकृष्टस्तु तेनैवं निसृतश्च मुहुर्मुहुः । ऋषिणा तत्क्षणात्कोपस्तत्रैवांतरधीयत ॥ ९ ॥

ऋषिः क्रोधन संत्यक्तो जमदग्निः प्रियान्वितः । मुनिभिः संवृतः पुत्रैर्न्यवसच्चाश्रमे सुखी ॥१०॥

कैलासमगमद्रामः तृप्तिं स भगवान्मुनिः । त्रैलोक्यमखिलं निन्ये रेणुकायाः प्रसादतः ॥ ११॥

रामदेवप्रसादेन कामधेनोः स्वतेजसा । त्रैलोक्यभुवनं प्राप्ता ख्यातिरत्यद्भुता मुनेः ॥ १२ ॥

तस्मिन्नेव ततः काले मुनिः पद्मोद्भवात्मजः । नारदो वादयन्वीणां ययौ महिष्मतीं पुरीम् ॥१३॥

नर्मदायास्तटे रम्ये नानारत्नैश्च शोभिते । पुरी माहिष्मती रम्या गजवाजिसमाकुला ॥ १४ ॥

दृश्यते भवनैः पुण्यैर्देवतायतनैः शुभैः । तोरणैर्विविधाकारैः पुरी पुण्यजनाकुला ॥ १५ ॥

तस्यां स हैहयो नाम राजाऽऽसीद्विश्वविश्रुतः । बभौ तस्य सुतः श्रीमान् कृतवीर्य इति श्रुतः

तस्य राकावती नाम कृतवीर्यस्य सा शुभा । रूपेणाप्रतिमा भार्या पतिं वचनमब्रवीत् ॥ १७ ॥

राकावत्युवाच—

उदितो हि मनोमोहः कंदर्पः स्मरणापहः । नाथ देहि रतिं तूर्णं नो चेत्त्यक्ष्यामि जीवितम् ॥१८॥

---

१ क्रोधस्तस्य

# अध्याय २७ वा

## जमदग्नीच्या आश्रमांतून क्रोधाचें गमन–कार्तवीर्याची कथा

स्कंद म्हणाला, क्रोधाचें हें बोलणें ऐकून जमदग्नि शांत झाला व क्रोधाला म्हणाला, हे चांडाळा, तूं पापी व क्रूर आहेस. तूं माझ्या आश्रमांतून लवकर निघून जा. तुझा जाण्याचा मार्ग मी दर्भजल शिंपडून शुद्ध करणार आहें. १–२.

क्रोध म्हणाला, प्रभो, तुम्हाला माझा थोडा तरी उपयोग होणार आहे! मुनिश्रेष्ठा, कृपा करून माझा त्याग करूं नका. ३. श्रेष्ठ मुने, क्रोधामुळें सर्व कामें यशस्वी होतात. क्रोधच बलवान् व शूर शत्रूला रणांत ठार मारूं शकतो. ४. जमदग्नि म्हणाला, चांडाळा, तुझ्यामुळें माझें कोणतेंच काम यशस्वी होणार नाहीं. खरोखर तूं निघून जा. न पेक्षां मी तुला शाप देईन. ५.

क्रोध म्हणाला, मुनिश्रेष्ठा, माझा जन्म महेश्वरापासून आहे, हें तुला माहीत आहे. योगी व देव यांच्या हृदयांत सुद्धां माझा वास असतो. मी पापकारी असलों तरी माझा त्याग कोणी करूं नये. कारण माझ्यासारखा कोणीच बलवान नाहीं. ६–७.

जमदग्नि म्हणाला, क्रोधा, तूं क्रूर आहेस. तूंच त्रैलोक्याला मोह उत्पन्न करतोस. यासाठीं हे चांडाळा, माझ्या घरांतून तूं चालता हो. ८. याप्रमाणें ऋषि बोलल्यावर तो क्रोध अनिच्छेनेंच अंतर्धान पावला. ९. क्रोध निघून गेल्यावर जमदग्नि आपली पत्नी, पुत्र व इतर ऋषि यांसह त्या आश्रमांत सुखानें राहूं लागला. १०. राम कैलास पर्वतावर गेला आणि भगवान् मुनीनें रेणुकेच्या कृपेनें तिन्ही लोक संतुष्ट केले. ११. रामाच्या प्रसादानें व कामधेनूच्या तेजामुळें मुनींची कीर्ति तिन्ही लोकांत पसरली. १२.

एकदां नारद वीणा वाजवीत माहिष्मती नगरांत गेला होता. १३. हें माहिष्मती नगर नर्मदेच्या रमणीय तटावर असून तें विविध रत्नांनीं सुंदर दिसत होतें व हत्ती घोडे यांनीं संपन्न होतें. १४. येथील लोक पुण्यवान् होते आणि देवालयें व घरें पवित्र आणि सुंदर दिसत होतीं. १५. या नगराधिपतीचें नांव हैहय असून त्याचा मुलगा कृतवीर्य या नावानें प्रसिद्ध होता. १६. त्याची राकावती नांवाची पत्नी अतिशय सुंदर होती. एकदां ती आपल्या पतीला म्हणाली, यावेळीं माझ्या मनांत कामवासना निर्माण झाली आहे. यासाठीं माझ्याशीं रतिक्रीडा करा, नाहीं तर मी मरून जाईन. १७–१८.

कृतवीर्य उवाच–

शृणु राके त्वया कालः क्रूराणां दैत्यरक्षसाम् । क्षणमेकं प्रतीक्षस्व प्रदोषो वर्तते प्रिये ॥१९॥
कृतवीर्येण तेनैवमुक्तापि स्मरमोहिता । न शशाक नियंतुं तं कालं राकावती तदा ॥ २० ॥
ततो रराम सा तेन पतिना सह सुंदरी । बलात्प्रदोषसमये तद्वीर्यादसुरोऽभवत् ॥ २१ ॥
मधुनामाऽसुरः क्षिप्रं प्रविश्यानुपलक्षितः । पूर्ववैरं स्मरन्नित्यं राकावत्यामभूत्तदा ॥ २२ ॥
कृतवीर्यात्समुत्पन्नः कार्तवीर्य इति श्रुतः । कुमारः करहीनोऽथ दत्तात्रेयाश्रमं ययौ ॥ २३ ॥
दत्तात्रेयं समाराध्य तपसोग्रेण दैत्यराट् । कार्तवीर्यः शिवं ताभ्यां लब्धवान्वरमुत्तमम् ॥२४॥
स सहस्रभुजत्वं च तस्मै प्रादान्महेश्वरः । दत्तात्रेयोऽददाच्छौर्यमवध्यत्वं द्विजादृते ॥ २५ ॥

ऋषय ऊचुः –

उत्पन्नः स मधुर्दैत्यो यो महीश्वररूपधृक् । कृतवीर्यात्कार्तवीर्यः करहीनः कथं बभौ ॥ २६ ॥

स्कन्द उवाच –

शिखेः पुत्रो बृहद्वल्यां समुत्पन्नो मधुर्यदा । तदा सहस्रं पूजानामीश्वरस्य बभंज सः ॥ २७ ॥
दैत्यः क्रुद्धेन शर्वेण[1] तदा शप्तो मुनीश्वराः । करहीनो भवस्वेति पूजाध्वंसान्ममासुर ॥ २८ ॥
इति शप्तः स हरिणा ततोदैत्यः स्वयं मधुः । चक्रायुधेन चोत्पन्नः कृतवीर्यान्नृपेश्वरात् ॥ २९ ॥
सर्वं निष्कंटकं राज्यं पित्रा दत्तं चकार सः । कार्तवीर्यार्जुनो नाम शौर्यशुल्को यतोऽभवत् ॥३०॥
स सहस्रकरः श्रीमान् माहिष्मत्यां महासुरः । कुर्वन्निष्कंटकं राज्यं त्रैलोक्यमजयद्बलात् ॥३१॥
सुरांस्त्रिविष्टपे जित्वा पाताले दैत्यपन्नगान् । नृपान्सर्वान्क्षिता क्षिप्रं माहिष्मत्यां स्थितः सुखी
अथ कालेन महता कर्तुं दिग्विजयं द्विजाः । लंकाद्वीपान्निरैच्छीघ्रं रावणः सगणो बली ॥ ३३ ॥
भ्रममाणो दशग्रीवः कुर्वन्दिग्विजयं ततः । स सहस्रार्जुनस्याथ ययौ महिष्मतीं पुरीम् ॥ ३४ ॥
तत्र देवार्चनं यावत् कृतवान्स दशाननः । नर्मदायां जलक्रीडां स चक्रे हैहयाधिपः ॥ ३५ ॥
संप्रसार्य करान्पादौ कार्तवीर्यो यदा जले । स्थितः पुण्योदकं नद्यास्तदूर्ध्वमगमद् द्विजाः ॥३६॥
कार्तवीर्यशरीरेण यदूर्ध्वमगमज्जलम् । तद्दशाननदेवानां तूर्णं पूजां समाहरत् । । ३७ ॥
तद् दृष्ट्वा महदाश्चर्यमाहूय सचिवानिदम् । रावणः स तु पप्रच्छ वचनं सचिवांस्ततः ॥३८॥

रावण उवाच –

नार्मदेयमधः केन निर्बंधाज्जलमद्भुतम् । प्रवृद्धमभवत्कस्मात्पश्यंतु त्वरितं भटाः ॥ ३९ ॥
इत्युक्तास्तेन ते सर्वे दशग्रीवेण राक्षसाः । पश्यंति नर्मदां तावत्पश्यंति हैहयाधिपम् ॥ ४० ॥

---

१ गर्भेण ।

कृतवीर्य म्हणाला, राकावती ऐक. ही वेळ क्रूर राक्षसाची आहे. प्रिये क्षणभर थांब. हा प्रदोषकाल आहे! १९. कृतवीर्यानें असें सांगितलें तरी तिला विलंब सहन झाला नाहीं. २०. नंतर त्या उभयतांचा समागम होतांच त्याच्या वीर्यापासून राक्षस जन्मला. २१. कारण ही संधि साधून पूर्ववैरामुळें मधु नांवाचा राक्षस राकावतीच्या गर्भांत शिरला. २२. पुढें याचा जन्म कृतवीर्यापासून झाला यासाठीं तो कार्तवीर्य या नांवानें प्रसिद्ध झाला. जन्माचे वेळीं याला हात नव्हते! नंतर तो हस्तहीन कार्तवीर्य दत्तात्रेयाच्या आश्रमांत गेला; व तेथें उग्र तपश्चर्या करून त्यानें दत्तात्रेयाची आराधना केली. त्यामुळें त्याला शंकर व दत्तात्रेय यांपासून उत्तम लाभ झाला. २३–२४. शंकरानें त्याला एक हजार हात दिले व दत्तात्रेयानें शौर्य देऊन ब्राह्मणाशिवाय अन्य कोणापासून तुला मृत्यु येणार नाहीं असा वर दिला. २५. ऋषींनीं प्रश्न केला, कृतवीर्याच्या वंशांत मधु दैत्य करहीन कसा जन्मला? २६. स्कन्द म्हणाला, शिखींपासून बृहद्रतीला मधु नांवाचा एक पुत्र झाला होता. त्यानें एकसहस्र शिव-पूजांचा भंग केला होता. यासाठीं क्रुद्ध शंकरानें त्याला ‘करहीन हो’ असा शाप दिला होता. २७–२८. अशा प्रकारें चक्रधर हरीनें शाप दिल्यामुळें तो मधु राक्षस हस्तहीन असा कृतवीर्य राजापासून जन्मला. २९. पित्यानें दिलेलें राज्य त्यानें निष्कंटक केलें. यासाठीं त्याच्या पराक्रमाला अनुरूप असें ‘कार्तवीर्यार्जुन’ हें नांव प्रसिद्ध झालें. ३०. त्या श्रीमान् सहस्र-करानें आपल्या सामर्थ्याच्या योगानें सर्व राज्य निष्कंटक करून त्रैलोक्यही जिंकलें. ३१. देव-स्त्रिया, पातालस्थ सर्प व सर्व राजे यांना जिंकून तो माहिष्मती राज्यांत सुखानें राहूं लागला होता. ३२. एकदां बलवान् रावण सैन्यासह लंकेहून दिग्विजयासाठीं निघाला होता. ३३. दिग्विजय करीत करीत तो सहस्रार्जुनाच्या माहिष्मती राज्यांत आला. ३४. यावेळीं रावण तेथें देवपूजा करीत बसला होता. कार्तवीर्य नर्मदेंत जलक्रीडा करूं लागला. ३५. त्या पवित्र पाण्यांत कार्तवीर्य आपले पाय पसरून पडून राहिला, त्यामुळें त्या नदीचा प्रवाह थांबून पाणी वाढूं लागलें. कार्तवीर्याच्या शरीरामुळें वृद्धिंगत झालेल्या त्या पाण्यानें रावणाच्या पूजा-साहित्याचा नाश झाला. ३६–३७. हें आश्चर्य पाहून रावणानें प्रधान इत्यादि पुरुषांना बोलावून विचारलें. खालीं नर्मदेचें पाणी कोणीं अडविलें आहे, तें तत्काळ पाहून या. ३८–३९. रावणाची अशी आज्ञा होतांच सर्वांनीं नर्मदा नदीकडे पाहिलें, तेव्हां त्यांना तेथें कार्तवीर्यराजा दिसला. ४०.

तैस्तु कोऽसि त्वमित्युक्तः सोऽब्रवीदर्जुनोऽस्म्यहम्। स तु किं कार्यमित्युक्तो रावणात्सोऽब्रवीदिदम् ॥ ४१ ॥

अर्जुन उवाच –

नार्मदीये जले रंतुं सुखं स्त्रीभिः समावृतः। यूयं के कस्य वा ब्रूत किं कार्यं कर्तुमागताः ॥४२॥
केन वा प्रेषिताश्चात्र इत्युक्तास्तेऽब्रुवन्भटाः।

भटा ऊचुः –

लंकेशो मृधि जेतुं त्वां कार्तवीर्यमिहागतः ॥ ४३ ॥
तच्छ्रुत्वाऽमर्षितः शूरः कार्तवीर्योऽतिसत्वरः। आगम्य रावणं दृष्ट्वा क्रोधादिदमुवाच ह ॥४४॥

अर्जुन उवाच –

उत्तिष्ठोत्तिष्ठ शूर त्वं तूर्णं लंकापते मम। स्वबाहुबलमद्याजौ दर्शयस्व पराक्रमम् ॥ ४५ ॥
इत्युक्तस्तेन लंकेशः शस्त्रास्त्रैर्विविधैर्द्विजाः। तत्सहस्त्रार्जुनं वीरमहनद्गगने स्थितः ॥ ४६ ॥
ततो रोषेण महता कंपयन्भुवनत्रयम्। कार्तवीर्योऽथ शस्त्रास्त्रैस्तस्य शस्त्राणि चाच्छिनत् ॥
ततो युद्धमभूद्धोरं रावणार्जुनयोर्महत्। पश्यतां मुनिदेवानां शस्त्रवृष्टिर्निरंतरम् ॥ ४८ ॥
राक्षसास्ते नृपाञ्जघ्नुर्नृपास्ते राक्षसान् रणे। रावणार्जुनयोर्युद्धे शस्त्रास्त्रैर्वधकांक्षिणः ॥ ४९ ॥
स सहस्त्रार्जुनस्तस्य रावणस्याभिनद्बलम्। राक्षसानां सितैर्बाणैः शलभा इव पावके ॥ ५० ॥
निवार्यास्त्राणि तैरस्त्रैः शस्त्रैः शस्त्राणि तं बली। विव्याध रावणं बाणैर्विविधैरर्जुनस्ततः ॥५१॥
सितास्त्रैस्त्र्यंबकान्बाणान्स्वर्णपुंखान्दशाननः। छित्त्वा तैस्त्र्यंबकैरेव[1] बाणैस्तस्य तमाहनत् ॥५२॥
तौ रावणार्जुनौ वीरौ युध्यमानौ मुनीश्वराः। जग्मतुर्विविधान्देशान्स्वर्गं तोयनिधिं तथा ॥
संभ्राम्य रावणं वीरं कार्तवीर्योऽतिदुर्जयः। माहिष्मत्यां समानीय शंभुशक्त्याऽहनद्रुषा ॥
सा शक्तिरतुला तस्य शतघंटा कृतस्वना। निर्भिद्य रावणं वीरं पातालमगमज्जवात् ॥ ५५ ॥
शक्तिनिर्भिन्नहृदयः शोणिताक्तः स रावणः। मर्दितः पतितो भूमौ वज्राहत इवाचलः ॥५६॥
रणे निपतितं दृष्ट्वा रावणं राक्षसाधिपम्। राक्षसा हतशेषास्ते ययुः सर्वे दिशो दश ॥ ५७ ॥
कार्तवीर्यः समुत्पाद्य दोर्भिः शक्तिं द्विजोत्तमाः। दशाननस्य हृदयात्तं मंत्रैः समजीवयत् ॥
तं समुत्क्षिप्य लंकेशं रथमारोप्य चार्जुनः। बद्ध्वा दिगंबरं कृत्वा ययौ माहिष्मतीं पुरीम् ॥
तां प्रविश्य पुरीं तूर्णं स सहस्त्रार्जुनो बली। भर्त्सयामास तं बद्ध्वा शालस्तंभेऽथ रावणम् ॥

सहस्त्रार्जुन उवाच–

कत्थसे यन्मुधा मूढ शूरोऽहमिति रावण। सोऽहं सुरारिलंकेश तत्सर्वं क्व गतं बलम् ॥
द्विजोऽहं तव दासोऽहं किंकरोऽहमहं शिशुः। एतैर्वचोभिस्ते मुक्तिर्नोचेमत्त विमोक्ष्यसे ॥

स्कंद उवाच–

इति निर्भर्त्सितस्तेन कार्तवीर्येण रावणः। तूष्णींभूतः स्थितस्तत्र व्रीडयावनतोऽब्रवीत् ॥६२॥

---

१ त्रैण्यंबकैरेव।

तूं कोण आहेस ? असें त्यांनीं त्याला विचारल्यावर तो उत्तरला, मी अर्जुन आहें. तूं येथें काय करतोस असें पुन्हा विचारल्यावर अर्जुन म्हणाला, या नर्मदेंत स्त्रियांसह जलक्रीडा करण्यांत आनंद असतो. तुम्ही कोण ? कशासाठीं येथें आलांत ? तुम्हाला येथें कोणी पाठविलें आहे ? असें अर्जुनानें विचारल्यावर ते वीर म्हणाले, लंकेचा राजा रावण तुला युद्धांत जिंकण्यासाठी येथें आला आहे. ४१-४३. हे उत्तर ऐकून तो शूर कार्तवीर्य अत्यंत वेगानें रावणाकडे येऊन त्याला रागानें म्हणाला, ऊठ लवकर, ऊठ व हे शूर लंकापते, तुझें बाहुबल मला दाखव. ४४-४५. हें भाषण ऐकून लगेच रावणानें आकाशांतून सहस्रार्जुनावर विविध अस्त्रांचा मारा केला. ४६. भयंकर रागानें थरथरणाऱ्या कार्तवीर्यानेंही आपल्या शस्त्रांनीं त्याचीं शस्त्रें मोडून टाकलीं. ४७. याप्रमाणें रावण व अर्जुन यांचें अतिशय अद्भुत असें युद्ध सुरू झालें. ४८. राजा व राक्षस एकमेकांस ठार करण्यासाठीं शस्त्रास्त्रांचा मारा करूं लागले. ४९. अग्नींत पतंग मरावे त्याप्रमाणें सहस्रार्जुनाच्या तीक्ष्ण बाणांनीं रावण-सैनिक युद्धांत मरण पावले. ५०. या युद्धांत अर्जुनानें रावणाच्या विविध शस्त्रास्त्रांचें आपल्या शस्त्रास्त्रांनीं निवारण करून त्यास बाणांनी विद्ध केलें. ५१. रावणानें सुद्धां सहस्रार्जुनाचें सुवर्णपुंख, त्र्यंबकबाण आपल्या बाणांनीं छेदून अर्जुनास आपल्या तसल्याच त्र्यंबकबाणांनीं जखमी केलें. ५२. श्रेष्ठ मुनींनो, याप्रमाणे रावण व अर्जुन लढत लढत विविध देशांत, स्वर्गांत व समुद्रावरही गेले. ५३. शेवटीं अजिंक्य अशा कार्तवीर्यानें त्या शूर रावणाला सर्वत्र फिरवून माहिष्मतीमध्यें आणलें व त्यास शिवशक्तीनें ठार मारलें. ५४. ती शतघंटा शिवशक्ति अद्वितीय होती ! ती शक्ति वीर रावणाचा भेद करून वेगानें जेव्हां पाताळांत गेली, त्यावेळीं तिनें मोठा आवाज केला. ५५. त्या शक्तीनें रावणाचें हृदय फोडलें व सर्व शरीर रक्तानें माखलें. अशा रीतीनें वज्राचा तडाखा बसलेल्या पर्वतासारखा तो छिन्नभिन्न होऊन जमिनीवर कोसळला. ५६. राक्षसेश्वर रावण रणांत मरून पडला असें पाहून सर्व राक्षस दहाही दिशांना पळून गेले. ५७. ब्राह्मणश्रेष्ठहो, कार्तवार्यानें आपल्या सहस्र बाहूंनीं रावणाच्या हृदयांतून त्याची शक्ति उपटून काढली व मंत्रसामर्थ्यानें त्यास सजीव केलें. ५८. नंतर त्यानें त्यास उचलून आपल्या रथांत ठेवून नग्न केलें आणि त्यास बद्ध करून तो महिष्मती नगरास गेला. ५९. बलवान् सहस्रार्जुनानें आपल्या नगरांत प्रवेश करून रावणाला शालवृक्षाच्या खांबाला बांधून ठेवलें. ६०. सहस्रार्जुन म्हणाला, हे मूर्खा, लंकेचा शूर राजा रावण तो मी आहें असें तूं म्हणाला होतास, तें तुझें सर्व बळ आतां कोठें गेलें ? ६१. मी ब्राह्मण, तुझा दास आहें, किंकर आहें ! असें तूं बोलल्याशिवाय मी तुला आतां सोडणार नाहीं. ६२. स्कंद म्हणाला, कार्तवीर्यानें अशी निर्भत्सना केल्यावर रावणानें आपली मान लाजेनें खाली करून ते शब्द उच्चारले. ६३.

ततो वसुश्रवास्तत्र जनकश्चतुराननः। पुलस्त्यो मुनयो देवाः पुरीं महिष्मतीं ययुः ॥ ६४ ॥
तानागतांस्ततो दृष्ट्वा स सहस्त्रार्जुनः स्वयम्। ब्रह्मादिसुरसिद्धर्षीन्पूजयामास भक्तितः ॥६५॥
पाद्यार्घ्याचमनीयाद्यैरर्हणैर्विविधैर्नृप। तानभ्यर्च्य मुनीन्देवान् प्रोवाचेदं कृतांजलिः ॥

कार्तवीर्य उवाच–

किं भवंतः समुद्दिश्य कार्यं किं हृदयेषु वः। कथयंतु तदव्यग्राः किमागमनकारणम् ॥ ६७ ॥

ब्रह्मोवाच –

यदर्थं यत्समुद्दिश्य वयमत्रागताः प्रभो। तच्छृणुष्व नृपश्रेष्ठ त्रैलोक्याधिपतेऽर्जुन ॥ ६८ ॥
अज्ञानतिमिरांधं तदेकमुन्मत्तमातुरम्। अदृश्यमभवत्तोकं तव पुर्यां श्रुतं मया ॥ ६९ ॥
तस्य शुद्धिस्त्वया कार्या यदि मां मन्यसेऽर्जुन। सत्यं त्वमेव जानासि तन्मे त्वं दातुमर्हसि ॥

अर्जुन उवाच–

तस्य कान्यभिधानानि शिशोर्ब्रूहि पितामह। यैर्मत्पुर्यां कृता शुद्धिस्तस्य को जनकः कुलम् ॥
एवं पृष्टश्चतुर्वक्त्रः कार्तवीर्येण भो द्विजाः। तूष्णींभूतश्चिरं ध्यात्वा नोत्तरं प्रत्यपद्यत ॥ ७२ ॥
तूष्णींभूते ततस्तस्मिंश्चतुरास्ये द्विजोत्तमाः। पुलस्त्यः खिन्नवद्वाक्यं प्रोवाचेदं नृपोत्तमम् ॥

पुलस्त्य उवाच–

कस्यापि मंदभाग्यस्य कुले जातो दशाननः। रावणो नाम लंकायाः पतिर्दुष्टतमः सदा ॥७४॥
तस्याद्य स्वयमेव त्वं कुरु शुद्धिं नृपेश्वर। तस्य तद्वचनं श्रुत्वा पुलस्त्यस्य स हैहयः।
दूतान्सहस्रशो मिथ्या प्रतारयन्वाक्यमब्रवीत् ॥ ७५ ॥

हैहय उवाच –

शिशुं पितामहस्येह पुरे पृच्छ कथंचन। प्रनष्टं वा निबद्धं वा सुप्तं वा मृतमेव वा ॥ ७६ ॥
ते सहस्रार्जुनेनाथ कौतुकात्सचिवास्तदा। आदिष्टा शिशुशुध्यर्थं चुक्रुशुस्तत्पुरे भृशम् ॥७७॥

सचिवा ऊचुः –

अज्ञानमल्पकं बालमभिधानविवर्जितम्। यैः श्रुतं दृष्टमस्माकं कथयंत्विह ते जनाः ॥ ७८ ॥
ते दंड्याश्चैव वध्यास्ते राज्ञः पुरनिवासिनः। नष्टं धृत्वा परापत्यं लोभान्न कथयंति ये ॥७९॥
सिंहासनोपविष्टस्तु कार्यवीर्यः प्रहस्य सः। ब्रह्मणे दर्शयामास बद्धं नग्नं च रावणम् ॥ ८० ॥
ब्रह्मादींस्तान्सुरान्दृष्ट्वा ऋषीन्सर्वान्स रावणः। व्रीडितः प्रसभं दीनः स स्तंभांतरितो बभौ ॥
ततः स्वयं प्रहस्याशु समुत्थाय वरासनात्। निगडादीन्नृपो बंधान् रावणस्यासिनाऽच्छिनत् ॥
धात्रे सत्कृत्य सन्मान्य रावणं हैहयाधिपः। वस्त्रालंकारणाद्यैस्तं तस्मै दानमिवाददत् ॥८३॥
प्रभग्नं रावणं दृष्ट्वा प्रहृष्टं हैहयाधिपम्। स्वयं व्रीडान्वितो ब्रह्मा प्रोवाचेदं कृतांजलिः ॥८४॥

ब्रह्मोवाच –

कृष्णकंबोर्यथाच्छस्य कंबोरंतरमुच्यते। कार्तवीर्यस्य शूरस्य तद्रावण तवांतरम् ॥ ८५ ॥

---

१ कन्या.

नंतर वसुश्रव, जनक, चतुरानन, पुलस्त्य, मुनि व देव माहिष्मती नगरींत आले. ६४. त्यांना पाहून सहस्रार्जुनानें स्वतः ब्रह्मादि देवांची भक्तिपूर्वक पूजा केली. ६५. पाद्य, अर्घ्य, आचमन इत्यादि ( षोडश ) उपचारांनीं त्यांची पूजा केल्यावर हात जोडून त्या कार्तवीर्य राजानें मुनींना व देवांना प्रश्न केला, आपण सर्व येथें कशासाठीं आलांत तें निःशंकपणें सांगा. ६६–६७. ब्रह्मदेव म्हणाला, हे प्रभो, त्रैलोक्याधिपते, आमचा इकडे येण्याचा उद्देश ऐका. ६८. आम्ही ऐकलें आहे कीं, अज्ञानतिमिरानें अंध झालेलें, उन्मत्त व पीडित असें एक बालक तुझ्या नगरींत हरवलें आहे. हे अर्जुना, जर तुला माझ्याबद्दल आदर आहे तर त्याचा शोध कर. त्या बालकाची माहिती तुलाच आहे, यास्तव तूंच तें बालक दे. ६९–७०. अर्जुन म्हणाला, हे पितामह, ज्या नांवांनीं त्याचा शोध नगरांत केला पाहिजे तीं त्या बालकाचीं नांवें कोणतीं आहेत ? त्या बालकाचा पितृवंश कोणता ? ७१. द्विजहो, याप्रमाणें कार्तवीर्यानें विचारल्यावर-सुद्धां तो ब्रह्मदेव बराच वेळ गप्पच राहिला, कांहींच बोलला नाहीं. ७२. ब्रह्मदेव कांहींच बोलत नाहीं असें पाहून पुलस्त्य खिन्न होऊन म्हणाला, हा दशानन कोणा एका अभाग्याच्या वंशांत जन्मलेला असून हा दुष्ट रावण नांवाचा लंकापति आहे. ७३–७४. हे राजेश्वरा, आज तूंच त्याला शुद्ध कर. हें पुलस्त्यवचन ऐकून तो हैहय अर्जुन बतावणी करीत आपल्या दूतांना उद्देशून म्हणाला, दूतांनो, आमच्या या नगरींत ह्या पितामहांचें एक बालक कोणत्या तरी कारणानें हरवलें असेल, बंधनांत पडलें असेल, झोपलें असेल, किंवा मेलें असेल तर त्याची चौकशी करा. ७५–७६. सहस्रार्जुनाची ही आज्ञा होतांच त्याच्या सर्व सचिवांनीं नगरांत बालकाच्या शोधासाठीं पुष्कळ आरडाओरड केली. ७७. एक सचिव म्हणाला, नामरहित असें एक लहान व अज्ञ बालक जर एकाद्याला आढळलें असेल किंवा त्याविषयीं कोणीं ऐकलें असेल तर त्यानें लगेच येथें आम्हाला कळवावें. ७८. जे कोणी हें हरवलेलें दुसऱ्याचें अपत्य आपल्यापाशीं ठेवून घेतील व राजाला कळविणार नाहींत, ते पौर लोक दंडास व वधास पात्र होतील ! ७९. लगेच सिंहासनाधिष्ठित कार्तवीर्यानें हंसून ब्रह्मदेवाला बद्ध व नग्न रावण दाखविला. ८०. त्या ब्रह्मादि देवांना व सर्व ऋषींना पाहून दीन रावण लज्जित होऊन खांबाच्या आड झाला. ८१. नंतर राजा हंसला व आसनावरून उतरून त्यानें आपल्या तरवारीनें रावणाचे पाश-बेड्या तोडल्या. ८२. नंतर हैहय राजानें वस्त्रें वगैरे देऊन ब्रह्मदेवाचा सत्कार केला व त्याला तो रावण दान केला. ८३. पराजित रावणाला व आनंदित हैहयाधिपाला पाहून लज्जित झालेला ब्रह्मदेव हात जोडून म्हणाला, हे रावणा, कृष्णशंख व श्वेतशंख यांमध्यें जेवढें अंतर असतें तेवढें अंतर तूं व शूर कार्तवीर्य यांमध्यें आहे. ८५.

यथा स्यंदनिकायास्तु क्षीराब्धेरंतरं महत् । सहस्रार्जुनबाहोस्तदंतरं तव रावण ॥ ८६ ॥
यथा पुष्करवृक्षस्य पारिजाततरोः श्रुतम् । तदंतरं दशग्रीव कार्तवीर्यस्य ते महत् ॥ ८७ ॥
जात्यश्वखरयोर्दृष्टं यथा काकसुपर्णयोः । महाश्चर्यमिदं मूढ दशास्य शृणु मे वचः । ८८ ॥
कार्तवीर्येण यद्युद्धे त्वं बद्धोऽसि दिगंबर । प्रतिग्रहं गृहीतोऽस्मि तव मया कुलपांसनः ॥८९॥
किं व्रीडयाऽनया वत्स देवत्वं मयि तिष्ठति । अहं पद्मोद्भवः पूज्यः सुरश्रेष्ठो न रावण ॥ ९०॥
ननु त्वं सांप्रतं विद्धि त्वत्कृतेऽहं प्रतिग्रही ।
किं किं रावण बालिश कृतमहो मूढ त्वयेदं महद् दुःखं मत्कुलपांसुनात्र बहुना किं त्वं क्रियत्ते बलम् ।
नो जानासि सहस्रबाहुमतुलं त्रैलोक्यनाथं नृपं यो दैत्यः स मधुः स एव बलवान् श्रीकार्तवीर्योऽर्जुनः ॥ ९१ ॥

इति श्रीस्कन्दपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये रावणपराजयो नाम सप्तविंशतितमोऽध्यायः ॥

# अथ अष्टाविंशतितमोऽध्यायः ।

## नारदार्जुनयोः संवादः ।

स्कन्द उवाच –
पितामहस्य वचनमाकर्ण्य स दशाननः । व्रीडान्वितश्चिरं ध्यात्वा न किंचित्प्राह तं वचः ॥ १ ॥
पुलस्त्य उवाच –
किं लंका सुरदेवदुर्जयपुरी प्राकारयंत्रान्विता किं त्वद्बाहुबलं तथा प्रतिहतं सामर्थ्ययुक्तोऽसि किम् ।
किं शस्त्रं तव दुर्निवार्यमतुलं पौलस्त्यवंशांतक[1] त्वं किं हैहयवंशमंडनममुं जेतुं समर्थो रणे ॥२॥
नहि तं खलु पश्यामि त्रिषु लोकेषु रावण । गृहीतशस्त्रं समरे जेष्यते योऽर्जुनं रणे ॥ ३ ॥
इति निर्भर्त्सितं तत्र रावणं चतुराननः । दृष्ट्वाऽर्जुनं प्रशंस्याथ गमने चाकरोन्मतिम् ॥ ४ ॥
ततस्तं प्रस्थितं दृष्ट्वा स सहस्रकरोऽर्जुनः । करांजलिपुटं कृत्वा ब्रह्माणमिदमब्रवीत् ॥ ५ ॥
अर्जुन उवाच –
पद्मोद्भव न ते तुल्यः कश्चिदस्त्यमितप्रभः । त्रिषु लोकेषु यस्यैते पुलस्त्याद्याः सुतोत्तमाः ॥६॥
विग्रहं मा कुरु त्वं हि बलिभिः सह रावण । बलिभिर्विग्रहं कुर्वन् क्षिप्रं नाशमवाप्स्यसि ॥ ७ ॥
इत्युक्त्वा ब्रह्मणे दत्वा कार्तवीर्यो दशाननम् । लंकां प्रस्थापयामास तं शिक्षाप्य द्विजोत्तमाः ॥
तं प्रस्थाप्य ततो ब्रह्मा रावणं जनकान्वितम् । लंकां स्वभुवनं सर्वैर्द्विजैः सार्धं ययौ जवात् ॥९॥

---
१ वांशान्तक ।

झरा व क्षीरसागर या दोहोंमध्यें जेवढें मोठें अंतर आहे, तेवढेंच अंतर हे रावणा, तूं व सहस्रार्जुन यांमध्यें आहे. ८६. कमलवृक्ष व पारिजातवृक्ष यांमध्यें जेवढा फरक आहे, तेवढाच मोठा फरक दशग्रीव आणि कार्तवीर्य यांमध्यें आहे. ८७. जातिवंत घोडा व गाढव, किंवा कावळा व गरुड यांच्या एवढेंच तुम्हां दोघांत मोठें अद्‌भुत अंतर आहे. हे मूर्ख दशानना, माझें वचन ऐक. ८८. हे दिगंबरा, कार्तवीर्यानें तुला बद्ध करून मला तूं कुलदूषण म्हणून दान केला. ८९. हे बाळ, आतां लाजून काय उपयोग? माझे ठिकाणीं देवत्व आहे, पण हे रावणा, आतां मी पूज्य देवश्रेष्ठ ब्रह्मदेव राहिलों नाहीं. ९०. खरोखर लक्षांत ठेव, मी आतां तुझ्यामुळें दान घेणारा झालों. मूर्ख रावणा, हें तूं काय केलेंस! मूढा, तूं फार वाईट केलेंस! त्रैलोक्यनाथ व अद्वितीय अशा राजाला तूं ओळखत नाहींस! पूर्वीं जो बलवान मधु दैत्य होऊन गेला, तोच हा कार्तवीर्य अर्जुन होय! ९१.

# अध्याय २८ वा

## नारद व अर्जुन यांचा संवाद

स्कंद म्हणाला, पितामहाचें तें बोलणें ऐकून रावण लज्जित झाला व कांहीं बोलला नाहीं. १. पुलस्त्य म्हणाला, रावणा, रत्नें व यंत्र यांनी संपन्न अशी ही तुझी लंका आतां देवांना अजिंक्य राहिली आहे का? तुझ्या बाहुबलाचा असा पराभव झाल्यावर तूं आतां समर्थ आहेस का? पुलस्त्यकुलनाशका, तुझ्या अद्वितीय शस्त्रांचा पराभव करणें कठिण आहे का? हैहयवंशाचें भूषण असलेल्या ह्या सहस्रार्जुनास तूं जिंकशील का? २. रावणा, मला तर ह्या शस्त्रधारी अर्जुनास जिंकूं शकेल असा त्रिभुवनांत कोणी दिसत नाहीं. ३. याप्रमाणें रावणाची निर्भर्त्सना ऐकून ब्रह्मदेव अर्जुनाची प्रशंसा करून जाऊं लागला. ४. तेव्हां सहस्रार्जुन ब्रह्मदेवास हात जोडून म्हणाला, पद्मोद्भवा, त्रैलोक्यांत तुझ्यासारखा अतितेजस्वी दुसरा कोणी नाहीं. कारण पुलस्त्यादि तुझे श्रेष्ठ पुत्र आहेत. ५-६. हे रावणा, प्रबलांशी तंटा करूं नकोस, तसें केल्यास तूं लवकर नाश पावशील. ७. असें बोलून कार्तवीर्यानें रावणाला ब्रह्मदेवाच्या स्वाधीन केलें, व त्याला उपदेश करून लंकेला पाठविलें. ८. नंतर ब्रह्मदेवानें रावणाला त्याच्या पित्यासह लंकानगरीं पाठवून दिलें व स्वतः ब्रह्मदेवही सर्व द्विजांसह आपल्या स्थानीं गेला. ९.

एवंप्रभावो दैत्येंद्रः कार्तवीर्यः स वीर्यवान् । येनावमानितः संख्ये रावणः सगणो द्विजाः ॥१०॥
सिंहासनोपविष्टं तं ब्रह्मपुत्रोऽथ नारदः । स्वस्तीत्युक्त्वार्चितो राज्ञा कार्तवीर्यं वचोऽब्रवीत् ॥११॥

नारद उवाच–

शृणु किंचिन्नृपश्रेष्ठ हैहयाधिपते प्रभो । तत्प्रवक्ष्यामि माहात्म्यं कस्यचित्तद्दपेः शुभम् ॥१२॥
राजन्त्रैलोक्यराज्यं ते तावल्लक्ष्मीस्तवातुला । यावन्न दृश्यते पुण्यो जमदग्नेर्वराश्रमः ॥ १३ ॥
तावदेताः स्त्रियः सर्वास्तन्वंग्यः कमलाननाः । यावन्न दृश्यते देवी रेणुकाऽघौघनाशिनी ॥१४॥
त्रैलोक्यमखिलं यस्याः प्रसादाद्धैहयाधिप । दानमानोदकान्नाद्यैरतुलां तृप्तिमागमत् ॥ १५ ॥
तस्याश्रमो नृपश्रेष्ठ तापसैरुपशोभितः । अनेकभूतसंघैश्च सेवितस्त्वघनाशनः ॥ १६ ॥
जमदग्नेरहं तस्मादाश्रमादागतोऽस्म्यहम् । राजन्त्वद्दर्शनाकांक्षी तत्पृष्टोऽसि व्रजाम्यहम् ॥ १७
एवं ब्रुवाणं देवर्षिं नारदं हैहयाधिपः । प्रणम्याभ्यर्च्य विधिवत्ततः प्रास्थापयद् द्विजाः ॥ १८ ॥
स तु प्रस्थापितस्तेन कार्तवीर्येण नारदः । पश्यतस्तस्य भगवांस्तत्रैवांतरधीयत ॥ १९ ॥
स सहस्त्रार्जुनः श्रुत्वा नारदाच्चरितं महत् । जमदग्नेर्निरैद्द्रष्टुं क्षिप्रमाश्रममुत्तमम् ॥ २० ॥
सपुत्रबंधुभृत्यैस्तैः सर्वसेनासमावृतः । मृगयां पर्यटन्भूपस्तमृषेराश्रमं ययौ ॥ २१ ॥
स मृगान्महिषान्क्रोडान् शृगालान्शशकान्बहून् । जघान जमदग्नेस्तानाश्रमे हैहयाधिपः ॥२२॥
ततस्ते कार्तवीर्येण सर्वे क्रोडादयो मृगाः । हन्यमानाः शरैस्तीक्ष्णैः क्रोशंतः पतिताः क्षितौ ॥२३॥
उत्पतंतः पतंतश्च ध्वनंतो भैरवान् रवान् । शृण्वन्तः कार्तवीर्येण जमदग्नेर्हता मृगाः ॥ २४ ॥
हन्यमानान्हतान् श्रुत्वा गतासून्पतितान्पशून् । तेनार्जुनेन न क्रुद्धो जमदग्निर्महातपाः ॥२५॥
नृपं तमागतं श्रुत्वा परं हर्षमुपागमत् । सोऽपि तस्याश्रमं दृष्ट्वा जमदग्नेर्महात्मनः ॥ २६ ॥
तं त्रैलोक्याधिकं पुण्यं राजा विस्मयमागतः । अहो किमेतदाश्चर्यमद्भुतं प्रतिभाति मे २७ ॥
अत्राश्रमे ह्यवैराणि दृश्यंते श्वापदानि किम् । दिव्यरत्नप्रभाभासः फलपुष्पसमन्विताः ॥ २८ ॥
दृश्यंते तरवः सर्वे जमदग्नेर्वराश्रमे ! एतैर्महद्भिरव्यग्रैस्तापसैरुपशोभितः ॥ २९ ॥
आश्रमो द्विजशालाभिर्वन्हिकुंडैरलंकृतः ।

स्कन्द उवाच–

एवं तमाश्रमं दृष्ट्वा विस्मयोत्फुल्ललोचनः ॥ ३० ॥
प्रशंस्य चार्जुनः श्रीमानिदं वचनमब्रवीत् । पश्यंतु सचिवाः सर्वे मंत्रिभिः सर्वतो द्विजाः ॥३१॥
जमदग्नेर्महद्रम्यं निवासस्थानमुत्तमम् । इत्यादिष्टास्ततस्तेन मंत्रिभिः सचिवास्तदा ॥ ३२ ॥
विश्रामस्थानमेकं तत्पश्यन्ति भार्गवाश्रमे ।

मंत्रिण ऊचुः–

रमणीयमिदं स्वामिन्नाश्रमस्थानमुत्तमम् ॥ ३३ ॥
आश्रमस्तापसानां हि विश्रामः क्रियते कथम् । सर्वत्र ह्यग्निशालाभिः सर्वतस्तापसान्वितः ॥३४॥
जमदग्नेरयं पुण्यो दृश्यते ह्याश्रमः प्रभो । वेदशास्त्रपुराणानि पठद्भिर्ब्रह्मवादिभिः ॥ ३५ ॥
आश्रमे जमदग्नेस्तात्किंचिद्राजन्न शुश्रुम ।

इति श्रीस्कांदे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये अष्टाविंशतितमोऽध्यायः २८ ॥

पराक्रमी दैत्येंद्र कार्तवीर्याच्या पराक्रमानें युद्धांत सर्व गणांसह रावणाचा पराभव केला. १०. ब्रह्मसुत नारद सिंहासनाधिष्ठित अर्जुनाला उद्देशून 'स्वस्ति' असें बोलला, व राजानेंही त्याचा सत्कार केला. नंतर कार्तवीर्याला नारद म्हणाला, हे हैहयाधिपते नृपश्रेष्ठा, मी तुला एका ऋषीचें माहात्म्य सांगणार आहें, तें तूं ऐक. ११–१२.

हे राजा, जोपर्यंत जमदग्नीचा आश्रम तुझ्या दृष्टीस पडला नाहीं, तोपर्यंत तुझें हें त्रैलोक्याचें राज्य व तुझी ही अमर्याद संपत्ति आहे! १३. जोपर्यंत तूं पापनाशिनी रेणुकादेवी पाहिली नाहींस, तोपर्यंत तुला ह्या स्त्रिया तन्वंगी व कमलमुखी वाटतील! १४. फार काय, तिच्याच कृपेमुळें सर्व त्रैलोक्याला दान, मान, पाणी, अन्न इत्यादीविषयीं अत्यंत समाधान लाभलें आहे. १५. जमदग्नीच्या त्या अघनाशन आश्रमांत तपस्वी व अनेक प्राणिसंघ वास करतात. १६. हे राजा, आतांच मी जमदग्नीच्या आश्रमांतून तुला भेटण्यासाठीं आलों आहे. ठीक आहे. आतां मी तुझा निरोप घेऊन जातों १७. याप्रमाणें देवर्षि नारद बोलल्यावर हैहयराजानें त्याला प्रणाम केला व त्याची उपचारांनीं पूजा करून त्यास निरोप दिला. १८. याप्रमाणें कार्तवीर्यानें निरोप दिल्यावर भगवान् नारद त्याच्या देखत तेथेंच अंतर्धान पावला. १९. तें महाचरित्र ऐकून लगेच तो सहस्रार्जुन जमदग्नीचा श्रेष्ठ आश्रम पाहाण्यासाठीं निघाला. २०. पुत्र, बंधु, नोकरवर्ग व सेना यांसह तो राजा शिकार करीत करीत ऋषीच्या आश्रमाकडे गेला. २१. त्या राजानें आश्रमांतील पुष्कळ मृग, महिष, डुकर, कोल्हे इत्यादि पशूंवर हल्ला केला; २२. व ते सूकरादि पशु कार्तवीर्याच्या तीक्ष्ण बाणांमुळें विद्ध होऊन विव्हळत भूमीवर पडले. २३. बाणांचा तो भयंकर आवाज ऐकून ते प्राणी इकडे–तिकडे उड्या मारूं लागले. त्या प्राण्यांना कार्तवीर्यानें ठार केलें. २४. सहस्रार्जुनानें पुष्कळ पशु मारले; ते गतप्राण होऊन जमिनीवर पडले आहेत व तो ठार मारीत आहे, हें वृत्त ऐकून महातपस्वी जमदग्नीला राग आला नाहीं! २५. उलट तो राजा आल्याचें ऐकून त्याला फार आनंद झाला. त्या राजालाही जमदग्नीचा तो त्रैलोक्याहून अधिक पवित्र आश्रम पाहून आश्चर्य वाटलें. केवढें हें आश्चर्य! हें सर्व अद्‌भुतच दिसत आहे! २६–२७. कारण ह्या आश्रमांतील श्वापदांमध्यें वैर नाहीं! फलपुष्पांनीं भरलेले हे वृक्ष स्वर्गीय रत्नाप्रमाणें तेजस्वी दिसतात. तसेंच शांत व तपस्वी मुनींमुळें हा आश्रम सुशोभित झाला आहे. ब्राह्मणांची घरें व अग्निकुंडें यांनीं हा आश्रम सुंदर दिसत आहे! स्कंद म्हणाला, याप्रमाणें तो आश्रम पाहून त्याचे नेत्र विकसित झाले. २८–३०. त्या आश्रमाची प्रशंसा करून श्रीमान् अर्जुन म्हणाला, मंत्र्यांसह सर्व सचिवांनीं जमदग्नीचें हें रमणीय स्थान पाहून घ्यावें. अशी आज्ञा होतांच ते सर्वत्र पाहूं लागले. तेव्हां त्यांना एक विश्राम–स्थान दिसलें. मंत्री म्हणाले, स्वामिन्, ही एक उत्तम आश्रमाची जागा आहे. तपस्व्यांच्या ह्या आश्रमाला खरोखर विश्रामरूप प्राप्त झालें आहे! सर्वत्र अग्निशाला व तपस्वी आहेत. जमदग्नीचा हा खास आश्रम असला पाहिजे. वेदशास्त्र पठण करणाऱ्या ब्रह्मचारी ऋषींमुळें हा पवित्र झालेला आश्रम आहे. हे राजा, आमच्या ऐकण्यांत आलें आहे कीं, ह्या आश्रमांत कशाचीही कमतरता नाहीं! ३१–३५.

# अथ एकोनत्रिंशत्तमोऽध्यायः ।

## अर्जुनस्याश्रमप्रवेशः ।

स्कन्द उवाच –
मंत्रिभिस्त्वेवमुक्तोऽसौ हैहयाधिपतिर्द्विजाः । अनादृत्य च तद्वाक्यं न निरदाश्रमाद्बहिः ॥ १ ॥
मृगयामटमानस्तु सबलः सहवाहनः । जमदग्नेर्नृपः श्रांतश्चक्रे विश्राममाश्रमे ॥ २ ॥
ससैन्यमर्जुनं वीरं ससुतामात्यबांधवम् । स ददर्श महातेजा जमदग्निर्मुनीश्वराः ॥ ३ ॥
तमागतमभिप्रेक्ष्य राजानं मुनिसत्तमः । एकवीरां प्रहर्षेण जमदग्निर्वचोऽब्रवीत् ॥ ४ ॥
ऋषिरुवाच –
आगतोऽयं महाभागो देवभूतस्तवाश्रमम् । मृगयामटमानस्तु परिश्रांतो न संशयः ॥ ५ ॥
हैहयाधिपतिर्वीरः कंदर्प इव मूर्तिमान् । देवि यत्करणीयं ते नृपायातिथये गृहे ॥ ६ ॥
तच्छीघ्रं ब्रूहि जानासि धर्ममत्र त्वमेव च ।
रेणुकोवाच –
अभ्यागतोऽतिथिर्मान्यः पूजनीयो विशेषतः ॥ ७ ॥
स्वागतेनार्हणीयोऽयं स्वामिन्नद्य भवेद्ध्रुवम् । अर्हणीयोऽर्जुनः श्रीमानयं धर्मो गृहाश्रमे ॥ ८ ॥
क्षुधितः सगणो राजा राजा पूजनीयो न संशयः । शीघ्रमाहूयतां स्वामिन्नन्नैरुच्चावचैरपि ॥ ९ ॥
दास्यामि भोजनं राज्ञे ससैन्यायादरेण च ।

इति श्रीस्कांदे सह्याद्रौ रेणुकामाहात्म्ये एकोनत्रिंशत्तमोऽध्यायः ॥ २९ ॥

# अथ त्रिंशत्तमोऽध्यायः ।

## आश्रमवैभवम् ।

स्कन्द उवाच –
इत्युक्तः स तया देव्या जमदग्निर्महेश्वरः । शीघ्रमागम्य राजानमिदं वचनमब्रवीत् ॥ १ ॥
ऋषिरुवाच –
स्वागतं ते नृपश्रेष्ठ ह्येहि शीघ्रं ममाश्रमे । सगणेन त्वया कार्यं भोजनं मद्गृहे नृप ॥ २ ॥
राजोवाच –
विप्राणां भोजनं श्रेष्ठं राज्ञो भोजनमादरः । किं तद्विशिष्यते तस्मात्कर्तव्यं तद्गृहे मया ॥ ३ ॥
पवित्रं कर्तुमात्मानमागच्छामि तवाश्रमम् ।
ऋषिरुवाच –
तापसानां गृहे स्वामिन्कंदमूलफलानि च ॥ ४ ॥
नित्यमेव हि भोज्यानि नान्यान्यन्नानि भूपते । कंदमूलफलैरेव स्वामिन्नोऽवेहि[1] भोजनम् ॥५॥

---
१ देहि

# अध्याय २९ वा

## सहस्रार्जुनाचा आश्रमप्रवेश

स्कन्द म्हणाला, “ द्विज हो, मंत्र्यांनीं असे सांगितल्यावर राजा त्यांच्या भाषणाकडे दुर्लक्ष करून आश्रमाबाहेर पडला नाहीं. १. शिकार करून थकल्यामुळें राजानें सैन्य व वाहनांसह त्या आश्रमांत विश्रांति घेतली. २. जेव्हां महातेजस्वी जमदग्नीला तो वीर अर्जुन राजा सैन्य, पुत्र, बांधव व अमात्यांसह दिसला, तेव्हां आपल्या आश्रमांत आलेल्या त्या राजाला पाहून जमदग्नि आपल्या एकवीरा पत्नीला आनंदानें म्हणाला, देवासारखा हा भाग्यशाली राजा तुझ्या आश्रमांत आला आहे. मृगयेमुळें फार थकलेलाही आहे. ३-५. हा वीर हैहयराजा मूर्तिमंत मदन आहे. देवी, ह्या अतिथिराजासाठीं जें कांहीं करणें योग्य असेल, तें मला लवकर सांग. कारण ह्याविषयी तुला चांगली माहिती आहे. ६.

रेणुका म्हणाली, “ स्वामी, अतिथीचा सन्मान व पूजा केली पाहिजे, त्याचें स्वागतही केलें पाहिजे. ह्या श्रीमान् राजाचा तर विशेष सत्कार केला पाहिजे; कारण हाच गृहस्थधर्म आहे. ७–८. अनुयायांसह हा राजा फार क्षुधाक्रांत झाला आहे. त्याला लवकर बोलवा. सैन्यासह त्या राजाला मी उच्च प्रतीचें अन्न मोठ्या आदरानें देईन. ” ९.

# अध्याय ३० वा

## जमदग्नीच्या आश्रमाचें ऐश्वर्य

स्कन्द म्हणाला, याप्रमाणें ती देवी बोलल्यावर जमदग्नि राजाकडे येऊन त्यास म्हणाला, “ नृपश्रेष्ठा, तुझें स्वागत असो. माझ्या आश्रमांत लवकर ये व सहपरिवार तूं माझ्या घरीं भोजन कर. १–२. राजा म्हणाला, ब्राह्मणांना भोजन श्रेष्ठ वाटतें, पण राजांना सन्मान श्रेष्ठ वाटतो. म्हणून तुझ्या घरीं जें चांगलें–योग्य असेल, तेंच मला केलें पाहिजे. मी पवित्र होण्यासाठींच तुझ्या घरीं येत आहें. ऋषि म्हणाला, स्वामी, तपस्व्यांच्या घरीं नेहमींच कंद–फल–मूळें असतात, दुसरें अन्न नाहीं. हे राजा, कंद–फल–मूळ हेंच आमचें भोजन समज. ३–५.

एवमुक्त्वा तु राजानं जमदग्निः स्वमाश्रमम् । आगम्य रेणुकां देवीमिदं वचनमब्रवीत् ॥ ६ ॥
देवि त्वं पाकनिष्पत्तिं कुरु तूर्णं शुभानने । अस्मिन्नेव क्षणे स्नात्वा क्षिप्रमेष्याम्यहं शुभे ॥ ७ ॥
आदरेण मया राजा प्रार्थितः सगणोऽर्जुनः । ध्रुवमेष्यत्ययं देवि भोजनार्थं तवाश्रमम् ॥ ८ ॥
देव्युवाच–
कृतमेव मया पूर्वं प्रसादाद्वो न संशयः । अन्नपानादिकं किंचित्क्षिप्रमेवावधार्यताम् ॥ ९ ॥
स्कन्द उवाच–
एवमुक्तस्तया देव्या जमदग्निर्मुदान्वितः । स्नातुं भागीरथीं गंगां स जगाम द्विजैर्वृतः ॥१०॥
ततो मध्यंदिने प्राप्ते राज्ञाऽऽदिष्टैर्मुनीश्वराः । चारितं तद्गृहं चारैः क्षुत्पिपासार्दितैस्तदा ॥
समाहूय ततश्चारान्पप्रच्छ स नृपेश्वरः ।
राजोवाच–
जमदग्नेर्गृहं रम्यमन्नानि सुरभीणि च ॥ १२ ॥
भवद्भिः कानि दृष्टानि मृदून्यन्नानि तद्गृहे । गोमहिष्यादिकं यच्च मुनेस्तत्ख्यायतां खलु ॥
चारा ऊचुः–
न पाकपरिणामोऽस्ति नाग्निधूमोऽपि दृश्यते । न फलान्यपि राजेंद्र तेनावहसितोऽसि किम् ॥
न धान्यानि गृहे तस्य गौरेकैव हि विद्यते । सर्वथा नास्ति संदेहो वंचितोऽसि महर्षिणा ॥
अत्रांतरे महातेजा जमदग्निर्मुनीश्वरः । भक्त्या स्नात्वा च गंगायां क्षिप्रं स्वाश्रममागमत् ॥
मुनिः संमार्जनं कृत्वा देवानभ्यर्च्य भक्तितः । कामधेनुमुपागम्य सर्वान्कामानयाचत ॥१७॥
ऋषिरुवाच–
देहि देवि नमस्तेऽस्तु सर्वान्कामान्ममाधुना । त्वत्प्रसादान्मया राज्ञे कर्तव्यं स्वागतं हि वै ॥
स्वामिनींद्रेण दत्तासि मातर्मे सुरवंदिनि । देवतातिथितृप्त्यर्थमानीतासि त्रिविष्टपात् ॥ १९ ॥
तेनैवं प्रार्थिता देवी सर्वान्कामान्हृदि स्थितान् ।
यथेप्सितान्ततः कामान् प्रादात्तस्मै महर्षये ॥ २० ॥
उच्चावचानि चान्नानि शाकानि विविधानि च । चैलकांबलवेश्मानि साऽददाज्जमदग्नये ॥
ततस्तानानयत्तूर्णमेकवीरा स्वमाश्रमम् । दध्यर्णवाज्यकुंडानि क्षीरार्णवगुडार्णवम् ॥ २२ ॥
सुरास्ते ऋषयः सर्वे सिद्धविद्याधरादयः । देव्यादिष्टास्ततोऽन्नादि दातुमभ्युद्यता भवन् ॥२३॥
सुबहूनि वरान्नानि वस्त्राण्याभरणानि च । भोजनानि विचित्राणि भोज्यपात्राणि चैव सा ॥
कामधेनुस्ततः प्रादात्तस्मै हृष्टा महात्मने ।
स्कंन्द उवाच–
एतस्मिन्नंतरे शीघ्रं मध्यं प्राप्ते दिवाकरे ॥ २५ ॥
जमदग्निः शुचिर्भूत्वा कार्तवीर्यं समाह्वयत् । स करांजलिमादाय विनयेनाभिगम्य च ॥२६॥
तमाहूयार्जुनं श्रीमान्मुनिः स्वाश्रममागमत् । तेनाहूतोऽथ ऋषिणा सभार्यः सगणस्त्वरन् ॥
ऋषेस्तस्याश्रमं पुण्यं कार्तवीर्यार्जुनो ययौ । पाद्यार्घ्याचमनीयाद्यैर्नृपं संपूजयदृषिः ॥ २८ ॥

---

१ त्पंद ।

असें सांगून जमदग्नि आपल्या आश्रमांत आला व रेणुकादेवीला म्हणाला, हे देवी, तूं लवकर अन्न तयार कर. हे शुभे, मी स्नान करून लवकरच येतों. ६–७. कारण मी राजाला सहपरिवार येण्यासाठीं आदरपूर्वक विनंती केली आहे. तो भोजनासाठीं तुझ्या आश्रमांत निश्चित येईल. ८. देवी म्हणाली, तुमच्या कृपेनें अन्नपानादि सर्व तयारी अगोदरच मी पूर्ण केली असें निश्चित समजा. ९. स्कन्द म्हणाला, याप्रमाणें रेणुकादेवी बोलल्यावर ब्राह्मणांसह जमदग्नि स्नानासाठीं आनंदानें नदीवर गेला. १०. मध्यान्ह होतांच भुकेनें व्याकूळ झालेले राजाचे दूत आश्रमांत येऊन गेले होते; त्यांना जवळ बोलावून राजानें विचारलें, जमदग्नीचें घर रमणीय आहे काय ? त्याच्या घरीं सुवासिक अन्न आहे काय ? तुम्हाला त्याच्या घरीं कोणतें अन्न आढळलें ? मुनींकडे गाई–म्हशी वगैरे आहेत काय, हें सर्व मला सांगा. ११–१३.

दूत म्हणाला, राजेंद्रा, तेथें स्वयंपाक नाहीं, अग्नीचा धूर नाहीं, फळेंसुद्धां नाहींत. जेवणाचें आमंत्रण ही नुसती तुमची थट्टा आहे. १४. त्याच्या घरी धान्य नाहीं ! फक्त एक गाय आहे ! महर्षीनें तुमची ही पूर्ण वंचना केली आहे, यांत संशय नाहीं. १५. इतक्यांत महातेजस्वी मुनीश्वर जमदग्नि गंगेंत स्नान करून लगबगीनें आश्रमांत आला. १६. मुनीनें संमार्जन केलें, देवपूजा केली व कामधेनूजवळ जाऊन तिच्याकडे सर्व इष्ट पदार्थ मागितले. १७. ऋषि म्हणाला, हे देवी, तुला नमस्कार असो. मला आतां सर्व पदार्थ दे. तुझ्याच प्रसादानें मला राजाचें स्वागत करावयाचें आहे. १८. हे माते सुरवंदिते, इंद्रानें मला तूं दिली आहेस. देवता, अतिथि, यांच्या तृप्तीसाठीं मी तुला स्वर्गांतून आणलें आहे. १९. याप्रमाणें त्यानें प्रार्थना केल्यावर कामधेनूनें सर्व इच्छित पदार्थ महर्षीला देऊन टाकले. २०. तिनें लहान मोठे अन्नपदार्थ, विविध वस्त्रें, कांबळी व घरें जमदग्नीला दिलीं. २१. ते सर्व पदार्थ एकवीरेनें आश्रमांत आणले. त्यांत दूध, दहीं, तूप, गूळ इत्यादि पदार्थही भरपूर होते. २२. देवीची आज्ञा होतांच देव, ऋषि, सिद्ध, विद्याधर इत्यादि सर्वजण अन्न वगैरे देण्यास सज्ज झाले. पुष्कळ चांगलें चांगलें अन्न, वस्त्रें, अलंकार, भोजन, अद्‌भुत अशीं भोजनपात्रेंही कामधेनूनें प्रसन्न होऊन त्या महात्म्याला दिली होतीं ! स्कंद म्हणाला, एवढ्या अवधींत सूर्य आकाशाच्या मध्यावर येतांच जमदग्नि शुचिर्भूत झाला व कार्तवीर्याकडे जाऊन त्यास त्यानें भोजनासाठीं बोलाविलें. २३-२६. सहस्रार्जुनास बोलावून श्रीमान् मुनि आपल्या आश्रमांत आला व त्याच्या पाठोपाठ राजाही पत्नी व परिवारासह त्या ऋषीच्या आश्रमांत गेला. ऋषीनें पाद्य, अर्घ्य, आचमन इत्यादि उपचारांनीं राजाचा सत्कार केला. २७-२८.

स्वगृहे भोजनं प्रादाज्जमदग्निः प्रियान्वितः । सुरभीणि ततोऽन्नानि पानानि विविधानि च॥
भुंजन्ददर्श रत्नानि वस्त्राण्याभरणानि च । तानि दृष्ट्वा तथान्नानि कामधेनुं च रेणुकाम् ॥
सुंदरीं सगणो भुंजन् राजा विस्मितमानसः । अहो रूपमहो धैर्यमहो सौंदर्यमुत्तमम् ॥३१॥
अहो गंभीरता चास्यास्तुल्या स्त्री नापरा क्वचित् । सुरगंधर्वसिद्धास्ते संति सर्वे महर्षयः ॥
तेषामातिथ्यसामर्थ्यं नेदृशं दृष्टमद्भुतम् । तपसा यशसा कीर्त्या चातिथ्येनेदृशेन च ॥ ३३ ॥
जमदग्ने न ते तुल्यस्त्रिषु लोकेषु विद्यते । किं ते मंत्रफलं स्वामिन्नाहोस्वित्तपसो बलम् ॥३४॥
किमिंद्रजालविद्येयं किं वा त्रैलोक्यमोहनम् । केन सिद्धेन देवेन तवैताः सर्वसिद्धयः ॥ ३५ ॥
दत्ताः समृद्धयो यस्माद् बभूवुस्तव मंदिरे । कामधेनुरियं शश्वच्चिंतामणिरयं मुने ॥ ३६ ॥
कल्पवृक्षादिकं किंचित्कथं प्राप्तोऽसि शंस मे ।

जमदग्निरुवाच –

शृणु राजन्यथा सर्वं प्राप्तोऽस्म्यहमरिंदम ॥ ३७ ॥
कदाचिदाश्रमं द्रष्टुमागतः पाकशासनः । तेन मेऽतिथिपूजार्थमियं धेनुः समर्पिता ॥ ३८ ॥
अस्याः प्रसादादातिथ्यं मया तव कृतं प्रभो ।

इति श्रीस्कन्दपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये त्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३० ॥

# अथ एकत्रिंशत्तमोऽध्यायः ॥

## कामधेनुयाचना ।

स्कन्द उवाच –

एवं निर्वर्ण्य तां देवीं कामधेनुं च सत्वरः । उत्तस्थौ स नृपो भुक्त्वा तदन्नममृतोपमम् ॥१॥
पश्यमानस्तदा राजा कामधेनुं मुहुर्मुहुः । निषसादासने रम्ये निःश्वसन्नुरगो यथा ॥ २ ॥
विधिवद्भोजनं दत्वा राज्ञे तस्मै मुनीश्वरः । प्रादाद्वस्त्राणि दिव्यानि रत्नानाभरणानि च ॥३॥
ऋषिणा तेन दत्तानि न जग्राह तदाऽर्जुनः । ततः प्रव्यथितोऽत्यर्थं जमदग्निः प्रियान्वितः ॥४॥
शिरस्यंजलिमादाय प्रार्थयामास तं नृपम् ।

जमदग्निरुवाच –

कृपां कुरुष्व मे राजन्नातिथ्यं सफलं कुरु ॥ ५ ॥
मद्गृहाणार्हणं प्रीत्या त्वं हि ज्ञानविदां वरः ।

स्कन्द उवाच –

इत्येवं प्रार्थितस्तेन मुनिना हैहयाधिपः ॥ ६ ॥
कामधेनुमभीप्सन्वै मुनिं वचनमब्रवीत् ।

जमदग्नीनें आपल्या घरीं त्यास अन्न व विविध पेयें प्रेमपूर्वक अर्पण केलीं. २९. भोजन करीत असतां त्या राजाला ती वस्त्रें, अलंकार, कामधेनु व सुंदर रेणुकाही दिसली. तिला पाहून परिवारासह राजाला आश्चर्य वाटलें. किती हें सुंदर रूप! अहह केवढें हें धैर्य!! केवढा हा हिचा गंभीरपणा!!! खरोखरच हिच्यासारखी दुसरी स्त्री असणें शक्य नाहीं! देव, गंधर्व, सिद्ध व ऋषि पुष्कळ आहेत, पण ह्यांच्याएवढें अद्‍भुत आतिथ्य-सामर्थ्य कोठेंही आढळलें नाहीं. तो जमदग्नीला म्हणाला, हे जमदग्नि, तुझ्यासारखें तप, यश, कीर्ति व आतिथ्य तिन्ही लोकांत नाहीं. हे स्वामिन्, हें सर्व तुझ्या मंत्राचें सामर्थ्य आहे कीं तपाचें सामर्थ्य आहे? ३०-३१.

ही गारुडी विद्या आहे कीं त्रैलोक्याला मोह उत्पन्न करणारें आणखी कांहीं आहे? कोणत्या सिद्ध देवामुळें तुला ह्या सर्व सिद्धि प्राप्त झाल्या आहेत? कारण तुझ्या मंदिरांत सर्व समृद्धि आहेत. ही कामधेनु, चिंतामणि व कल्पवृक्ष वगैरे तुला कसे मिळाले, हें सर्व सांग. जमदग्नि म्हणाला, हे राजा, हें सर्व मला कसें मिळालें, तें ऐक. ३५-३७.

एकदां इंद्र माझा आश्रम पाहण्यासाठीं येथें आला होता. त्यानेंच अतिथिपूजेसाठीं मला ही धेनु दिली व हिच्याच प्रसादानें मी तुमचें हें आतिथ्य केलें आहे. ३८.

## अध्याय ३१ वा

## कामधेनुयाचना

स्कंद म्हणाला, याप्रमाणें राजानें ह्या देवीची व कामधेनूची स्तुति केली व अमृतोपम अन्नग्रहण करून तो लगबगीनें उठला. १. त्या कामधेनूकडे वरचेवर पहात तो राजा रम्य आसनावर बसला व सापासारखा निःश्वास टाकूं लागला. २. प्रजेश्वराला विधियुक्त भोजन देऊन झाल्यावर मुनीश्वरानें त्याला वस्त्रें, रत्नें व अलंकार दिले. ३. ऋषीनें दिलेल्या त्या सर्व वस्तूंचा राजानें स्वीकार केला नाहीं. त्यामुळें प्रेमळ जमदग्नीला फार दुःख झालें. ४. म्हणून त्यानें हात जोडून राजाची प्रार्थना केली. जमदग्नि म्हणाला, राजा, कृपा करून माझें आतिथ्य सफल कर. ५. प्रेमानें पूजेचा स्वीकार कर. कारण तूं श्रेष्ठ तत्त्ववेत्ता आहेस. स्कंद म्हणाला, याप्रमाणें त्या मुनीनें हैहयराजाची प्रार्थना केली. ६.

राजोवाच –

सवायुतं गवां ब्रह्मन्दोग्ध्रीणां हेमवर्चसाम् ॥ ७ ॥

प्रयच्छामि न संदेहः कामधेनुं प्रयच्छ मे ।

ऋषिरुवाच –

कामधेनुमिमां राजन् पुराणीं सुरवंदिनीम् ॥ ८ ॥

किं प्रार्थयसि दीनां हि त्वन्यत्प्रार्थयतां विभो ।

राजोवाच –

राज्यार्धं ते प्रदास्यामि सत्यमेव मयोदितम् ॥ ९ ॥

कामधेनुमिमां देहि नान्यदिच्छामि किंचन ।

ऋषिरुवाच –

देवतातिथितृप्त्यर्थं मे प्रायच्छत्पुरंदरः ॥ १० ॥

कामधेनं मुनिश्रेष्ठाः सत्यमेतन्न संशयः । नित्यमस्याः पयो वन्हेर्गोमयं गृहमार्जनम् ॥ ११ ॥

पवित्रार्थं च गोमूत्रं कथं तां धेनुमिच्छसि ।

राजोवाच –

इयं त्वतिथये ब्रह्मन् वंदनीया[2] च गौर्मम[1] ॥ १२ ॥

प्रीतियोगेन दातव्या नान्यदिच्छामि किंचन ।

दुर्वासा उवाच –

किं प्रार्थयसि भूपः सन् जमदग्निं मुनीश्वरम् ॥ १३ ॥

त्वयैव विप्रमुख्येभ्यो दातव्यं दानमुत्तमम् । ब्राह्मणाश्च सदा रक्ष्याः सापराधाश्च राजभिः ॥१४॥

ब्राह्मणा हि विषं घोरं संतानक्षयकारकम् । ब्राह्मणो हि विषं घोरं सहस्त्रार्जुन मा पिब ॥ १५ ॥

सहस्त्रार्जुन उवाच –

यद्यप्येवं मुनिश्रेष्ठ तथाप्येका च गौर्मम । दातव्या प्रीतियोगेन देव्या च जमदग्निना ॥ १६ ॥

जमदग्निरुवाच –

श्रुतमेव त्वया देवि कार्तवीर्यस्य भाषितम् । यन्मे धेनुं प्रयच्छेति किं ते मनसि वर्तते ॥१७॥

देव्युवाच –

किंचित्कार्यं समुद्दिश्य कार्तवीर्येण गौः प्रभो । प्रार्थिता किं मया वाच्यं यतोऽयं गृहमागतः॥१८॥

गृहागतायातिथये कृतातिथ्याय धर्मतः । न चातिविप्रियं कर्तुमयुक्तं दुष्टभाषणम् ॥ १९ ॥

राजोवाच–

सर्वं निष्कंटकं राज्यं तव दास्याम्यहं मुने । कामधेनुमिमां देहि बहुना किं प्रयोजनम् ॥२०॥

---

१ मम दास्यात् । २ वंचनीया ।

तेव्हां कामधेनूची इच्छा धरून तो राजा म्हणाला, हे ब्रह्मन्, तुला मी निश्चित सोन्या-सारख्या दुभत्या दहा हजार गाई देतों, तूं मला कामधेनु दे. ऋषि म्हणाला, ह्या वृद्ध देववंदित कामधेनूची इच्छा तूं कां करतोस ? ७–८.

प्रभो, दुसरें कांहीं तरी माग. राजा म्हणाला, मी तुला अर्धें राज्य देतों. मी तुला खरेंच सांगत आहें कीं, मला ही कामधेनूच दे. मला दुसरें कांहीं नको. ऋषि म्हणाला, देवता व अतिथि यांची तृप्ति करण्यासाठींच इंद्रानें मला ही कामधेनु दिली आहे, हें सत्य आहे. रोज जिचें दूध, गोमय व गोमूत्र अग्नि पवित्र करण्यासाठीं व गृहसंमार्जनासाठीं मला पाहिजे, तिची इच्छा तूं कां करतोस ? राजा म्हणाला, हे ब्रह्मन्, ही गाय अतिथींसाठींच आहे. माझी वंचना करूं नकोस. ९–११.

ही गाय मला प्रेमानें देऊन टाक. मला दुसरें कांहीं नको ! दुर्वास म्हणाला, तूं स्वतः राजा असून मुनीकडे याचना कां करतोस ? वस्तुतः तूंच श्रेष्ठ ब्राह्मणांना उत्तम दान द्यावेंस. राजे लोकांनीं सदैव अपराधी ब्राह्मणाचें रक्षण करावयाचें असतें. १२–१४. ब्राह्मण हें संताननाशक महाभयंकर विष आहे ! सहस्रार्जुना, तूं तें प्राशन करूं नकोस. १५. सहस्रार्जुन म्हणाला, मुनिश्रेष्ठा, असें असलें तरी रेणुकादेवी व जमदग्नि यांनी मला ही एकच गाय प्रेमानें द्यावी. १६. जमदग्नि रेणुकेला म्हणाला, देवि, मीं माझी गाय देऊन टाकावी, हें कार्तवीर्याचें म्हणणें तूं ऐकलेंच आहेस. याविषयीं तुझा विचार काय ? १७. देवी म्हणाली, अतिथीला उद्देशून कांहीं तरी केलें पाहिजे. प्रभो, कार्तवीर्यानें तर गाय मागितली ! मी काय सांगूं ? कारण हा आपल्या घरचा अभ्यागत आहे. १८. आपल्या घरीं आलेल्या व सत्कार केलेल्या अतिथीला उद्देशून अति अप्रिय दुष्ट भाषण करणें अयोग्य आहे. १९.

राजा म्हणाला, हे मुने, तुला मी हें माझें सर्व निष्कंटक राज्य देऊन टाकतों, फक्त मला ही एक कामधेनु दे. २०.

स्कन्द उवाच–

कार्तवीर्यस्य तद्वाक्यमाकर्ण्य ऋषयोऽमलाः। विषादमगमन्सर्वे शल्यविद्धा मृगा इव ॥ २१ ॥
अथोत्थायासनाद्धीमानृचीको वाक्यमब्रवीत्। जमदग्नेश्च तां धेनुं प्रार्थयंतं तमर्जुनम् ॥२२॥

ऋचीक उवाच–

मैवं ब्रूहि नृपश्रेष्ठ किं त्वं धेन्वा करिष्यसि। अक्रोधनः शुचिः शांतो मुनिर्ज्ञानविदां वरः।
जमदग्निर्नृपश्रेष्ठ तस्य धेनुं किमिच्छसि ॥ २३ ॥

राजोवाच–

मुधा ते भाषितं विप्र गौस्तवेयं[2] यथा तथा। द्विधा शापभयाद्विप्र त्रासिता सा न तद्भवेत् ॥२४॥

विश्वामित्र उवाच–

यद्बलात्पौरुषं राजन् विप्राणामस्ति तेजसा। तन्निदर्शनमत्युग्रं शृणु किंचिद्ब्रवीमि ते ॥ २५ ॥
तुरंगं मृगयन् पूर्वं त्रैलोक्ये सगरान्वयः। ज्वलत्कपिलकोपेन प्राप्तो वै भस्मराशिताम् ॥ २६ ॥

अर्जुन उवाच –

पश्यन्तु[3] मुनयः सर्वे तेऽपि सर्वे सुरासुराः। एकतो मद्बलं धेनुं मुनेर्नेष्याम्यहं बलात् ॥ २७ ॥

अगस्त्य उवाच–

निदर्शनमिदं राजन् विप्राणां तन्महात्मनाम्। सामर्थ्यं यत्प्रवक्ष्यामि शृणुष्व त्वमथाद्भुतम् ॥
वेणुर्यैरवनीपतिस्त्वकुशली जातो वसुः पातितो। दुष्टश्चेष्टितविग्रहेण नहुषो रोषात्सशापोक्तितः
यत्कोपाद्बलवाननलोद्भुतमुखस्त्रैलोक्यभुग् वै विभोः। कस्तान्ब्राह्मणपुंगवानगणयन्गतः सुखं भूपतिः ॥ ३० ॥

राजोवाच –

नृपान्नृपाः प्रशंसंति विप्रान्विप्रा न संशयः। ब्राह्मणादित्रयो वर्णास्ते राज्ञामनुवर्तिनः ॥३१॥
दानशूराश्च राजानः क्षत्रशूराः सदा युधि। ब्राह्मणानां च किं शौर्यं तेजोदानबलादिकम् ॥३२॥

दुर्वासा उवाच –

भार्या भृगोर्भाग्यवती पुलोमा सा दैत्यपृष्ठे भयविह्वलांगी।
मुमोच गर्भं स च जायमानश्चक्रे गतासुं च्यवनोऽरिमाशु ॥ ३३ ॥

अर्जुन उवाच –

पश्यंतु मुनयः सर्वे जमदग्निर्गृहाश्रमम्। अभ्यागताय यद्धेनुं पुराणीं न प्रयच्छति ॥ ३४ ॥
कामधेनुमिमां तूर्णं भवद्भिर्मे मुनीश्वराः। जमदग्निस्तथा वाच्यो यथा हृष्टः प्रयच्छति ॥ ३५ ॥

वसिष्ठ उवाच –

नैष धर्मस्तव प्रोक्तो यद्बलादर्जुनस्त्विमाम्। नेतुमिच्छसि धेनुं त्वं मुनेर्नाशमवाप्स्यसि ॥३६॥
शूले त्वज्ञातप्रोतस्त्वं[4] ह्यचोरं चोरशंकया। मांडव्यो दंडयामास दंडिनं च सुजन्मना (?) ॥३७॥

---

१ ततोत्था० । २ गौतमीया। ३ द्रक्ष्यन्तु। ४ प्रोतस्त्वं चोरः

स्कंद म्हणाला, कार्तवीर्याचें तें भाषण ऐकून ते सर्व निर्मल ऋषि बाणविद्ध हरिणासारखे दुःखी झाले. २१. तेव्हां बुद्धिमान् ऋचीक ऋषि आपल्या आसनावरून उठून उभा राहिला व जमदग्नीची गाय मागणाऱ्या सहस्त्रार्जुनास उद्देशून बोलूं लागला. ऋचीक म्हणाला, नृपश्रेष्ठा, तूं हें बोलूं नकोस. धेनु घेऊन तूं काय करणार आहेस? क्रोधहीन, पवित्र, शांत व श्रेष्ठ तत्त्वज्ञानी जमदग्नीची गाय तूं कां इच्छितोस? २२-२३. राजा म्हणाला, हे विप्रा, तुझें बोलणें व्यर्थ आहे. जर तूं शापाची भीति दाखवीत असशील तर मीही शाप देऊं शकतां. पण त्यामुळें ही गाय घाबरून जाईल! ती घाबरूं नये म्हणून मी शांत आहें. २४. विश्वामित्र म्हणाला, हे राजा, तूं जर बलपराक्रमाच्या गोष्टी करीत असशील तर ब्राह्मणामध्येंही एक विलक्षण तेज आहे. त्याविषयींचा एक अति भयंकर दृष्टांत सांगतों, ऐक. २५. पूर्वी सगरराजाचा एक वंशज त्रैलोक्यांत आपला घोडा शोधीत असतां तो कपिलमहामुनीच्या क्रोधाग्नीनें भस्मसात् झाला! २६. सहस्रार्जुन म्हणाला, असें असेल तर सर्व मुनि, देव व राक्षस यांनीं पहातच रहावें! त्यांची शक्ति एका बाजूला व माझी एकट्याची शक्ति दुसऱ्या बाजूला असेल. मी माझ्याच शक्तीनें ही कामधेनु नेणार आहें. २७. अगस्ति म्हणाला, हे राजा, श्रेष्ठ विप्रांच्या सामर्थ्याविषयीं आणखी एक अद्भुत दृष्टांत सांगतों, ऐक. २८. वेन, वसु व नहुष या दुष्ट राजांना ब्राह्मणांनीं शाप देऊन शासन केलें आहे! २९. ज्यांच्या मुखांतून त्रैलोक्यभक्षक अग्नि निर्माण झाला, त्या ब्राह्मणश्रेष्ठांचा अवमान केल्यानें कोणत्या राजाचें भलें होईल? ३०. राजा म्हणाला, राजे राजांची व ब्राम्हण ब्राम्हणांची प्रशंसा करीत असतात यांत संशय नाहीं. वस्तुतः ब्राह्मणादि तीन वर्ण राजाला अनुसरून असतात. ३१. क्षत्रियराजे दानशूर व रणशूरही असतात. ब्राह्मणापाशीं शौर्य, तेज, दान व बल यांपैकीं काय आहे? ३२. दुर्वास म्हणाला, भृगुपत्नी भाग्यवती पुलोमा हिला एक दैत्य आपल्या पाठीवर घेऊन जात असतां भीतीनें तिचा गर्भपात झाला म्हणून च्यवन गर्भानें जन्मतांच आपल्या शत्रूस गतप्राण केलें. ३३. अर्जुन म्हणाला, सर्व मुनींनीं पहावें कीं, जमदग्नि आपल्या घरीं आलेल्या अतिथीला एक म्हातारी गाय देत नाहीं! ३४.

मुनीश्वरांनो, तुम्ही जमदग्नीला लवकर उपदेश करा, म्हणजे तो आनंदानें गाय देण्यास तयार होईल. ३५. वसिष्ठ म्हणाला, हे सहस्रार्जुना, तूं ही मुनीची गाय जबरदस्तीनें नेऊं पाहतोस, हा धर्म नव्हे. त्यामुळें तुझाच नाश होईल. ३६. एका राजानें चोर समजून मांडव्य ऋषीला शूळावर बसविलें, तेव्हां त्यानें दंडकर्त्यासच शिक्षा केली! ३७.

अर्जुन उवाच –

चैलरत्नानि कांताश्च गोमहिष्यादिकं द्विजाः । गृहागतेभ्यो राजभ्यस्तद्दातव्यं द्विजैर्मुदा ॥३८॥
धेनुरत्नमिदं दिव्यं दातव्यं मुनिना मम । यदीच्छेदभयं विद्वान् तूष्णींभूतः कथंचन ॥३९॥
बहुना किमिमां धेनुं यदि मे न प्रयच्छति । भवद्भिः सह तस्याथ मुनेर्नाशो भविष्यति ॥४०॥
इति श्रुत्वा वचो राज्ञस्त्वेकवीराऽघनाशिनी । प्रहस्य वचनं प्राह नृपं मधुरया गिरा ॥ ४१ ॥

एकवीरोवाच –

त्रैलोक्यनाथ धर्मज्ञ हैहयाधिपते प्रभो । विप्रनाशवचोऽयुक्तं नैव त्वय्युपपद्यते ॥ ४२ ॥
ब्राह्मणा हि महात्मानो येषां चरणरेणुभिः । विपदो विपदं यांति संपदो यांति संपदम् ॥
विप्रप्रीत्याऽस्मि सुप्रीता पूजिता[1] विप्रपूजनैः । विप्रे दानाच्च मे दत्तं मानो मे विप्रमानतः ॥
तद्धितं मद्धितं सर्वं तत्कृतं मत्कृतं भवेत् । तन्मतं मन्मतं राजंस्तदरिर्मदरिर्भवेत् ॥ ४५ ॥
अमरनरतिरश्चां मूर्तयो ये द्विजाश्च त्रिजगदवनहेतोः संचरंति त्रिसंध्यम् ।
जनयति परितोषं तासु मे ब्रह्ममूर्तिस्त्रिगुणविकृतसृष्टिः सात्त्विकी सोऽभिवंद्यः ॥ ४६ ॥

स्कन्द उवाच–

एतद्वचनमाकर्ण्य रेणुकायाः सुरर्षयः । विश्वप्रीतिकरं धर्म्यं परां प्रीतिमुपागमन् ॥ ४७ ॥
तत्पीयूषमिदं स्वादु ह्यमेयं रेणुकावचः । न जग्राहार्जुनो रोषान्मृत्युकाल इवौषधम् ॥ ४८ ॥

गौतम उवाच–

शृणुष्व नृपशार्दूल द्विजसामर्थ्यमुत्तमम् । येषां सुचिन्हमद्यापि चरित्रमनुमीयते ॥ ४९ ॥
लक्ष्मीपीनपयोधरस्थललुठन्मुक्तालतामालिका
लीलालंकृतचारुवक्षसि यदा निद्राजुषि श्रीपतौ ।
एकः कश्चिदुपागमद् द्विजवरो दौवारिकैर्वारितः
श्रीवत्सः स्वपदा जघान हृदि तद्देवस्य लक्ष्माभवत् ॥ ५० ॥

अर्जुन उवाच–

किं गौतम मुधा सर्वे मां वक्ष्यंति महर्षयः । कामधेनुमिमां तूर्णं जमदग्ने प्रयच्छ मे ॥ ५१ ॥

मांडव्य उवाच–

आतापिर्यः स वातापिश्च सुरमुनिद्वेषिणौ बिल्वलश्च
त्रीनेतान्यश्चखाद प्रसरितवदनः स्तूयमानः सुराद्यैः ।
कुंभादुद्भूतमूर्तिश्चुलुकविलुलितं वारिधेर्वारि पीत्वा
चक्रेऽपेयं पयोधेः शृणु नृपतिवर प्रागगस्त्यो मुनींद्रः ॥ ५२ ॥

स्कंद उवाच –

इत्याकर्ण्य मुनिश्रेष्ठाः कार्तवीर्यस्त्वरान्वितः । जमदग्निमिदं वाक्यमुवाचातिरुषान्वितः ॥ ५३
सर्वं निष्कंटकं राज्यं गृहीत्वेयं ममार्जुन । दातव्याऽतिथये विप्र मानिनो मे वचः कुरु ॥ ५४

---

१ पूजितस्तद्धि पूजितैः ।

अर्जुन म्हणाला, वस्त्रें, रत्नें, स्त्रिया, गाई, म्हैशी इत्यादि ब्राह्मणांनीं अभ्यागत राजाला आनंदानें द्यावयाच्या असतात! ३८. म्हणून आपल्यावर संकट येऊं नये अशी इच्छा असल्यास या मुनीनें हें स्वर्गीय गोरत्न मला द्यावें. फार काय, जर ह्या विद्वान् व शांत ऋषीनें मला ही गाय दिली नाहीं, तर तुम्हां सर्वांसह ह्या मुनीचा नाश होईल. ३९-४०.

हें राजाचें भाषण ऐकून पापघ्नी एकवीरा हंसून राजाला मधुर शब्दांत बोलली. ४१. एकवीरा म्हणाली, हे त्रैलोक्यनाथ हैहयेश्वरा, तूं धर्मज्ञ आहेस. ब्राह्मणनाशाची भाषा करणें तुला शोभत नाहीं. ४२. कारण ब्राह्मण महात्मे आहेत. त्यांच्या केवळ चरणधूळीनें विपत्तींचा नाश होतो व संपत्तीची वृद्धि होते. ४३.

विप्रांच्या आनंदानें मला आनंद होतो व विप्रांच्या सत्कारानें माझा सत्कार होतो. विप्रांना कांहीं दान दिल्यास ते दान मला मिळतें व विप्रांना मान दिल्यास तो मानही मलाच मिळतो. ४४. त्यांचें हित, तें माझें हित; त्यांनीं केलें, तें मीच केलें. त्यांचा विचार, तो माझा विचार व त्यांचा शत्रु तो माझा शत्रु होय. ४५. ब्राह्मण हे देव, मानव आणि पशुपक्षी यांच्या मूर्ति आहेत. त्रैलोक्याच्या रक्षणासाठीं ते त्रिकाळ सर्वत्र संचार करतात. अशा ब्राह्मणांना जो संतुष्ट करतो तो सात्विक पुरुष त्रिगुणात्मक सृष्टि उत्पन्न करणारा ब्रह्मदेव होय व तो मलाही वंदनीय आहे. ४६. स्कंद म्हणाला, हे रेणुकेचें धर्मपर व जगदानंददायक वचन ऐकून देवर्षींना फार आनंद झाला. ४७. परंतु आसन्नमरण प्राणी औषध घेत नसतो, त्याप्रमाणें रेणुकेचें हें वचनामृत सहस्रार्जुनानें स्वीकारलें नाहीं. ४८. गौतम म्हणाला, ज्याचें चरित्र सुचिन्ह म्हणून अजूनही सन्मानिलें जातें, अशा एका श्रेष्ठ द्विजाचें सामर्थ्य श्रवण कर. ४९.

एकदां सुंदर, अलंकृत व मौक्तिकमालासंपन्न अशा लक्ष्मीच्या पीनपयोधरांच्या ठिकाणीं लक्ष्मीपति निद्राधीन झाले होते; इतक्यांत एक श्रेष्ठ ब्राह्मण त्यांच्या दर्शनासाठीं आला. त्याला द्वारपालानें आंत प्रवेश करू दिला नाहीं! त्या प्रसंगीं ब्राह्मणानें विष्णूच्या वक्षस्थलावर लत्ताप्रहार केला. तेंच चिन्ह विष्णूचें श्रीवत्स बनलें! ५०. अर्जुन म्हणाला, गौतमा, हे सर्व महर्षि मला काय सांगणार! हें सर्व व्यर्थ आहे. जमदग्ने, तूं मला ही गाय ताबडतोब देऊन टाक. ५१. मांडव्य म्हणाला, पूर्वीं आतापि, वातापि व बिल्वल हे सुरमुनींचा द्वेष करीत होते. म्हणून कुंभोद्भव अगस्त्यमुनीनें त्या तिघांनाही सबंध गिळून टाकलें! एवढा मोठा समुद्र! पण अगस्तीनें त्यासही एका चुळींत पिऊन टाकलें व त्या समुद्राचें पाणी खारट केलें. त्याप्रसंगीं देवादिकांनीं त्यांची स्तुति केली आहे! ५२.

स्कंद म्हणाला, द्विजश्रेष्ठ हो, हें सर्व भाषण ऐकून कार्तवीर्याला राग आला व त्वेषानें जमदग्नीला उद्देशून तो म्हणाला, विप्रश्रेष्ठा, माझें सहस्रार्जुनाचें हें सर्व निष्कटंक राज्य घेऊन मला अतिथीला ही गाय देऊन टाक. माझें हें म्हणणें ऐक. ५४.

इमां सर्वगुणैर्युक्तामेकवीरां पतिव्रताम् । दत्त्वेमां देहि मे धेनुं त्रैलोक्यं ते ददाम्यहम् ॥ ५५ ॥

स्कन्द उवाच –

सहस्रार्जुनात्तु तद्वाक्यं श्रुत्वा ते मुनयोऽमलाः । इदमूचुर्वचः सर्वे मार्कंडेयादयस्ततः ॥ ५६ ॥

मैवं प्रार्थय भो राजन्कार्तवीर्य बलादिमाम् । कामधेनुं स्वभवनं गच्छ तूर्णं सुखी भव ॥ ५७ ॥

नाशं गमिष्यसि क्षिप्रं यदि धेनुमिमां बलात् । नेष्यसि त्वमधर्मेण सत्यमेतन्न संशयः ॥ ५८ ॥

अर्जुन उवाच --

तिष्ठतां तद्वचस्तावद्यद्भवद्भिरुदाहृतम् । पौरुषं मे मुनिश्रेष्ठा हृदि शल्यमिवार्पितम् ॥ ५९ ॥

चिंतामणेरयं स्पर्शः कल्पवृक्षादयोऽमलाः । कामधेनुरियं चैतद्वस्तुप्राप्तः कथं मुनिः ॥ ६० ॥

गवां शतसहस्राणि प्रयच्छामि मुने तव । कामधेनुमिमां देहि नो चेन्नेष्याम्यहं बलात् ॥

जमदग्निरुवाच –

विनेष्यसि बलाद्राजन्कामधेनुमिमां यदि । त्रैलोक्यविजयी शूरस्ततः किं ते करोम्यहं ॥

मान्यस्त्वमतिथिः पूज्यस्त्रिषु लोकेषु विश्रुतः । यत्करिष्यसि तत्तूर्णं कुरुष्व नृपपुंगव ॥ ६३ ॥

स्कन्द उवाच -

जमदग्नेर्वचः श्रुत्वा कार्तवीर्यस्य तद्वचः । प्रहस्य चैकवीरा सा प्रोवाचेदं वचोऽर्जुनम् ॥

एकवीरोवाच –

सहस्रार्जुन वत्स त्वं स्वस्थः शृणु वचो मम । यदीच्छसि शुभां धेनुं कल्पवृक्षादिकं नय ॥

यदि त्वमिच्छसि सहस्रभुज त्वमद्य । धेन्वादि सर्वमहमत्र ददामि तुभ्यम् ॥

आतिथ्यकालसदृशं तव नास्ति सत्यम् । वस्तु प्रियं त्रिभुवने किल दीयते यत् ॥ ६६ ॥

राजंस्त्वमिच्छसि यदि कामधेन्वादिकं च यत् । तत्सर्वं संप्रदास्यामि तुभ्यं नादेयमद्य वै ॥ ६७ ॥

अर्जुन उवाच –

प्रतिग्रहं त्वया दत्तं न गृहीष्याम्यहं शुभे । दानधर्मेण धेन्वादि सत्यमेतन्न संशयः ॥ ६८ ॥

कामधेनुरियं देवि कौतुकात्प्रार्थ्यते मया । न हि प्रतिग्रहं घोरं गृहीष्यामि कदाचन ॥ ६९ ॥

रेणुकोवाच -

अश्वमेधसहस्रैस्तैर्यज्ञैर्वत्स त्वया कृतैः । राजसूयादिभिश्चैव ययुस्तृप्तिं सुरादयः ॥ ७० ॥

त्वया दत्तान्यनेकानि दानानि विविधानि च । श्रद्धया वेदविद्भ्यः कार्तवीर्य श्रुतं मया ॥ ७१

सुरसिद्धेषु यक्षेषु गंधर्वोरगेषु च । त्रैलोक्ये त्वत्समो नास्ति त्वमेव सकलेश्वरः ॥ ७२ ॥

स्कन्द उवाच –

एवं श्रुत्वैकवीरायास्तद्वाक्यममृतोपमम् । स सहस्रार्जुनः किंचिद्वाक्यं नोवाच दुर्मतिः ॥ ७३ ॥

एतस्मिन्नंतरे धेनुस्तं विलोक्य नृपाधमम् । प्रविश्य कामधेनुस्तां होमशालां मुनीश्वराः ॥

वचः सा गार्हपत्यादींस्तानग्नीनिदमब्रवीत् ।

धेनुरुवाच –

भवद्भिरस्य दुष्टस्य श्रुतमग्निभिरुत्तरम् ॥ ७५ ॥

यद्वै बलादिमां धेनुं तां नेष्यामीति भाषितम् । भवदीयाहममरा न गच्छाम्यर्जुनालयम् ॥ ७६ ॥

ह्या सर्वगुणसंपन्न व पतिव्रता अशा एकवीरेकडे पहा व मला ही धेनु दे. मी तुला त्रैलोक्य देतों. ५५.

स्कंद म्हणाला, सहस्रार्जुनाचें तें वाक्य ऐकून मार्कंडेयादि निर्मळ मुनि म्हणाले, हे कार्तवीर्यराजा, अशा रीतीनें कामधेनूची बलपूर्वक मागणी करूं नकोस. लवकर आपल्या घरीं जा व सुखी हो. ५६–५७. जर तूं ही गाय जबरदस्तीनें नेशील, तर ह्या अधर्मामुळें तुझा निश्चितच नाश होईल. ५८.

सहस्रार्जुन म्हणाला, तुमचा हा उपदेश पुरे झाला. मुनिश्रेष्ठहो, आपल्या पराक्रमाविषयीं बोललांत, त्या शल्यानें मात्र माझें हृदय विद्ध झालें आहे. ५९. चिंतामणीचा स्पर्श, निर्मल कल्पवृक्ष व ही कामधेनु ह्या वस्तु ह्या मुनीला कशा मिळाल्या ? ६०. असो. हे मुने, तुला एक लक्ष गाई देतों. तूं मला फक्त ही एक गाय दे. नाहींतर मी ही गाय बलानें नेईन. ६१. जमदग्नि म्हणाला, हे राजा, जरी तूं त्रैलोक्यविजयी असलास तरी बलानें ही गाय नेण्याचा प्रयत्न केल्यास नाश पावशील ! म्हणून मी तुझ्यासाठीं काय करूं ? ६२. तिन्हीं लोकांत प्रसिद्ध असा तूं माझा पूज्य अतिथि आहेस. राजश्रेष्ठा, तुला जें करावयाचें आहे, तें लवकर कर. ६३. स्कंद म्हणाला, जमदग्नि व कार्तवीर्य यांचें हें संभाषण ऐकून एकवीरा हंसली व अर्जुनाला उद्देशून म्हणाली, बाळ सहस्रार्जुना, तूं माझें भाषण शांतपणें ऐकून घे. जर तुला सुंदर कामधेनु व कल्पवृक्ष पाहिजे असतील, तर घेऊन जा. ६४–६५. हे सहस्रबाहो, फार काय, तुझी इच्छा असेल तर ही धेनु इत्यादि सर्व कांहीं मी तुला देतें. खरोखरच या आतिथ्यकाळीं तुला न देण्याजोगी प्रिय वस्तु या त्रिभुवनांत नाहीं ! ६६. हे राजा, कामधेनु इत्यादि तुला पाहिजे ती वस्तु दान देण्यास मी तयार आहें. तुला देण्यास अयोग्य असें कांहींच नाहीं. ६७.

सहस्रार्जुन म्हणाला, हे शुभे, तूं दानरूपानें दिलेल्या धेनु इत्यादि वस्तु मी बिलकूल स्वीकारणार नाहीं. हे देवी, कौतुक म्हणून ही कामधेनु मागत आहें. हा घोर प्रतिग्रह मी कधींच स्वीकारणार नाहीं. ६८–६९.

रेणुका म्हणाली, हे वत्सा, तूं हजारों अश्वमेध व राजसूय यज्ञ केलेस, त्यामुळें सर्व देव तृप्त झाले आहेत. कार्तवीर्या, तूं नानाप्रकारचीं दानेंही वेदवेत्त्या ब्राह्मणांना श्रद्धापूर्वक दिलीं आहेस, असें मी ऐकलें आहे. ७०–७१. देव, सिद्ध, यक्ष, गंधर्व, सर्प यांमध्यें, फार काय, तिन्हीं लोकांत तुझ्यासारखा दुसरा कोणी नाहीं ! तूंच सर्वेश्वर आहेस. ७२.

स्कंद म्हणाला, एकवीरेचें हें वचनामृत ऐकून तो दुर्मति सहस्रार्जुन कांहीं बोलला नाहीं. ७३. इतक्यांत त्या नृपाधमास पाहून कामधेनु यज्ञशाळेंत आली व गार्हपत्यादि अग्नींना उद्देशून बोलूं लागली. ती म्हणाली, अग्नींनो, तुम्ही या दुष्टाचें उत्तर ऐकलें ना ? हा राजा मला, ह्या धेनूला जबरदस्तीनें नेऊं पहात आहे ! पण देवहो, मी तुमची आहें. मी ह्या सहस्रार्जुनाच्या घरीं जाणार नाहीं. ७४–७६.

वसंति ऋषयो देवा वेदा यज्ञा ममोदरे । न शक्याऽहं बलान्नेतुं कार्तवीर्येण भूसुराः ॥ ७७ ॥
अक्रोधनोऽयं निर्वीर्यो जमदग्निर्महातपाः । किं कर्तव्यं मया देवाः ख्यायतां प्रतिभाति यत् ॥ ७८
ध्रुवमद्याधुना राज्ञः कर्तव्यो निग्रहः किल ।

अग्नय ऊचुः –

न जानीमो वयं देवि किं कर्तव्यमिति ध्रुवम् ॥ ७९ ॥
त्वमेव सर्वं जानासि सर्वदेवमये शुभे ।

धेनुरुवाच –

मां नेतुमिच्छति क्रूरः कार्तवीर्योऽयमर्जुनः ॥ ८० ॥
तस्मादहं करिष्यामि यन्मया ह्यनुष्ठितम् ।

अग्नय ऊचुः –

जमदग्निमृषिं दृष्ट्वा कुरु देवि यथोचितम् ॥ ८१ ॥
ऋषेरस्यातिथिर्मान्यः कार्तवीर्योऽयमर्जुनः । सुराणामपि पूज्योऽयं दुर्जयः समरेऽर्जुनः ॥ ८२ ॥
विशेषादतिथिर्मान्यः पूजितो जमदग्निना ।

स्कन्द उवाच –

एवमुक्ताऽग्निभिर्विप्राः कामधेनू रुषान्विता । जमदग्निमुपागम्य रुरोदोच्चैर्भयातुरा ॥ ८३ ॥
अक्रोधनं ततः शांतं जमदग्निं प्रहस्य सा । कामधेनुरिदं वाक्यमब्रवीद्रुषिता सती ॥ ८४ ॥

धेनुरुवाच –

स्वामिंस्त्वमस्य दुष्टस्य कार्तवीर्यस्य मन्युना । न करिष्यसि संहारं कथं मां प्रेरय प्रभो ॥ ८५ ॥

जमदग्निरुवाच –

नैष धर्मो भवेद्देवि गृहाश्रमनिवासिनाम् । न केनाप्यतिथिर्दुष्टोऽप्यागतः स्वगृहे हतः ॥८६॥
त्रैलोक्याधिपतिर्मान्यो विशेषाद्धैहयाधिपः । गृहागतोऽतिथिर्मान्यः कथं घातयितुं क्षमः ॥८७॥

स्कन्द उवाच –

ऋषेस्तद्वचनं धर्म्यमप्याकर्ण्याथ तत्क्षणात् । तदनादृत्य सा धेनू रुषिता चासृजन्नरान् ॥ ८८ ॥
होमधेनुकृतहुंकृतस्त्वनान्निर्ययुर्विविधशस्त्रपाणयः ।
ते नराःप्रलयवन्हिसन्निभाः कालमृत्युसदृशास्तथोद्धताः ॥ ८९ ॥
धेनोर्मुखात्किरातास्ते चक्षुर्भ्यां म्लेच्छजातयः । बर्बराः श्रोत्रदेशाभ्यां निर्ययुः शस्त्रपाणयः ॥
तन्मूत्ररंध्राद् द्रविडास्ततो दग्धनगोपमाः । निर्ययुर्गोमयाद्धीराः पुंड्रकास्ते सहस्रशः ॥ ९१ ॥
रोमरंध्रप्रदेशेभ्यो निर्गतैः शस्त्रपाणिभिः । धेनोस्तैरमितैरुग्रैरर्जुनस्त्रासितो भृशम् ॥ ९२ ॥
ततो निजघ्नुः संक्रुद्धाः शतशोऽथ सहस्रशः । ससैन्यमर्जुनं वीरं नानाशस्त्रैर्द्विजोत्तमाः ॥९३॥
कार्तवीर्यस्ततः क्रुद्धः शस्त्रास्त्रैर्विविधैर्भृशम् । जघान सचिवैः सार्धं धेनुसृष्टान्धनुर्धरान् ॥९४॥
विव्यधुस्तेऽर्जुनं वीरा राजानं वा रथान्बहून् । धेनुसृष्टास्तथा क्रुद्धास्ते नरा ह्यमितास्त्वरन् ॥
शस्त्रास्त्रैर्निहताः शूरैर्म्लेच्छैः कालसमप्रभैः । कार्तवीर्योऽतिरोषेण कालानलसमो बभौ ॥९६॥
ते प्रसार्याथ वक्त्राणि मृत्युवक्त्रनिभाननाः । गजानश्वान् रथान्मेषान् चिक्षिपुः स्वमुखे सुरान् ॥

माझ्या उदरांत ऋषि, देव, वेद व यज्ञ यांचा वास आहे. भूदेवहो, कार्तवीर्याला मला बलपूर्वक नेतां येणार नाहीं. ७७. हा तपस्वी जमदग्नि तर क्रोधहीन व निर्वीर्य बनला आहे ! अशा परिस्थितींत मी काय करावें ! देवहो, तुम्ही तुमचें मत सांगा. ७८. आज आतां ह्या राजाला शिक्षा झालीच पाहिजे !

अग्नि म्हणाले, देवी, काय करावें हें आम्हांला बिलकुल समजत नाहीं. तुलाच तें माहीत आहे. कारण तुझ्या ठिकाणीं सर्व देवता आहेत.

धेनु म्हणाली, हा क्रूर कार्तवीर्य अर्जुन मला जबरदस्तीनें नेऊं पहात आहे. यासाठीं मला पाहिजे तें मी करीन.

अग्नि म्हणाले, देवी, जमदग्नीकडे पाहून तूं योग्य तें कर. ७९–८१. कारण रणांत अजिंक्य असा हा कार्तवीर्य अर्जुन ऋषीचा सन्माननीय अतिथि आहे. शिवाय तो देवांनाही पूज्य आहे ! ८२. विशेषेंकरून या माननीय अतिथीची जमदग्नीनें पूजा केली आहे. स्कंद म्हणाला, याप्रमाणें अग्नि बोलल्यावर क्रुद्ध व भयभीत कामधेनु जमदग्नीच्या जवळ जाऊन मोठ्यानें रडूं लागली. ८३. क्रोधहीन व शांत जमदग्नीला हंसून ती कामधेनु रागानें म्हणाली, ८४. हे स्वामिन्, या दुष्ट कार्तवीर्याचा संहार तूं कां करीत नाहींस ? तुला या गोष्टीचा राग कसा येत नाहीं ? प्रभो, निदान मला तरी तशी आज्ञा करा. ८५. जमदग्नि म्हणाला, हे देवी, गृहस्थाश्रमी पुरुषांचा हा धर्म नव्हे ! आपल्या घरीं आलेल्या दुष्ट अतिथीचीसुद्धां आतांपर्यंत कोणी हत्या केलेली नाहीं ! ८६. विशेषतः त्रैलोक्याधिपति हैहयराजा याचा सत्कारच केला पाहिजे ! आपल्या घरीं आलेल्या अतिथीचा सन्मान करावयाचा असतो. त्याचा घात करणें कसें बरें योग्य होईल ? ८७.

स्कंद म्हणाला, धर्माला अनुसरून असलेलें हें ऋषिवचन ऐकूनही त्याकडे त्या क्रुद्ध धेनूनें दुर्लक्ष केलें व लगेच अनेक पुरुष निर्माण केले. ८८. त्या होमधेनूच्या हुंकारांतून विविध शस्त्रधारी पुरुष बाहेर पडले. ते प्रलयकालच्या अग्नीसारखे व कालमृत्यूसारखे कठोर दिसत होते. ८९. त्या धेनूच्या मुखांतून किरात, डोळ्यांतून म्लेच्छ, कानांतून बर्बर, मूत्ररंध्रांतून दग्ध पर्वतासारखे काळेकुट्ट द्रविड, गोमयांतून हजारों वीर पुंड्रक व रोमरंध्रांतून अनेक वीर पुरुष हातांत शस्त्र घेऊनच बाहेर पडले. त्या भयंकर वीरांनीं सहस्रार्जुनाला भयभीत करून सोडलें. ९०–९२. त्या क्रुद्ध वीरांनीं शूर अर्जुनाचे शेंकडों हजारों सैनिक आपल्या विविध शस्त्रांनीं ठार केले. ९३. क्रुद्ध कार्तवीर्यानेंही विविध शस्त्रांनीं धेनूचे अनेक धनुर्धारी पुरुष ठार केले. ९४. धेनूचे वीर पुरुष असंख्य होते. त्यांनींसुद्धां अर्जुनराजास जखमी करून त्याचे पुष्कळ रथ मोडून टाकले. ९५. यावेळीं ते शूर म्लेंच्छ काळाप्रमाणें भासत होते. कार्तवीर्यही अत्यंत क्रुद्ध झाल्यामुळें प्रलयकालच्या अग्नीसारखा दिसत होता. ९६. तरी पण ते म्लेच्छ आपले मृत्यूचे जबडे उघडून त्यांत गज, घोडे, रथ, मेष ह्यांचा घांस घेत होते. ९७.

कामधेनुरतिक्रुद्धा कार्तवीर्यस्य पश्यतः । तस्य बंधून्सुतामात्यान्सा शृंगाभ्यां व्यदारयत् ॥
एवं धेनुशरीरोत्थैः सिंहवीर्यैर्धनुर्धरैः । स्वसैन्यं निहतं दृष्ट्वा क्रोधं चक्रे नरेश्वरः ॥ ९९ ॥
म्लेच्छैर्विदारितं सैन्यं ससुतामात्यबांधवम् । किंचित्तद्ग्रसितं दृष्ट्वा जमदग्निं नृपोऽब्रवीत् ॥

राजोवाच –

कामधेनुहतं विप्र ससुतामात्यबांधवम् । स्वसैन्यमतुलं दृष्ट्वा तूष्णींभूतः स्थितोऽसि किम् ॥
एवं ब्रुवाणं राजानं म्लेच्छाद्यास्ते सहस्रशः । निजघ्नुरर्जुनं शस्त्रैः सोऽपि तान्निजघान ह ॥२॥

जमदग्निरुवाच –

मत्कुलेऽस्याः परं तीव्रमभूत्कष्टं न संशयः । यस्याः संदर्शनादेव सर्वकामफलं लभेत् ॥ ३ ॥
तव वध्यो ममाप्येषः सत्यमेतत्सुरेश्वरि । कार्तवीर्योऽर्जुनः संख्ये किं कर्तव्यं मयाधुना ॥ ४ ॥

एकवीरोवाच –

गृहागतोऽयमतिथिः पूज्यस्त्विति विचार्य च । नावाहयामि परशुरामदेवं शिवांतिकात् ॥५॥

धेनुरुवाच –

याहि याहि परित्यज्य त्वं सहस्रार्जुन द्रुतम् । मुनिमेनं सुवृत्तं तु दांतं स्वनपराधिनम् ॥६ ॥

अर्जुन उवाच –

किं त्वया वारितोऽयं मे क्वचिज्जीवन्विमुंचति । जमदग्निर्मुनिर्धेनो यच्छ तन्मद्बलं हतम् ॥७॥
स्वशरीरेण धेनो त्वमिमं प्रच्छाद्य तिष्ठसि । मुनिं तथाप्यहं त्वां च घातयिष्यामि चासिना ॥८॥
त्यज मे जमदग्निं त्वं विचरस्व यथासुखम् । मया हता सती[1] क्षिप्रं कथं नाशं गमिष्यसि ॥९॥
इत्युक्त्वा खड्गमुद्यम्य[2] रोषेण महताऽऽवृतः । अभ्यधावत्ततो हंतुं तावद्धेन्वा निवारितः ॥१०॥
तन्मेरुशिखराकारं विबुधानां शिरो महत् । रक्षन्त्येव[3] मुनिं शांतं कामधेनुरतिष्ठत ॥ ११ ॥

जमदग्निरुवाच –

अपसर्प शुभे धेनो त्यज मां हैहयाधिपः । यत्करिष्यति तत्तूर्णं करोतु सुखमीश्वरः[4] ॥ १२ ॥

स्कंद उवाच –

जमदग्नेरिदं वाक्यं श्रुत्वा ते मुनयः सुराः । चकंपिरे भृशं विप्राः शल्यविद्धा इवार्दिताः ॥१३॥

ऋषय ऊचुः –

कार्तवीर्य नृपश्रेष्ठ सर्वेषां नो वचः शृणु । त्यज ह्यग्र्यामिमां धेनुं मा नाशं व्रज नाज्ञवत् ॥१४॥
अस्माभिर्नीतिशास्त्रेण सर्वैरुक्तोऽसि चार्जुन । न करिष्यसि चेद्वाक्यं तत्कर्तुमपि वांछसि ॥१५॥
मा त्वं ब्रह्मवधं घोरं गोवधं मा कुरुष्व हि । ब्रह्महत्यासमं पापं न भूतं न भविष्यति ॥१६॥
पंचभ्यः पातकेभ्यो वा ब्रह्मघ्नगुरुतल्पगौ । निषिद्धौ तेन धेनुं त्वं हंतुं किं विप्रमिच्छसि ॥१७॥
गोहत्याब्रह्महत्याभ्यामेताभ्यां त्वमथार्जुन । किं करिष्यसि तद् ब्रूहि का गतिस्ते भविष्यति ॥
नूनं केयमिति ज्ञातुं तव ज्ञानं न विद्यते । रेणुकां जमदग्निं च न जानासि रुषान्वितः ॥ १९ ॥

इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये एकत्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३१ ॥

---

१ ऽस्यपि । २ उत्पाद्य । ३ तमप्येवं । ४ मुख०

कामधेनूलाही हें सर्व पाहून फार राग आला व तिनें कार्तवीर्याच्या देखत त्याचे बंधु, पुत्र, अमात्य यांना आपल्या शिंगांनीं विदीर्ण केलें. ९८. अशा रीतीनें त्या धेनूच्या शरीरांतून निर्माण झालेल्या धनुर्धारी पुरुषसिंहांनीं आपल्या सैन्याची केलेली धूळधाण पाहून तो राजा भयंकर क्रोधायमान झाला. ९९. म्लेंच्छांनीं पुत्र, बांधव व अमात्य यांसह आपल्या सैन्याची केलेली वाताहत पाहून राजा जमदग्नीस म्हणाला, हे विप्रा, तुझ्या कामधेनूनें माझे पुत्र, बांधव व अमात्य ठार केले. माझें मोठें सैन्य गारद केलें! हें सर्व पाहूनही तूं शांत कसा राहिलास? १००–१०१. एवढें राजा बोलत आहे, तोंच त्याच्यावरसुद्धां हजारों सशस्त्र म्लेंच्छांनीं हल्ला केला; तेव्हां त्यानेंही त्यांचा वध केला. १०२.

जमदग्नि म्हणाला, जिच्या केवळ दर्शनानें माझ्या सर्व कामना पूर्ण होतात, त्या माझ्या धेनूला निश्चितच दुःख झालें असेल! हे देवी, तुला व मलाही हा कार्तवीर्य अर्जुन खरोखरच वध्य आहे. मी तरी आतां काय करावें? १०३–४.

एकवीरा म्हणाली, माझ्या घरीं आलेला हा पूज्य अतिथि आहे. हाच विचार करून मीही शिवाजवळून परशुरामाला बोलाविलें नाहीं. १०५. धेनु म्हणाली, हे सहस्रार्जुना, ह्या सदाचारी, निग्रही व अत्यंत निरपराधी मुनीला सोडून तूं ताबडतोब निघून जा. १०६.

अर्जुन म्हणाला, तूं घाई केलीस म्हणून काय हा जमदग्नि मुनि जिवंत सुटेल? हे धेनो, ठार केलेलें माझें सैन्य तूं परत दे. १०७. धेनो, आज ह्या मुनीस बाजूस करून मध्यें तूं उभी आहेस, तरीपण मुनीला व तुलाही मी तलवारीनें ठार करणार आहें. १०८. जमदग्नीस माझ्या स्वाधीन कर व यथेच्छ निघून जा, न पेक्षां तूंही ठार मारली जाशील! १०९. असें बोलून अत्यंत क्रुद्ध झालेला राजा तलवार उगारून मुनीस ठार मारण्यास धांवला, तोंच त्या धेनूनें त्यास अडविलें. ११०. देवानांही पूज्य अशी ती धेनु मुनीचें रक्षण करीत मेरुपर्वतासारखी मध्यें उभी राहिली! १११. जमदग्नि म्हणाला, हे धेनो, तूं दूर हो. मला सोड. ह्या राजाला जें करावयाचें असेल तें त्याला खुशाल करूं दे. ११२.

स्कंद म्हणाला, जमदग्नीचें तें वाक्य ऐकून सर्व ब्राह्मण, मुनि व देव बाणविद्ध झाल्याप्रमाणें थरथर कांपूं लागले. ११३.

ऋषि म्हणाले, नृपश्रेष्ठ कार्तवीर्या, आमचें सर्वांचें म्हणणें ऐक व ह्या श्रेष्ठ धेनूला सोड. मूर्खासारखा नाश पावूं नकोस. ११४. आम्ही तुला नीतिशास्त्राला अनुसरूनच सांगत आहोंत. जर तूं आमचा उपदेश न ऐकशील व यथेच्छ वर्तन करशील, तर तुझ्या हातून घोर गोहत्या व ब्रह्महत्या होईल. ती हत्या करणें योग्य नव्हे. कारण ब्रह्महत्येसारखें दुसरें घोर पाप झालें नाहीं, होणार नाहीं. ११५–६. ब्रह्महत्या व गुरुपत्नीगमन हीं दोन पापें पंचमहापातकांहून अधिक निषिद्ध आहेत. तर मग तूं ब्रह्महत्या व गोहत्या कां करूं पाहतोस? ११७. गोहत्या व ब्रह्महत्या करून तुला काय मिळणार आहे व तुझी कोणती गति होणार तें सांग. ११८. तुला क्रोधानें ग्रासलें आहे. म्हणूनच ही धेनु, रेणुका व जमदग्नि यांची ओळख तुला पटत नाहीं. ११९.

# अथ द्वात्रिंशत्तमोऽध्यायः ।

## कामधेनुवर्णनम् ।

स्कन्द उवाच –

मुनिभिस्त्वेवमुक्तोऽपि कार्तवीर्यो मुनीश्वराः । रोषेण महता युक्तस्त्विदं वचनमब्रवीत् ॥ १ ॥

राजोवाच –

ऋषिणाऽऽदिष्टया धेन्वा ससैन्याः पुत्रबांधवाः । सचिवा मे हताः सर्वे मंत्रिणः किमतः परम् ॥

यद्यनेन परित्यक्तोऽप्यमर्षो मुनिना द्विजाः । कथमेषा त्वियं धेनुः सक्रुद्धा न निवार्यते ॥ ३ ॥

ऋषय ऊचुः –

अक्रोधनोऽयं जमदग्निश्च सत्यं नास्यापराधोऽस्ति सहस्रबाहो ।
शुचिः सदाचाररतो महात्मा तवोचितं तत् प्रकुरुष्व राजन् ॥ ४ ॥
यस्याः प्रसादात्सुरसिद्धसंघास्त्वन्नार्थिनो ये वयमत्र विप्राः ।
सर्वे गतास्तृप्तिमखंडितां भो विद्ध्येकवीरां त्वमचिंत्यरूपाम् ॥ ५ ॥
या देवमाता त्वदितिश्च गौरी या गौतमी या च भगीरथी च ।
या धर्मदेवर्षिमहाध्वराणां तेजो महद्विद्धि त्वमेकवीरा ॥ ६ ॥
या ब्रह्मविद्याऽखिलयोगिनां या तिष्ठत्यचिंत्या हृदयेषु नित्यम् ।
या देवमाता त्रिपदा पवित्रा सा चैकवीरा नृप निर्विकल्पा ॥ ७ ॥
ब्रह्मा मुखं तद्धृदयं तु यस्या विष्णुश्च सर्वे मुनयोंऽगिरोमाः ।
कुक्षिप्रदेशादखिलाः समुद्रा मेरुः शिरोभूः ऋतवोंऽघ्रियुग्मम् ॥ ८ ॥
शिवः स्वयं यो जमदग्निरेष स कश्यपस्यापरवेदरूपः ।
या वन्हिकुंडादुदिता सहस्रबाहो न जानासि सुराधिनाथ ॥ ९ ॥

इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये द्वात्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३२ ॥

# अथ त्रयस्त्रिंशत्तमोऽध्यायः ।

## अर्जुनकामधेनुयुद्धम् ।

स्कन्द उवाच –

मुनीनां तद्वचः श्रुत्वा कार्तवीर्यो महाबलः । रोषेण महताऽऽविष्टस्तूष्णींभूतो बभौ क्षणम् ॥

धेनुरत्नहृतचेता क्रोधाकुलितविग्रहः । विचाराचारनिर्मुक्तः प्रलयाग्निसमोऽभवत् ॥ २ ॥

ततः कृपाणमतुलं परिमार्ज्य मुहुर्मुहुः । हैहयाधिपतिस्तूर्णमुत्पपातांबरं जवात् ॥ ३ ॥

कामधेनुरपि क्रुद्धा सहसोत्पत्य चांबरम् । अवधूय शिरः पद्भ्यां शृंगाभ्यामभिनन्नृपम् ॥४॥

# अध्याय ३२ वा

## कामधेनूचें वर्णन

स्कंद म्हणाला, याप्रमाणें मुनींनीं सांगितलें असतांही कार्तवीर्य अत्यंत रागानें बोलूं लागला. राजा म्हणाला, ऋषीच्या आज्ञेवरून धेनूनें माझें सैन्य, पुत्र, बांधव, मंत्री व सचिव यांचा नाश केला आहे. याहून मोठें दुःख तें कोणतें ? १–२. द्विज हो, जर या द्विजानें क्रोधाचा त्याग केला आहे, तर त्यानें या क्रुद्ध गाईला या कृत्यापासून परावृत्त कां केलें नाहीं ? ३.

ऋषि म्हणाले, या ऋषीला क्रोध माहीत नाहीं, हें सत्य आहे. सहस्रबाहो, हा या मुनीचा अपराध नव्हे ! हा महात्मा पवित्र व सदाचारी आहे. यापुढें तुला जें योग्य वाटतें तें तूं कर. ४. जिच्या प्रसादानें अन्नार्थी देव, सिद्धसंघ व आम्ही सर्व विप्र यांची अखंड तृप्ति होते, ती ही अचिंत्यरूप एकवीरा आहे असें समज. ५. देवमाता अदिति, गौरी, गौतमी, भागीरथी, धर्म, देव, ऋषि, महाध्वर या सर्वांचें महातेज म्हणजेच ही एकवीरा देवी आहे असें समज. ६. हे राजा, सर्व योगी-जनांच्या हृदयांतील अतर्क्य ब्रह्मविद्या, देव-माता व पवित्र त्रिपदा गायत्री म्हणजेच ही निर्विकल्प एकवीरा आहे. ७. हिचें मुख ब्रह्मदेव आहे, हृदय विष्णु आहे, सर्व अंगरोम मुनि आहेत, कुक्षि समुद्र आहेत, शिर मेरुपर्वत आहे व दोन्ही चरण हे यज्ञ आहेत. ८. हा जमदग्नि स्वतः शिव असून कश्यपाचें दुसरें वेदरूप आहे. हे सहस्रबाहो, ही एकवीरा अग्निकुंडांतून निर्माण झाली आहे, हें तुला माहीत नाहीं. ९.

# अध्याय ३३ वा

## अर्जुन व कामधेनु यांचें युद्ध

स्कंद म्हणाला, मुनींचें तें भाषण ऐकून महाबल कार्तवीर्य अत्यंत कोपाविष्ट झाल्यामुळें क्षणभर शांत वाटला. १. त्याचें मन धेनुरत्नामुळें मोहित झालें होतें व शरीर रागानें ग्रासलें होतें. त्यामुळें तो विचारापासून फार दूर गेला होता व प्रलयाग्नीसारखा भयंकर बनला होता. २. एकदम तो सहस्रार्जुन आपली अद्वितीय तलवार वरचेवर साफ करून वेगानें आकाशांत उडाला. ३. क्रुद्ध कामधेनुसुद्धां एकदम आकाशांत उडाली व तिनें आपलें मस्तक रोखून शिंगांनीं व पायांनीं राजावर प्रहार केले. ४.

स कामधेनुमहनद्रोषेण महतासिना । शृंगाभ्यामहनत् खड्गं कामधेनुर्नृपस्य सा ॥ ५ ॥
दैत्येन महता धेनुर्हता धेन्वा स चार्जुनः । द्वयोः परस्परं मृत्युर्नास्तीत्येवं शिवोऽब्रवीत् ॥
ततो विहाय तरसा कामधेनुं मुनीश्वराः । हंतुमभ्यगमत्खड्गमुद्यम्य सहसाऽर्जुनः ॥ ७ ॥
मंत्रयित्वाहरन्धेनुं पश्यतस्तामृषेर्बलात् । ततस्ते सचिवास्तस्य राज्ञः सर्वे च मंत्रिणः ॥ ८ ॥
तूर्णं गृहीत्वा तां धेनुं निर्ययुस्तत्पुराद्बहिः । ततस्ते मुनयः सर्वे सुरगंधर्वकिन्नराः ॥ ९ ॥
जमदग्नेर्हतां धेनुं ते दृष्ट्वा चुक्रुशुर्भृशम् । तस्मिन्नेव ततः काले जमदग्नेस्तदग्रतः ।
क्रोधो विग्रहवान्स्थित्वा प्रहसन्वाक्यमब्रवीत् ॥ १० ॥

क्रोध उवाच –

यत्त्वयाऽहं परित्यक्तस्तस्येदं कर्मणः फलम् । तूष्णींभूतोऽसि किं ब्रह्मंस्त्वं दीनोऽसि मया विना ॥
प्रभवंति न शास्त्राणि वीर्यं तेजश्च पौरुषम् । अस्त्राणि विविधान्येव पुरुषस्य मया विना ॥
किं करोमि मुनिश्रेष्ठ त्यक्तोऽहं सर्वथा त्वया । किंचिद्गृहाण मां तूर्णं राज्ञा नीतास्ति गौर्बलात् ॥
दुःखं दैन्यं भयं घोरं त्वं प्राप्तोऽसि मया विना । मामद्यापि गृहाणाशु यदि जीवितुमिच्छसि ॥
शस्त्रास्त्रैर्विविधैरेनं राजानं सगणं रणे । निर्दलिष्यसि सर्वांस्तान्यदि मामनुवर्तसे ॥ १५ ॥
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये त्रयस्त्रिंशत्तमोऽध्याय ॥ ३३ ॥

# अथ चतुस्त्रिंशत्तमोऽध्यायः ।

## जमदग्निवधः ।

स्कन्द उवाच –

इत्युक्तोऽपि महातेजाः क्रोधेन स मुनिस्तदा । तूष्णींभूतोऽभवत्तत्र जमदग्निर्मुनीश्वराः ॥१॥
काककोकिलकृष्णांगः क्रोधस्ताम्रारुणेक्षणः । जमदग्निं प्रणम्याथ तत्रैवांतरधीयत ॥ २ ॥
नीयमाना तु सा धेनुरर्जुनेन बलीयसा । हंबाशब्दं पुनः कृत्वा जमदग्निमुपागमत् ॥ ३ ॥
साऽश्रुपातमुखी दीना कशादंडाश्मभिर्हता । जमदग्नेर्निधायाशु ग्रीवां स्कंधे रुरोद सा ॥४॥
पुनरागम्य ते तस्य राज्ञः सर्वे च दौतिकाः । दाम्ना बध्द्वा च तां धृत्वा निर्ययुः शस्त्रपाणयः ॥
कशादंडप्रहारैस्तैस्ताडिता सा मुहुर्मुहुः । रुरोद विस्वरं दीना स्मरमाणा च तं मुनिम् ॥ ६ ॥
सा विमुक्ता ततस्तेभ्यो जमदग्नेस्तदग्रतः । स्थित्वा मूर्ध्नि मुखं कृत्वा रुरोदातीव दुःखिता ॥७॥
ततस्तां दुःखितां दृष्ट्वा कामधेनुं मुनीश्वराः । प्रणम्याश्वासयामास जमदग्निः कृपान्वितः ॥ ८ ॥

जमदग्निरुवाच –

न क्रोधेन विना देवि शक्तोऽहं सुरवंदिनि । जेतुं रणाजिरे शत्रुं शस्त्रास्त्रैर्दुष्टचेतसम् ॥ ९ ॥
रोषेण परित्यक्तोऽहं न शक्तो रक्षणेऽधुना । किं करोमि बलाद्दीनां त्वामादाय प्रयास्यति ॥१०॥
परीक्ष्यातिथिमातिथ्यं नाहं घातयितुं क्षमः । एतस्मिन्नंतरे क्रुद्धः स सहस्रार्जुनो बली ॥ ११ ॥
मंत्रिभिः प्रेरितः खड्गमुद्यम्याग्रत आगतः । तस्य क्रुद्धस्य राज्ञश्च किल्बिषे सा मतिर्बभौ ॥१२॥

---

१ चावशक्तो । २ उत्पाद्य

राजानेंसुद्धां कामधेनूवर महाखड्गानें प्रहार केले. त्या महादैत्यानें धेनूवर व धेनूनें राजावर तडाखे मारले. पण शिव म्हणाला, दोघांनांही परस्परांपासून मृत्यु नाहीं. ५–६.

नंतर मुनीश्वर हो, एकाएकीं कामधेनूवर प्रहार करण्याचें सोडून सहस्रार्जुन राजा तलवार घेऊन मुनीस ठार मारण्यासाठीं धांवला. ७. तेवढ्या अवधींत ऋषीच्या देखत राजाचे मंत्री व सचिव आपसांत मसलत करून ती गाय घेऊन पळाले, ८.

ते थेट नगराबाहेर पडले. जमदग्नीची ती गाय नेलेली पाहून सर्व मुनि, देव, गंधर्व व किन्नर आक्रोश करूं लागले! त्याचवेळीं क्रोध साकार होऊन जमदग्नीच्या पुढें उभा राहिला व बोलूं लागला. ९–१०. क्रोध म्हणाला, मुने, तूं माझा त्याग केलास, त्याचें हें फल आहे! आतां गप्प कां? हे ब्रह्मन्, माझ्यावांचून तूं दीन बनलास. ११. माझ्यावांचून पुरुषाचें वीर्य, तेज, पराक्रम, विविध अस्त्रें व शस्त्रें व्यर्थ होतात. १२. मुनिश्रेष्ठा, मी तरी काय करूं? तूंच माझा त्याग केलास! राजा जबरदस्तीनें अनाथ गाय घेऊन गेला. आतां तरी मला आश्रय दे. १३. मला जवळ न केल्यामुळें तुला भयंकर दुःख, दैन्य व भय प्राप्त झालें आहे. तुला जिवंत रहावयाचें असेल तर अजून माझा स्वीकार कर. १४. जर मला अनुसरशील तर विविध शस्त्रास्त्रांनीं तूं या सपरिवार राजाला ठार मारूं शकशील. १५.

# अध्याय ३४ वा

## जमदग्नि–वध

स्कंद म्हणाला, मुनीश्वरांनो, क्रोध इतकें बोलला, तरी तो महातेजस्वी जमदग्नि स्तब्धच राहिला! १. म्हणून कावळा व कोकिळ यांसारखें शरीर व आरक्त नेत्र असलेला तो क्रोध तेथेंच अंतर्धान पावला. २. बलवान् अर्जुन कामधेनूला घेऊन चालला असतां ती हंबरडा फोडून पुनः जमदग्नीजवळ आली. ३. त्या दीन गाईच्या डोळ्यांतून अश्रु वहात होते; चाबूक, दंड व दगड यांचा तिच्यावर मारा चालू होता, तरीसुद्धां ती जमदग्नीच्या खांद्यावर आपली मान ठेवून रडत होती! ४. त्या राजाचे सर्व शस्त्रधारी दूत आले, तिला दाव्यानें बांधून नेऊं लागले, चाबूक व काठ्या यांचा तिच्यावर वारंवार प्रहार करूं लागले, तेव्हां ती अत्यंत दीन होऊन व मुनीला आठवून रडूं लागली! ते दृश्य अत्यंत करुण होतें. ५–६. पुनः त्या गाईनें आपली सुटका करून घेतली व ती जमदग्नीच्या समोर आली. त्याच्या मस्तकावर आपलें तोंड ठेवून ती रडूं लागली. ७. तेव्हां दयाळू जमदग्नीनें दुःखी कामधेनूला प्रणाम केला व तिचें सान्त्वन केलें. ८. जमदग्नि म्हणाला, हे देववंदिते, क्रोधावांचून मी रणांत दुष्ट शत्रूला केवळ शस्त्रास्त्रांनीं जिंकूं शकत नाहीं. ९. रागानेंही माझा त्याग केल्यानें मी तुझें रक्षण करण्यास असमर्थ आहें! मी काय करूं? हा राजा तुला दीन गाईस जबरदस्तीनें घेऊन जाईल. परंतु प्रथम अतिथीचा सत्कार करून नंतर त्याचा घात करणें मला योग्य वाटत नाहीं! इतक्यांत क्रुद्ध सहस्रार्जुन मंत्र्यांच्या सांगण्यावरून नंगी तलवार उगारून त्याच्या समोर उभा राहिला.

कामधेनुं मुनिं हत्वा नेष्यामीति मुनीश्वराः। दाम्ना बध्द्वा स्वहस्तेन कामधेनुं मुनीश्वर ॥१३
देहि शीघ्रं त्वमप्येनां यदि जीवितुमिच्छसि।

जमदग्निरुवाच –

स्वयं नय बलादेनां न दातुं तत्र वै क्षमः ॥ १४ ॥
करोमि किं नृपश्रेष्ठ यद्येषा गौर्न गच्छति।

स्कन्द उवाच –

इत्युक्तो मुनिना तेन संक्रुद्धो हैहयाधिपः। भर्त्सयामास तं विप्रं खङ्गमुत्पादयन्लघु ॥ १५ ॥
ततो रोषेण महता जमदग्निं मुनीश्वराः। तेनासिनाऽतितीक्ष्णेन कार्तवीर्यस्तं प्राहरत् ॥ १६ ॥
ततश्चुक्रोश सा देवी रेणुकाऽघविनाशिनी। अर्जुनेन हतं दृष्ट्वा पतिं च पतिवल्लभा ॥ १७ ॥
जमदग्नेः प्रिया भार्या तस्योपर्यपतच्छुभा। एकवीरा जगद्धात्री माऽर्जुनेति वचोऽब्रवीत् ॥१८॥
ततः पुनरसौ रोषादसिना मुनिसत्तमम्। तं जघान तया सार्धमुपस्थित्यैकवीरया ॥ १९ ॥
त्रिःसप्तवारं संक्रुद्धो जमदग्निमथार्जुनः। हत्वा तस्य मुनेः क्षिप्रमसिना कायमच्छिनत् ॥ २० ॥
ततस्ते सुरगंधर्वाः सिद्धाश्च परमर्षयः। रुरुदुस्तं हतं दृष्ट्वा क्रोशंतस्तेन भार्गवम् ॥ २१ ॥
सा त्रिःसप्तक्षतांगी च रेणुका पतिवत्सला। चुक्रोश सुबहूंश्छब्दान्स रामः शृणुयाद्यथा ॥२२॥
एकवीरा जगन्माता मुनिभिः परिवारिता। इदमाहार्जुनं देवी वचनं प्रहसन्निव ॥ २३ ॥

रेणुकोवाच –

ब्रह्मघ्नार्जुन पापिष्ठ किमिदं साहसं कृतम्। कामधेनुमिमामिच्छन् पापं निरयसाधनम् ॥२४॥
हत्वेमं ब्राह्मणं शांतं क्व गतिस्तव मूढ रे। को ह भुक्त्वा परान्नं हि हर्तुमिच्छति तद्धनम् ॥२५॥
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये जमदग्निवधो नाम चतुस्त्रिंशत्तमोऽध्यायः ॥३४

# अथ पंचत्रिंशत्तमोऽध्यायः।

## परशुरामप्रतिज्ञा।

स्कन्द उवाच –

तस्यास्तद्वाक्यमाकर्ण्य तूष्णींभूतो मुनीश्वराः। निरैद्रामभयाद्राजा समंतादवलोकयन् ॥ १ ॥
मुनींद्रे निहते तेन कामधेनुर्मुनीश्वराः। जगाम स्वर्गमेवासौ क्रंदमाना सुदुःखिता ॥ २ ॥
एकवीरा जगद्वंद्या साध्वी पतिपरायणा। यानुच्चैरकरोच्छब्दान् रामस्तानशृणोत्तदा ॥ ३ ॥
तातमातृस्वनान्श्रुत्वा प्रणम्येशं गणेश्वरम्। पृष्ट्वा तद्धनुरादाय मातुर्गृहमुपागमत् ॥ ४ ॥
स ददर्श ततो रामः पितरं निहतं भुवि। तां त्रिःसप्तक्षतांगीं च रेणुकां मातरं सुतः ॥ ५ ॥
तं मृतं पितरं दृष्ट्वा बाष्पव्याकुललोचनः। पप्रच्छ मातरं रामः कारणं स्व[1]पितुर्वधे ॥ ६ ॥

---

१ पितरं।

त्यावेळीं त्या क्रुद्ध राजाच्या मनांत मुनीला ठार मारून कामधेनूला घेऊन जाण्याचा पापी विचार चालू असल्याचें स्पष्ट दिसत होतें. तो राजा म्हणाला, मुनिश्रेष्ठा, जर तुला जिवंत राहण्याची इच्छा असेल, तर ह्या कामधेनूला दाव्यानें बांधून लवकर माझ्या स्वाधीन कर. जमदग्नि म्हणाला, हे राजा, तूं स्वतः आपल्या शक्तीच्या जोरावर हिला खुशाल घेऊन जा. मी स्वतः ही धेनु देऊं शकत नाहीं. हे नृपश्रेष्ठा, जर ही गाय तुझ्याजवळ जात नाहीं, तर मी काय करूं? स्कंद म्हणाला, मुनीच्या ह्या बोलण्यानें सहस्रार्जुन फार रागावला. त्यानें विप्राची निर्भत्सना केली व एका अति तीक्ष्ण तलवारीनें जमदग्नीच्या मस्तकावर आघात केला. १०–१६. अर्जुनानें आपल्या पतीचा वध केला हें पाहून पापघ्नी व पतिप्रिया रेणुका हिनें मोठा आक्रोश केला. १७. जमदग्नीची प्रियपत्नी एकवीरा आपल्या पतीच्या शरीरावर पडली व म्हणाली, हे अर्जुना, ह्यांना मारूं नकोस. १८. तरीपण त्यानें पुनः तलवारीनें एकवीरेसह त्या श्रेष्ठ मुनीवर सपासप वार केले. १९. अतिक्रुद्ध अर्जुनानें एकवीस वेळां प्रहार करून जमदग्नीच्या शरीराचे तुकडे तुकडे केले. २०. तेव्हां देव, गंधर्व, सिद्ध, महर्षि, तो वध पाहून रडूं लागले. २१. आघात झालेल्या त्या पतिव्रता रेणुकेनें भार्गवाला ऐकूं यावें म्हणून फार मोठ्यानें आक्रोश केला. २२. मुनींनीं तिला परावृत्त करण्याचा प्रयत्न केला, तरीसुद्धां जगन्माता एकवीरा देवी सहस्रार्जुनाला उद्देशून म्हणाली, हे ब्रह्मघाती, पापी अर्जुना, तूं हें केवढें क्रूर कर्म केलेंस! कामधेनूची इच्छा बाळगून तूं नरकाचें साधन असें पापच केलेंस. २३–२४. रे मूर्खा, ह्या शांत ब्राह्मणाला तूं ठार केलेंस. ऋषींचें अन्न खातोस आणि त्याचें धनसुद्धां हरण करतोस! अशानें तुला सद्गति कशी मिळणार? २५.

## अध्याय ३५ वा

## परशुरामाची प्रतिज्ञा

स्कंद म्हणाला, त्या देवीची ती वाणी ऐकून राजा निरुत्तर झाला व परशुरामाच्या भीतीनें निघून गेला. १. त्यानें मुनीला ठार मारल्यावर कामधेनु आक्रंदन करीतच स्वर्गाला निघून गेली. २. जगद्वंद्य साध्वी एकवीरेनें केलेला मोठा आक्रोश कैलास येथें परशुरामाच्या कानावर गेला. ३. आईचा तो आवाज ऐकून त्यानें शंकर व गणेशाला प्रणाम केला व त्यांचा निरोप घेऊन त्यानें आपलें धनुष्य घेतलें व तो घरीं आपल्या आईकडे आला. ४. तेथें त्याला जमिनीवर गतप्राण झालेला पिता व एकवीस प्रहार झालेली माता दिसली. ५. त्या मृत पित्याला पाहून परशुरामाच्या डोळ्यांत अश्रु आले, व त्यानें आईस पितृवधाचें कारण विचारलें. ६.

राम उवाच –

मातर्दैवजगद्वंद्ये केनेदं दुष्कृतं कृतम् । त्वयि स्थितायां तद् ब्रूहि मा शुचस्त्वं मयि स्थिते ॥७॥
अधुनैव हतः शत्रुर्मया परशुना शरैः । क्रव्यादैर्मेदलुब्धैश्च नूनं विपरिकृष्यते ॥ ८ ॥
ससैन्यस्य रणे गृध्राः श्येना गोमायुवायसाः । भक्षयिष्यंति मांसानि मातस्त्वं ब्रूहि तं रिपुम् ॥

स्कन्द उवाच –

ततः परशुरामस्य श्रुत्वा तद्वचनं शुभा । प्रहस्य रेणुका तस्य कथयामास तं रिपुम् ॥ १० ॥

देव्युवाच –

आगतोऽत्र नृपो राम कार्तवीर्य इति श्रुतः । तस्मै सम्यङ् मयाऽऽतिथ्यं कृतवत्याऽऽदरेण च ॥
कामधेनुः शुभा तेन भुक्त्वा चैवार्थिता बलात् । नीयमानाऽपि सा तेन न जगाम नृपालयम् ॥
कशादंडप्रहारैश्च सचिवैर्निहता शुभा । न सा जगाम तद्देशं यत्रासौ सहस्राऽर्जुनः ॥ १३ ॥
ततः प्रकुपितः शीघ्रमर्जुनो मुनिसत्तमम् । आकृष्य किल तां राजा जघान पितरं तव ॥ १४ ॥
नहि मे जीवितुं शक्यमनेन पतिना विना । मां त्रिःसप्तक्षतांगीं च पश्य राम धनुर्धर ॥ १५ ॥

राम उवाच –

त्रिःसप्तकृत्वः पृथिवीं देवि निःक्षत्रियामहम् । करिष्यामि न संदेहो मातस्त्वत्कृते कौतुकम् ॥१६
शतानि दश बाहूनामर्जुनस्य सुरेश्वरि । पश्यतां सर्वदेवानां छेदयिष्यामि सायकैः ॥ १७ ॥
शिरस्तालफलाकारमर्जुनस्य रणे शुभे । अधुनैव हनिष्यामि मातः परशुना लघु ॥ १८ ॥

एकवीरोवाच –

सत्यमुक्तं त्वया वत्स प्रतिज्ञातं च यद्गिरा । पितृभक्त्या च संस्कारं कृत्वा तत्सफलं कुरु ॥ १९ ॥
राम तिष्ठेति चाकाशे पृथिव्यां यत्र पुत्रक । श्रोष्यसि त्वं यदा वाचं तत्र संस्कर्तुमर्हसि ॥ २० ॥
पितरं चैकतः क्षिप्त्वा मां तुलायां तथैकतः । गृहीत्वा नय तत्राशु श्रोष्यसि त्वं सतां गिरम् ॥
यत्राचार्यो भवेद्वत्स सर्वशास्त्रविशारदः । तेनैव सहितो भक्त्या प्रतिष्ठान्तं कुरु द्वयोः ॥ २२ ॥
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये पंचत्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३५ ॥

# अथ षट्त्रिंशत्तमोऽध्यायः ।

## जमदग्निसंस्कारः ।

स्कन्द उवाच –

इत्युक्तो रामदेवस्तु तया मात्रा द्विजोत्तमाः । आरोपयत्तुलायां तां मातरं पितरं तथा ॥ १ ॥
तामादाय तुलां स्कंधे रामो धर्मभृतां वरः । संस्कर्तुं पितरं भक्त्या कान्यकुब्जाश्रमान्निरैत् ॥

---

१ तिष्ठति । २ कृतवाना०

राम म्हणाला, हे जगद्वंद्य माते, तुझ्या उपस्थितींत हें दुष्कृत्य कोणी केलें ते सांग. मी असल्यावर तूं शोक करूं नकोस. ७. तूं त्या शत्रूचें फक्त नांव सांग, आतांच मी त्यास ठार करतों. म्हणजे मांस खाणारे राक्षस त्याला ओढून नेतील, आणि गिधाडें, ससाणे, कोल्हे व कावळे त्याचें मांस खातील. ८–९.

स्कंद म्हणाला, परशुरामाचें तें बोलणें ऐकून रेणुकेनें त्यास त्या शत्रूची सर्व माहिती सांगितली. १०.

देवी म्हणाली, प्रसिद्ध कार्तवीर्य राजा येथें आला होता. आम्ही त्याचें आदरपूर्वक योग्य स्वागत केलें. ११. भोजनानंतर त्यानें कामधेनु मागितली व जबरदस्तीनें तिला नेण्याचा त्यानें प्रयत्न केला. पण ती त्याच्या घरीं जाईना. ११–१२. म्हणून त्याच्या सचिवांनीं तिच्यावर चाबूक, काठ्यानीं प्रहार केले! तरी पण ती सहस्रार्जुनाच्या घरीं गेली नाहीं. १३. तेव्हां क्रुद्ध राजानें तिला बाजूला ओढून मुनीला ठार केलें. १४. आतां मला पतीवांचून जीवन शक्य नाहीं. धनुर्धर रामा, माझ्या शरीरावरील या एकवीस जखमा पहा. १५. राम म्हणाला, हे देवी, मीं निश्चित ही पृथ्वी एकवीस वेळां निःक्षत्रिय करीन. हे सुरेश्वरी, सर्व देवांच्या देखत मीं अर्जुनाचे सहस्रबाहु बाणांनीं कापून टाकीन. १६–१७. हे माते, अर्जुनाचें ताडफळाएवढें शीर रणांत आतांच नष्ट करतों. १८.

एकवीरा म्हणाली, हे बाळ, तूं पितृप्रेमामुळें जें वाणीनें बोललास तें कृतींत आणून त्याचा सफल संस्कार कर. १९. हे राम, उभा रहा, अशी आकाशवाणी जेथें ऐकशील त्या भूमीवर प्रेतसंस्कार कर. २०. तराजूच्या एका पारड्यांत वडिलांना व दुसऱ्या पारड्यांत मला ठेवून तो तराजू घेऊन तूं चालूं लाग, म्हणजे ती सद्वाणी तुझ्या कानांवर येईल. २१. हे सर्व-शास्त्रसंपन्न वत्सा, जेथें आचार्य असतील, तेथेंच त्यांच्या सहकार्यानें दोघांचा प्रेमपूर्वक संस्कार कर. २२.

# अध्याय ३६ वा

## जमदग्नीचा अंत्यसंस्कार

स्कंद म्हणाला, द्विजश्रेष्ठहो, मातेच्या आज्ञेला अनुसरून परशुरामानें आपल्या माता-पित्यांना कावडींत ठेवलें. १. ती कावड खांद्यावर घेऊन तो श्रेष्ठ धनुर्धर पित्याच्या अंत्यसंस्कारा-साठीं कान्यकुब्जाश्रमाकडे निघाला. २.

जगाम विरजादीनि तीर्थान्यायतनानि च। पर्वतान्विविधाकारान्द्वीपांस्तोयनिधिस्थलान् ॥३
जगाम रामस्त्वरितः संस्कर्तुं पितरं क्षणात्। स क्षणादलकीग्रामे दत्तात्रेयाश्रमं शुभम् ॥ ४ ॥
मुनिभिः संवृतो रामः क्षिप्रमागमदच्युतः। सुरसिद्धमुनींद्रैस्तैः किन्नरोरगचारणैः ॥ ५ ॥
वृतः संस्तूयमानस्तु रामो मातरमीक्षयन्। ततः सह्याद्रिं संप्राप्य गुरुभक्तिपरायणः ॥ ६ ॥
सा खे परशुरामं तं वागुवाचाशरीरिणी। भो भो परशुराम त्वमत्रैव विधिवत्कुरु ॥ ७ ॥
दत्तात्रेयेण सहितः पितुः संस्कारमादरात्। रामः सह्याचले रम्ये श्रुत्वा तां वाचमंबरे ॥ ८ ॥
अवतीर्थं तुलां तत्र समंतादवालोकयत्। स ददर्श ततो रम्यमाश्रमं मुनिभिर्वृतम् ॥ ९ ॥
दत्तात्रेयस्य तं रामः कंदमूलफलान्वितम्। स तं दृष्ट्वाभिवाद्याथ पानपात्रधरं मुनिम् ॥ १० ॥
प्रमदैकं विवस्त्रं च प्रार्थयामास भार्गवः।

राम उवाच –

कृपां कुरुष्व मे स्वामिन्यदि त्वं भक्तवत्सलः। आगतोऽस्म्यत्र संस्कर्तुं पितरं ब्रूहि मे विधिम्

दत्तात्रेय उवाच –

न जानामि विधिं ब्रह्मन्धर्मं वाऽधर्ममेव वा। यथेष्टं धर्ममाश्रित्य स्थितोऽहमतिदुःखितः ॥१२॥

राम उवाच –

धर्माधर्मौ विजानासि त्वमेव मुनिसत्तम।
त्वमेव सर्वदेवानां योगिनां परमो गुरुः। योगीश्वरस्त्वमेवैकस्त्राता त्वमिति मे मतिः ॥ १३ ॥

दत्तात्रेय उवाच –

दिगंबरेयं प्रमदा तथाहं च दिगंबरः। न जानामि विधिं नूनं मदिरास्वादलालसः ॥ १४ ॥
अस्पृश्योऽहमसंभाष्यो दुर्वृत्तः कुरूपासनः। संस्कारं विधिवत्कर्तुं न जानामि द्विजोत्तम ॥१५॥

स्कन्द उवाच –

इत्युक्त्वा तूर्णमुत्थाय दत्तात्रेयो वरासनात्। प्रणम्य रेणुकां भक्त्या संतुष्टाव कृतांजलिः ॥१६॥

दत्तात्रेय उवाच –

देवि मातस्त्वमेवैका वंदनीया सुरेश्वरि। त्वं हि वाणीसुदुर्लक्ष्या योगिनां हृदयेषु च ॥१७॥
त्वं विश्वेस्मिन्नो लोके प्राणिनां भवसागरे। एकवीरा त्वमेवैका त्रैलोक्ये सचराचरे ॥ १८ ॥
एकैवानेकरूपेषु या स्थिताऽसि नमोऽस्तु ते। इति स्तुत्वैकवीरां तां जमदग्नेर्मृतस्य च ॥१९॥
पादौ प्रणम्य शिरसा राममाह ऋषिर्वचः।
त्वं कृत्वैवाधुना स्नानं सर्वतीर्थजलेषु च। मया तु शासितः स्वामिन्संस्कारं विधिवत्कुरु ॥२०॥
इति श्रीस्कन्दपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये जमदग्निसंस्कारो नाम षट्त्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३६ ॥

---

१ विश्वतिमां।

विरज इत्यादि तीर्थें, विविध पर्वत, द्वीपें व सरोवरें इत्यादि स्थानें घाईनें फिरून शेवटीं तो अलकी गांवांत पोंचला. रामाच्या बरोबर पुष्कळ मुनीसुद्धां होते. तेथें एक दत्तात्रेयाचा आश्रम होता. त्या ठिकाणीं सुर, सिद्ध व मुनींद्र यांनीं त्याची स्तुति केल्यावर रामानें त्यांना आपल्या मातेचें दर्शन घडविलें. तेथून तो गुरुभक्त सह्याद्रीवर पोंचला. ३–६.

इतक्यांत परशुरामाला उद्देशून आकाशवाणी झाली. 'परशुराम, येथेंच दत्तात्रेयाच्या सहकार्यानें आपल्या वडिलांचे विधियुक्त अंत्यसंस्कार कर.' रमणीय सह्याद्रीवर असतांना ती आकाशवाणी ऐकून त्यानें कावड खालीं ठेविली व चोहोंकडे पाहिलें. तेथें त्याला दत्तात्रेयाचा एक रम्य आश्रम दिसला. त्यांत पुष्कळ मुनी होते. सर्वत्र कंदमूळें व फळें भरपूर होतीं. तेथें त्याला हातांत पानपात्र असलेला एक मुनि व एक विवस्त्र प्रमदा दिसली. मुनीला अभिवादन करून भार्गवानें त्यास विनंती केली कीं, स्वामिन्, आपण भक्तवत्सल आहांत. माझ्यावर दया करा; माझ्या वडिलांच्या अंत्यविधीसाठीं मी येथें आलों आहें, मला त्याचा विधि सांगा. ७–११. दत्तात्रेय म्हणाले, हे ब्रह्मन्, या विषयांत मी पूर्ण अज्ञ आहें. मला धर्म–अधर्माचें ज्ञान नाहीं. यथेष्ट आचरण करून मी येथें मोठ्या कष्टानें राहिलों आहे.

राम म्हणाला, मुनिश्रेष्ठा, तुम्हांलाच धर्म व अधर्म माहीत आहे. तुम्हीच सर्व देवांचे व योग्यांचे महागुरु योगीश्वर आहांत. तुम्हीच माझे रक्षणकर्ते आहांत. १२–१३.

दत्तात्रेय म्हणाले, ही माझी प्रमदा दिगंबर आहे व मीही दिगंबर आहें. मला धर्मविधि बिलकुल माहीत नाहींत. मला फक्त मदिरेची लालसा आहे. १४. द्विजोत्तमा, मी अस्पृश्य, अवाच्य, दुराचारी व कुलकलंक असल्यानें मला विधियुक्त संस्कार माहीत नाहींत. १५.

स्कंद म्हणाला, एवढें बोलून दत्तात्रेयमुनि लगेच आसनावरून उठला. त्यानें रेणुकेला प्रणाम केला व हात जोडून तिची स्तुति केली ! देवी माते, तूंच वंदनीय आहेस. योगिजनांच्या हृदयांत वास करणारी तूं अचिंत्यरूप सरस्वती आहेस. भवसागरांतून सर्व प्राण्यांना तारणारी नौका आहेस. चराचर त्रैलोक्यांत एकटीच वीरदेवी आहेस. १६–१८. तूं एकच आहेस पण तुझी रूपें अनेक आहेत. देवी, तुला नमस्कार असो. याप्रमाणें एकवीरेची स्तुति करून व मृत जमदग्नीच्या चरणांना प्रणाम करून दत्तात्रेयऋषि रामाला म्हणाला, स्वामिन्, तूं आतांच सर्व तीर्थजलांत स्नान करून माझ्या आज्ञेवरून पित्याचा विधियुक्त संस्कार कर. १९–२०.

# अथ सप्तत्रिंशत्तमोऽध्यायः ।

## रेणुकावन्हिप्रवेशः ।

स्कन्द उवाच –

तेनोक्तो[1] मुनिना रामः सर्वधर्मभृतां वरः । विनम्य तद्धनुर्दिव्यं संदधे विपुलं शरम् ॥ १ ॥
रामस्तेन शरेणाथ भित्त्वा सह्याचलं क्षणात् । आनयत्सर्वतीर्थानि भुक्तिमुक्तिप्रदानि च ॥२॥
तत्र गोदावरी गंगा यमुना च सरस्वती । देवी भागीरथी गंगा तुंगभद्रा च नर्मदा ॥ ३ ॥
प्रयागं पुष्करं तत्र पुण्यं चैव गयात्रयम् । एतान्यन्यानि तीर्थानि रामस्तत्रानयद्द्रुतम् ॥ ४ ॥
स्वामितीर्थे ततः स्नात्वा रामः कृत्वा प्रदक्षिणम् । संस्कारं च पितुश्चक्रे समिद्धे जातवेदसि ॥ ५ ॥
रेणुका सा जगन्माता सर्वाभरणभूषिता । दत्तात्रेयमथाहूय रामं वचनमब्रवीत् ॥ ६ ॥

एकवीरोवाच –

स्वस्थानं गंतुमिच्छामि सह भर्त्रा सुरेश्वर । गुरुदेवद्विजान्याहि प्रतिज्ञां सफलां कुरु ॥ ७ ॥

स्कन्द उवाच –

इत्युक्तः स तया मात्रा रामः शस्त्रभृतां वरः । स्नेहगद्गदया वाचा रेणुकामिदमब्रवीत् ॥ ८ ॥

राम उवाच –

नहि शक्ष्याम्यहं मातस्त्वद्दते वस्तुमुत्तमे । अस्मिन्सह्याचले रम्ये शोभितेऽपि सुरर्षिभिः ॥

रेणुकोउवाच –

सर्वतीर्थैः सुरैः सर्वैर्मुनींद्रैः सिद्धकिन्नरैः । सहिताऽत्रैव विश्रामं करिष्यामि न संशयः ॥ १० ॥
एवमुक्त्वा जगन्माता रेणुका सा पतिव्रता । पश्यतां मुनिदेवानां प्रविवेश हुताशनम् ॥११॥
पुष्पवर्षोऽभवत्तत्र रेणुकायास्तदोपरि । सहसा शंखभेरीणामंबरे निनदो महान् ॥ १२ ॥
सुगंधचंदनैर्दिव्यैः सिषिंचुश्चाप्सरोगणाः । तुष्टुवुर्मुनयो देवाः प्रसन्नमनसोंऽबरे ॥ १३ ॥
गंधर्वास्ते जगुर्हृष्टास्तस्याश्चरितमद्भुतम् । मृदंगशंखवीणास्तु वादयंतः कलस्वनाः ॥ १४ ॥
रामः कृत्वाऽपि संस्कारान् पितृमात्रोर्मुनीश्वराः । दत्तात्रेयेण सहितस्त्वाह्वानमकरोत्तयोः ॥
साऽचिरेणैव कालेन स्वयं तत्रैव रेणुका । उदतिष्ठत्सुरैः सार्धं जमदग्निर्मुनीश्वराः ॥ १६ ॥
रामो गणेश्वरो भूत्वा गृहीत्वा परशुं करे । रूपेणैकेन सोऽतिष्ठद्रेणुकायाः समीपतः ॥ १७ ॥
सह्याचलस्थितां देवीं रामः प्रत्यक्षरूपिणीम् । कार्तवीर्यवधार्थं मे ह्यनुज्ञां बांधवान्वितः ॥
मात्राऽऽदिष्टोऽथ पित्रापि रामः शस्त्रभृतां वरः । दृष्ट्वा तानभिवाद्याशु देवर्षीनभिवादयन् ॥
सुरर्षिदेवयक्षास्ते रामादिष्टास्ततो मुदा । तस्थुर्लिंगमये दिव्ये रेणुकापुण्यविग्रहे ॥ २० ॥
तस्थौ मेरुर्महाशैलो हिमवान्मलयस्तथा । श्रीशैलपर्वताः सर्वे तस्थू रेणुकलेवरे ॥ २१ ॥
तस्मिन्सर्वाणि तीर्थानि मातुर्देहेऽद्भुतानि च । रेणुकायास्तदा स्थित्वा ह्युपासांचक्रिरे मुदा ॥
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये सप्तत्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३७ ॥

---

१ तनैव ।

# अध्याय ३७ वा

## रेणुकेचा अग्निप्रवेश

स्कंद म्हणाला, याप्रमाणें तो मुनि बोलल्यावर सर्वश्रेष्ठ धनुर्धारी रामानें धनुष्य सज्ज करून त्याला दिव्य बाण जोडला. १. त्या बाणानें एका क्षणांत सह्याद्रि भेदून ऐश्वर्य व मुक्ति देणारीं सर्व तीर्थें उत्पन्न केलीं. २. त्यांत गोदावरी, गंगा, यमुना, सरस्वती, तुंगभद्रा, नर्मदा, पुष्कर व गया हीं तीर्थें प्रमुख होतीं. ३–४. नंतर रामानें प्रमुख तीर्थांत स्नान केलें व प्रदीप्त अग्नीस प्रदक्षिणा करून त्यांत पित्याचा अन्त्यसंस्कार केला. ५. त्यावेळीं जगन्माता रेणुका स्वतः अलंकृत झाली व दत्तात्रेयाला बोलावून परशुरामाला म्हणाली, मला पतीसह गमन करण्याची इच्छा आहे. तूं आतां देव, द्विज व गुरु यांच्याकडे जा व आपली प्रतिज्ञा पूर्ण कर. ६–७.

स्कंद म्हणाला, मातेचें हें बोलणें ऐकून श्रेष्ठ शस्त्रधारी राम गहिंवरून रेणुकेला म्हणाला, आई, ह्या रमणीय सह्याद्रीवर तुझ्यावांचून देवर्षींच्या सहवासांत सुद्धां मी राहूं शकणार नाहीं. ९.

रेणुका म्हणाली, हे राम, सर्व तीर्थें, देव, मुनि, सिद्ध व किन्नर यांसह मीसुद्धां येथेंच राहणार आहें. १०. असें बोलून जगन्माता व पतिव्रता रेणुकेनें सर्व मुनिदेवांसमक्ष अग्निप्रवेश केला. ११. त्यावेळीं रेणुकेवर पुष्पवृष्टि झाली, व आकाशांत शंख, भेरी वाजूं लागल्या. १२. अप्सरांनीं सुवासिक चन्दनाचें सिंचन केलें. मुनींनी व देवांनीं प्रसन्न मनानें रेणुकेची स्तुति केली. १३. आनंदित गंधर्वांनीं तिचें अद्‌भुत चरित्र वर्णन केलें, मृदंग, वीणा व शंख वाजविले. १४. मातापित्यांचा अन्त्यसंस्कार झाल्यावर दत्तात्रेयासह रामानें आपल्या आई-वडिलांना हांक मारली ! १५. लगेच रेणुका व सर्व देवांसह जमदग्नि उपस्थित झाला. १६.

त्यावेळी राम गणेशरूप बनला व हातांत परशु घेऊन त्यांच्याजवळ उभा राहिला. त्यानें बांधवांसहित कार्तवीर्याचा वध करण्यासाठीं प्रत्यक्ष सह्याद्रिवासिनी देवीजवळ अनुज्ञा मागितली. १७–१८. मातापित्यांनींसुद्धां त्याला त्या वधाची आज्ञा दिली. रामानें त्यांना व देवर्षींनां वंदन केलें. १९. रामाच्या आज्ञेनें देव, देवर्षि, यक्ष आनंदानें रेणुकेच्या पवित्र व दिव्य लिंगरूप शरीरांत राहिले. २०. महाशैल मेरु, हिमालय, मलय, श्रीशैल हेसुद्धां रेणुकेच्या शरीरांत राहिले! सर्व तीर्थेंसुद्धां रामजननी रेणुकेच्या देहांत राहून तिची आनंदानें उपासना करू लागलीं. २१–२२.

# अथ अष्टत्रिंशत्तमोऽध्यायः ।

## युद्धाय परशुरामप्रस्थानम् ।

स्कन्द उवाच –

एवं परशुरामोऽथ तयोः कृत्वा विधानतः । आवाहनं च संस्कारं प्रणाममकरोन्मुदा ॥ १ ॥
पूजां कृत्वा तयोर्भक्त्या ब्राह्मणैः स्वस्ति वाच्य च । भोजयित्वा ऋषीन्देवान्दत्तात्रेयमपूजयत् ॥
ब्राह्मणेभ्योऽथ रत्नानि वासांसि रुचिराणि च । गजानश्वान् रथान्देशान्प्रादात्तेभ्योऽथ भार्गवः ॥
कोशरत्नानि सर्वाणि शुभान्याभरणानि च । ब्राह्मणेभ्यो धनं रामः सर्वं प्रादान्महायशाः ॥
गोमहिष्यादिकं सर्वं ब्राह्मणेभ्यो मुनीश्वराः । मातापित्रोस्तदा भक्त्या रामः प्रादात्सुरेश्वरः ॥
[१]पूजयित्वा द्विजान्भक्त्या ब्रह्मेंद्रप्रमुखान्सुरान् । तर्पयित्वा पितॄन्रामो रेणुकामिदमब्रवीत् ॥६॥

राम उवाच –

देवि स्वामिनि गच्छामि पुरीं माहिष्मतीमहम् । हंतुं तमधुना दुष्टमर्जुनं सगणं रणे ॥ ७ ॥
अनुज्ञातस्त्वया मातः पापात्मपितृघातकम् । पश्यतां मुनिदेवानां हनिष्याम्यर्जुनं रणे ॥ ८ ॥

देव्युवाच –

त्वं ज्ञातोऽसि मया नूनं ज्ञानगम्यः परात्परः । स्वयं त्वमुच्यसे रामो गुरुभक्तिपरायणः ॥ ९ ॥
हत्वा तमर्जुनं संख्ये तूर्णमागंतुमर्हसि । कार्यमारभ्य भो राम त्वया किंचिद्भविष्यति ॥ १० ॥
धन्योऽसि कृतकृत्योऽसि येन मातृगृहे शुभे । न पुमांस्त्वत्समः सत्यं यत्कृत्यं तत्कुरु द्रुतं ॥११॥

स्कन्द उवाच –

तयैकवीरया रामस्त्वनुज्ञातः प्रणम्य तां । धनुः परशुमादाय चो[२]त्पपातांबरं जवात् ॥ १२ ॥
ततो मातृगृहाद्रामः सक्रुद्धः परवीरहा । निरैद् माहिष्मतीं हंतुं सहस्रार्जुनमाहवे ॥ १३ ॥

स्कन्द उवाच –

स ददर्श ततो रामः पथि नारदमंबरात् । अवनीतलमायन्तमुद्यंतमिव भास्करम् ॥ १४ ॥
तं परिष्वज्य बाहुभ्यां नारदो भगवानृषिः । अभिवंद्य प्रणम्याशु रामं वचनमब्रवीत् ॥ १५ ॥

नारद उवाच –

राम राम शृणुष्वेदं यद्ब्रवीमि शुभेक्षण । तच्छ्रुत्वैवाधुना किंचित्कर्तुमर्हसि सुव्रत ॥ १६ ॥
गंगां तु नर्मदां पुण्यां सुरसिद्धर्षिसेविताम् । कुणपैर्दूषितां राम कुरुष्व निरुपद्रवाम् ॥ १७ ॥
अर्जुनेन यदा शंभुस्तपसाऽऽराधितः पुरा । प्रार्थितश्च तदा तेन प्रेतानि गिरिजापतिः ॥१८॥
तत्प्रेतान्यर्जुनेनैव विकृतान्यशुभानि च । तान्यभिद्रुत्य भूतानि पाति[३]तानि बिभीषया ॥१९॥
भेदयित्वा तु वक्षांसि ह्यसृङ्मेदोवसादिकम् । भक्षयंति सुरश्रेष्ठ मांसमेतद्यथासुखम् ॥ २० ॥

राम उवाच –

क्व निवासोस्ति भूतानां यैरियं दूषिता नदी । यदि जानासि देवर्षे तानि तूर्णं प्रदर्शय ॥२१॥

---

१ एवं पूज्य । २ सोत्पपात० । ३ पातयंती ।

# अध्याय ३८ वा

## परशुरामाचें युद्धासाठीं प्रस्थान

स्कंद म्हणाला, याप्रमाणें परशुरामानें मातापित्यांचा विधिवत् अन्त्यसंस्कार करून त्यांना आनंदानें प्रणाम केला. १. भक्तिपूर्वक त्यांची पूजा, ब्राह्मणभोजन वगैरे झाल्यावर त्यानें ऋषि, देव व दत्तात्रेय यांची पूजा केली. २. भार्गवानें ब्राह्मणांना रत्नें, सुंदर वस्त्रें, हत्ती, घोडे, रथ व देश दान केले. ३. खजिन्यांतील श्रेष्ठ रत्नें, सुंदर अलंकार, गाई–म्हैशी इत्यादि सर्व धन त्या ब्राह्मणांना त्या कीर्तिमान रामानें देऊन टाकलें. श्रेष्ठ मुनींनो, सुरेश्वर रामानें हे गोमहिषी इत्यादि सर्व दान केवळ आपल्या आईवडिलांवरील प्रेमामुळें केलें. ५. याप्रमाणें भक्तिपूर्वक ब्राह्मणपूजा व ब्रह्मेन्द्रादि देवांचें तर्पण करून राम रेणुकेला उद्देशून म्हणाला, हे देवी, मी आतां परिवारासह अर्जुनाचा वध करण्यासाठी माहिष्मती नगरीला जात आहें. ६–७. हे माते, तुझ्या अनुज्ञेनें पितृघाती व पापी अर्जुनाला मुनि–देवांच्या समक्ष मी ठार करणार आहें. ८.

देवी म्हणाली, तुला माझी परवानगी आहे. परात्पर असा तूं केवळ ज्ञानगम्य आहेस. लोक तुला गुरुभक्त समजतात. युद्धांत त्या अर्जुनाचा वध करण्यास तूंच समर्थ आहेस. लवकर कार्यास लाग. तुझ्या हातून थोडेफार कार्य होणार आहे. ९-१०. तूं धन्य व कृतकृत्य आहेस. कारण तुझ्या सुंदर वंशांत तुझ्यासारखा पुरुष नाहीं. म्हणून तुला जें करावयाचें असेल तें लवकर कर. ११.

स्कंद म्हणाला, याप्रमाणें एकवीरेची आज्ञा होतांच रामानें रेणुकेस प्रणाम केला आणि धनुष्य व परशु घेऊन त्यानें एकदम आकाशांत उड्डाण केलें. १२. तो क्रुद्ध राम मातृगृहांतून सरळ माहिष्मती नगराकडे अर्जुनाचा वध करण्यासाठीं निघाला. १३.

स्कंद म्हणाला, वाटेंत त्या रामाला आकाशमार्गानें भूतलावर येणारा नारद उगवत्या सूर्यासारखा दिसला. १४. भगवान् नारदानें त्यास नमस्कारपूर्वक आलिंगन दिलें व म्हणाला, हे सुनेत्र राम, माझें वचन लक्षपूर्वक ऐक व नंतर जें कांहीं करावयाचें असेल तें कर. १५–१६. सिद्ध व ऋषि यांनी ज्यांचा आश्रय केला, त्या पवित्र गंगा–नर्मदा नद्यांना प्रेतांनीं दूषित केलें आहे. यांसाठीं त्यांचा उपद्रव दूर करून त्या शुद्ध कर. १७. पूर्वी अर्जुनानें तपश्चर्या करून शंभूची आराधना केली होती. तेव्हां अर्जुनाला भिवविण्यासाठीं गिरिजापतीनें विकृत व अशुभ भूत-प्रेतांचा वर्षाव केला होता. तीं भूतप्रेतें प्राण्यांचें वक्षस्थल भेदून रक्त, मेद, मांस व वसा यथेच्छ खात होतीं. १८–२०.

राम म्हणाला, नदी दूषित करणाऱ्या या भूतांचा निवास कोठें आहे? देवर्षे, तुला माहीत असल्यास मला लवकर सांग. २१.

स्कन्द उवाच –

इत्युक्तो नारदस्तेन रामेण भगवानृषिः । तं देशमगमद्यत्र कुणपानि वसंति वै ॥ २२ ॥
शोभमानौ[1] ततः क्षिप्रमुभौ तौ रामनारदौ । ददृशतुर्दिशः सर्वाः समीरेणातिसंवृताः ॥ २३ ॥
जग्मतुर्विस्मयं दृष्ट्वा तौ तस्मिन्गिरिगव्हरे । तत्पयोधिवनं घोरमद्भुतं रोमहर्षणम् ॥ २४ ॥
क्रूरपक्षिभिराकीर्णं क्रव्यादैर्वनचारिभिः । मांसलुब्धनिनादैश्च व्याघ्रसर्पवृकादिभिः ॥ २५ ॥
सघोषं भैरवं भाति प्रतिशब्दकृतं यथा । शिलाशिखरबद्धैश्च बिलैः प्रेतावलंबितैः ॥ २६ ॥
यथाकालसुखं घोरं निर्जनं तद्वनं महत् । प्रविश्य नारदं रामः प्रहस्येदमुवाच तम् ॥ २७ ॥

राम उवाच –

पश्य नारद देवर्षे मद्बाहुबलमीदृशम् । येनाहं नाशयिष्यामि प्रेतानि गिरिकंदरे ॥ २८ ॥
एवं संभाषमाणं तं न्यग्रोधादशुभानि च । बलाद्भीषयितुं राममाजग्मुरवतीर्य च ॥ २९ ॥
बिभीषिकाभिरुग्राभिरभिद्रुत्याथ बाहुभिः । यावद्रामो गृहीतस्तैस्तावत्परशुमाददे ॥ ३० ॥
स तान्प्रक्षिप्य सहसा कुठारेण बलीयसा । चकार विलयं कोपात्सुपर्णः पन्नगानिव ॥ ३१ ॥
तानि शतसहस्राणि प्रेतानि मुनिसत्तमाः । हतान्येकेन रामेण पश्यतो नारदस्य च ॥ ३२ ॥
विकृतानि च घोराणि पतितानि महीतले । ससृजुर्विकृतान्नादान् राम पाहीति चाब्रुवन् ॥३३
तिष्ठ तिष्ठेति संप्रोचुः कानिचिद्विकृतानि वै । तथान्यान्यपि तान्येवं राम रामेति चुक्रुशुः ॥३४
अंबरात्पुष्पवर्षोऽभूद्रामदेवस्य मूर्धनि । सुरदुंदुभयो नेदुर्मृदंगपणवादयः ॥ ३५ ॥
स्तुवंति रामं स्तुतिभिः सुरसिद्धर्षिकिन्नराः ।

स्कन्द उवाच –

ततो विस्मयमापन्नस्तं दृष्ट्वा रामविक्रमम् । नारदो राममाश्लिष्य प्रणम्याह तदग्रतः ॥ ३६ ॥

नारद उवाच –

राम देव निबोध त्वं यद्ब्रवीमि सुरेश्वर । न हि तं खलु पश्यामि त्वत्प्रतीमबलोऽभवत् ॥३७॥
ज्ञातोऽसि स मया नूनं हरिस्त्रिभुवनेश्वरः । राक्षसानसुरान्हत्वा येनेयमवनी धृता ॥ ३८ ॥
मत्स्यकूर्मादिभिर्येन रूपैस्त्रैलोक्यमुध्दृतम् । रामदेवस्त्वया वीर लीलया च विधार्यते ॥ ३९॥

स्कन्द उवाच –

एवमभ्यर्च्य तं रामं परिष्वज्य मुहुर्मुहुः । रामेण सहितः प्राप्तो नारदोऽथाऽऽशु नर्मदाम् ॥४०
गंगां प्रणम्य तौ भक्त्या तटमासाद्य संस्थितौ । ददृशतुरुभौ रम्यं तापसाश्रममुत्तमम् ॥ ४१ ॥
मार्कंडेयमृषिं दृष्ट्वा तत्र तौ रामनारदौ । हृष्टौ बभूवतुः प्रेम्णा तं प्रणम्याभितस्थतुः ॥ ४२ ॥
धन्योऽहमिति तत्त्वज्ञः प्रणम्याभ्यर्च्य भक्तितः । रामं प्रदक्षिणं कृत्वा मार्कंडेयोऽब्रवीदिदम् ॥४३

मार्कंडेय उवाच –

स्वागतं ते मुनिश्रेष्ठ त्रातोऽहं राम दर्शनात् । यस्त्वं ममाश्रमं प्रेम्णा नारदेन समागतः ॥४४
स्मरंतस्त्वां हृषीकेश वयं सर्वे त्वहर्निशम् । रम्ये गंगातटे पुण्ये संस्थिताःस्म पृथक् पृथक् ॥४५

---

१ गम्यमानौ ।

स्कंद म्हणाला, याप्रमाणें रामानें विचारल्यावर तो नारद ऋषि प्रेतांच्या निवासस्थानाकडे निघाला. २२. अतिशय वेगानें तेथें जात असतां त्या उभयतांना सर्व दिशा वाऱ्यानें भरून गेल्यासारख्या वाटल्या. २३. त्या गिरिकंदरांत तें समुद्रकांठचें घोर, अद्भुत व रोमांचकारक वन पाहून त्यांना विस्मय वाटला. २४. कारण त्या वनांत क्रूर पक्षी, रक्तमांसभक्षक वनचर प्राणी, मांसाला चटावलेले वाघ, लांडगे व सर्प यांचे आवाज ऐकूं येत होते. २५. प्रेतांचें आश्रयस्थान असलेल्या पर्वतावरील गुहांमध्यें त्या आवाजांचा प्रतिध्वनि उमटल्यावर तर तें वन विशेषच भीषण वाटत होतें. २६. अशा त्या ओसाड व भयानक वनांत प्रवेश केल्यावर राम नारदाला हंसून म्हणाला, देवर्षे नारदा, माझा पराक्रम पहा. मी गिरिकंदरांत असलेलीं सर्व प्रेतें नष्ट करतों! २७–२८. याप्रमाणें राम बोलत आहे, तोंच त्याला भिवविण्यासाठीं तीं अशुभ प्रेतें वडावरून खालीं उतरून त्याच्याजवळ आलीं! २९. त्या भयानक उग्र प्रेतांनीं त्या रामावर एकाएकीं हल्ला करून त्याला धरलें! लगेच रामानें त्यांच्यावर जोरानें परशु फेंकला. क्रुद्ध गरुडानें सर्पनाश करावा, त्याप्रमाणें त्या प्रबल परशूच्या योगानें नारदाच्या समक्ष रामानें एक लक्ष प्रेतांचा संहार केला. ३०–३२. जमिनीवर पडलेलीं तीं विकृत व भयंकर प्रेतें विचित्र आवाज करूं लागलीं! कांहीं विक्राळ प्रेतें 'थांब., थांब' असें, तर कांहीं प्रेतें 'आमचें रक्षण कर' असें ओरडूं लागलीं. ३३-३४. यावेळीं आकाशांतून रामदेवावर पुष्पवर्षाव होऊं लागला. देव दुंदुभी, मृदंग व पडघम वाजूं लागले. ३५. देव, सिद्ध, ऋषि व किन्नर रामाची स्तुति करूं लागले! स्कंद म्हणाला, हा रामविक्रम पाहून विस्मित झालेला नारद रामाला आलिंगून व नमस्कार करून म्हणाला, हे सुरेश्वर रामा, माझें म्हणणें ऐक. खरोखर तुझ्यासारखा बलवान् पुरुष पूर्वी झाला नाहीं; म्हणून मला तूं त्रिभुवनेश्वर विष्णुच वाटतोस. ३६–३७. कारण विष्णूंनेंही राक्षस व असुर यांचा वध करून आणि मत्स्य–कूर्म इत्यादि अनेक रूपें धारण करून पृथ्वीचें रक्षण केलें आहे. पण रामदेवा, तूं हें सर्व रक्षण–कार्य सहज करीत आहेस. ३८–३९.

स्कंद म्हणाला, याप्रमाणें रामाला वारंवार आलिंगन देऊन व अभिनंदन करून झाल्यावर नारद रामासह नर्मदातटीं आला. ४०. त्या पवित्र गंगेला प्रणाम करून ते दोघे तेथें उभे राहिले तोंच त्यांना तेथें तपस्व्याचा एक रमणीय व श्रेष्ठ आश्रम दिसला. ४१. त्या आश्रमांत मार्कंडेय ऋषीला पाहून त्या उभयतांना फारच आनंद झाला. त्याला भक्तिपूर्वक प्रणाम करून त्यांनी त्याची स्तुति केली. ४२. तेव्हां तत्त्वज्ञानी मार्कंडेयानें रामाचा प्रणामपूर्वक सत्कार करून त्याला प्रदक्षिणा केली व तो भक्तिपूर्वक रामाला म्हणाला, मी धन्य झालों. हे मुनिश्रेष्ठ रामा, तुझें स्वागत असो. तुझ्या दर्शनानें माझें रक्षण झालें. कारण हे रामा, तूं नारदासह प्रेमानें माझ्या आश्रमांत आला आहेस. ४३–४४. हृषीकेशा, आम्ही सर्व या पवित्र व रमणीय अशा गंगाकिनारीं रात्रंदिवस तुझेंच स्मरण करीत निरनिराळे आश्रम करून राहिलों आहोंत. ४५.

राम उवाच –

किं मोहयसि मामत्र प्रभो सन्मुनिसत्तमाः । नारदं स्तुहि देवर्षिं ब्रह्माणमथवा हरिम् ॥४६॥

नारद उवाच –

त्वां यजंति महात्मानस्त्वां ध्यायंति च योगिनः । त्वदृते नापरं किंचिद्रामदेव नमोऽस्तु ते ॥४७

मार्कंडेय उवाच –

ममाश्रमपदं नाथ सत्यकाम वचः शृणु । अभिभूय बलाद्ब्रह्मन्नर्जुनेन बलीयसा ॥ ४८ ॥
त्रैलोक्यमखिलं देवदैत्यदानवराक्षसैः । अभिभूतं च बलिभिस्त्वयि नाथे स्थिते प्रभो ॥ ४९॥
तदेको नवदुर्गेऽस्मिन् राक्षसो विकृतेक्षणः । क्रव्यादः किल्बिषः क्रूरो मांसपुष्टोऽतिभीषणः ॥५०
भक्षयन्मुनिमांसानि शूलपाणिर्निशाचरः । निरुध्यैनं बलान्मार्गं सदा तिष्ठति खेचरः ॥ ५१ ॥
तदद्यैव मम प्रीत्या नारदेन सहाधुना । अंतरिक्षचरं घोरं राक्षसं हंतुमर्हसि ॥ ५२ ॥
इत्युक्तः स तु रामोऽथ मार्कंडेयेन धीमता । उत्पत्य गगनं तूर्णमाव्हयामास राक्षसम् ॥ ५३
तच्छब्दश्रवणात्तूर्णमाजगाम निशाचरः । भ्रामयन् शूलमत्युग्रं यत्र राम सुरेश्वरः ॥ ५४ ॥
तं दृष्ट्वाऽचलसंकाशं राक्षसं विकृतेक्षणम् । क्षिप्रं परशुरामोऽथ संदधे विपुलं शरम् ॥ ५५ ॥
तं विव्याध ततः क्रूरो राक्षसं रेणुकात्मजः । लीलयैवोरसि क्षिप्रं शरेणैकेन भो द्विजाः ॥५६॥
स विद्धस्तेन बाणेन रामेणोरसि राक्षसः । भ्रममाणोऽचिरं क्षिप्रं नीतो माहिष्मतीं पुरीम् ॥५७॥
हृत्प्रदेशस्थितेनासौ रामबाणेन राक्षसः । तं ददर्शार्जुनो व्योम्नि भ्रममाणं यथाऽचलम् ॥५८॥
स विस्मितमनाः क्रूरं राक्षसं हैहयाधिपः । दृष्ट्वा किमेतदाश्चर्यमुवाच सचिवान्प्रति ॥ ५९ ॥
राजा तैरेवमप्युक्तो न विद्मः किं न्विदंत्विति । स तु रामेषुणा तूर्णं भ्राम्यमाणो निशाचरः ॥६०॥
निपपात पुरद्वारे वज्राहत इवाचलः । पतता तेन विप्रेंद्राः पुरी माहिष्मती तदा ॥ ६१ ॥
चचाल सा च भूः सर्वा भग्नप्रासादमंदिरा । तदत्यद्भुतमत्युग्रमनिष्ठमिदमेव सः ॥ ६२ ॥
कार्तवीर्यस्ततो मत्वा ध्यानमेवागमच्चिरम् ।
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये अष्टत्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३८ ॥

## अथ एकोनचत्वारिंशत्तमोऽध्यायः ।

### रामार्जुनयोर्युद्धम् ।

स्कन्द उवाच –

दृष्ट्वा परशुरामस्य तत्कौतुकं महाद्भुतम् । सुरगंधर्वऋषयस्तुष्टुवुः पुष्पवृष्टिभिः ॥ १ ॥
नारदोऽपि मुदा रामं परिष्वज्य सुहृत्तया । प्रणम्य चाग्रतः स्थित्वा प्रोवाचेदं कृतांजलिः ॥२॥

नारद उवाच –

इतः स्थानांतरं राम गंतव्यमविलंबितम् । क्षिप्रमेष्यामि तां दृष्ट्वा हैहयाधिपतेः पुरीम् ॥ ३ ॥
इत्युक्त्वा नारदो रामं प्रणम्य स निरैत्पुरीम् । स रामो नर्मदायां च चक्रे स्नानादिकाः क्रियाः ॥४

राम म्हणाला, हे मुनिश्रेष्ठ प्रभो, तुम्ही मला कां बरें मोहांत टाकीत आहांत? तुम्ही या देवर्षि नारदाची, ब्रह्मदेवाची किंवा श्रीहरीची स्तुति करा. ४६. नारद म्हणाला, रामदेवा, हे महात्मे तुझी स्तुति करितात, व योगी लोक तुझें ध्यान करतात; म्हणून तुझ्यावांचून दुसरें कांहींच श्रेष्ठ नाहीं! तुला माझा नमस्कार असो. ७४.

मार्कंडेय म्हणाला, हे नाथ, माझी एक इच्छा ऐकून घे. प्रबळ अर्जुनानें मोठा हल्ला करून माझा हा आश्रम उध्वस्त केला. ४८. हे प्रभो, तुझ्यासारखा आमचा स्वामी असतांना बलवान् अशा देव, दैत्य-दानव व राक्षस यांनीं सर्व त्रैलोक्य ग्रासलें आहे! ४९. या नवदुर्गांत भयंकर नेत्रांचा, रक्तमांसभक्षक व क्रूर असा एक पापी राक्षस रहात असतो. भयानक असा तो राक्षस मुनिमांस खाऊन पुष्ट बनला आहे. हातांत त्रिशूळ घेऊन तो नेहमीं मार्गांत आम्हांला त्रास देत असतो. ५०-५१. म्हणून आजच व आतांच नारदासह तूं माझ्यासाठीं त्या राक्षसाचा वध कर. ५२. असें धीमान् मार्कंडेय बोलतांच रामानें गगनांत उड्डाण करून त्या राक्षसास युद्धाचें आव्हान दिलें. ५३. तो आव्हानाचा शब्द ऐकून तो निशाचरसुद्धां लगेच आपला भयानक त्रिशूळ गरगरा फिरवीत सुरेश्वर रामाजवळ येऊन उभा राहिला. ५४. भयंकर नेत्रांच्या त्या पर्वतप्राय राक्षसास पाहून परशुरामानें त्यावर तीक्ष्ण शर सोडला. ५५.

अहो, द्विजहो, त्या क्रुद्ध रेणुकात्मजानें सहज सोडलेला तो बाण त्या राक्षसाच्या छातींत घुसला! ५६. तशाच स्थितींत त्या राक्षसाला रामानें आकाशांत गरगर फिरवीत माहिष्मती नगरावर नेलें. ५७. छातींत रामबाण असतां आकाशांत गिरक्या खात असलेला तो पर्वताएवढा राक्षस सहस्रर्जुनाला दिसला! ५८. तेव्हां विस्मित होऊन त्या हैहयाधिप अर्जुनानें आपल्या सचिवांना विचारलें, अहो, आकाशांत हें कोणतें आश्चर्य आहे! तेव्हां ते राजाला उत्तरले, 'आम्हांला माहीत नाहीं.' ५९-६०. इतक्यांत वज्रानें विदीर्ण झालेल्या पर्वतासारखा तो राक्षस रामबाणासह नगराच्या वेशीवर पडला. त्या आघातामुळें माहिष्मती नगरांतील वाडे व मंदिरें मोडलीं व सर्व पृथ्वी हादरली! ही अति अद्‌भुत व उग्र घटना अनिष्टसूचक आहे, असें वाटून तो कार्तवीर्य बराच वेळ विचारांत पडला. ६१-६२.

## अध्याय ३९ वा

## परशुराम व सहस्रार्जुन यांचें युद्ध

स्कंद म्हणाला, परशुरामाचा तो पराक्रम पाहून देव, गंधर्व व ऋषींनी त्याची स्तुति केली. त्याच्यावर पुष्पवर्षाव होऊं लागले. १. नारदानेंही त्याला मोठ्या प्रेमानें मिठी मारली. रामाला प्रणाम करून व त्याच्यासमोर हात जोडून तो म्हणाला, आपण येथून लवकर अन्यत्र निघून जावें. मीसुद्धां हैहयाधिपाची नगरी पाहून लवकर येईन. २-३. असें बोलून त्यानें रामाला प्रणाम केला व तो माहिष्मती नगरीकडे निघाला. रामही नर्मदा नदींत स्नानादि विधि करीत राहिला. ४.

ततोऽनिष्टं महद् दृष्ट्वा क्षिप्रं माहिष्मतीश्वरः । समाहूय नृपान्सर्वान्प्रोवाचेदं त्वरान्वितः ॥५॥

अर्जुन उवाच –

उत्तुंगशैलसंकाशैर्गजैरश्वैर्नरैर्नृपाः । रथैः समन्विताः शूरैस्तूर्णमागम्यतामिह ॥ ६ ॥

दृढबंधकपाटानि महापरिघवंति च । द्वारेषु क्षिप्यतां तूर्णं प्राकारेष्ववरुध्यताम् ॥ ७ ॥

के वयं के परे दुष्टास्त्विति पश्यंत्वहर्निशम् । पुरस्यांतर्बहिर्देशे चारास्त्रिभुवनेऽपि ये ॥ ८ ॥

ततो दृष्ट्वाऽथ ते सर्वे राजानो दृढविक्रमाः । स्वबलैः संवृतास्तस्थुः कार्तवीर्यस्य सन्निधौ ॥९॥

सोऽपि सिंहासनारूढो गृहीतपरमायुधः । कार्तवीर्यस्ततः सर्वा दिशः समवालोकयत् ॥१०॥

अवलोक्य दिशः सर्वाः सः सुरासुरदुर्जयः । कार्तवीर्यस्ततः सुप्तः कुतुकं तन्निवेदयत् ॥ ११ ॥

निशायामद्य यत्सुप्ते कौतुकं भो द्विजोत्तमाः । दृष्टं वक्ष्यामि तत्सर्वं श्रूयतां सचिवैः सह ॥ १२ ॥

दृष्टं निर्भुजमात्मानं भो छिन्नशिरसं तथा । मुंडं दिगंबरं विप्राः ख्यायतां मे यथा तथा ॥ १३ ॥

इयं राकावती नग्ना कंठे बद्धा च भो द्विजाः । क्रंदमाना च जननी दिशं याम्यां जगाम भोः ॥ १४ ॥

पुरी माहिष्मती चेयं गजवाजिसमाकुला । निमग्ना सागरे घोरे भग्नप्राकारमंदिरा ॥ १५ ॥

आसने शयने याने भोजने नारीसंगमे । तमेव विप्रं पश्यामि यो मया निहतः पुरा ॥ १६ ॥

क्षीरवारिधृतान्नेषु तं छिन्नशिरसं द्विजाः । पश्यामि प्रमदायुक्तं स्वप्ने त्वसिविदारितम् ॥ १७ ॥

विप्रा ऊचुः–

यदि त्वत्तोऽभयं राजन् सर्वेषां नो भविष्यति । स्वप्नार्थं कथयिष्यामः सर्वं शृणु जनेश्वर ॥१८॥

अर्जुन उवाच –

कथयंतु भवंतो मे स्वप्नार्थं निर्भयं द्विजाः । ईश्वराज्ञामिमां विप्राः सत्यमेतन्मयोदितम् ॥

विप्रा उवाच –

अपराधविहीनोऽपि जमदग्निः प्रियाऽन्वितः । यत्त्वया निहतो राजन्स्वप्नोऽयं तस्य कर्मणः ॥

ब्रह्महत्यासमं पापं न भूतं न भविष्यति । जमदग्निर्हतो राजंस्तस्य चेदं निदर्शनम् ॥२१॥

श्रूयते तस्य पुत्रैकस्त्रिषु लोकेषु विश्रुतः । बली परशुरमोऽति क्षिप्रमत्रागमिष्यति ॥२२॥

तद्रक्षस्वात्मनाऽऽत्मानं नूनं नास्त्यत्र संशयः । बलमादेशय क्षिप्रं पुरस्यास्य समंततः ॥२३॥

विप्राणां तद्वचः श्रुत्वा स सहस्रार्जुनो बली । समादिश्य सुतान्चारान्नानामार्गेषु सत्वरम् ॥

गजानां नित्यमत्तानां तिस्रः कोट्यः समादिशत् । अश्वानां पंच कोट्यस्तु रथानां षट् तथा द्विजाः ॥ २५ ॥

दश कोट्यः पदातीना तस्याः कोट्यस्तु रक्षणे ।

चारा ऊचुः –

क्षिप्रं त्रैलोक्यमस्माभिश्चरितं हेहयाधिप ॥ २६ ॥

कश्चिन्नास्ति बलं शत्रुर्दृश्यते मत्सरी क्वचित् । इदं त्वयैव भोक्तव्यं त्रैलोक्यं नाऽत्र संशयः ॥

शत्रुमूर्ध्नि पदं दत्वा स्वामिन्बाहुबलेन च । स नास्ति त्रिषु लोकेषु यस्त्वया निहतो रणे ॥

त्वमेवैकः परः शूरस्त्रैलोक्ये सचराचरे ।

इकडे तें मोठें अनिष्ट पाहून माहिष्मतीश्वर अर्जुन सर्व राजांना बोलावून सांगूं लागला. ा म्हणाला, राजांनों, मोठमोठे हत्ती, घोडे, रथ व धिप्पाड शूर पुरुष यांसह निघून ताबडतोब येथें उपस्थित व्हा. ६. सर्व तटांचे दरवाजे घट्ट बंद करा व त्यांना मोठमोठे अडसर लावा. रवाजांमध्ये अडथळे निर्माण करा व तटांवर लक्ष ठेवा. ७. तसेंच हेंही पहा कीं, नगरांत आपले व परकी लोक कोण आहेत. गुप्त हेरांनीं नगरांत व बाहेरही लक्ष ठेविलें पाहिजे! ८. राजाची आज्ञा होतांच अत्यंत पराक्रमी राजे आपल्या सैन्यासह कार्तवीर्याजवळ उपस्थित झाले. ९. स्वतः कार्तवीर्यही विशाल शस्त्र घेऊन सिंहासनावर बसला. त्यानें सभोंवार एक दृष्टिक्षेप केला, १९. व सुरासुरांना अजिंक्य अशा कार्तवीर्यानें त्याला पूर्वरात्रीं दिसलेलें विचित्र स्वप्न निवेदन केलें. ११. द्विजश्रेष्ठ हो, रात्रीं स्वप्नांत मला जें आश्चर्य दिसलें, तें मी तुम्हांस सांगणार आहे, ऐका. १२. स्वप्नांत मी नग्न असून मला बाहु नाहींत व माझें मस्तकही कापलेलें आहे! तसेंच ही माझी राकावती जननी नग्न होऊन आक्रोश करीत दक्षिण दिशेकडे निघून गेलेली! १३–१४. हत्ती घोडे यांनी गजबजलेली ही माहिष्मती नगरी भयानक समुद्रांत बुडाली असून तिचे प्राकार व मंदिरें भग्न झालीं आहेत असें मी स्वप्नांत पाहिलें. ब्राह्मणहो, या स्वप्नाचा अर्थ सांगा. १५. बसतांना, झोंपतांना, चालतांना व जेवतांना, फार काय स्त्रीसंगमांत सुद्धां मला तोच ब्राह्मण दिसतो कीं, जो मी ठार केला होता! १६. ब्राह्मणहो, ज्याचा मी वध केला होता, तोच ब्राह्मण पत्नीसह मला दूध, पाणी, तूप व अन्नांत दिसत आहे! १७.

विप्र म्हणाले, हे राजा, आम्हांस अभय असल्यास, आम्ही या स्वप्नाचा अर्थ सांगतों.

अर्जुन म्हणाला, द्विजहो, आपण निर्भयपणें मला या स्वप्नाचा अर्थ ईश्वराची आज्ञा समजून सांगा. मी हें सत्य सांगत आहें. १८–१९.

विप्र म्हणाले, कोणताही अपराध नसतां तूं स्त्रीसह जमदग्नीची हत्या केलीस, त्याच कृत्याचें हें स्वप्न आहे! २०. ब्रह्महत्येसारखें दुसरें पापच नाही. हे राजा, तूं जमदग्नीस ठार केलेंस, त्याचेंच हें निदर्शन आहे! २१. त्याचा परशुराम नांवाचा त्रैलोक्यांत प्रसिद्ध असा एक बलवान् पुत्र आहे, असें आम्ही ऐकतों. तो लवकरच येथें निश्चित येणार. २२. यासाठीं तूं स्वतः आपलें रक्षण कर. या नगराचें सर्व बाजूंनीं रक्षण करण्यास सैन्यास आज्ञा कर. २३. विप्रांचें तें उत्तर ऐकून प्रबल सहस्रार्जुनानें आपल्या पुत्रांना व चारांना तसा आदेश दिला व तीन कोटी उन्मत्त हत्ती, पांच कोटी घोडे, सहा कोटी रथ व दहा कोटी पायदळ नगररक्षणासाठीं ठेवलें.

चार म्हणाले, हैहयेश्वरा, आम्ही सर्व त्रैलोक्य फिरून पाहिलें, पण कोठेंही सैन्य किंवा मत्सरी शत्रु आम्हांला आढळला नाहीं. म्हणून हे राजा, शत्रूच्या मस्तकावर पाय ठेवून आपल्या बाहुबलाच्या योगानें तुम्हीच या त्रैलोक्याचा यथेच्छ उपभोग घ्यावा. तुम्ही पराजित केला नाही असा एकही शत्रु या त्रैलोक्यांत नाहीं. चराचर अशा या तीन्ही लोकांत तूंच एक श्रेष्ठ शूर आहेस.

अर्जुन उवाच –

सद्गुरुः शूलपाणिर्वा दत्तात्रेयोऽपि वा रणे ॥ २९ ॥

न शक्नोति रणे जेतुं सेंद्रा देवा निशाचराः । एवं संभाषमाणस्तु कार्तवीर्यो बहूनि च ॥ ३० ॥

अनिष्टान्यद्भुतान्यग्रे ददर्श मुनिसत्तमाः । देवः शोणितवर्षेण ववर्ष भवनोपरि ॥ ३१ ॥

कबंधान्यंतरिक्षे च शिरांसि विकृतानि च । भ्रमंति चक्रवेगेन क्रंदमानानि भो द्विजाः ॥३२॥

एवंव्याघ्रवराहादिशिवा गोमायुवायसाः । कार्तवीर्यपुरद्वारि व्याहरंत्यशुभानि च ॥ ३३ ॥

एतानि दृष्ट्वा चान्यानि ह्यनिष्टान्यशुभानि च । कार्तवीर्यः स्वरोषाद्वै प्रलयाग्निसमोऽभवत् ॥

सहस्रदोर्भिर्दिव्यानि शस्त्राण्यादाय सत्वरः । स दिव्यबद्धसन्नाहसन्नद्धोऽभवदर्जुनः ॥३५॥

ततो माहिष्मतीं क्षिप्रे[1]मागम्यांतः प्रविश्य च । पुरीमालोकयामास रामचारः स नारदः ॥

चारिता नगरी तेन नारदेन महात्मना । सर्वेऽपि च कदाप्येतन्न जानीयुर्विचक्षणाः ॥ ३७ ॥

पुरीं निरीक्ष्य सजनां स सहस्रार्जुनोऽग्रतः । नारदस्त्वरितो राममागम्येदं वचोऽब्रवीत् ॥

नारद उवाच –

राम स्वामिन्प्रभो क्षिप्रमागंतव्य धनुर्धर । धनुषः स्वननिर्घोषं कुरुष्व त्वं वने स्थितः ॥३८॥

स्कन्द उवाच –

स्नानं कृत्वा च गंगायां तेनोक्तो मुनिना द्विजाः । गुरुदेवद्विजानां च पूजयामास भक्तितः ॥

ततोऽचिरेण कालेन हैहयाधिपतेः पुरीम् । प्राप्य रामो वने स्थित्वा धनुर्गुणमवादयत् ॥४०॥

सहसा धनुषः शब्दमशृणोद्धैहयाधिपः । स्थितः सिंहासने रम्ये विस्फाटमशनेरिव ॥ ४१ ॥

ततो घोरतरः शब्दः स बभूव मुहुर्मुहुः । रामस्य धनुषो येन त्रैलोक्यमगमद्भयम् ॥ ४२ ॥

श्रुत्वा तं धनुषः शब्दं समीपे सहसाऽर्जुनः । उत्पपातासनात्तूर्णं खड्गमादाय सत्वरः ॥ ४३ ॥

मंत्रिणः सचिवानन्यान्सुहृत्पुत्रान्सुहृत्सखीन् । तानाहूयार्जुनः क्षिप्रं पप्रच्छ धनुषः स्वनम् ॥

अर्जुन उवाच –

बहवो धनुषः शब्दाः स्वयं घोराः श्रुता मया । एतस्य धनुषः शब्दाः सर्वे शृण्वंतु तत्त्वतः ॥४५॥

इत्युक्तास्तेन ते सर्वे मंत्रिणः सचिवादयः । श्रुत्वा तद्धनुषः शब्दं राजानमिदमब्रुवन् ॥ ४६ ॥

मंत्रिण ऊचुः –

धुनुते[2] च मही राजन् भ्रमणाच्चानुमीयते । तद् ध्रुवं नास्ति संदेहो महानयमुपप्लवः ॥ ४७ ॥

आत्मनो लंघितां चेत्थमुल्लंघ्य जलधिः स्वयम् । गर्जन् गंभीरनादैश्च त्रैलाक्यं नेष्यति क्षयम् ॥

वादयन् शूलपाणिर्वा हृषितः सोऽसुरान्प्रति । पिनाकं तद्धनुर्दिव्यं कैलासं तिष्ठति स्वयम् ॥४९॥

अथवा देवराजस्य भुवने श्रोत्रघातिनः[3] । नगांताः सरितः क्षिप्रमासने सहसोत्थितः ॥ ५० ॥

अस्माभिरधुना नूनं लक्षितो धनुषः स्वनः । शार्ङ्गपाणेर्नृपश्रेष्ठ हृषितस्यासुरान्प्रति ॥ ५१ ॥

स्कन्द उवाच –

इत्युक्तो मंत्रिभिः सर्वैर्बंधुभिर्हैहयाधिपः । शृण्वंस्तु धनुषः शब्दं तूर्णं प्राकारमारुहत् ॥ ५२ ॥

त्वरितस्तमथारुह्य प्राकारं गगनोन्नतम् । मंत्रिभिः सहितो भूपः समंतादवालोकयत् ॥ ५३ ॥

---

१ क्षित्र० २ धुन्वतेयं । ३ घंतिनः ।

अर्जुन म्हणाला, फार काय, शंकर व दत्तात्रेयसुद्धां मला रणांत जिंकू शकणार नाहींत. इंद्रादि देव व राक्षस यांनाही माझा पराजय करणें शक्य नाहीं. असें कार्तवीर्य बोलत आहे तोंच त्याला समोर अनेक अद्भुत अनिष्टें दिसूं लागलीं ! मुनिश्रेष्ठ हो, राजवाड्यावर रक्तवृष्टि होऊं लागली. २४–३१. अंतरिक्षांत धडें व विकृत मस्तकें आक्रोश करीत चक्रवेगानें भ्रमण करूं लागलीं ! ३२. त्याचप्रमाणें वाघ, वराह, भालू, कोल्हे व कावळे कार्तवीर्याच्या नगराच्या वेशीवर येऊन अशुभ रोदन करूं लागले ! यावेळीं कार्तवीर्य रागानें प्रलयाग्नीच भासला. ३३–३४. लगेच आपल्या हजारों हातांनीं दिव्य शस्त्रें घेऊन व शरीरावर दिव्य चिलखत चढवून तो सज्ज झाला. ३५. नंतर रामदूत नारदानेंही माहिष्मती नगरांत प्रवेश करून नगराची पाहणी केली. ३६. तो महात्मा नारद सर्व नगरांत फिरला, पण सहस्रार्जुनाचे कोणी चतुर पुरुष त्याला ओळखूं शकले नाहींत. ३७. नारदानें सहस्रार्जुनाच्या समोर सर्व लोकांसह नगरीचें निरीक्षण केलें व त्वरित रामाजवळ येऊन तो म्हणाला, हे धनुर्धारी रामा, लवकर ये व नगराजवळ वनांत राहूनच धनुष्याचा टणत्कार कर. ३८.

स्कंद म्हणाला, हे नारदाचें वचन ऐकून रामानें गंगेंत स्नान केलें आणि गुरु, देव व द्विज यांची भक्तिपूर्वक पूजा केली. ३९. नंतर लगेच हैहयाधिपतीच्या नगराजवळ वनांत येऊन यानें धनुष्याच्या दोरीचा टणत्कार केला. ४० एकाएकीं झालेला तो धनुष्याचा आवाज रमणीय. सिंहासनावर आरूढ झालेल्या सहस्रार्जुनाला विद्युत्पातासारखा भासला. ४१. रामाच्या धनुष्याचा तो शब्द अधिकाधिक भयंकर होऊं लागला, त्यामुळें त्रैलोक्य भयभीत झालें. ४२. आपल्याजवळच होत असलेला धनुष्याचा तो आवाज ऐकून लगेच सहस्रार्जुन तलवार घेऊन आसनावरून उठला, ४३. व आपले मंत्री, पुत्र व जिवलग मित्र यांना जवळ बोलावून धनुष्याच्या आवाजाबद्दल विचारूं लागला. ४४.

अर्जुन म्हणाला, मी स्वतः धनुष्याचे पुष्कळ भयंकर ध्वनि ऐकले आहेत. यासाठीं तुम्ही सर्वजण धनुष्य–ध्वनीचें स्वरूप जाणून घ्या. ४५. नंतर मंत्री, सचिव वगैरे धनुष्याचा तो आवाज ऐकून राजाला म्हणाले, ही पृथ्वी कंप पावत आहे; व त्यामुळें निश्चितच मोठा प्रलय होणार असें वाटतें. ४६–४७. किंवा समुद्र आपली मर्यादा सोडून गंभीर गर्जना करीत त्रैलोक्याचा नाश करणार असेल. ४८. किंवा असुरांवर संतुष्ट होऊन शूलपाणि शंकर कैलासावर आपलें दिव्य पिनाक धनुष्य वाजवीत असतील, किंवा असुरांवर संतुष्ट झालेल्या विष्णूच्या धनुष्याचा हा आवाज असेल. ४९–५१.

स्कंद म्हणाला, याप्रमाणें सर्व मंत्री व बंधु बोलल्यावर तो धनुर्ध्वनि ऐकून राजा नगराच्या तटावर चढला. ५२. त्या गगनचुंबी तटावरून त्यानें सभोंवार पाहिलें. ५३.

स ददर्शार्जुनः श्रीमान्द्विजमप्रतिमम् ततः । जमदग्निसुतं रामं मंडलीकृतकार्मुकम् ॥ ५४ ॥
बद्धगोधांगुलित्राणं शितबाणं धनुर्धरम् । दृष्ट्वा तं सहसा रामं राजा विस्मयमागमत् ॥ ५५ ॥
प्राकाराग्रे स्थितं रामो दृष्ट्वा तं हैहयाधिपम् । युद्धाय हैहयो धन्वी करेण बहिराव्हयत् ॥५६॥

राम उवाच –

ब्रह्मघ्नार्जुन पापिष्ठ पश्य विप्रस्य मे बलम् । करानुत्पाटयिष्यामि कथं वै ब्राह्मणो हतः ॥ ५७ ॥
अद्य मद्बाणभिन्नस्य पतितस्य तवार्जुन । भक्षयिष्यंति मांसं ते गृध्रजंबूकवायसाः ॥ ५८ ॥
श्वापदाः सर्वगात्राणि भक्षयिष्यंति तेऽधुना । विभक्तानि कुठारेण मया समरमूर्धनि ॥ ५९ ॥
जमदग्नेरहं पुत्रो ब्रह्मघ्नं त्वां न संशयः । पश्यतां सर्वदेवानां घातयिष्यामि सायकैः ॥ ६० ॥
मद्दृष्टिमार्गणैर्भिन्नस्त्वं पापिष्ठ न मोक्ष्यसे । अधुनैव हनिष्यामि युद्धं देहि ममार्जुन ॥ ६१ ॥
इति श्रीस्कन्दपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये एकोनचत्वारिंशत्तमोऽध्यायः ॥ ३९ ॥

# अथ चत्वारिंशत्तमोऽध्यायः ।

## सहस्रार्जुनवधः ।

स्कन्द उवाच –

ततः परशुरामस्य तद्वाक्यं जलदोपमम् । श्रुत्वा चुकोप बलवान् शल्यविद्ध इवार्जुनः ॥ १ ॥
अनादृत्य च तद्वाक्यं बालं मत्वाऽर्जुनः स्वयम् । अशक्तमिति मत्वा तं रामं क्रोधादब्रवीदिदम् ॥

अर्जुन उवाच –

गर्जितं ते वृथा मूढ बटो कस्ते पराक्रमः । कर्मणा दर्शयस्वाशु किं बहु त्वं विकत्थसे ॥ ३ ॥
न मां योधयितुं शक्तः स्वयं रुद्रोऽपि संगरे । पिनाकपाणिर्भगवान् किं पुनस्त्वं शिशुर्मृधे ॥४॥
ब्रह्मापि त्रिदशैः सार्धमपि विष्णुः स्वयं मृधे । किं शिशुस्त्वमशक्तो मामेकः संख्ये विजेष्यसे ॥
पदांगुल्यग्रभागेन बिभेति प्रसभं सदा । स किं शक्तोऽतिबालस्त्वं बटो जेतुं रणे रिपुम् ॥६॥
मुष्टिनैकेन मूढ त्वामधुनैव च पातये । बटोस्ते चक्षुषी हत्वा पातयिष्यामि भूतले ॥ ७ ॥
राक्षसाः समरे दैत्याः सिद्धा विद्याधरोरगाः । इंद्राग्निप्रमुखाः सर्वे निर्जितास्ते मयाऽधुना ॥ ८
न शिशुं त्वां हनिष्यामि सत्यमेतन्मयोदितम् । मा भैस्त्वं गच्छ गच्छाऽऽशु यदि जीवितुमिच्छसि॥

स्कन्द उवाच –

इत्युक्तं पौरुषं तेन रामः सत्यपराक्रमः । घोरांधकारमसृजद्बाणैः प्राच्छादयन्दिशः ॥ १० ॥
ततस्तां नगरीं दिव्यामर्जुनस्य मुनीश्वराः । आग्नेयेनाभिनद्रामः शरेण क्रोधमूर्च्छितः ॥ ११ ॥
ततो हाहाकृताः सर्वे दह्यमानाः समंततः । निर्ययुर्नगरात्तस्मान्नागरास्ते सहस्रशः ॥ १२ ॥
गजैरश्वैर्भटैश्चैव युद्धार्थं बाहुरर्जुनः । आगतो यत्र रामोऽसौ दृष्टः सत्यपराक्रमः ॥ १३ ॥
ततस्तैः सचिवैस्तस्य रेणुकातनयो बली । शस्त्रास्त्रैर्निहतः शूरो न चचालाचलोपमः ॥ १४ ॥

तेव्हां त्यास जामदग्नेय धनुर्धारी ब्राह्मण दिसला. त्याच्या अंगुष्ठांत घोरपडीचें अंगुलित्राण असून हातांत तीक्ष्ण बाण होता. त्या रामाला पाहतांच राजाला विस्मय वाटला. ५४–५५ रामालाही तटावर अर्जुन दिसला. तेव्हां धनुष्य घेतलेल्या हैहयानें रामास युद्धासाठीं बाहेर बोलाविलें. ५६.

राम म्हणाला, हे ब्रह्मघाती, पापिष्ठ अर्जुना, ह्या ब्राह्मणाची शक्ति पहा. ज्या हातांनी तूं ब्रह्मवध केलास, ते तुझे हातच उपटून काढतों. ५७. हे अर्जुना, माझ्या बाणांनीं छिन्नभिन्न होऊन पडलेलें तुझें शरीर आज गिधाड, कोल्हे व कावळे यांच्या भक्ष्यस्थानीं पडेल. ५८. रणांत मी माझ्या कुऱ्हाडीनें तुझ्या शरीराचे तुकडे तुकडे करून श्वापदांना खाऊं घालणार ! ५९. मी जमदग्नीचा पुत्र आज सर्व देवांच्या समक्ष बाणांनीं तुझा निश्चितच वध करणार आहे ! ६०. हे पापिष्ठा, आतां तूं माझ्या दृष्टिपथांतून निसटूं शकत नाहींस. मला युद्ध करूं दे, मी आतांच तुला ठार करतों. ६१.

# अध्याय ४० वा

## सहस्रार्जुनवध

स्कंद म्हणाला, रामाचें तें मेघगंभीर भाषण ऐकून बाणविद्ध झाल्यासारखा अर्जुन संतप्त झाला. १. पण त्याच्या बोलण्याकडे त्यानें लक्ष दिलें नाहीं ! रामाला मूर्ख अशक्त समजून अर्जुन म्हणाला, हे ब्राह्मणाच्या मूर्ख पोरा, तुझी गर्जना व्यर्थ आहे. तुझा तो पराक्रम कृतींत दाखव. तूं पुष्कळच आत्मप्रशंसा करतोस. २–३. युद्धांत प्रत्यक्ष भगवान् पिनाकपाणि रुद्रसुद्धां माझ्याशीं लढूं शकत नाहीं; मग तुझ्यासारख्या लहान मुलाची ती काय कथा ! ४. सर्व देवांसह प्रत्यक्ष विष्णुसुद्धां मला युद्धांत जिंकूं शकत नाहीं, मग तूं तर एक अशक्त पोर ! तूं मला काय जिंकणार ? ५. जें बालक पदांगुलीच्या टोंकाला घाबरतें, तें माझ्यासारख्या प्रबळ शत्रूला कसें जिंकणार ? ६. अरे मूर्खा, मी तुला आतांच एका मुष्टीनें चिरडतों ! अरे बटो, तुझे दोन्ही डोळे काढून जमिनीवर फेंकतों. ७. अरे, मी आजवर युद्धांत राक्षस, दैत्य, सिद्ध, विद्याधर, उरग व इंद्रप्रमुख सर्व देवांना जिकलें आहे ! ८. म्हणून तुझ्यासारख्या मुलाला खरोखरच मी ठार मारणार नाहीं. जा, भिऊं नकोस. जिवंत राहण्याची इच्छा असल्यास लवकर येथून निघून जा. ९. स्कंद म्हणाला, याप्रमाणें अर्जुनानें आपला पराक्रम सांगितल्यावर सत्यपराक्रमी रामानें आपल्या बाणांनी सर्वत्र घोर अंधार निर्माण केला, १०. व क्रोधानें बेभान होऊन त्यानें अर्जुनाच्या नगरीवर अग्निबाण सोडला. ११. त्यामुळें सर्वत्र हाहाःकार उडाला ! हजारों नागरिक जळूं लागले व नगरांतून बाहेर धावूं लागले. १२. म्हणून प्रथम जेथें सत्यपराक्रमी राम दिसला होता तेथें अर्जुन हत्ती, घोडे व योद्धे यांसह आला. १३. त्याच्या सचिवांनीं प्रबल रेणुकासुतावर शस्त्रास्त्रांचे पुष्कळ आघात केले, पण पर्वतासारखा तो शूर राम बिलकुल डगमगला नाहीं. १४.

स तानापततः क्रुद्धो धनुराकृष्य सायकैः । विध्द्वा न्यपातयद्रामः पतंगानिव पावके ॥ १५॥
ततो विव्याध मातंगानिषुभिर्वेगवत्तरैः । शरनिर्भिन्नसर्वांगाः पदातिगजवाजिनः ॥ १६ ॥
निपतंति क्षणाद्भूमौ वज्रपातादिवाचलाः । हन्यमानान्महाबाणैः प्रहसन्निव भार्गवः ॥ १७ ॥
रामः प्रहरतां श्रेष्ठः सपताकध्वजांस्तथा । केचिन्निर्भिन्नशिरसः शरनिर्भिन्नविग्रहाः ॥ १८ ॥
निपेतुर्भूतले भग्नाः सैनिकास्ते गतासवः । हतैरश्वै रथैर्नागैर्योधैश्चैव पदातिभिः ॥ १९ ॥
अकरोत्तद्रणं रामो घोररूपं भयावहम् । ततः प्रावर्तत नदी शोणितांबुतरंगिणी ॥ २० ॥
मेदोमज्जाकर्दमिनी शब्दघोषवती हि सा । तद् दृष्ट्वा निहतं सैन्यं रामेण स तदाऽर्जुनः ॥२१॥
शस्त्रास्त्रैरभिनद्रामं रथमारुह्य सत्वरः । ततोऽधिगम्य नाराचैः प्रगृह्य विपुलं धनुः ॥ २२ ॥
विव्याध समरे रामं दुर्जयं हैहयाधिपः । रामोऽपि लीलया चैकः सहस्त्रार्जुनमाहवे ॥ २३ ॥
अभिनत्प्रसभं बाणैः पतंगमिव पावकः ।

स्मृत्वा नमस्कृत्य महेश्वरं तं विघ्नेशरूपैरमितैर्द्विजेंद्रैः ।
त्रैलोक्यमावृत्य जघान रामस्तं कार्तवीर्यं सगणं कुठारैः ॥ २४ ॥

नरांश्च मातंगरथांश्च निघ्नान्विदारयन्वै ऋषिभिः स रामः ।
जघान रामं स तु कार्तवीर्यो दंतैश्च गूढाभिरजःकुठारैः ॥ २५ ॥

सहस्त्रदोर्भिस्तु सहस्त्रबाहुरनेकरूपैरतुलैरनंतैः ।
शस्त्रास्त्रवर्षेण ववर्ष रामं बलाहको मेरुमिवांतरिक्षात् ॥ २६ ॥

शस्त्राणि तस्याप्रतिमानि तानि दिव्यास्त्रयुक्तानि सहस्त्रबाहोः ।
गणेशरूपैर्विविधैः कुठारैश्चिच्छेद रामोऽसुरदुष्टहंता ॥ २७ ॥

गजैस्तुरंगैः पतितैश्च शूरैर्विमर्दितैश्चैव रथैः सुदिव्यैः ।
हतैस्तु रामेण गणेशरूपैस्तद्घोररूपं तु रणं बभूव ॥ २८ ॥

गजेषु रामस्तुरगेषु रामो रथेषु रामस्तु रणेषु रामः ।
रामात्मकं विश्वमिदं बभूव गणशरूपैर्गिरिसन्निकाशैः ॥ २९ ॥

गायंति देवा ऋषयः स्तुवंति वीणादिवाद्यानि च वादयंति ।
गंधर्वमुख्याः प्रमदाः सुराणां नृत्यंति रामं गणपं समीक्ष्य ॥ ३० ॥

तदद्भुतं युद्धमभूत्सहस्त्रबाहो – – – – हतांतरिक्षे ।
तद्योगिनीवृंदसहस्त्रभूतं वेतालशब्दैः पिशिताशलुब्धैः ॥ ३१ ॥

घोरं बभूवाथ रणं – – – सहस्त्रबाहोश्च ततो मुनींद्राः ।
दैत्यराक्षससिद्धौघैर्हैहयाधिपतिर्बली । रूपैर्जघान शस्त्रास्त्रै रामं रामोऽपि चार्जुनम् ॥ ३२ ॥
तिसृभिश्चैव हरिणां तिसृभिर्द्विजसत्तमाः । सकोटिशतसंख्याभिः शक्तिभिस्तान्गणेश्वरान् ॥३३॥
जघान सोऽर्जुनः संख्ये रामं विघ्नेशरूपिणम् । शस्त्रास्त्रैरभिनद्रामः सहस्त्रार्जुनमाहवे ॥ ३४ ॥
शुंडादंडप्रहारैस्तैरर्जुनं रेणुकात्मजः । वराहरूपैरभिनत्सैन्यं तस्य व्यदारयत् ॥ ३५ ॥

अग्नींत किडे टाकावे, त्याप्रमाणे चालून येणाऱ्या त्या सर्वांना क्रुद्ध रामानें बाणांनीं जमिनीवर लोळविलें. १५. त्याच्या वेगवान् बाणांनीं हत्ती, घोडे व सैनिक यांची सर्वांगें छिन्नभिन्न होऊन, वज्रपातानें पर्वत पडावे त्याप्रमाणें एका क्षणांत जमिनीवर पडूं लागलीं. १६. कित्येकांचीं डोकीं फुटलीं; कित्येकांचा चेंदामेंदा झाला. कित्येक सैनिक गतप्राण होऊन भूतलावर पडले. याप्रमाणें वाताहत झालेल्या हत्ती, घोडे, रथ व सैनिकांच्या योगानें तें रणांगण अति भयानक झालें. त्यांतून रक्ताची नदी वाहूं लागली. त्या नदीवर मेदमज्जा यांचा नुसता चिखल झाला होता. सर्वत्र आर्तस्वर ऐकूं येत होता. याप्रमाणें रामानें आपलें सर्व सैन्य ठार केलेलें पाहून सहस्रार्जुन लगेच रथावर आरूढ होऊन रामावर शस्त्रास्त्रांचा मारा करूं लागला; व मध्येंच त्यानें एक विशाल बाणानें दुर्जय रामाला जखमी केलें. नंतर अग्नीनें पतंगाला मारावें तद्वत् रामानें अर्जुनावर सहजतेनें बाणांचा मारा केला. परशुरामानें विघ्नेश व असंख्य द्विजेंद्र यांसह महेश्वराचें स्मरण केलें व त्यांस नमस्कार करून त्रैलोक्य व्यापून राहिलेल्या गणांसह कार्तवीर्यावर कुऱ्हाडीचे प्रहार केले. मेघानें मेरुपर्वतावर वर्षाव करावा, त्याप्रमाणें सहस्रार्जुनही आपल्या सहस्र करांनीं, अप्रतिम व अनंत रूपांनीं रामावर शस्त्रास्त्रांचा वर्षाव करूं लागला. १७–२६. पण दुष्ट असुरांचें हनन करणाऱ्या रामानें सहस्रबाहूंचीं तीं अप्रतीम दिव्य शस्त्रास्त्रें आपल्या गणेशरूप विविध परशूंनीं छेदून टाकलीं. २७. हत्ती, घोडे, शूर सैनिक मरून पडले; दिव्य रथ छिन्नभिन्न झाले; त्यामुळें तें रणांगण अधिकच भयाण दिसूं लागलें. २८. त्या पर्वतप्राय गणेशरूपांमुळें हत्तीमध्यें राम, अश्वांमध्यें राम, रथांमध्यें राम व रणांमध्यें राम दिसूं लागला. थोडक्यांत, हें विश्वच रामरूप बनलें. २९. रणांत राम व गणेश यांना पाहून देव गाऊं लागले; ऋषि स्तुति करूं लागले; गंधर्व वीणादि वाद्यें वाजवूं लागले व देवांगना नृत्य करूं लागल्या. ३०. बलवान् हैहयाधिपानें दैत्य, राक्षस, सिद्ध इत्यादि रूपांनीं व शस्त्रास्त्रांनीं रामावर प्रहार केले व रामानेंही अर्जुनावर आघात केले. ३१–३२. अशा रीतीनें राम व सहस्रार्जुन यांनीं एकमेकांवर शस्त्रास्त्रांचा मारा केला. ३३–३४. शेवटीं रेणुकात्मज परशुराम यानें वराहरूपें धारण करून आपल्या दंडाच्या प्रहारांनीं सहस्रार्जुनाला व त्याच्या सैन्याला जर्जर केलें. ३५.

रामो नृसिंहरूपैस्तैर्गदाचक्रादिभिर्नरैः। सैन्यं व्यदारयत्तीक्ष्णैः शस्त्रैरर्जुनमाहनत् ॥ ३६ ॥
शुंडादंडैः परशुभिर्दंतैस्तं हैहयाधिपम् । नृसिंहरूपैरहनत्सैन्यं तस्य व्यदारयत् ॥ ३७ ॥
स रामरूपैर्विविधैश्च शस्त्रैर्विष्णोश्च रूपैरपि कार्तवीर्यम् ।
जघान रामः परशत्रुतापनो व्यदारयत्तान्नृपतीन्समस्तान् ॥ ३८ ॥
ये त्वंतरिक्षे सुरसिद्धयक्षास्ते विस्मयंतः प्रसभं प्रहृष्टाः ।
स्तुवंति गायंति सुरांगनास्ता रामं समीक्ष्याभितरूपयुक्तम् ॥ ३९ ॥

इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे रेणुकामाहात्म्ये अगस्त्यस्कंदसंवादे परशुरामसहस्रार्जुनयोर्युद्धे सहस्रार्जुनवधो नाम चत्वारिंशत्तमोऽध्यायः ॥ ४० ॥ श्रीप्रयागमाधवार्पणमस्तु ॥

## ॥ इति रेणुकामाहात्म्यं समाप्तम् ॥



तसेंच नृसिंहरुपें धारण करून शंख, चक्र व गदा इत्यादि तीक्ष्ण शस्त्रांनीं अर्जुनाच्या सैन्याचा फडशा पाडून रामानें शेवटीं त्याला ठार केलें. त्या अनंतरूपधारी रामाला पाहून सुर, सिद्ध व यक्ष यांना आश्चर्य व आनंद वाटला. त्यांनी त्याची स्तुति केली व सुरांगना नाचूं लागल्या. ३६–४०.

॥ ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥

# स्कन्दपुराणांतर्गतं सह्याद्रिखण्डम् ।

## अथ प्रथमोऽध्यायः ।

चित्पावनब्राह्मणोत्पत्तिः ।

स्कन्द उवाच –
ब्राह्मणा दशधा प्रोक्ताः पंचगौडाश्च द्राविडाः । तेषां सर्वेषां चोत्पत्तिं कथयस्व सुविस्तरम् ॥१॥
महादेव उवाच –
द्राविडाश्चैव तैलंगाः कर्नाटा मध्यदेशगाः । गुर्जराश्चैव पंचैते कथ्यन्ते[1] पंचद्राविडाः ॥ २ ॥
सारस्वताः कान्यकुब्जा उत्कला मैथिलाश्च ये । गौडाश्च पंचधा चैव दश विप्राः प्रकीर्तिताः॥
त्रिहोत्रा ह्यग्निवैश्याश्च[2] कान्यकुब्जाः कनोजयाः । मैत्रायणाश्च पंचैते पंचगौडाः प्रकीर्तिताः ॥
ब्राह्मणा दशधा चैव ऋषिवंशोद्भवाः स्मृताः । देशे देशविधाचारा एवं विस्तरते मही ॥५॥
सर्वेषां ब्रह्म गायत्री वेदकर्ममयो विधिः । षट्कर्मविधियुक्ता न तत्र कार्या विचारणा ॥ ६ ॥
भुंज्याश्च भोजनीयाश्च सर्वदेशेषु ब्राह्मणाः । योनिसंबंधकृत्यं च स्वशाखासूत्रसंज्ञया ॥ ७ ॥
चर्मांबु गुर्जरे चैव देशदोषः प्रकल्प्यते । दक्षिणे दासीगमनं दोषश्चैव महाद्भुतः ॥ ८ ॥
न दंतधौतं कर्नाटे काश्मीरे पटमार्जनम् । तैलंगे गोवाहनं च प्रातरन्नं तु द्राविडे ॥ ९ ॥
एवं देशोद्भवो दोषः स्वे स्वे देशे च कल्प्यते। गुर्जरी कच्छहीना च विधवा तु सकंचुकी ॥१०॥
त्रिहोत्राश्च कनोजाश्च मत्स्यभुङ्मांसभुंजकाः। कान्यकुब्जो भ्रातृगामी देशदोषाः प्रकीर्तिताः॥
यथा देशस्तथा दोषः स्वे स्वे देशे प्रकल्प्यते। परदेशे कृतं कर्म बाध्यते चैव पापकम् ॥१२॥
एवं ऋषिकुलं श्रेष्ठं ब्राह्मण्यं चैव विस्तृतम् । सर्वकर्मसु शुद्धं च देशदोषः प्रकल्प्यते ॥१३॥
ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्राश्चैवानुलोमजाः। प्रतिलोमाः षट्कषट्कं ज्ञातयो[3]ऽष्टादश स्मृताः॥
[ सोमात्सूर्यात्समुद्भूताः क्षत्रियाश्च द्विवंशजाः । विख्याता वसुधादेवी सर्वशास्त्रेषु विश्रुताः ॥ ]
हरिवंशे भारते च क्षत्रं सर्वत्र विश्रुतम् । तत्सर्वं च मयैवोक्तं तेऽग्रे गुह्यं च पार्वति ॥ १५ ॥
सूर्यः कश्यपगोत्रं च नेत्राद्दक्षिणतो ह्यभूत् । तत्सूर्याज्जायते वंशश्चिरमायुर्मुनीश्वरः ॥१६॥
कन्या भद्रा महद्भूता व्यतीपातं च वैधृतिः। यमुना चैव या कन्या सवर्णा चैव साभवत्* ॥१७
एवं सूर्यग्रहे वंशश्चिरमायुस्ततः परम्। अग्रे वंशमहाश्रेष्ठा[4] अग्निवैश्यादयोऽपि च ॥ १८ ॥
एवं वंशमहाश्रेष्ठः केवलं धर्मरक्षकः । यदुवंशेषु संभूतो विष्णुर्धर्मार्थहेतवे ॥ १९ ॥
मनो[5] विरंचेश्चन्द्रो ह्यत्रिगोत्रसमुद्भवः । चंद्राद्[6] बुधोऽभवत्पुत्रस्तस्य पुत्रः पुरूरवाः ॥ २० ॥

---

१ द्राविडाः पंच कथ्यते । २ ०वैश्याश्च । ३ ज्ञातिश्च । ४ ०श्रेष्ठम् । ५ मानात्विरिंद्रियोश्चंद्र अरिगोत्रसमुद्भवः । ६ चंद्रायुधो ।

# अध्याय १ ला

## चित्पावन ब्राह्मणांची उत्पत्ति

स्कंदानें प्रश्न विचारला, पंचगौड व पंचद्राविड असे ब्राह्मणांचे दहा भेद आहेत. त्या सर्वांची उत्पत्ति कशी झाली हें विस्तारपूर्वक सांगा. १.

महादेव म्हणाले, द्राविड, तैलंग, कर्नाट, मध्यदेशस्थ व गुर्जर हे पंचद्राविड आणि सारस्वत, कान्यकुब्ज, उत्कल, मैथिल व गौड हे पंचगौड होत. असे दहा प्रकारचे ब्राह्मण आहेत. तसेंच त्रिहोत्र, अग्निवैश्य, कान्यकुब्ज, कनोजय व मैत्रायण हे पांच गौडान्तर्गत आहेत. २–४. ह्या सर्व दशविध ब्राह्मणांची उत्पत्ति ऋषींपासून झाली असून ह्या विशाल देशामध्यें त्या त्या देशानुसार त्यांचे आचार नानाप्रकारचे आहेत. सर्व ब्राह्मणांचें सारसर्वस्व गायत्री मंत्र असून, त्यांचे सर्व विधि वेदमंत्रपूर्वकच होत असतात. अध्ययन–अध्यापन, यजन–याजन आणि दान–प्रतिग्रह हीं त्यांचीं षट्कर्में आहेत. ५–६.

सर्व देशांतील ब्राह्मणांनीं अन्नव्यवहार व विवाहसंबंध आपापल्या शाखासूत्रानुसार करावा. ८. गुर्जर देशांत भिस्तीचें पाणी, दक्षिणेंत दासीगमन, कर्नाटकांत दांत न धुणें, काश्मीरांत वस्त्र न धुणें, तेलंगणांत गोवाहन तर द्रविड देशांत प्रातःकाळीं अन्नभक्षण हे सर्व देशानुसार दोष होत. तसेंच गुर्जर देशांत स्त्रीनें विकच्छ राहणें, विधवेनें चोळी वापरणें, त्रिहोत्रांत मत्स्यभक्षण, कनोजांत मांसभक्षण व भावाबरोबर संबंध ठेवणें हेही सर्व देशदोष होत. सारांश, तो तो दोष त्या त्या देशानुसार क्षम्य असतो. आपल्या देशांत दुसऱ्या देशांतील आचाराचें अनुकरण करणें योग्य नव्हे. इतकेंच नाहीं तर तें पाप आहे. १२. ऋषिकुलोद्भव सर्व ब्राह्मण श्रेष्ठ होत. ते सर्व बाबतींत शुद्ध आहेत. वरील सर्व दोष हे देशदोष म्हणून मानले गेले आहेत. १३. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांपासून अनुलोमपद्धतीनें सहा व प्रतिलोम-पद्धतीनें सहा जाती निर्माण होतात. अशा एकंदर अठरा पोट जाती मानल्या गेल्या आहेत. १४. हरिवंशांत व भारतांत क्षत्रियवंश प्रसिद्ध आहेत. हे पार्वती, ह्याविषयींचें सर्व रहस्य यापूर्वी मीच तुला सांगितलें आहे. सोमवंशी व सूर्यवंशी क्षत्रिय राजे पृथ्वीवर सर्वश्रुत आहेत. १५. परमेश्वराच्या उजव्या डोळ्यापासून सूर्य निर्माण झाला व त्यापासून दीर्घायु सूर्यवंश झाला. याच सूर्यवंशांत पुढें महाश्रेष्ठ अग्निवेश्य इत्यादि राजे निपजले. १६–१८. तसेंच वंशानें महाश्रेष्ठ व केवळ धर्मरक्षक असा विष्णु यदुवंशांत धर्मरक्षणासाठीं जन्मास आला. १९. परमेश्वराच्या मनापासून चंद्र निर्माण झाला; व या चंद्रापासून बुध व त्याचा पुत्र पुरूरवा झाला. २०.

पुरूरवस उद्भूतः सोमवंशो महाद्भुतः । धर्मसंरक्षणार्थाय क्षत्रैकर्मा महीपतिः ।। २१ ।।
एवं क्षेत्रे[2] महाराजशताधिकविशेषतः । रामेण निहताः क्षत्रा एकविंशतित्रारतः ।। २२ ।।
ब्राह्मणेभ्यश्च सकला पृथ्वी दत्ता यथाविधि । नवीनं निर्मितं क्षेत्रं शूर्पारकमनुत्तमम् ।। २३ ।।
वैतरण्या दक्षिणे च सुब्रह्मण्यास्तथोत्तरे । सह्यात्सागरपर्यंतं शूर्पाकारं व्यवस्थितम् ।। २४ ।।
शतयोजनदीर्घं च विस्तारं त्रीणि योजनम् । भार्गवी मिलिता पृथ्वी समुद्रात्सुखहेतुना ।।२५।।
क्षेत्रं जवाधिकं काश्याः सर्वतीर्थानि तत्र वै । विमलं निर्मलं चैव खादिरं तीर्थमुत्तमम् ।। २६ ।।
हरिहरेश्वरं चैव तीर्थं मुक्तेश्वरं तथा । वालुकेशो महाश्रेष्ठो बाणगंगा सरस्वती ।। २७ ।।
तस्यास्तु दक्षिणे भागे कुशस्थली समुद्रिणी । मध्ये ग्रामाः परं ख्याता गोमांचलपर्वते ।। २८।।
तत्रैव स्थापितं तीर्थं गोरक्षं च कुमारिजम् । रामकुंडं कुड्मलं च प्राचीलिङ्गं गुणोपमम् ।।२९।।
एवं क्षेत्रं महादेवि भार्गवेण विनिर्मितम् । तन्मध्ये च कृतो वासः पर्वते चांतरंगके ।। ३० ।।
श्राद्धपक्षार्थं तेनैवामंत्रिताः सर्वब्राह्मणाः । नागता ब्राह्मणाः सर्वे क्रुद्धोऽभूद्भार्गवो मुनिः ।।३१।।
मया नूतनकर्त्रा वै क्षेत्रं निर्मितं नवम् । नागता ब्राह्मणाः सर्वे कारणं किं प्रयोजनम् ।। ३२ ।।
ब्राह्मणा नूतनाः कार्याः एवं चित्तेऽनुचिन्तयन् । सूर्योदये च स्नानार्थं गतः सागरदर्शनम् ।।३३।।
चितास्थाने च सहसा ह्यागतांश्चाब्रवीन्मुनिः । का जातिः को भवद्धर्मः क्व स्थाने चैव वासनम् ।।
कथयध्वं ममाग्रे नु कारणं तस्य विद्यते ।
कैवर्तका ऊचुः –
ज्ञातिं पृच्छसि हे राजन् ज्ञातिः कैवर्तकीति च ।। ३५ ।।
सिंधुतीरे कृतो वासः व्याधकर्मविशारदाः । तेषां षष्टिकुलं श्रुत्वा पवित्रमकरोत्तदा ।। ३६ ।।
ब्राह्मण्यं च ततो दत्त्वा सर्वविद्यासुलक्षणम् । चितास्थाने पवित्रत्वं चितपावनसंज्ञकम् ।।३७।।
सर्वकाले स्मृतश्चायं कार्यार्थमागमिष्यति । एवं तदाशिषस्तेभ्यो दत्त्वा नु भार्गवो मुनिः ।।३८।।
आनिनायालयश्रेष्ठस्त्रैलोक्याधिपतिः प्रभुः । एवं च नूतनविप्रेभ्यो[3] ददौ गोत्राणि नामतः ।।३९।।
चतुर्दशगोत्रकुलाः स्थापिताश्चांतरंगके । सर्वे च गौरवर्णाश्च सुनेत्राश्च सुदर्शनाः ।। ४० ।।
सर्वविद्यानुकूलाश्च भार्गवस्य प्रसादतः । गता बहुदिनास्तेषां स्वीयकार्याणि[5] कुर्वताम् ।। ४१ ।।
कुचोद्यं चैवमादाय स्वामिबुद्धिपरीक्षणात् । अकार्यं कुर्वते कर्म स्मरन्ते भार्गवं मुनिम् ।।४२।।
आगतस्तत्क्षणादेव पूर्वोक्तस्य च कारणात् । तत्रैव दृश्यते कृत्यं क्रोधितः स जगद्गुरुः ।। ४३ ।।
शापितास्तेन ये विप्रा निंद्याश्चैव कुचित्सकाः । शापश्च प्राप्यते तस्मात् कुत्सिताश्च दरिद्रिणः ।।
सेवां[7] सर्वत्र कर्तार इदं निश्चयभाषणम् । इतिहासकथा देवि तवाग्रे कथिता मया ।। ४५ ।।
चित्पावनस्य चोत्पत्तिरिदं चैव तु कारणम् । सह्याद्रेश्च तले ग्रामश्चित्तपोलननामतः ।। ४६ ।।
तत्रैव स्थापिता विप्रा यावच्चंद्रदिवाकरौ । पश्चात्परशुरामेण ह्यानीता मुनयो दश ।। ४७ ।।
त्रिहोत्रवासिनश्चैव पंचगौडान्तरास्तथा । गोमांचले स्थापितास्ते पंचक्रोश्यां कुशस्थले[8] ।।४८।।
भारद्वाजः कौशिकश्च वत्सकौंडिन्यकश्यपाः । वसिष्ठो जमदग्निश्च विश्वामित्रश्च गौतमः ।। ४९ ।।
अत्रिश्च दश ऋषयः स्थापितास्तत्र एव हि । श्राद्धार्थं चैव यज्ञार्थं भोजनार्थं च कारणात् ।।५० ।।

---

१ क्षेत्रकर्मण्यते मही । २ क्षेत्रं । ३ नूतनान् विप्रान् । ४ देविं । ५ स्वकार्यं कृतवान्स्थिताः । ६ शापं । ७ सेवा ८ कुशस्थल्यां ।

या पुरूरव्यापासून धर्मरक्षक व क्षात्रधर्मदक्ष असा सोमवंश चालू झाला. २१.

याप्रमाणें पुष्कळ क्षत्रिय महाराजे होऊन गेले. या सर्वांचा परशुरामानें एकवीस वेळां वध केला. २२. नंतर त्यानें सर्व पृथ्वीचें ब्राह्मणांना दान केलें, व उत्कृष्ट असें शूर्पारक क्षेत्र निर्माण केलें. २३. वैतरणी नदीच्या दक्षिणेस व सुब्रह्मणी नदीच्या उत्तरेस सह्याद्रीपासून सागरापर्यंत सूपाच्या आकाराचें हें स्थान वसलेलें आहे. २४. शंभर योजन (४०० कोस) लांब व तीन योजन (१२ कोस) रुंद असलेली ही भार्गवी पृथ्वी केवळ लोककल्याणासाठीं परशुरामानें संपादन केली. २५. हें क्षेत्र काशीहून एका जवानें श्रेष्ठ आहे, कारण येथें सर्वच तीर्थें आहेत. निर्मल व विमल असें खादिर तीर्थ, हरीहरेश्वर, मुक्तेश्वर, वालुकेश, बाणगंगा सरस्वती हीं तीर्थें असून तिच्या दक्षिणेस कुशस्थली व गोमांचल पर्वतावर दुसरे पुष्कळ गांव प्रसिद्ध आहेत. २६-२८.

भार्गवरामानें तेथें गोरक्ष, कुमारिज, रामकुंड, कुडमल, प्राचीसिद्ध व गुणोपम या तीर्थांची निर्मिति केली; व एका पर्वतावर आंतील भागीं तो स्वतः राहूं लागला. यानंतर तेथेंच त्यानें श्राद्धादि वैदिक कर्मासाठीं साठ चित्पावन ब्राह्मण कुळांची स्थापना करून त्यांस १४ गोत्रें दिलीं. हे सर्व ब्राह्मण विशेष गौरवर्णी, सुंदर व सुनेत्र होते. हे सर्व परशुरामाच्या कृपाप्रसादानें सकलविद्यासंपन्न झाले. हें स्थान सह्याद्रीच्या पायथ्याशीं चित्तपोलन या नावानें प्रसिद्ध आहे. २९-४६.

यानंतर परशुरामानें त्रिहोत्रवासी व पंचगौडान्तर्गत दहा ब्राह्मण आणून गोमांचल व त्याची पंचक्रोशी आणि कुशस्थल येथें त्यांची स्थापना केली. ४७-४८.

त्यांचें अन्नग्रहण करणारा पतित होतो. अग्निहोत्र, संन्यास, पौरोहित्य, वैदिक व स्मार्त कर्मे, पुराणपठन, स्वयंभू लिंगास स्पर्श, तंत्रज्ञान व यमादि अष्टयोग या गोष्टी गोलकांना विहित नाहींत, असें भार्गवानें सांगितलें आहे. हे गोलक वृत्तीनें वर्णहीन व बहिष्कृत असल्यानें ब्राह्मणत्वाचें अनुकरण न करतां त्यांनीं कलियुगांत पृथ्वीवर संचार करावा. विशेष बोलण्यांत अर्थ नाहीं. आणखी काय ऐकण्याची इच्छा आहे? ४५–४८. यांच्या दर्शनानें पुरुषांना पातित्य प्राप्त होतें. या पापास सूर्यदर्शन हें प्रायश्चित्त आहे. ४९. गणेश, विष्णु, अनादि रहित विष्णु, उदार पराक्रमी विष्णु, देवी, उपेंद्र व महेंद्रलिंग यांना मी पुनः पुनः प्रणाम करतों. ५०.

# अध्याय ११ वा

## पातित्यग्राम

शौनक म्हणाला, शुक्तिमती नदीच्या दक्षिण तीरावर आणखी एक पातित्यग्राम आहे. येथें वाहक बनलेल्या द्विजांना शूद्रांनीं आपलें वाहन दिलें. १.

पूर्वी माद्र व कंद या नांवाचे दोन प्रसिद्ध शूद्र होऊन गेले. हे महापराक्रमी व बलिष्ठ असून रूपयौवनसंपन्न होते. हे नृपनंदना, शिवपूजा व द्विजभक्ति करण्यांत त्यांचा पुष्कळ काळ निघून गेला. २–३. त्यांची ती कीर्ति ऐकून एकदां बत्तीसग्रामवासी श्रेष्ठ वेदवेत्ते, आठ सपत्नीक ब्राह्मण पुत्रांसह आपलें दारिद्र्य दूर व्हावें अशा इच्छेनें त्यांच्याजवळ आले. ४–५. प्रथम सर्वांनीं मिळून त्यांस आशीर्वाद दिला व नंतर ते द्रव्यलोलुप ब्राह्मण धनाच्या आशेनें त्यांस म्हणूं लागले, तुम्ही दोघे धीट व श्रीमंत असून त्रैलोक्यांत पूज्य आहांत! रूप, औदार्य व गुण या बाबतींत तुमची बरोबरी करणारा दुसरा कोणीही नाहीं. ६–७.

वक्तृत्वपटु अशा अतिथींनी केलेली ती विविध प्रशंसा ऐकून त्यापैकीं ज्येष्ठ धार्मिकानें त्यांचा विधियुक्त सत्कार केला व त्यांस पुष्कळ धन दिलें. नंतर त्या शूद्रानें त्या आठही कुटुंबियांस पशु, धान्य व दासी देऊन मोठ्या आनंदानें राहाण्यास संपन्न घरेंही दिलीं. ८–१०. त्यानें याप्रमाणें त्यांचा सत्कार केल्यावर त्या शूद्राची सेवा करीत ते विप्र तेथें राहूं लागले. अशा स्थितींत बारा वर्षें निघून गेलीं. ११. नंतर एकदां त्या शूद्राच्या मनांत असा एक विचार आला कीं, आपल्या सर्व भार्या पुत्रहीन आहेत, यासाठीं एक पुष्ट उन्नतपयोधरी, रूपवती, तरुण व सर्वलक्षणसंपन्न अशी सुंदर स्त्री मला मिळेल तर बरें होईल. माझ्या वंशवृद्धीसाठीं मला एका सुंदर स्त्रीशीं विवाह केला पाहिजे. १२–१३. कारण निपुत्रिकाला सद्गति मिळत नाहीं, असें विद्वान् म्हणतात! असा विचार करून त्यानें दुसरा विवाह करण्याचा निश्चय केला. १४.

शूद्र उवाच –

क्रियतां मम चार्वंगी[1] सखायः पुत्रकामिनी ॥ १५ ॥

अस्मिन्नर्थे महाराजा जातिमाकुरुताधुना[2] । अथ ते बांधवाः सर्वे समालोच्य परस्परम् ॥ १६ ॥

कांचित्कन्यां शुभश्रोणीं बिंबोष्ठीं नवयौवनाम् । दृष्ट्वा तमूचुस्ते सर्वे जना अर्थार्थ[3] संस्थिताः ॥ १७ ॥

काप्यस्त्यत्र[4] महाप्राज्ञ तव भार्या भविष्यति । इति तेषां वचः श्रुत्वा मेने स कृतकृत्यताम् ॥ १८ ॥

श्वः काले परिणेतव्या इति निश्चित्य चेतसा । पाणिग्रहणसंभारान्संपाद्य स्वजनैः सह ॥ १९ ॥

शिबिकावाहकः कोऽपि नास्त्यत्र विषये बत । किं करोमि क्व गच्छामि कथं चिंता नशिष्यति[5] ॥

ब्राह्मणांस्तान्समाहूय विनयेनाब्रवीद्वचः । अहं च भवतां भृत्यो मम कार्यं समग्रतः ॥ २१ ॥

मनोहितं कुलस्यास्य भवद्भिः क्रियतां लघु । तदा तस्य वचः श्रुत्वा विप्राः प्रेमनिमंत्रिताः ॥

तथेत्यूचुर्द्विजाः सर्वे नानारत्नैरलंकृताः । अष्टपादेन रचितामष्टौ ते शिबिकां दधुः ॥ २३ ॥

शौनक उवाच –

किं वक्तव्यं नरपते हेलया विधिचोदिताः । गुरून्बंधुजनान्सर्वांस्त्यजंत्यर्थपरा नराः ॥ २४ ॥

वेश्यासक्ताः स्वदारांश्च[6] द्यूतासक्तास्त्रयीमिव । अश्वासक्ता नरा भूपं सततं गां त्यजंति हि ॥ २५ ॥

जघन्यः सहसागत्य शिबिकामारुरोह सः । शनैर्वधूगृहं प्राप्य कृतोद्वाहः स शूद्रजः ॥ २६ ॥

पत्न्या सह मुदा[7] युक्तः प्रपेदे निजमंदिरम् । अथ तेभ्यो द्विजेभ्यश्च वस्त्राण्याभरणानि च ॥

एकैकस्मै द्विजायाथ प्रददौ स मुदान्वितः । शतप्रस्थानि निष्कानि किं न देयं महीपतेः ॥ २८ ॥

अथ ते ब्राह्मणाः सर्वे द्रव्याण्यादाय सत्वरम् । भ्रातृवर्गं समादाय ग्रामं गंतुं प्रचक्रमुः ॥ २९ ॥

पतितानागतान्दृष्ट्वा ग्रामस्थाः क्रोधमूर्छिताः । दंडमादाय हस्तेन निजघ्नुस्तान्नरेश्वर ॥ ३० ॥

ते भयात्सहसा जग्मुर्दारुणं वृषलाग्रजम्[8] । तमूचुः पाहि पाहीति का गतिर्नो विधीयताम् ॥

तदा तेषां वचः श्रुत्वा कृपयाविष्टचेतसा । जघन्यजाग्रणीभूय तानुवाच भयान्वितान् ॥ ३२ ॥

शौनक उवाच–

शोकं त्यजत हे विप्राः किमस्ति क्लेशकारणम् । इमं ग्रामं च दास्यामि नवोढामंगनामिमाम् ॥

गोमहिष्यादि सर्वस्वं स्थीयतामत्र निर्भयाः ।

शौनक उवाच –

यस्य द्रोहं च कुरुते यदा[9] यः करुणान्वितः ॥ ३४ ॥

अतीव दुखसंतप्तस्तमेव शरणं व्रजेत् । मनसा[10] न स्मरेत्सोऽपि द्रोहस्तेन कृतः पुनः ॥ ३५ ॥

---

१ चार्वंगि । २ जात । ३ योजनार्धार्धं० । ४ स्तत्र । ५ तरिष्यसि । ६ परस्त्रीणां ।
७ मुदं युक्तं । ८ वृषलांगजं । ९ यदापः । १० मनसादुस्मरत् ।

त्यानें आपल्या सर्व बांधवांस बोलावून आपला विचार त्यांस कळविला. शूद्र म्हणाला, [illegible]त्र हो, मला पुत्रेच्छु अशी सुन्दर स्त्री हवी आहे. यासाठीं तुम्ही आपल्या ज्ञातिबांधवांस [illegible]झा हा मनोदय कळवा. नंतर त्या सर्व ज्ञातिबंधूंनीं आपसांत विचार केला व शुभश्रोणी, [illegible]बोष्ठी व नवयौवना अशी एक वधू नियोजित करून ते द्रव्यलोभी लोक त्यास म्हणाले, [illegible] बुद्धिमंता, एक कन्या तुझी भार्या होण्यास तयार आहे ! त्यांचें हें भाषण ऐकून तो स्वतःस [illegible]तकृत्य समजूं लागला ! १७–१८.

मग उद्यांच विवाह करावा, असा विचार करून त्यानें विवाहविधीस लागणारी सर्व [illegible]आवश्यक तयारी आपल्या बांधवांच्या मदतीनें केली. १९. पण आपल्या या देशांत आपली [illegible]लखी वाहून नेणारा कोणी दिसत नाहीं, तर काय करावें ? कोठें जावें ? ही अडचण दूर कशी [illegible]हावी ? अशी चिंता त्याला उत्पन्न झाली ! यासाठीं सर्व ब्राह्मणांना एकत्र बोलावून तो त्यांना [illegible]म्रतापूर्वक म्हणाला, मी आपला नोकर आहें, असें समजून आपण माझीं सर्व कामें करावीं [illegible] माझी अभिलाषा लवकर पूर्ण करावी. त्याचें तें भाषण ऐकून प्रेमानें निमंत्रण दिलेल्या सर्व [illegible]आठ ब्राह्मणांनीं 'ठीक आहे,' असें बोलून त्याची अष्टकोनी रत्नखचित पालखी वाहून [illegible]नेण्याची तयारी दर्शविली ! २०–२३.

शौनक म्हणाला, काय बोलावें ? हे राजा, दैवाच्या प्रेरणेनें पैशालाच सर्वस्व समजणारीं माणसं केवळ पैशाच्या आशेनें गुरु व बंधुजनांचाही त्याग करतात. २४. वेश्या, परस्त्री व द्यूत यांवर आसक्ति असलेलीं माणसें वेदत्याग करतात; अश्वासक्त माणसें राजा व पृथ्वीचाही त्याग करतात ! २५.

त्यांची तयारी असल्याचें जाणून तो शूद्र लगेच त्या पालखींत बसला व सावकाश वधूच्या घरीं पोंचल्यावर त्यानें यथासांग विवाहविधि पार पडला. नंतर तो शूद्र आनंदित होऊन पत्नीसह आपल्या घरीं गेला. तेथें त्यानें त्या ब्राह्मणांस वस्त्राभरणें दिलीं; शिवाय प्रत्येक ब्राह्मणाला शंभर शेर सोन्याचीं नाणींही दिलीं. हे राजा, त्यानें तरी कां देऊं नये ? २६–२८.

नंतर ते सर्व ब्राह्मण तो द्रव्यभार घेऊन आपल्या बांधवांसहवर्तमान आपल्या गांवांत जाऊं लागले. तेव्हां त्या पतितांना पाहून ग्रामस्थ लोकांचा राग अनावर झाला. त्यांनीं काठ्यांनीं त्यांना झोडपून काढलें. २९–३०. यामुळें घाबरून जाऊन ते सर्व विप्र दारुण अशा ज्येष्ठ शूद्राकडे गेले व म्हणाले, 'आमचें रक्षण करा, आमचें रक्षण करा. आतां आमचें होणार काय ! तुम्ही कांहीं तरी करा.' अशी त्यांची विनवणी ऐकून त्या शूद्र नेत्याचें मन द्रवलें व तो त्या भयभीत झालेल्या ब्राह्मणांस म्हणाला, तुम्ही शोक करूं नका. ब्राह्मणांनो, दुःख कां करतां ? मी तुम्हांला हा माझा गांव, माझी नवविवाहित स्त्री, गाई, म्हैशी वगैरे सर्वस्व देऊन टाकतों. तुम्ही येथेंच निर्भय होऊन रहावें !

शौनक म्हणाला, एकादा मनुष्य आपला द्रोह करीत आहे असें वाटलें तर दयाळू मनुष्यानें अत्यंत दुःखसंतप्त होऊनही द्रोह करणाऱ्यासच शरण जावें. फार काय, त्यानें केलेल्या द्रोहाची आठवणसुद्धां त्यास होतां कामा नये. ३१–३५.

उद्धरिष्यति धर्मात्मा रामः शस्त्रभृतां वरः। तेषामसौ द्रोहकृतं चतुर्थे नरपुंगवः ॥ ३६ ॥
न चात्र विस्मयः कार्यो न कश्चित्करुणात्मना। अथ तेभ्यो द्विजेभ्यश्च शूद्रोऽसौ करुणार्दितः ॥३
कांतां स्वकां च तां तां तु नवोढां नवयौवनाम्। विचित्रवसनोपेतां विचित्राभरणैर्युताम् ॥
गोमहिष्यादिसर्वस्वैः पूरितं भवनं तथा। स्नात्वा शुक्तिमतीतोये नृसिंहेशस्य सन्निधौ ॥३९॥
धरापूर्वं ददौ ग्रामं सुजनैरभिनंदितम्। निर्भीताः संचरंतात्र स्थीयतां शाश्वतं द्विजैः ॥ ४०
इत्युक्त्वा तीर्थयात्रायै ययौ स वृषलात्मजः।
शौनक उवाच –
अथ ते ब्राह्मणाः सर्वे हृष्टचित्ता भवंन्ति ते ॥ ४१ ॥
ग्रामस्य ह्यष्टौ भागांश्च कृत्वा स्वं स्वं निवेशनम्। तथैव ते भावयन्तः तथा नामानि यानि च ॥
हव्यकव्यशुभादीनि चक्रुः संकेतमार्गतः। तदाप्रभृति राजेंद्र ते विप्रा न्यवसन्सुखम् ॥ ४३
द्वात्रिंशद्ग्रामसंस्थानां माहात्म्यं वृषलस्य च। नवोढायाश्च कांतायाः किं ब्रवीमि नरेश्वर ॥४४
कुलहीनाः परित्यक्ता गुरुबंधुजनैः सह। द्वात्रिंशद्ग्रामवासिनो निंदिताः पापचारिणः ॥ ४५
सदा शूद्रान्ननिरता राजंते भूतले बत। एतेषां दर्शनात्सद्यः पातित्यमनुगच्छति ॥ ४६
प्रायश्चित्तविधिं वक्ष्ये चंडांशोर्दर्शनं परम्। बहुनात्र किमुक्तेन नात्र कार्या विचारणा ॥ ४७ ॥
हिरण्यहन्तारमनादिपूरुषं जगत्त्रये व्याप्तसुदारुविग्रहम्।
सुरासुरैः पूजितपादपंकजं भजे नृसिंहं च भजे नृसिंहम् ॥ ४८ ॥
इति श्रीस्कंदपुराणे उत्तररहस्ये सह्याद्रिखंडे पातित्यग्रामो नाम एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

# अथ द्वादशोऽध्यायः।

## पातित्यग्रामः।

शौनक उवाच –
पातित्यग्राममस्त्यन्यत्कोटिलिंगेशसन्निधौ। तत्र स्थितानां मर्त्यानां पापिनां क्रूरकर्मणाम् ॥ १
असत्यवादिनां तेषां माहात्म्यं च वदामि ते। लोकेऽतिवैचित्र्यकरं श्रोतृणां विषयावहम् ॥ २
पुरा तु पार्थिवः कश्चिदासीद्वरगुणान्वितः। नाम्ना वसुरिति ख्यातो यं विदुर्भूपुरंदरम् ॥ ३
तस्मिन् शासति भूपाले क्षोणीं सर्वसमृद्धिनीम्। अनृतत्वं शोषकत्वं नास्तीत्याहुर्मनीषिणः ॥
इत्थं प्रवर्तमानस्य व्यतीयुर्बहवः समाः। कदाचिदभवद्वादैः कूलस्थानां महात्मनाम् ॥ ५ ॥
तदा कोटीश्वरस्थानां सीमाव्यत्यस्तकारणम्। तदा वैनयसंबंधं षोडशप्रस्थहेतुकम् ॥ ६ ॥
कृत्वा विवादं बहुधा राज्ञे सर्वं न्यवेदयेत्। अथ राजा महाप्राज्ञो नीतिवाक्यविदां वरः ॥७॥
तदा कोटीश्वरस्थांस्तान् प्रचंडान्धूर्तपुंगवान्। जल्पतः सर्वमनृतं सांत्वयन्नाह पार्थिवः ॥ ८ ॥
इत्थं प्रवदतस्तत्र वाक्यं च नृपतेः शुभम्। तिरस्कृत्य नृपस्याग्रे न्यकुर्वंतो बभाषिरे ॥ ९ ॥

१ ते गात्र०। २ करुणार्दितः। ३ संचरन्त्यत्र। ४ भवंस्तदा। ५ स्वैःस्वैर्। ६ भावयेत्यासं
७ वासिन्यो। ८ हतार०। ९ पोषकत्वं। १० वादं।

हें ऐकून दयार्द्र मनाच्या त्या शूद्रानें रंगीबेरंगी वस्त्रें परिधान केलेली, सर्वालंकारयुक्त
ापली नवविवाहित तरुण पत्नी, गाई-म्हैशी व परिपूर्ण घर हें सर्व व भूमीसह तो
म, स्वतः शुक्तिमती नदींत स्नान करून नरसिंह देवासमोर ब्राह्मणांना दान केला व म्हटलें,
ाह्मणहो, तुम्ही येथें निर्भयपणें खुशाल रहा. ३६–४०. असें बोलून तो वृषलपुत्र तीर्थयात्रेस
ाघून गेला.

शौनक म्हणाला, यामुळें ते सर्व ब्राह्मण आनंदित झाले. ४१. त्यांनीं त्या गांवाचे आठ
ाग केले व त्यांत आपआपलीं घरें बांधलीं. पूर्वीचीं त्यांच्या घरांचीं जीं नांवें होतीं, तींच
यांनीं चालू ठेवलीं व संकेतमार्गानें हव्य-कव्य व इतर मंगल कृत्यें करूं लागले. हे राजेंद्रा,
ाव्हांपासून ते तेथें सुखानें राहूं लागले. ४२–४३.

बत्तीसग्रामसंस्था, तो शूद्र व ती नवविवाहित स्त्री यांचें माहात्म्य मी किती वर्णन
करूं ! ४४. कुलहीन, गुरु-बंधुजनांनीं वाळींत टाकलेले, पापाचरणी व निंदित असे ते बत्तीस-
ग्रामवासी लोक शूद्रान्न खाऊन भूतलावर राहूं लागले. त्यांच्या दर्शनानें मनुष्य पतित होतो.
४५–४६. सूर्यदर्शन हेंच त्याला प्रायश्चित होय. विशेष सांगण्याची किंवा विशेष विचारही
करण्याची आवश्यकता नाहीं. ४७. हिरण्यकशिपूचा वध करणारा अनादिपुरुष व ज्याचे चरण
सुरासुरांनीं वंदिले त्या नरसिंहाची सर्वांनीं भक्ति करावी. ४८.

# अध्याय १२ वा

## पातित्यग्राम

शौनक म्हणाला, कोटिलिंगेशाजवळ आणखी एक गांव आहे. तेथील एका पापी, क्रूरकर्मी व असत्यवादी माणसाचें माहात्म्य मी तुला सांगतों. त्याचें चरित्र अतिविचित्र असल्यानें श्रोत्यांना सुखावह असतें. १–२.

पूर्वी वसु नांवाचा अति गुणी राजा होऊन गेला. त्याला लोक पृथ्वीवरचा इंद्र समजत. ३. तो सर्वसंपन्न पृथ्वीचें राज्य करीत असतां प्रजेंत असह्य व शोषक वृत्ति नव्हती, असे लोक म्हणतात. ४. अशा सुस्थितींत पुष्कळ वर्षें निघून गेलीं. एकदां कोटीश्वरचे ग्रामस्थ लोक आणि तीरस्थ महात्मे लोक यांमध्यें सीमेविषयीं तंटा उद्भवला. सोळा शेर धान्याच्या प्रचलित पद्धतीविषयीं पुष्कळ वादविवाद करून शेवटीं त्यांनीं तो तंटा राजाला कळविला. तो राजा महाबुद्धिमान् व नीतिशास्त्रज्ञ होता. कोटीश्वरस्थ लोक महाधूर्त असून खोटीच बडबड करतात, हे त्यानें ओळखलें, व त्यांचें सांत्वन केलें. पण राजाचा तो चांगला उपदेश त्यांना रुचला नाहीं व राजाच्या समोरच ते त्याच्या उपदेशाचा तिरस्कार करूं लागले. ५–९.

निजगाद विचिन्त्यार्थं[1] हर्षयन्निव तां सभाम्। काश्यपीं प्रार्थयिष्यामो वदत्येषां[2] शुभाशुभम्
कलुषं यत्र यत्रास्ति तत्र तत्र दहिष्यति । इति निश्चित्य मनसा चारानाज्ञापयत्तदा ॥१
द्वात्रिंशद्ग्रामनिलयान् स्वे स्वे धर्मे व्यवस्थितान् । भृशं[3] मानधनान्पूज्यान्क्षिप्रमानीयतामि
पश्चाच्च साधयिष्येऽहमादिश्य नृपतिर्गतः[4] ।

शौनक उवाच –

तस्मिन्नेव क्षपामध्ये धूर्ताः कोटीश्वरे स्थिताः ॥ १३ ॥
सीमोपांत्यं समागत्य खनित्रैरतिवेगतः । क्षोणीं खात्वा व्योममात्रां कुंडे कुत्सितकर्मतः[5] ॥१४
निक्षिप्य पुरुषं कंचित्[6] स्थीयसे तैः प्रपूर्य तत् । यथा स्वस्वगृहं[7] प्रापुर्[8]राज्ञा चैव व्यवस्थिताः ॥१
अथ चारैः समानीता द्वात्रिंशद्ग्रामवासिनः । आजग्मुर्नृपसान्निध्यमाशीर्वादपुरःसरम् ॥१६
तत्कालोचितवाक्यानि जगदुर्[9]वै नरेश्वर । तदा वसुजनैः सार्धं सीमाप्रांतं ययौ[10] मुदा॥ १७
संगृह्य पूजासंभारं दैवज्ञैस्तांत्रिकैः सह । तौर्यत्रिकेण सहितः कुटकोटीश्वरैः सह ॥ १८ ॥
स्थिरां पूजां करोति स्म गंधपुष्पाक्षतादिभिः । भक्ष्यभोज्यैस्तथा धूपैर्दीपैर्नैवेद्यचंदनैः ॥ १
प्रार्थनामकरोत्तत्र पार्थिवो मनसेप्सिताम् । कृतांजलिपुटो भूत्वा विजयेनाब्रवीद्वचः ॥ २० ॥

राजोवाच –

विधेहि[11] देवि कल्याणं कलुषं यन्मया कृतम् । अज्ञानात्[12]ज्ज्ञानतो वापि क्षम्यतां क्षम्यतां त्वया
कूटस्थानामिदं[13] क्षेत्रमन्यस्थानामथापि वा । सुवक्तव्यं[14] त्वया सम्यक् बोधनाय इमां नृणाम् ॥२
इत्थमुक्त्वा महीपालस्तत्र तूष्णीं बभूव सः ।

शौनक उवाच –

शृण्वतां सर्वभूतानां कुंडस्थो विधिचोदितः ॥ २३ ॥
परित्यागाय चैतेषां स्वनाशाय नृपात्मजाः । राजकीर्त्यै तथा ख्यात्यै गदति स्म नराधमः ॥२४॥
इदं कोटीश्वरस्थानं ज्ञातव्यं नात्र संशयः । इमं शब्दं समाकर्ण्य पिशुनाः पापकारिणः ॥ २५ ॥
श्रूयतां मनुजैः सर्वैः भवद्भिर्लोककंटकैः । अपहृत्य मदीयं च भवद्भ्यो वै ददात्यसौ ॥ २६ ॥
इति संलापयंतस्ते मेनिरे कृतकृत्यतम् ।

शौनक उवाच –

एतस्मिन्नंतरे व्योम्नि जनमाश्चर्यकारिणी ॥ २७ ॥
निजभर्तृस्नेह एव तथा कोटीश्वरस्य च । प्राप्नोति जनतापौघः शंकयैवामितप्रभौ ॥ २८ ॥
स्वप्रभावं दर्शयन्ती निजगादाथ तान्प्रति । नत्वा गीर्भूमिसंबंधा जाता नरसुखा ध्रुवम् ॥ २९ ॥
कोटीशस्था जनाः सर्वे वंचकाः पापचारिणः । अस्मिन्नर्थे महाराज शपामि शिवपादयोः ॥३०॥
इत्युक्त्वा सा भगवती तत्रैवांतर्हिताभवत् । तदा तद्वाक्यमाकर्ण्य रोमांचितकलेवरः ॥ ३१ ॥
तस्थौ मुहूर्तं धर्मात्मा जडीभूतः सविस्मयः । ग्रामस्थानां पुरोभागे भूमिं खात्वा प्रदृष्टवान् ॥३२॥
कृमिसंकुलितं मांसं भूतं पुरुषविग्रहम् । स राजा विस्मितो भूत्वा क्रोधात्संरक्तलोचनः ॥३३॥

---

१ विचिन्वाथ । २ वदत्येषां । ३ भृष० । ४ ग्रहं । ५ कर्मणः । ६ कश्चित् स्थीयन्ते ते प्रपूरयेत् । ७ स्वगतं । ८ प्राप० । ९ जुगुप्सु । १० ययुर् । ११ देहि । १२ अज्ञानाज्ञा० । १३ कूटस्थानमिदं । १४ वास्तव्यते ।

व्हां विचार करून राजा म्हणाला, आम्ही सर्वजण या खरें-खोटें सांगणाऱ्या पृथ्वीसच र्थना करूं या. जो खोटा पक्ष असेल तो जळून जाईल. हें ऐकून सभेंतील लोक हर्षभरित ाले. याप्रमाणें ठरल्यावर राजानें हेरांना आदेश दिला कीं, बत्तीस गांवांतील स्वधर्मनिष्ठ ाह्मणांना सत्वर बोलावून आणा; कारण ते अत्यंत मानी व पूज्य आहेत. ११-१२. पुढील ाम मी करतों. अशी आज्ञा करून राजा राजवाड्यांत गेला.

शौनक म्हणाला, त्याच रात्रीं कोटीश्वरस्थ धूर्त लोकांनीं सीमाभागांत एकत्र जमून ाणी लागेपर्यंत फावड्यांनीं अतिवेगानें खड्डा खणून त्यांत एक मनुष्य ठेविला ! व तो खड्डा रून भरून पूर्ववत् व्यवस्थित केल्यावर सर्व जण आपआपल्या घरीं गेले. १३-१५.

नंतर बत्तीस गांवांतील लोकांना घेऊन हेर लोक आले. त्यांनीं राजाजवळ जाऊन आशीर्वाद दिले व त्या वेळेस योग्य असें भाषणही केलें. नंतर वसुराजा सर्व लोकांना बरोबर ेऊन सीमाभागाकडे आनंदानें गेला व सोबत पूजा साहित्यही नेलें. तेथें ज्योतिषी, तांत्रिक, तुतारी वाजविणारे व कोटीश्वरग्रामवासी लोकही उपस्थित झाले. गंध, फूल, अक्षता, धूप, नैवेद्य, चंदन इत्यादि उपचारांनीं यथासांग पूजा करून झाल्यावर पूर्वी ठरल्याप्रमाणें राजानें हात जोडून नम्रपणें प्रार्थना केली. १६-२०. राजा म्हणाला, हे देवी, आमचें कल्याण कर. जव माझ्याकडून जाणतेपणीं किंवा अजाणतेपणीं अपराध घडला असेल, तर त्याची तूं क्षमा कर. २१. हा सीमाभाग कूटस्थांचा आहे कीं दुसऱ्यांचा आहे? हें तूं या सर्व लोकांना चांगलें समजेल अशा स्पष्ट रीतीनें सांगावें. एवढें बोलून राजा थांबला.

शौनक म्हणाला, तो कुंडांतील अधम पुरुष दैवानें प्रेरणा केल्याप्रमाणें सर्व प्राणिमात्रांना ऐकूं येईल अशा रीतीनें बोलूं लागला. त्याचें तें बोलणें ह्या लोकांच्या त्यागासाठीं, स्वतःच्या नाशासाठीं, तसेंच राजाच्या कीर्तिसाठीं व प्रसिद्धीसाठीं होतें. २२-२४. तो पुरुष म्हणाला, ही जागा कोटीश्वराची आहे, यांत संशय नाहीं. हें वचन ऐकून पापी व दुष्ट कोटीश्वरस्थ लोक म्हणाले, लोक हो ऐका, तुम्ही सर्व लोक लोककंटक आहांत. हा राजा आमच्या जागा हिसकावून घेऊन त्या आपणांस देत आहे ! असें म्हणून ते स्वतःस कृतकृत्य मानूं लागले.

शौनक म्हणाला, इतक्यांत आश्चर्यकारक आकाशवाणी झाली. ती जमिनीसंबंधीं होती, म्हणून ती वाणी ऐकून लोकांना आनंद झाला. २७ व २९. ती अशी : हे सगळे कोटीशस्थ लोक पापी व लुच्चे आहेत. महाराज, हें मी तुम्हांला शिवचरणाची शपथ घेऊन सांगत्यें. ३०. असें बोलून ती देवी लगेच अंतर्धान पावली. तें वचन ऐकून राजाच्या शरीरावर रोमांच उभे राहिले. ३१. तो धार्मिक राजा आश्चर्यानें क्षणभर निश्चल राहिला. त्यानें ग्रामस्थांसमोर ती जागा खणून पाहिली. तेव्हां त्यांना तेथें पुरुष शरीराचा कृमींनी भरलेला एक मांसगोळा दिसला ! तो पाहून राजाचे डोळे रागानें लाल झाले. ३२-३३.

ग्रामस्थानां पुरोभागे सर्वस्वमपहृत्य च । असाक्षिवादिनां तत्र ग्रामस्तेभ्यः प्रदत्तवान् ॥३४
परित्यागपरीत्यागतैरेव तु विधीयताम्। इति निर्दिश्य भगवान् गच्छति स्म पुरं प्रति ॥ ३५
अथ ते ब्राह्मणाः सर्वे लीलया नतमस्तकाः । असाक्षवादिनो यूयं पतिताः पापमंत्रिताः ॥ ३६
अस्थाना अश्लाघनीयाः सर्वकर्मबहिष्कृताः। अस्मिन्ग्रामे विवाहादिर्वर्जनीयो भविष्यति ॥३७
शश्वेत्थमनृताद्भूप महाप्रज्ञा दृढव्रताः । ग्राममन्यं समासाद्य जग्मुस्ते स्वं निवेशनम् ॥३८
परित्यक्तास्ततः सर्वे वार्धेस्तीरमुपाश्रिताः। स्थिताः षण्मासपर्यंतमदक्षा व्याकुलेंद्रियाः ॥३९

शौनक उवाच –

यदृच्छयागतः श्रीमान् विमतस्थापितो महान्। ततो दूरे समायांतमहस्करमहद्युतिम् ॥४०॥
ऊर्ध्वपुंड्रांकितं शांतं ललाटे चोर्ध्वपुंड्रकम्। आमूलमुद्रांकितबाहुदंडं मध्ये समावेशितचैलखंडम्
वामे करे प्रौद्धतवेणुदंडमंते युगे माध्वमतप्रचंडम् । पुनश्च मुद्रांकितसर्वगात्रं वामे करे संस्थितनीलपत्रम् ॥ ४२ ॥
कृपासमालोकितवामनेत्रं ध्यायंतमीशं हृदि पक्षिपत्रम् । कंठे समाश्लिष्टसुपद्ममालां ब्रह्मांडापिंडीकृतपिंडजालम् ॥ ४३ ॥
ध्यायंतमीशस्य नृसिंहलीलां ध्यायंतमाद्यं हृदि लोकरूपम् । तं दृष्ट्वा दंडवद्भूमौ मुनिं मंदारसंनिभम् ॥ ४४ ॥
वदंतं स्वमतं सम्यक् पेतुश्चरणयोर्मुदा। उचुस्तेषां चरित्राणि ह्यसाक्षित्वेन निंदिताः ॥ ४५ ॥
पाहि पाहि महाभाग कृपालो दीनवत्सल ।

शौनक उवाच –

इत्याकर्ण्य वचस्तेषां शोकपूरितदिङ्मुखम् ॥ ४६ ॥
उद्धरिष्याम्यहं विप्राः क्षणादेव न संशयः। कृपाकरः स भगवानित्युक्त्वा चाभयं ददौ ॥४७॥
तप्तमुद्रांकितं कृत्वा मंत्रं चेत्थं हराभिधम् । तथाष्टाक्षरमंत्रं च विष्णुनामान्हिकं शुभम् ॥
ऋषिश्च वामदेवाख्यश्छंदोऽनुष्टुप्प्रकीर्तितः । तथा नारायणो देवः कैवल्यार्थप्रदायकः ॥ ४९ ॥
पुरा चक्रधरः श्रीमान्हितमामुक्तवान्किल । कंठे च तुलसीदाम ललाटे चोर्ध्वपुंड्रकम् ॥ ५०
मुखे पंचाक्षरं यस्य विष्णुरेव न संशयः। बहुनात्र किमुक्तेन कुर्वंतु मम शासनम् ॥ ५१ ।

शौनक उवाच –

स्थापयित्वा ततो योगी प्रययौ तैश्च सत्कृतः। निष्कलंकाश्च ते विप्रा गुरोर्वचनगौरवात् ॥५२॥
तस्मिन्ग्रामे निवासं च पुनश्च नृपशासनात् । वेदवाक्यात्परित्यक्ता निर्भीताः संचरंत्यहो ॥५३॥
तेषां दर्शनमात्रेण पातित्यं लभते नरः । प्रायश्चित्तमहं वक्ष्ये षष्ठकालशतं चरेत् ॥ ५४ ॥*
इति श्रीस्कंदपुराणे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे शिवगणेशसंवादे पातित्यग्रामकथनं नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

---

१ परित्यागात्सरीत्यागं

यासाठीं त्यानें सर्व ग्रामस्थांसमक्ष खोटी साक्ष देणाऱ्याचें सर्वस्व घेऊन तो गांव त्या गंतिवादींना देऊन टाकला. ३४. नंतर ईश्वरी लीलेनें नतमस्तक झालेल्या त्या ब्राह्मणांनीं त्यांना शाप दिला कीं तुमचे विचार पापी आहेत, तुम्ही खोटी साक्ष दिली आहे, म्हणून तुम्हांला स्वतःचें असें स्थान राहणार नाहीं. तुम्ही निंद्य व सर्वकर्मबहिष्कृत व्हाल आणि या गांवांत तुम्हांला विवाह वगैरे वर्ज्य होतील. ३५–३७.

हे राजा, याप्रमाणें खोटें बोलल्याबद्दल त्यांना शाप देऊन ते दृढव्रत व महाबुद्धिमान् ब्राह्मण दुसऱ्या गांवांत आपआपल्या घरीं गेले. ३८. याप्रमाणें ते पूर्णबहिष्कृत लोक गोंधळलेल्या स्थितींत समुद्रतीरावर येऊन सहा महिने राहिले. ३९.

शौनक म्हणाला, या अवधींत एक महान् योगी सहज तेथें पोंहोचला. त्यानें पृथ्वीवर एका विशिष्ट मताची स्थापना केली होती. त्याचें तेज सूर्यासारखें असून त्याच्या शरीरावर ऊर्ध्व पुंड्र होते व मुद्रा शांत होती. सर्व बाहुदंड मुद्रांकित असून त्यावर वस्त्र परिधान केलें होतें. ४०–४१. त्याच्या डाव्या हातांत वेणुदंड होता. तो योगी म्हणजे कलियुगांतील मूर्तिमंत प्रचंड माध्वमत होतें. फार काय, त्याचे सर्व अवयव मुद्रांकित असून त्याच्या डाव्या हातांत एक नीलपत्र होतें. त्याच्या सुंदर नेत्रांत पूर्ण कृपा होती. त्याच्या हृदयांत गरुडवाहन श्रीविष्णूचें चिंतन चालू होतें. गळ्यांत सुंदर कमलमाला शोभत होती. तीं कमळें सर्व ब्रह्माण्डांच्या अनेक लहान लहान गोलकांप्रमाणें भासत होतीं. ईश्वराच्या नृसिंहलीलेचें व आद्य विश्वरूपाचें चिंतन तो करीत होता. अशा त्या मंदार पर्वतासारख्या मुनीला दंडवत प्रणाम करून त्या लोकांनी आपली सर्व हकीगत सांगितली व शेवटीं ते म्हणाले, हे महाभाग्यवंता, तूं कृपाळू व दीनांचा कनवाळू आहेस. आमचें रक्षण कर, रक्षण कर.

शौनक म्हणाला, हें त्यांचें वचन ऐकून व शोकपूर्ण असें त्यांचें दीन वदन पाहून कृपावंत भगवंतांनीं त्यांना अभय दिलें व म्हटलें, विप्रांनों, मी तुमचा उद्धार निश्चित एका क्षणांत करतों. ४२–४७. असें बोलून त्यानें त्यांचें शरीर तप्त मुद्रांकित केलें. राज म्हणण्याचा 'हर' नामक मंत्र व विष्णूचा अष्टाक्षरी मंत्र ( ॐ नमः वासुदेवाय ) त्यांना दिला. त्या मंत्राचा ऋषि वामदेव, छंद अनुष्टुप, देव ज्ञानमुक्ति देणारा नारायण असल्याचें त्यानें सांगितलें. ४८–४९.

पूर्वीं चक्रधारी श्रीविष्णूनेंही हा कल्याणाचा मार्ग सांगितला होता. तो असा कीं ज्याच्या कंठांत तुळसीची माळ, ललाटावर ऊर्ध्वपुंड्र व मुखांत श्रीनारायणाचा पंचाक्षरी मंत्र असेल तो निःसंशय भगवान् विष्णूच होय. विशेष सांगण्याची आवश्यकता नाहीं. तुम्ही माझी आज्ञा पाळा. ५०–५१.

शौनक म्हणाला, त्या योग्यानें त्यांची तेथें स्थापना केली. नंतर अशाप्रकारें त्या विप्रांनीं त्याची पूजा केल्यावर तो तेथून निघून गेला. गुरुवचनांवर श्रद्धा ठेवल्यामुळें निष्कलंक बनलेले ते ब्राह्मण त्याच गांवांत निर्भय होऊन राजाज्ञेनें राहूं लागले, पण वेदवचनांपासून दूर झाले. ५२–५३. म्हणून त्यांच्या केवळ दर्शनानें मनुष्याला पातित्य प्राप्त होतें. यासाठीं मी षष्ठकालशत नांवाचें प्रायश्चित आचरण्यास पुढें सांगणार आहे. ५४.

# अथ त्रयोदशोऽध्यायः

## शूद्रोत्पत्तिः ।

शतानीक उवाच –

विचित्रमिदमाख्यानं[1] विचित्रं त्वन्मुखोद्गतम्। भूयोऽपि श्रोतुमिच्छामि वद माहात्म्यमुत्तमम्॥

शौनक उवाच –

शृणु राजन्प्रवक्ष्यामि सकलं[2] च कथां पुनः । पुरा शतविसंतूनां गार्भिणीनां नरोत्तम ॥ २ ॥

नानादेशोद्भवानां च वृत्तांतं प्रवदामि ते । अंगवंगकलिंगेभ्यः सौराष्ट्राद्गुर्जरात्तथा ॥ ३ ॥

आंध्रद्राविडकर्नाटकाश्मीरेभ्यस्तथैव च । करहाटमहाराष्ट्रसिंधुमागधतो[3] नरैः ॥ ४ ॥

गौडगोराष्ट्रदेशाभ्यां परित्यक्ता वितंतवः । संजाताः पूर्वगर्भिण्यः कृताः श्राद्धविगर्हिताः ॥५॥

कल्पनारहिता नार्यः क्षुत्पिपासार्तिपीडिताः । मिलित्वा ताः समायातास्तुंगभद्रातटं नृप ॥६॥

तीरस्थमद्वयं शांतं विरूपाक्षं महेश्वरम् । नार्यः सर्वाः समाविष्टाः स्तुतिं कर्तुं प्रचक्रमुः ॥७॥

तत्रापश्यन्महाभागं नासाग्रकृतलोचनम् । कण्वं नाम महाभागं शतघस्त्रो[4]धिकप्रभम् ॥ ८ ॥

ऊचुः प्रांजलयः सर्वाः स्ववृत्तांतं पृथक् पृथक् । का गतिर्नो वद मुने निंदितानां च मादृशाम्॥

किं कुर्मः कुत्र गच्छामः श्रेयो मरणमेव नः ।

शौनक उवाच–

गर्भिणीवचनं श्रुत्वा कृपालुर्वाक्यमब्रवीत् ॥ १० ॥

उपत्यकायां क्रोडाद्रेरासाते शंकराच्युतौ । तयोः समीपे वाराही सह्यशैलसमुद्भवा ॥ ११ ॥

तस्याः कूले तपस्यंतं सर्वक्षत्रकुलांतकम् । भार्गवं तं महाभागं शरणं व्रजत द्रुतम् ॥ १२ ॥

इति तस्य वचः श्रुत्वा मुनिं नत्वा पुनः पुनः । यत्रास्ते करुणासिंधुस्तत्रैव समुपागताः ॥१३॥

नदीकूले तपस्यंतं वैश्वानरसमद्युतिम् । ईदृशं भार्गवं दृष्ट्वा तस्यांतिकमुपाविशन् ॥ १४ ॥

रक्ष रक्ष महाभाग सर्वभूतदयानिधे । दुःखान्नस्तारय विभो भज्यमाना नुं[5] सुदुःसहात् ॥१५

इत्थमाक्रंदिताः पेतुः पादोपांते नृपात्मज । त्वया दत्ता वयं तै ब्रह्मन्दूषिताः पापकारिणः ॥१६*

उद्धारय दयासिंधो मृतप्राया हतश्रियः ।

शौनक उवाच–

तासां वाक्यमथाकर्ण्य कृपालुर्भृगुनंदनः ॥ १७ ॥

दर्शयन्स्वप्रभावं च सांत्वयामास भार्गवः । उद्वहन्निव नेत्राभ्यामभयं दत्तवान्मुनिः ॥ १८ ॥

का विपत्तिश्च संप्राप्ता सर्वं वदत सुव्रताः । क्षणार्धेन तथा नश्येद् भयं मा कुरुताधुना ॥१९॥

कराभ्यामंजलिं कृत्वा प्रोचुर्भार्गवसंमुखे । भो भार्गव महाप्राज्ञ दयालो क्षत्रियांतक ॥ २० ॥

प्राग्जन्मचरितं वृत्तं भुज्यतेऽस्माभिरीदृशम्। स्वबंधुभिः परित्यक्ता मंदभाग्या निराकृताः ॥

---

१ आख्यातं । २ पुरपुनः । ३ मागधतैर् । ४ आदिकं प्रभं । ५ भंगमानेव दुःखदात् ।

# अध्याय १३ वा

## शूद्रोत्पत्ति

शतानीक म्हणाला, शौनका, तुझ्या मुखांतून निघालेलें हें विचित्र आख्यान मी ऐकलें ! पुनः आणखीही उत्तम आख्यान मी ऐकूं इच्छितों. तरी एक उत्तम असें आख्यान सांगा. १.

शौनक म्हणाला, हे राजा, मी एक आख्यान सांगतों. तें तूं आपल्या पत्नीसह श्रवण कर. निरनिराळ्या देशांतील शंभर गर्भवती विधवा स्त्रियांचा वृत्तान्त सांगतों.

एकदां अंग, वंग, कलिंग, सौराष्ट्र, गुर्जर, आंध्र, द्राविड, कर्नाटक, काश्मीर, करहाट, महाराष्ट्र, सिंध, मागध, गौड व गौराष्ट्र, या देशांतील विधवा स्त्रिया गर्भवती झाल्या. म्हणून पुरुषांनीं त्यांना श्रद्धादि कोणत्याही कर्माला निंद्य ठरवून त्यांचा त्याग केला. २–५. विचारमूढ व क्षुधातृषाकुल अशा त्या विधवा स्त्रिया एकत्र जमून तुंगभद्रा नदीच्या तीरावर अद्वय, शांत, विरूपाक्ष अशा महेश्वराकडे येऊन त्या देवाची स्तुति करूं लागल्या. ६–७. तेथें त्यांना नासाग्रीं दृष्टि लावून ध्यानस्थ बसलेला महाभाग कण्वप्रभु दिसला. ८. त्या सर्वांनीं त्याला हात जोडून आपआपला निरनिराळा वृत्तांत निवेदन केला व विचारलें कीं, आमच्यासारख्या निंदित स्त्रियांचें पुढें काय होणार ? आम्ही काय करावें ? कोठें जावें ? कीं आम्हांला मरणच श्रेयस्कर आहे ? ९.

शौनक म्हणाला, त्या गर्भवतींचें भाषण ऐकून तो दयाळू मुनि म्हणाला, क्रोडाद्रीच्या पायथ्यापाशीं हरि–हरांचीं देवस्थानें आहेत. त्यांच्या जवळच सह्यपर्वतावर उगम पावलेली वाराही नदी वहात आहे. तिच्या तीरावर सर्व क्षत्रियकुलांतक महाभाग भार्गवराम तपश्चर्या करीत आहे. तुम्ही त्यालाच लवकर शरण जा. १०–१२. हें त्याचें वचन ऐकून व पुनः पुनः त्याला प्रणाम करून त्या सर्व स्त्रिया करुणासागर भार्गवाकडे आल्या. १३. भार्गवराम नदीतटावर तप करीत होता. त्यावेळीं तो अग्नीसारखा तेजस्वी दिसत होता. त्याच्या जवळ जाऊन आक्रोश करीत त्या म्हणाल्या, हे महाभाग, आमचें रक्षण कर. हे दयासागरा, दुःसह दुःखानें आमचे तुकडे तुकडे होत आहेत. १४–१५.

याप्रमाणें आक्रोश करून त्यांनीं त्याच्या चरणांवर लोटांगण घातलें. हे ब्रह्मन्, आमच्याकडून पाप घडल्यामुळें आम्ही दूषित झालों आहों. दयासिंधो, आम्ही निस्तेज व मृतप्राय बनलों आहों. आमचा उद्धार कर. शौनक म्हणाला, त्यांचें तें भाषण ऐकून कृपाळू भार्गवानें त्यांना आपला प्रभाव दर्शविला व त्याचें सांत्वन केलें. त्यानें जणूं नेत्रांनींच त्यांचा उद्धार केला व त्यांना अभय दिलें. १६–१८.

निष्ठावंत स्त्रियांनों, तुमच्यावर कोणती आपत्ति आली आहे, तें सांगा. एका क्षणांत ती आपत्ति दूर होईल. आतां निर्भय होऊन रहा. १९. भार्गवासमोर हात जोडून त्या म्हणाल्या, हे महाप्राज्ञ क्षत्रियांतक भार्गवा, तूं दयाळू आहेस. आम्ही आमच्या पूर्वजन्मींच्या कर्माचें हें फळ भोगीत आहों. नातलगांनीं टाकल्यामुळें बहिष्कृत व दुर्दैवी बनलों आहोंत ! २०–२१.

प्राणान्मोक्तुमधैर्यत्वाद्गच्छामो नियतेर्बलात् । पूर्वपुण्यप्रभावेन त्वद्दर्शनमभूद्विभो ॥ २२ ॥
कृपां कुरु भृगुश्रेष्ठ पालयास्मान्द्विजोत्तम ।
शौनक उवाच –
इति तासां वचः श्रुत्वा चाभयं दत्तवान्किल ॥ २३ ॥
इतः षड्योजनाद्दूरे गोकर्णेशस्य सन्निधौ । तत्र न्यग्रोधवृक्षोऽस्ति योजनद्वयमंडितः ॥ २४ ॥
तत्र स्थानं प्रकुर्वंतु निर्भीत्या मम शासनात् । विवाहनासाभरणं विना पादांगुलीयकम् ॥ २५
धार्यतां श्रेष्ठं वः सम्यगाकल्पांतं भविष्यति । संजातानां च युष्माभिः संयुतानां च लक्षणैः ॥२६
तनुजानां तनुजेभ्यो वरं दत्त्वा महामुनिः । पश्यतां सर्वलोकानां तत्रैवांतरधीयत ॥ २७ ॥
अथ तस्य वचः श्रुत्वा न्यग्रोधं समुपाविशन् । तत्र स्थानं समासाद्य ग्रामस्थानामथाज्ञया ॥२८
सुखेन न्यवसन्भूप भार्गवस्याज्ञया तदा । काश्चित्कन्याः सुषुविरे काश्चित्पुत्रान्प्रपेदिरे ॥ २९ ॥
स्वेषु स्वेषु च संबंधं चक्रुरन्योऽन्यमार्गतः । तदाप्रभृति ते सर्वे राजंते भुवने बत ॥ ३० ॥
तासु जाता महाभागाः शूद्रा एव न संशयः । तेषां संसर्गमात्रेण पातित्यमनुगच्छति ॥३१॥
तत्पापविनिवृत्त्यर्थं मार्तंडमवलोकयेत् । बहुनात्र किमुक्तेन पुनरन्यं वदामि ते ॥ ३२ ॥
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे उत्तररहस्ये शूद्रोत्पत्तिर्नाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

# अथ चतुर्दशोऽध्यायः ।

## पातित्यग्रामनिर्णयः ।

शौनक उवाच –
द्वात्रिंशद्ग्रामवासिभिः परित्यक्ता नराधमाः । किरातकन्यासंसर्गात्प्रचरंति निराकृताः ॥ १ ॥
चतुर्विंशत्यर्भकाणां डोलना सकुटुंबिनाम् । सततं दुश्चरित्राणां विभवं प्रवदामि ते ॥ २ ॥*
पुरा ध्वजोत्सवे रम्ये चंद्रदत्ते नराधिपे । नानादेशात्समायाता नानावर्णा द्विजातयः ॥ ३ ॥
ब्राह्मणक्षत्रविट्शूद्रा विवर्णाः शबरादयः । सर्वे ते चोत्सवं दृष्ट्वा जग्मुस्तत्र यथागताः ॥ ४ ॥
जनसंमर्दतः काचित्कन्या शबरसंभवा । व्यत्यस्ताभूत्तदा भूप सुंदरी पंचहायना ॥ ५ ॥
गुर्जरग्रामगाः केचित् वंचयित्वाथ बालिकाम् । तस्मिन्नेव तदा रात्रौ तां गृहीत्वा ययुर्गृहान् ॥
दुःखिता बांधवास्तस्या मातृभ्रात्रादयस्तथा । अदृष्ट्वा बालिकां सर्वे भृशं ते दुःखमापुः ॥ ७ ॥
दिनत्रयमथो गत्वा क्लेशयित्वा पुरं ययुः । अतीव धूर्तास्ते विप्राः पुपुषुस्तां पुलिंदजाम् ॥ ८
तयान्यग्रामवर्यस्य सूनोरुद्वाहः क्रियते । शबरी ते विधानेन चक्रदेवेन चोदिता ॥ ९ ॥
व्यतीते षोडशे वर्षे सा सुता शुभलक्षणा । तनया मंगलापांगी ताराधिपकलानना ॥ १० ॥
पुत्रान्प्राप क्रमात्सा तु सर्वावयवसुंदरान् । इत्थं प्रवर्तमानाया व्यतीयुर्बहवः समाः ॥ ११ ॥

प्राणत्याग करण्याचें धैर्य न झाल्यानें भटकत असतां दैवबळानें व पूर्वपुण्याईनें आम्हांस तुमचें दर्शन घडलें ! २२.

हे द्विजोत्तम भृगुश्रेष्ठा, कृपा करून आमचें रक्षण करा. शौनक म्हणाला, हें त्यांचें बोलणें ऐकून भार्गवानें त्यांस अभय दिलें; २३. व तो म्हणाला, येथून सहा योजन दूर अंतरावर गोकर्णेश्वराजवळ दोन योजन विस्तृत असा एक वटवृक्ष आहे. २४. माझ्या आज्ञेवरून तुम्ही तेथें निर्भयपणें रहा. पायांतील अंगुलीयकाशिवाय विवाहचिन्ह म्हणून फक्त नासाभरण धारण करावें. यामुळें तुमचें कल्पकालपर्यंत कल्याण होईल. तसेंच तुमच्या सुलक्षण संततीचें कल्याण होईल. २५–२६. याप्रमाणें त्या स्त्रियांच्या वंशालासुद्धां वर देऊन भार्गवमुनि सर्व लोकांसमक्ष तेथेंच अंतर्धान पावला. २७.

नंतर त्याचें तें भाषण ऐकून सर्व स्त्रिया त्या वटवृक्षाजवळ जाऊन राहिल्या. तें स्थान मिळाल्यावर तेथें ग्रामस्थांच्या व भार्गवाच्या आज्ञेनें सुखानें राहूं लागल्यावर कांहीं स्त्रियांना पुत्र व कांहींना कन्या झाल्या. २८–२९. त्यांनींही विविध मार्गांनीं आपसांतच संबंध ठेविला. तेव्हांपासून ती सर्व मंडळी जगांत नांदू लागली. ३०. त्यांचे ठिकाणीं जन्मलेली सर्व संतति शूद्रच होय. त्यांच्या केवळ संसर्गानें मनुष्याला पातित्य प्राप्त होतें. ३१. हें पातित्य दूर करण्यासाठीं सूर्यावलोकन करावें. याविषयी अधिक काय सांगावें ! तुला आणखी एक कथा सांगतों. ३२.

## अध्याय १४ वा

## पातित्यग्रामनिर्णय

शौनक म्हणाला, किरातांच्या कन्यांशीं संबंध ठेवल्यामुळें बत्तीसग्रामस्थांनीं वाळींत टाकलेले नराधम भटके बनले. १. दुराचारी बनलेल्या त्या चोवीस सहकुटुंब मूर्खांचें ऐश्वर्य मी तुला सांगतों. २. पूर्वी चंद्रदत्त नांवाचा राजा राज्य करीत असतां तेथील रमणीय ध्वजोत्सव पाहण्यासाठीं पुष्कळ देशांतून नाना वर्णाचे द्विज आले होते. ३. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र तसेंच वर्णहीन शबरादि जातीचे लोकसुद्धां आले होते. ते सर्व लोक उत्सव पाहून झाल्यावर निघून गेले. ४. त्या लोकांच्या झुंडींत कांहीं शबरकन्या हरवल्या ! त्यांत एक पांच वर्षांची सुंदर मुलगी पण हरवली होती. गुर्जर देशांतील लोक तिला फसवून व बरोबर घेऊन त्याच दिवशीं आपल्या घरीं गेले. ५–६. तिची आई, भाऊ वगैरे नातलग ती न सांपडल्यामुळें फारच दुःखी झाले. तीन दिवसपर्यंत पुष्कळ व्यर्थ खटपट करून झाल्यावर तेही आपल्या गांवीं गेले. त्या धूर्त विप्रांनी त्या शबरकन्येचें पालनपोषण केलें व गांवांतील दुसऱ्या एका वरिष्ठाच्या मुलाशीं तिचा विवाह केला. ९. ती शुभलक्षणी मुलगी सोळा वर्षांची झाली तेव्हां त्या चंद्रमुखीचे नेत्र फारच सुंदर दिसूं लागले. १०. नंतर तिला क्रमानें सर्वांगसुंदर पुत्र झाले व याप्रमाणें पुष्कळ वर्षें निघून गेलीं. ११.

ध्वजोत्सवं पुनर्द्रष्टुं तद्ग्रामस्था द्विजातयः। तया नार्या समायुक्तास्तत्पुत्रैः परिवारिताः ॥१२॥
नानादेशस्थिता विप्रा उत्सवं द्रष्टुमागताः। व्याधः सोऽपि सबंधूभिः[1] सभार्यः सहसागमत् ॥
तत्रोत्सवदिने रात्रौ तान्बंधून् दृष्टवान्किल। सा तावन्मातरं दृष्ट्वा रुरोदातीव दुःखिता ॥१४॥
उरश्च ताडयामास सा मातातीव दुःखिता। एतस्मिन्नंतरे मर्त्या हाहाकारं प्रचक्रमुः ॥१५॥
अग्रजस्य वधूं नीचा वंचयित्वा प्रयास्यति[2]। इति ते बांधवाः सर्वे राज्ञे वार्तां न्यवेदयन् ॥१६॥
भूपोऽतिविस्मितो[3] भूत्वा तामाहूय पुलिंदजाम्। किमर्थं द्विजपत्नीं त्वमपहृत्य प्रयास्यसि ॥
इति राजवचः श्रुत्वा तं प्रत्याह पुलिंदजा।

पुलिंदजा उवाच –
एषा मदीया बाला तु विनष्टाभूद्ध्वजोत्सवे[4] ॥ १८ ॥
इदानीं दैवयोगेन प्राप्ता मम कुमारिका। अस्मिन्नर्थे प्रमाणानि कुर्यां भवदनुग्रहात् ॥ १९ ॥
इत्थं विज्ञाप्य राज्ञे तु सुधीरा सा सुतान्विता। पुत्रभ्रातृसमायुक्तो ययौ व्याधः स्वमंदिरम् ॥
तस्य वाक्यमथाकर्ण्य नृपतिर्विस्मयान्वितः। निर्दहन्निव नेत्राभ्यां क्रोधात्संरक्तविग्रहः ॥२१॥
अब्रवीत्तान्सभामध्ये तथ्यं वदत भूसुराः।
शौनक उवाच –
तदा द्विजातयः सर्वानूचुर्भीत्यातिविह्वलाः[5] ॥ २२ ॥
कृतमस्माभिरागश्च[6] तत्सर्वं क्षम्यतां विभो। इत्युक्त्वा पादयोस्तस्य पेतुः पापरताधमाः ॥२३॥
अथ राजा महाप्राज्ञः सत्यधर्मरतः सुधीः। स्वीकृत्य तेषां सर्वस्वं ग्रामस्थेभ्यः प्रदत्तवान् ॥२४॥
परित्यागपरित्यागं[7] तैरेव तु विधीयताम्। इत्युक्त्वा नृपतिर्धीमान् जगाम निजपत्तनम् ॥ २५
द्वात्रिंशद्ग्रामवासिभ्यो व्रीडावनतमस्तकाः। समेत्य सहसा तत्र पापिनां ग्रामवासिनाम् ॥ २६
तेषां संपर्किणां राजन् चतुर्विंशत्कुटुंबिनाम्। चतुर्विंशत्यर्भकाणां डोलान्यादाय सत्वरम् ॥ २७
तेषां जलेषु निक्षिप्य रक्तमाल्यानि यानि च। तांश्च[8] ग्रामाद्बहिर्देशे तद्वद्गोमयवारिणा ॥ २८ ॥
तथा विसर्जयामास महाभाग दृढव्रताः। तेभ्यः श्राद्धं ततः कृत्वा विधिवत्कुंभसंज्ञितम् ॥ २९
द्वात्रिंशद्ग्राममध्ये तु न देयं स्थानमीदृशाम्। इत्याभाष्य महाभागा ययुः सर्वे यथागताः ॥
शौनक उवाच –
किं वक्तव्यं महाराजन् द्वात्रिंशद्ग्रामवासिनाम्। इत्थं प्रतिज्ञायुक्तानां माहात्म्यं सत्यवादिनाम्
ततस्ते पतिताः सर्वे प्रचरंति नराधमाः। स्थानहीनाः परित्यक्ताः सर्वकर्मबहिष्कृताः ॥ ३२ ॥
तेषां दर्शनमात्रेण पातित्यं प्राप्नुवंति हि। प्रायश्चित्तविधानं तु मया वक्तुं न शक्यते ॥ ३३ ॥
तत्रापि समकाले तु कोटिमार्तंडदर्शनात्। तदा पूता भविष्यंति नात्र कार्या विचारणा ॥
बहुनात्र किमुक्तेन ग्राममन्यं वदामि ते।
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे उत्तररहस्ये पातित्यग्रामनिर्णयो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥१४

---

१ सबंधुभ्यः। २ प्रहास्यति। ३ भूपोति विस्मयो। ४ उत्सवैः। ५ भीता। ६ रागच्छ। ७ त्यागं तैरेवतु। ८ तेषां।

पुनः एकदां त्या गांवांत ध्वजोत्सव झाला व तो पाहण्यासाठीं त्या गांवांतील सर्व द्विज व स्त्रिया आपल्या मुलांसह आल्या. १२. दुसऱ्या देशांतूनही विप्र तो उत्सव पाहण्यासाठीं आले. तो शबर–व्याधही आपली पत्नी व बांधवांसह तेथें आला होता. १३. त्या उत्सवाच्या दिवशीं आपल्या आईला व नातलगांना पाहून ती मुलगी फारच दुःखी झाली व रडूं लागली. या अवधींत तेथें जमलेल्या लोकांत फार हाहाःकार उडाला. १५. हे नीच शबर ब्राह्मण-स्त्रीला पळवूं पाहतात, अशी तक्रार तेथील ब्राह्मणांनी राजाकडे केली. १६. आश्चर्यचकित होऊन राजानेंही त्या शबरीला बोलावून द्विजपत्नीस कां नेऊं इच्छितेस असा तिला प्रश्न केला. १७.

हे राजाचें वचन ऐकून ती त्या राजाला घडलेली सर्व हकीगत निवेदन करूं लागली. शबरी म्हणाली, ही माझीच मुलगी मागें ध्वजोत्सवांत हरवली होती. आतां ती माझी कन्या मला केवळ माझ्या दैवयोगानेंच पुनः भेटली आहे. आपला अनुग्रह झाल्यास मी पुष्कळच पुराव्यांनी ही गोष्ट सिद्ध करण्यास सिद्ध आहें. १८–१९.

याप्रमाणें राजाला विनंती करून ती अत्यंत धीट स्त्री आपल्या त्या मुलीसह व पुत्र-बंधूंसह आपल्या गांवीं गेली; व तो व्याध-शबरही गेला. २०. तिचें तें भाषण ऐकून विस्मित झालेल्या राजाचे नेत्र रागानें लाल झाले! जणुं तो आपल्या डोळ्यांनीं त्या ब्राह्मणांना जाळूं पहात होता. २१. तो भर सभेंत त्यांना म्हणाला, ब्राह्मणहो, खरें सांगा.

शौनक म्हणाला, ते ब्राह्मण भीतीनें लटपटूं लागले व म्हणाले, हे राजा, आमच्याकडून हा अपराध घडला आहे. याबद्दल क्षमा करा. असें म्हणून त्या अधम ब्राह्मणांनीं राजासमोर लोटांगण घातलें. नंतर सत्यधर्मी, सुज्ञ व महाप्राज्ञ अशा त्या राजानें त्यांचें सर्वस्व हिरावून घेऊन तें सर्व ग्रामस्थांना देऊन टाकलें. २२–२४. ग्रामस्थांनींसुद्धां त्यांचा पूर्ण त्याग करावा, एवढें बोलून राजा आपल्या नगरीला निघून गेला. २५.

बत्तीसग्रामस्थांसमोर त्या सर्व विप्रांना लाजेनें अधोवदन व्हावें लागलें. त्यावेळीं सर्व लोक एकत्र जमले व त्यांनीं त्या मूर्ख व पापी अशा सहकुटुंब चोवीस ग्रामस्थांच्या डोल्या व लाल माळा पाण्यांत फेकून दिल्या. त्यांच्यांशीं संपर्क ठेवणाऱ्यांचीही तीच दशा केली व त्या सर्व मूर्खांना गांवाबाहेर हांकलून दिलें. त्यांच्या राहात्या जागेवर गोमयमिश्र पाणी शिंपडलें नंतर त्या निश्चयी लोकांनीं त्यांचें विधियुक्त घटश्राद्ध केलें. २६–२९. तसेंच बत्तीसगांवात असल्या लोकांना वस्तीस जागा देऊं नये, असें तेथील लोकांस सांगून सर्व लोक आल्यासारखे निघून गेले. ३०.

शौनक म्हणाला, हे महाराज, सत्यवादी अशा द्वात्रिंशद्–ग्रामस्थांचें सामर्थ्य अशा प्रकारचें श्रेष्ठ आहे, हें काय सांगितलें पाहिजे ! ३१. म्हणून ते सर्व नराधम पतित बनले व स्थानभ्रष्ट होऊन सर्व कर्मांत बहिष्कृत झाले. ३२. त्यांच्या केवळ दर्शनानें मनुष्याला पातित्य प्राप्त होतें, प्रायश्चित्तविधि तर मी सांगूच शकत नाहीं. ३३. तरी पण एकाच वेळीं एक कोटी सूर्यांचें दर्शन झाल्यासच तो पतित पवित्र होईल. याविषयीं विचार करूंच नये. ३४. फार काय सांगावें ! तुला आणखी एका गांवाची माहिती सांगतों.

# अथ पंचदशोऽध्यायः ।

## पातित्यग्रामनिर्णयः ।

शौनक उवाच –

पातित्यग्रामसमन्[1]यं तु चक्रनद्यास्तटे शुभे । नानाग्रामात्तदित्याहुः सर्वकर्मबहिष्कृतम् ॥ १ ॥
रामसृष्टास्तु ये पूर्वं[2]मध्यूषुः संस्थलं च ते । मयूरवर्मानीतानां विप्राणां करदायकाः ॥ २ ॥
उल्लिखं तत्क्षणाः केचित्केचिद्दारामकारिणः । वेदबाह्याः कर्मशून्यास्तंतुमात्रा द्विजातयः ॥३॥
गायत्रीजपमात्रेण ब्राह्मणा इति ते विदुः । ख्याता लोकेषु सर्वत्र स्वग्रा[3]माधय एव ते ॥ ४ ॥
देवताराधने चापि श्रुतिस्मृत्युदितेऽपि च । तेषां हारा मांसकेन भोजने [4]प्रीतिभोजने ॥५॥
मयूरवर्मा स पुरा मेधावी बलवान्महान् । बलभी नाम नगरी तस्यां किर्वतनामतः ॥ ६ ॥
रामेण निर्मितैर्विप्रैर्वाहयित्वा च वाहनम् । शिष्टान्वितान्समादाय पुनः स्वपुरमाययौ ॥ ७ ॥
ग्रामप्रदानसमये प्रोचुर्भार्गवनिर्मिताः । पुरा भार्गवरामेण साधिता भूरियं नृप ॥ ८ ॥
आहृत्य तत्कथं तेभ्यो ददाति वसुधामिमाम् । तथा वदतु मेधावी का गतिर्नो विधीयताम् ॥

शौनक उवाच –

तेषां वाक्यमथाकर्ण्य सांत्वयन्नाह पार्थिवः । ग्रामचतुष्टयं दास्ये स्थीयतां तत्र शाश्वतम् ॥१०
इत्युक्त्वा नृपतिः श्रीमान् ददौ ग्रामचतुष्टयम् । कुडालकं च पदिकं मट्टीनागाभिधं तथा ॥
आगतेभ्यो द्विजेभ्यश्च शेषां भूमिं प्रदत्तवान् । रामेण निर्मिता विप्राः स्थि[6]ता ग्रामचतुष्टये ॥
षट्कर्मरहिता ये तु राजंते भुवनेश्वर । बहुनात्र किमुक्तेन सर्वकर्मबहिष्कृताः ॥ १३ ॥
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे उत्तररहस्ये पातित्यग्रामनिर्णयो नाम पंचदशोऽध्यायः ॥१५

# अथ षोडशोऽध्यायः ।

## शिशुहत्या ।

शौनक उवाच –

वक्ष्यामि राजशार्दूल ग्राममन्यं बहिष्कृतम् । बेलंजीती तदित्याहुः सीतायाश्चोत्तररोधसि ॥ १
कृत्वा मिथुनहत्यां च प्रचरंति नराधमाः । विभवं प्रवदाम्यद्य सावधानमनाः शृणु ॥ २ ॥

---

१ मन्यस्ति । २ पूर्वारध्यूषुः । ३ स्वग्रामाविधयैव । ४ प्रतिभोजने । ५ बलभीप्रति ।
६ स्थित्वा ।

# अध्याय १५ वा

## पातित्यग्रामनिर्णय

शौनक म्हणाला, चक्रनदीच्या सुंदर तटावर पूर्वी सांगितलेल्या नाना प्रकारच्या गांवांहून नेराळा असा आणखी एक पातित्यग्राम आहे. त्यावर लोकांनीं पूर्ण बहिष्कार टाकला होता. १. परशुरामानें निर्माण केलेले जे ब्राह्मण तेथें पूर्वी राहात होते, त्यांना मयूरवर्म्यानें आणलेल्या ब्राह्मणांना कर द्यावा लागत होता. २. त्यांपैकीं कित्येक ब्राह्मण बागबगीचा करणारे वेदबाह्य व कर्महीन असून केवळ सूत्रधारी ब्राह्मण होते. ३. फक्त गायत्रीजप केल्यानें मनुष्य ब्राह्मण होतो असा त्यांचा समज होता. ग्रामस्थ लोक त्यांना ‘गांवातील रोग’ असेंच समजत असत. ४. भोजन, प्रीतिभोजन व देवपूजा यामध्यें, फार काय, श्रुतिस्मृतिप्रतिपादित कर्मांमध्येंसुद्धां यांच्या अन्नांत मांस असे. ५.

पूर्वी मयूरवर्मा नांवाचा एक मोठा बुद्धिमान् व बलवान् राजा होऊन गेला. त्यानें बलभी नांवाची नगरी निर्माण केली होती. तेथें किर्वेत नांवाचा एक गृहस्थ रहात होता. ६. त्यानें परशुरामनिर्मित ब्राह्मणांना आपलें वाहन वाहून नेण्यास लावलें व कांहीं विशिष्ट लोकांना आपल्या बरोबर घेऊन पुनः तो गांवीं आला. ७. पुढें एकदां ग्रामदानाच्या वेळीं भार्गवाचे ब्राह्मण म्हणाले, हे राजा, ही पृथ्वी पूर्वी भार्गवरामानें निर्माण करून आम्हांस दिली होती. तीच भूमि तूं ह्या आतांच आणलेल्या ब्राह्मणांना दान कशी देऊं शकतोस? तूंच सांग. तूं बुद्धिमान् आहेस. आमची कांहीं तरी व्यवस्था करावी. ८-९.

शौनक म्हणाला, त्यांचें वाक्य ऐकून त्यांचें समाधान करण्यासाठीं राजा म्हणाला, मी तुम्हांला चार गांवें देतों. तेथें तुम्ही कायम वस्ती करून रहावें. १०. असें बोलून त्या श्रीमान् राजानें त्यांना चार गांवें दिलीं. तीं अशीं:—कुडालक, पदिक, मट्टी व नाग. ११. नंतर आलेल्या त्या ब्राह्मणांना बाकीची जागा दिली आणि भार्गवनिर्मित विप्र त्या चार गांवांत राहूं लागले. १२. हे राजा, ते षट्कर्महीन द्विज म्हणून प्रसिद्ध झाले. विशेष सांगण्यांत काय अर्थ आहे? ते सर्व कर्मांत बहिष्कृत बनले. १३.

# अध्याय १६ वा

## शिशुहत्या

शौनक म्हणाला, हे श्रेष्ठ राजा, सीतानदीच्या उत्तरतीरावरील दुसऱ्या एका बेलंजीती नांवाच्या बहिष्कृत गांवाची माहिती सांगतों. १. त्या गावांतील एक नराधम एका जोडप्याची हत्या करून यथेच्छ भटकत होता. त्याच्या वैभवाची माहिती मी आज तुला सांगतों. ती तूं एकाग्र मनानें ऐक. २.

आसीत्पुरा वीरभूपः पुरंदरसमद्युतिः। धन्विनामग्रणीः श्रेष्ठो यं विदुर्भूपुरंदरम् ॥ ३ ॥
सर्वकामसमृद्ध्याढ्यां नगरीं रत्नमालिनीम्। प्रज्वालयन् श्रिया दीप्त्या वांच्छतीमिव सुस्थितिम् ॥ ४ ॥
जराशोकक्रमिहरां निष्कलंकां निराकुलाम्। अंतःसलिलयैन्त्राढ्यां[1] उत्क्षिप्तध्वजतोरणाम् ॥ ५ ॥
दिव्यमूलफलैर्वृक्षैः फलपुष्पोपशोभिताम्। नीलपीतसितैः श्यामैर्लोहितैश्चमरैर्मृगैः ॥ ६ ॥
लतागुल्मैः परिवृतां रक्तमंजीरधारिभिः। पुष्पिताग्रा महाशाखाः प्रवालांकुरधारिणः ॥ ७ ॥
लताविंतानसंच्छन्ना नदीषु सरसीषु च। वृक्षा बहुविधास्तत्र राजंते केतवो यथा ॥ ८ ॥
केतकाशोकबकुलाः पुन्नागतिलकार्जुनाः। चूतनिंबाश्च बदरीकदंबबकुला ध्रुवम् ॥ ९ ॥
प्रियंगुपाटलौ जंबुशाल्मल्यः प्लक्षवंजुलौ। सालतालतमालाश्च चंपकाश्च मनोरमाः ॥ १० ॥
संफुल्लपुष्पशिखरा ज्वलिताग्निशिखा इव। आम्रातकमधूकाश्च लकुटाः कुटजासनौ ॥ ११ ॥
खर्जूरनारिकेलाश्च पूगाः सप्तच्छदास्तथा। एते चान्ये च बहवः शोभंते परितः पुरीम् ॥ १२
गंधवंति च पुष्पाणि रसवंति फलानि च। उद्यानानि[2] विशालानि तत्र तत्र सरांसि च ॥१३॥
भासंते पुण्यतीर्थानि रम्याणि विमलानि च। मेरुमंदारतुल्यानि सौधानि भुवनानि च ॥१४॥
नगरीं तां विशेषज्ञः पालयामास भूमिपः। तस्य राष्ट्रे द्विजः कश्चिद्वेदवेदांगपारगः ॥ १५ ॥
यथार्थनामा[3] भगवान् आसीद्गुणनिधिः पुरा। तस्य ज्येष्ठा गुणवती द्वितीया गुणमालिनी ॥
रूपयौवनसंपन्ना भार्या बालमृगेक्षणा। स्तनंधय्याः[4] कनिष्ठाया रक्षणं कुरुते सदा ॥ १७ ॥
आदरत्वाज्जेष्ठभार्या तां कन्यामौरसीमिव। द्वितीया वक्रहृदया[5] मदं भर्तुश्च कुर्वती ॥ १८ ॥
अतीव नम्रभावेन चास्ते सा गुणमालिनी।
शौनक उवाच –
इत्थं प्रवर्तमानस्य द्विजस्य भवनं प्रति ॥ १९ ॥
गोराष्ट्रनिलयः कश्चिद्विप्रो वेदविदां वरः। शयनार्थमथायातोऽनतयः खिन्नमानसः ॥ २० ॥
दुःखेन रात्रौ शयनमकरोज्जागरं मुनिः। तस्याः क्षपाया मध्ये तु कनिष्ठा वरवर्णिनी ॥ २१ ॥
उत्थाय शयनात्तूर्णमन्वगाच्छिशुसंनिधिम्। मात्सर्यातिनिर्दयत्वाद्[6] दर्भकस्य च कंधराम् ॥२२॥
बभंज नृपशार्दूल धैर्यमालंब्य चेतसा। तं[7] शिशुं सहसा हत्वा भूयः पर्यंकमाविशत् ॥२३॥
किं वक्तव्यं दुराचारः साक्षादेवाभवत्तदा। अथ प्रभाते ज्येष्ठा सा चोत्थाय शयनात्तदा ॥
अंकगां बालिकां दृष्ट्वा रुधिरेणार्दितां तनुम्। आः किमेतदिदं घोरं हा हतास्मीत्यवोचत ॥
उदरं ताडयंती सा कराभ्यामतिविव्हला। जडीभूता क्षणेनाथ विललापातिदुःखिता ॥२६॥
आर्तस्वरं तमाकर्ण्य कनिष्ठा तीव्रभेषजम्। वैचित्र्येण महाराज प्रलापं च तथाविधम् ॥२७॥
द्वयोर्विवादं श्रुत्वा तु द्विजः खिन्नचित्तोऽभवत्। राज्ञे निवेदयामास वृत्तातं विस्तरात्तयोः ॥

---

१ यन्त्रा। २ निशितानि ततोद्यानि। ३ नाम्नः। ४ स्तनंधयीं। ५ चक्रहृदया।
६ अतिदीयत्वात्। ७ तान्।

पूर्वी धनुर्धर, श्रेष्ठ व इंद्रासारखा तेजस्वी असा एक राजा होता. म्हणून लोक त्याला लोकांचा इंद्र समजत असत. ३. जणुं दुसरी अमरावतीच अशी त्याची रत्नमालिनी नगरी सर्व श्रियांनीं संपन्न होती. त्या नगरीला तो आपल्या ऐश्वर्यानें विशेष शोभा आणीत होता. ४. रा–शोकरूपी रोग दूर करणारी ती नगरी कलंकहीन व शांत असून तेथें भरपूर जलाशय ते. सर्वत्र ध्वज-तोरणें शोभत होतीं. ५. त्या नगरींत उत्तम कंद व फळें असलेले वृक्ष व दर फुलें होतीं. निळे, पिवळे, पांढरे, सांवळे व तांबूस वर्णाचे सुंदर चमर–मृग तेथें होते. ६. ल गुच्छ धारण करणाऱ्या वेलींनीं व झुडुपांनीं ती नगरी वेष्टिली गेली होती. तेथील पुष्कळ झांवर पुष्कळ फुलें व कोमल पालवी होती. ७. नद्या व सरोवरें यांवर लताभारांनीं ओथंबलेले विध वृक्ष ध्वजांसारखे तेथें शोभत होते. ८. केवडा, अशोक, बकुल, पुंन्नाग, तिलक, अर्जुन, आंबा, लिंबू, बोर, कदंब, प्रियंगु, पाटल, जांभळ, शाल्मली, पिंपळ, वंजुल, साल, ाड, तमाल, चांफा, विकसित फुलें अग्रभागीं असल्यामुळें पेटत्या अग्निज्वालेप्रमाणें शोभणारे आम्रातक, मधूतक, लकुट, कूट, जासन, खर्जूर, नारिकेल, सुपारी, सप्तपर्ण हे व आणखीही अनेक वृक्ष त्या नगरीच्या सभोंवार शोभत होते. ९–१२. सुगंधी फुलें, रसाळ फळें, सरोवरें, रमणीय व स्वच्छ पुण्यतीर्थें जिकडेतिकडे शोभत होतीं. मेरु–मंदार पर्वतासारखी मंदिरें व वाडे यांनीं ती नगरी विशेष शोभत होती. १३–१४.

एक विद्वान् राजा या नगरीचें पालन करीत होता. अशा नगरींत गुणनिधि असें यथार्थ नाम धारण करणारा वेदवेदांगपारंगत ब्राह्मण रहात होता. १५. मोठी गुणवती व धाकटी गुणमालिनी या नांवाच्या त्याला दोन भार्या होत्या. मोठ्या पत्नीचे नेत्र बालमृगाप्रमाणें चंचल असून ती रूपयौवनसंपन्न होती. ती दुसरीच्या तान्ह्या मुलीचें स्वतःच्या मुलीप्रमाणें प्रेमपूर्वक रक्षण करीत होती. दुसरी गुणमालिनी ढोंगी असून पतीविषयीं तिला फार गर्व होता व तिच्या वागणुकींत ( दिखाऊ) नम्रपणा होता. शौनक म्हणाला, याप्रमाणें कांहीं काल गेल्यावर त्या ब्राह्मणाच्या घरीं गोराष्ट्रांतून एक मोठा वेदवेत्ता ब्राह्मण शयनासाठीं आला. तो मनांत संततीच्या बाबतींत कष्टी होता. १६–२०. तो मुनि बिछान्यावर पडून राहिला, पण त्या दुःखामुळें त्याला झोंप लागली नाहीं. मध्यरात्रीच्या सुमारास ब्राह्मणाची सुंदर कनिष्ठ स्त्री आपल्या शय्येवरून उठून चटकन आपल्या बालकाजवळ गेली; ती फार मत्सरी व अतिनिर्दय होती! तिनें अर्भकाची मान आपल्या मनांत मोठें धैर्य आणून मोडून टाकली! शिशूची हत्या करून ती लगेच पुनः आपल्या पलंगावर आली! २१–२३. काय बोलावें? दुराचार तर प्रत्यक्ष घडला होता! दुसऱ्या दिवशीं सकाळीं ज्येष्ठ भार्या आंथरुणावरून उठली, तेव्हां तिला तिच्या मांडीवरील मुलीचें शरीर विद्रूप झालेलें दिसलें. अरे हें काय? माझा घात झाला असें ती बोलूं लागली व अत्यंत विव्हळत आपली छाती दोन्ही हातांनीं बडवूं लागली! क्षणभर ती निश्चल झाली व लगेच अतिदुःखानें विलाप करूं लागली. २४–२६. तिचा तो आर्त स्वर ऐकून, कनिष्ठ स्त्रीचा निर्दयपणा व बडबड आणि त्या दोघींचें भांडण इत्यादि गोष्टींमुळें त्या शयनार्थी द्विजाचें मन खिन्न झालें; त्यानें त्या दोघींचा वृत्तांत राजाला सांगितला. २७–२८.

विप्रवाक्यमथाकर्ण्य सम्राट् स्मयमवाप सः । तदानीं मंत्रिभिः सार्धं निर्णेतुं न शशाक ह
समाहूय स मेधावी भूसुरं शयनार्थिनम् । तथ्यं वद यथा दृष्टं शंकां मा कुरु मा कुरु ॥३०॥
नृपतेर्वाक्यमाकर्ण्य भूसुरः प्राह सस्मितम् । अहो प्रागल्भ्यसिंहोऽयं युवतीजनस्यास्पदम् ।
मतंगजं विहायाद्य मशकं हंतुमुद्यतः । ध्यात्वा मुहूर्तं मनसा द्विजः सोऽपि दृढीकृतः ॥३२॥
मया प्रबोधितं वाक्यमतिक्रमितुमंजसा । राजेव शिक्षयिष्यामि न रक्षणफलं यथा ॥ ३३ ॥
इत्थं निर्धार्य विप्रोऽसौ सूनुमौरसिकं तदा । यद्वा भवतु मे पुत्रश्चेत्कृतो यदि निर्णयः ॥ ३४

विप्र उवाच –

न ज्ञातमनयोः कर्म दुष्कृतं चातिगर्हितम् । तथाप्युपायं वक्ष्यामो राजश्रेणीशिरोमणे ॥ ३५
प्रत्यग्वार्धितटे रम्ये विख्यातं नु जयंतिकम् । तस्मिन् राष्ट्रे द्विजः कश्चिच्चतुर्भिः सूनुभिः सह ।
ज्येष्ठो वेदविदां श्रेष्ठो द्वितीयः शब्दशास्त्रवित् । तृतीयो लीपिशास्त्रज्ञः कनिष्ठो न्यायविस्तरः ।
गोराष्ट्रदेशाधिपतिः सर्वज्ञोऽपि महामतिः । करोत्यस्य पुरोभागे नित्यं नीतिजनैः कृतम् ॥३८
तमानय महाबाहो प्रागल्भ्येष्वधिकं विदुः । कलुषाकलुषं सम्यक् स करिष्यत्यसंशयः ॥३९॥
विना तेन त्रिभुवने निर्णेतुं कोऽपि नास्ति हि । तथेत्युक्त्वा नरपतिर्लेखयामास पत्रिकाम् ॥
चारानाज्ञापयामास गोराष्ट्रनगरं प्रति । ते प्रापुः सत्वरं दूता ददू राज्ञे तु पत्रिकाम् ॥ ४१
लेख्यमालोकयांचक्रे गोराष्ट्राधिपतिः स्वयम् । तं तार्किकं समाहूय वदति स्म नृपोत्तमः ॥ ४२
इदानीं सार्वभौमस्य प्रेम्णा त्वं द्रष्टुमिच्छसि । विजयाख्यां पुरीं रम्यां त्वया श्वो गम्यतामिति ॥
तथा स बाढमित्युक्त्वा प्रतस्थे विप्रनंदनः ।

इति श्रीस्कंदपुराणे उत्तररहस्ये सह्याद्रिखंडे षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

# अथ सप्तदशोऽध्यायः ।

## बेलंजीतिग्रामः ।

शानक उवाच –

भाव्यवस्था न वा ज्ञाता हेलया विधिचोदितः । गोत्रेभ्यः प्रस्थितस्तूर्णं निर्जगाम शनैः शनैः ॥
तदोत्पाताः समुद्भूता दिवि भूम्यंतरिक्षगाः । विपत्प्राप्तिकरा घोरा दारुणा रोमहर्षणाः ॥ २
ननादांतर्हितो भूमौ पृषदश्वो जगर्ज च । अनेकशाखासंयुक्ता वृक्षाः पेतुः समंततः ॥ ३ ॥
विप्रस्य दक्षिणे भागे शिवा घोरा ववाशिरे । रुदंति वायसास्तस्य शशांको न चादृश्यत ॥४॥
एतान्योत्पातकादीनि मनसा न स्मरन् ययौ ।

१ जनहास्पदं । २ जात० । ३ विख्यातेति । ४ जयंतिका । ५ ष्वतिके । ६ महाज्ञातौ ।
७ सहितः । ८ ततो० । ९ पृषदंसो । १० शिला । ११ च वासिरे । १२ समदृश्यत ।

ब्राह्मणाचें बोलणें ऐकून सम्राटालाही आश्चर्य वाटलें. पण मंत्र्यांचें सहकार्य घेऊनसुद्धां त्या त्या भांडणाचा उलगडा झाला नाहीं व तो निर्णयही करूं शकला नाहीं. २९. म्हणून त्या चतुर राजानें शयनासाठीं आलेल्या ब्राह्मणाला बोलावून निक्षून सांगितलें, कीं तूं पाहिलेला सत्य वृत्तांत सांग. बिलकूल भिऊं नकोस. ३०. राजाचें हें वचन ऐकून ब्राह्मण (मनांत) हसून म्हणाला, वा! हा राजा तर चातुर्याचा सिंहच दिसतो! कारण युक्तीचा आधार असलेल्या त्या हत्तीला सोडून (माझ्यासारख्या) मच्छराला मारण्यास सिद्ध झाला! असो. त्यानें मनांत पक्का निर्धार केला कीं तो मुलगा जर या वादाचा निर्णय उत्तम रीतीनें करील, तर मी त्या मुलाला माझा औरस पुत्र समजेन. ३१–३४. असा विचार करून विप्र म्हणाला, हे राजश्रेष्ठा, मला ह्यांचें दुष्कृत्य किंवा अतिनिंद्य कर्म समजलेंही नाहीं. तथापि मी तुम्हांला एक उपाय सांगतों. ३५.

पश्चिम समुद्राच्या रमणीय तटावर जयंतिक नांवाचें एक राष्ट्र आहे. त्या राष्ट्रांत एक ब्राह्मण असून त्याला चार पुत्र आहेत. ३६. पहिला श्रेष्ठ वेदवेत्ता, दुसरा व्याकरणशास्त्रज्ञ, तिसरा लीपिशास्त्रज्ञ असून शेवटचा नीतिशास्त्रांत प्रवीण आहे. ३७. गोराष्ट्राधिपति स्वतः सर्वज्ञ व महाबुद्धिमान् असूनसुद्धां तो नेहमींच नीतिमान् लोकांचा सल्ला घेत असतो. ३८. यासाठीं तो बाहुशाली राजा, त्याला तुम्ही घेऊन या. कारण लोक त्याला चतुरश्रेष्ठ समजतात. खऱ्या-खोट्या विवादाचा निर्णय तो निःसंशय करील. ३९. त्याच्याशिवाय दुसरा कोणीही या त्रिभुवनांत निर्णय देण्यास समर्थ नाहीं! हें ऐकून व 'ठीक आहे,' असें बोलून राजानें एक पत्र लिहविलें; ४०. व हेरांना बोलावून त्यांना आज्ञा केली. त्या आज्ञेप्रमाणें दूतांनीं ती पत्रिका गोराष्ट्रनगरांत जाऊन राजाच्या हातांत दिली. ४१. गोराष्ट्राधिपानें स्वतः तें पत्र पाहिलें व तार्किकाला बोलावून त्यास म्हणाला, तुला आतां सार्वभौम राजाला भेटावयाचें आहे. त्यासाठीं तूं उद्यां सकाळीं विजयनगराकडे जा. ४२–४३. त्यावर 'ठीक आहे' असें उत्तर देऊन तो ब्राह्मणपुत्र निघाला.

# अध्याय १७ वा

## बेलंजीति गांवाची उत्पत्ति

शौनक म्हणाला, पुढील घटना त्याला समजली नाहीं. केवळ दैवानें प्रेरणा केल्याप्रमाणें लगेच तो नातलगांकडून निघाला व हळूहळू जाऊं लागला. १. तेव्हां आकाशांत भूमीवर व अंतरिक्षांत संकटसूचक उत्पात होऊं लागले. ते उत्पात घोर, भयंकर व अंगावर रोमांच आणणारे होते. पृथ्वीच्या पोटांत आवाज होऊं लागला व वारा गर्जना करूं लागला. अनेक फांद्यांसह वृक्ष चहूंकडे पडूं लागले. २–३. ब्राह्मणाच्या उजव्या भागाकडे येऊन कुत्रीं भयानक रडूं लागलीं. कावळे ओरडूं लागले. चंद्र दिसेनासा झाला. ४. पण उत्पात वगैरे कशाचीही पर्वा न करतां तो चालूं लागला.

शौनक उवाच –

दिने[1] चाष्टादशेऽतीते सार्वभौमं ददर्श सः ॥ ५ ॥

स राजा मतिमान्विप्रं मानयित्वा जगाद तम् । शिशुहत्यामि[2]मां सम्यक् विचारय महामते ॥

तच्छुत्वा द्विजशार्दूलः प्रविवेश सभांगणम् । द्विजभार्यां समाहूय प्रोवाच द्विजपुंगवः ॥ ७ ॥

ब्राह्मण उवाच –

विहाय वस्त्राभरणं तथा लज्जां विहाय या । प्रदक्षिणं करोत्याशु सभां सम्यक् सुलोचने ॥ ८ ॥

सा निष्पापा भवत्येवं नात्र कार्या विचारणा । एवमुक्त्वा द्विजवरस्तूष्णीं तत्राभवत्किल ॥ ९ ॥

शौनक उवाच –

श्रुत्वा ज्येष्ठा तदा वाक्यं हा कष्टं प्राप्तवाल्यहम्[3] । मनसा न कृतं कर्म दुर्लंघ्या नियतेर्गतिः ॥ १०

कथं कार्यप्रमाणं च हृदि स्मर्तुं न शक्यते । कलुषं वा धारयामि धैर्येत[4] निधनं मया ॥ ११ ॥

प्राणा एव परित्याज्या मानमेवाभिरक्षितुम् । अनृता अध्रुवाः प्राणाः मानमाचंद्रतारकम् ॥ १२

उत्तमा मानमिच्छंति धनमानौ हि मध्यमाः । अधमा धनमिच्छंति मानो हि महतां धनम् ॥

तस्माद्[5] मया प्रमाणानि क्रियन्ते न कदाचन । पश्यंतु[6] सर्वभूतानि त्यक्ष्यामीदं कलेवरम् ॥

इत्युक्त्वा सा गुणवती तूष्णीमेवाभवत्तदा । द्वितीयोत्थाय त्वरया वस्त्रादिरहिता सती ॥१५॥

तस्थौ तदा पुरोभागे निर्लज्जा भयवर्जिता । तां दृष्ट्वा मनुजाः सर्वे हाहाकारं प्रचुक्रुशुः ॥१६॥

क्रूरया पापरतया बालिकां[7] चानया हता । अस्मिन्नर्थे महाराज शंकां मा कुरु मा कुरु ॥१७॥

तस्याः स धैर्यतां दृष्ट्वा राजा विस्मयमागतः । दंडयित्वा शिशुघ्नां तां मानयित्वा द्विजोत्तमम् ॥

प्रेम्णा तस्मै धनं गाश्च ग्रामद्वयमदात्पुनः । अनेकवस्त्राभरणं वैजयंतीं मनोरमाम् ॥ १९ ॥

दत्वा प्रधानतां राजा विशति स्म निकेतनम् । तदाप्रभृति लोकोऽसौ प्रावर्धत दिने दिने ॥

शुक्लपक्षे शशांकस्य कलेव नृपनंदन । ग्रामद्वयं सगोत्रेभ्यो दत्तं च द्विजसत्तम ॥ २१ ॥

सुखेन न्यवसत्तत्र महान्कालो[8] न्यवर्तत ।

शौनक उवाच –

अथैनं निग्रहं कर्तुं रंध्रान्वेषणतत्पराः ॥ २२ ॥

समेत्य मंत्रिणं सर्वे प्राचीना बुद्धिजीविनः । अतीव मूर्खः संजातः सूनुस्तस्य दुरात्मवान् ॥

तस्य भार्या वरारोहा रूपयौवनशालिनी । आयताक्षा शुभश्रोणी पीनोन्नतकुचद्वया ॥ २४ ॥

---

१ दिनान्यष्टादशातीते । २ मिदं । ३ प्राप्तवानहं । ४ न धार्ये । ५ तस्मादहं प्रमाणानी कदाचिदपि नाक्रिये । ६ पश्यंती । ७ बालकी । ८ महत्कालो ।

शौनक म्हणाला, याप्रमाणें अठरा दिवस निघून गेल्यावर तो सार्वभौम राजाला भेटूं
ला. ५. त्या ब्राह्मणाचा सन्मान करून तो बुद्धिमान् राजा त्याला म्हणाला, हे महामते,
। शिशुहत्येचा चांगला विचार कर. तें ऐकून त्या द्विजश्रेष्ठानें सभांगणांत प्रवेश केला व त्या
जपत्नीला बोलावून विचारलें. ६-७.

ब्राह्मण म्हणाला, हे सुंदरी, वस्त्राभरणें टाकून व लाज सोडून ताबडतोब सभेस प्रदक्षिणा
र. ८. जर तूं निष्पाप आहेस, तर याविषयीं विशेष विचार करण्याची जरूरी नाहीं, असें
लून तो गप्प बसला. ९.

शौनक म्हणाला, हें ऐकून ज्येष्ठ स्त्री मनांत म्हणाली, अरेरे, हें एक माझ्यावर मोठें
कटच आहे! हें दुष्कर्म खरोखर माझ्या मनांतसुद्धां नव्हतें! खरोखर दैवगति गहन असते.
१०. ह्या कर्मासाठीं मी पुरावा तरी कोणता द्यावा? ह्या कर्माचें स्मरणसुद्धां दुःसह आहे. मग
आतां मी निंदा सहन करावी कीं मरण पत्करावें? ११.

प्राणत्याग करून स्वाभिमानाचें रक्षण करावें, हेंच चांगलें! प्राण हे असत्य व
अशाश्वत असून गौरव हा चंद्र-नक्षत्रें असेपर्यंत शाश्वत राहणारा आहे. १२. श्रेष्ठ लोकांना
सन्मान हवा असतो, मध्यम लोक धनाची व सन्मानाची अपेक्षा करतात, आणि नीच लोक
केवळ धनाची इच्छा करतात; कारण सन्मान हेंच महापुरुषांचें धन असतें. १३.

म्हणून मी ( कुकर्म करण्याचें ) प्रमाण मात्र बिलकूल करणार नाहीं. सर्व प्राणिमात्रांच्या देखत मी शरीरत्याग करणार! १४. एवढें बोलून ती गुणवती शांत बसली. पण दुसरीनें लगेच उठून वस्त्रालंकार टाकून दिले व निर्लज्ज होऊन ती निर्भयपणें त्यांच्यासमोर उभी राहिली. अशा स्थितींत तिला पाहून सर्व लोकांनीं हाहाःकार करीत ओरडून सांगितलें कीं, याच पापी व क्रूर स्त्रीनें बालिकेची हत्या केली आहे; हे राजा, यांत बिलकूल शंका बाळगूं नकोस. १५-१७. तिचें तें धैर्य पाहून राजाला विस्मय वाटला. यास्तव त्यानें त्या शिशुघातिनीस शिक्षा केली. द्विजश्रेष्ठाचा सन्मान करून त्यास प्रेमानें धन, गाई, दोन गांव, अनेक वस्त्राभरणें व सुंदर वैजयंती माळ दिली. १८-१९. तसेंच त्याला प्रमुख पद देऊन राजानें आपल्या प्रासादांत प्रवेश केला. हे नृपनंदना, तेव्हांपासून शुक्ल पक्षांतील चंद्रकलेप्रमाणें ह्या लोकांची दिवसेंदिवस भरभराट होत गेली. त्या ब्राह्मणानेंही दोन्ही गांव सगोत्री ब्राह्मणांना देऊन टाकले व पुष्कळ काळ तेथें सुखानें राहूं लागला.

शौनक म्हणाला, नंतर त्या राजाचे पूर्वींचे प्रधानासह सर्व बुद्धिजीवी पुरुष त्या ब्राह्मणाचा सूड घेण्यासाठीं त्यांचें एखादें व्यंग्य शोधण्यास टपून बसले! दुर्दैवानें ब्राह्मणाचा पुत्र फारच मूर्ख व दुराचारी निपजला! २०-२३. त्याची सुंदर बांध्याची स्त्री रूपयौवनसंपन्न असून तिचे नेत्र विशाल होते. स्तन उन्नत व नितंब रेखीव होते. २४.

बिंबाधरी सुवदना विट्मार्गे च प्रवर्तिनी । कदाचिज्जारभर्त्रा वै विलासं कुर्वती सती ॥२५॥
भर्ता तथाविधां दृष्ट्वा तां क्रोधाद्विवशं गतः । खड्गमुद्यम्य हस्तेन मिथुनीकृतविग्रहौ ॥ २६ ॥
स्मरग्रहेण विवशौ तदा निर्बद्धयंत्रितौ । कलाभिज्ञौ तु निपुणौ संहा[1]रमकरोत्क्रुधा ॥ २७ ॥
दैवादयं समायातः कालः स्वेनाशुभाप्तये । इदानीं दोषमारोप्य प्राचीनां[2] मंत्रिसत्तमाः ॥२८॥
राज्ञे निवेदयामासुर्वार्तां मिथुनहत्यकाम् । परित्यागाय सर्वेषामुपायं चक्रुरंजसा ॥ २९ ॥
गोराष्ट्रजानां मूर्खाणां पापिनां क्रूरकर्मणाम् । आस्ते म[3]हाबलो देवो गोराष्ट्रे सिंधुसन्निधौ ॥३०
दक्षिणस्यां महाक्षेत्रमविमुक्तं वदंति हि । यात्रां कृत्वा महादेवं तथा क्रोडेश्वरं विभुम् ॥३१॥
तथैव दर्शनं कृत्वा प्राप्नुवंति विशुद्धताम् । शासयित्वा नृपेणैव मंत्रिभिर्मंत्रकोविदै[4]ः ॥ ३२ ॥
शौनक उवाच–
अथ गोराष्ट्रजाः सर्वे दुःखान्निर्गत्य तत्परात् । पातित्यविनिवृत्यर्थं तीर्थयात्रां शनैः शनैः ॥३३
कुर्वन्तः सह्यमासाद्य नानामुनिगणैर्वृतम् । अवतीर्य गिरेः शृंगं तौलवं देशमाविशन् ॥ ३४ ॥
क्रमाद्गोकर्णमद्राक्षीत् तत्क्षेत्रस्थं महाबलम् । गोकर्णेशं च संपूज्य विधिवन्नृपनंदन ॥ ३५ ॥
स्नात्वा शुक्तिमतीतोये सर्वाघौघविना[5]शिनि । विधिवत्पूजयामासुः स्वस्य पापनिवृत्तये ॥३६॥
पश्चात्तापेन संयुक्ता दक्षिणां दि[6]शमाययुः । द्वे द्वे पिशाचरूपे[7] च सुप्तस्य दुरात्मनाम् ॥३७॥
पृष्ठभागे यत्र यत्र तत्र तत्र गमिष्यतः । अनंतेशसमीपे तु तपस्यंतं महामुनिम् ॥ ३८ ॥
शंखचक्रगदापद्ममुद्रालांछितविग्रहम् । तं दृष्ट्वा दंडवद्भूमौ पेतुश्चरणयोर्मुदा ॥ ३९ ॥
ऊचुस्तेषां चरित्राणि युग्महस्तेन दूषिताः । ध्यात्वा मुहूर्तं धर्मात्मा कृपयाविष्टमानसः ॥४०
ददौ तीर्थोदकं तेभ्यः सूचयन्निव मंगलम् । कस्यापि तीर्थमध्ये तु गुंजामात्रास्थितं शुभम् ॥४१
जनार्दन इति ख्यातं शालग्राममभूत्किल । कृतार्थोऽस्मीति निश्चित्य मंजूषांते निबध्य तद् ॥
आरुह्य सह्यशिखरं गंतुं सर्वे प्रचक्रमुः । मार्गे मध्यान्हवेलायां सीतायाश्चोत्तरे तटे ॥ ४३ ॥
गलितं पनसं दृष्ट्वा वृक्षमूलमुपाविशन् । फलं तत्सहसा भित्वा बुभुक्षुस्ते नरास्तदा ॥ ४४ ॥
वस्त्रेण मार्जनं कृत्वा ह[8]स्तमंत्रविवर्जिताः । ते सर्वे गाढमागत्य वृक्षमूलं व्यलोकयन् ॥ ४५ ॥
तत्र दृष्ट्वा महाश्चर्यं किमेतदिति शब्दिताः । आसीत्करंडपीठे[9] च शालग्रामजनार्दनः ॥ ४६ ॥

---

१ स्वभार्यां कृतवान्शिक्षामस्य दोषो न कारयेत् । शिक्षा नार्याः सर्वथैव कर्तव्या इति शास्त्रतः इति चेच्छंकायामाह । अहिंसा परमो धर्म इति वचनात् । ब्राह्मणस्य तु सर्वथैव हिंसा निषिद्धा एवं तावत् । अत्र स्त्रीहत्या मैथुनहत्या च । एवंकृतस्य पुरुषस्य कथं दोषो नारोपणीयः । भार्यादंडं पृथक्शय्येति पृथक् शय्या च नारीणामशस्त्रवधउच्यते परित्याज्या दुष्टभार्येति वा । अथ पुरुषाः सर्वथाऽदूष्या एवेत्यर्थः । प्रकृतमनुसरामः ॥

१ संभार । २ मंत्र० । ३ महाबलेनेति देवो । ४ मंत्रिणै । ५ शनी । ६ दिशिम् । ७ द्वाभ्यां पिशाचरूपाभ्यां । ८ हस्तमंत । ९ पीठं ।

पण बिंबाधरी व सुमुखी अशी ती स्त्री अत्यंत जारिणी होती. एकदा तिला तिच्या पतीनें जारपतीसह विलास करीत असतां पाहिलें ! तिला तशा अवस्थेंत पाहतांच तो क्रोधानें अंध झाला. लगेच त्यानें तलवार उगारून कामातुर होऊन एकमेकांस घट्ट बिलगलेल्या स्थितींतच त्या दोघांचे तुकडे केले. वस्तुतः कामकलाप्रवीण अशीं तीं दोघें अत्यंत सावध होतीं ! पण केवळ दैवयोगानें संकट ओढवणार होतें म्हणून हा (पति) कांहीं काळ तेथें उपस्थित झाला व त्याच्याकडून रागामुळें त्यांचा वध झाला.

यावेळीं अगोदरच्या श्रेष्ठ मंत्र्यांनीं त्याच्यावर मिथुनहत्येचा आरोप ठेवला व ही बातमी राजाला कळविली. या संधीचा फायदा घेऊन गोराष्ट्रांतील मूर्ख, पापी व क्रूरकर्मी अशा त्या सर्वांना हांकलून देण्यासाठीं त्यांनीं उपाय केला. गोराष्ट्रांत समुद्राजवळ महाबल देव आहे. २५–३०. दाक्षिणात्य लोक त्या स्थानाला अविमुक्त महाक्षेत्र म्हणतात. त्या विभु क्रोडेश्वर महादेवाची यात्रा करून जे त्याचें दर्शन घेतात ते शुद्ध होतात. यासाठीं त्या कुटिल कारस्थानी मंत्र्यांनी राजाकडून त्यांना तसा आदेश देवविला. ३१–३२.

शौनक म्हणाला, त्या आज्ञेला अनुसरून गोराष्ट्रस्थ सर्व लोक मोठ्या कष्टानें तेथून निघून पातित्यनिवृत्तीसाठीं हळूहळू तीर्थयात्रा करूं लागले, व पुष्कळ मुनिगण असलेल्या सह्याद्रीच्या शिखरावरून उतरून खालीं तौल देशांत आले. ३३–३४.

क्रमानें पुढें गेल्यावर त्यांना गोकर्णक्षेत्राचें दर्शन झालें. तेथें त्यांनीं गोकर्णेश महाबलाची विधियुक्त पूजा केली. ३५. सर्व पाप नाश करणाऱ्या शुक्तिमती नदीमध्यें स्नान करून पाप-निवृत्तीसाठी त्यांनीं तीर्थाचीही विधियुक्त पूजा केली. ३६. पश्चात्ताप पावलेले ते लोक दक्षिण दिशेकडे जाऊं लागले, तेव्हां ती दोन पिशाच्च रूपें निद्रित मिथुनाची हत्या करणाऱ्या त्या दुष्टाचा सर्वत्र पाठलाग करूं लागलीं ! अनंतेश देवाजवळ पोहोंचतांच शरीरावर शंख-चक्र-गदा-पद्म व मुद्रा यांचीं चिन्हें असलेला एक तपस्वी महामुनि त्यांच्या दृष्टीस पडतांच त्यांनीं त्याच्या चरणांना आनंदानें दंडवत घातला. ३७–३९.

त्या अपवित्र लोकांनीं हात जोडून त्याला आपली हकीगत निवेदन केली. दयाळू धर्मात्म्यानें क्षणभर ध्यान करून त्यांना मंगलसूचक तीर्थोदक दिलें. तेव्हां त्या पुरुषांपैकीं एकाच्या हातांतील तीर्थांत गुंजेएवढें जनार्दन नांवाचें शालग्राम–लिंग निर्माण झालें. मी कृतार्थ झालों असा निर्धार करून त्यानें तें लिंग एका पेटींत ठेविलें. नंतर ते सर्व सह्याद्रीचें शिखर चढून मार्ग चालूं लागले. प्रवासांत दुपारच्या वेळीं सीता नदीच्या उत्तर किनाऱ्यावर झाडावरून पडलेला एक फणस पाहून त्या झाडाखालीं तीं सर्व माणसें बसलीं व त्यांनीं तें फळ फोडून खाल्लें. ४०–४४. हात व मंत्र यांचा उपयोग न करतां केवळ वस्त्रानें मार्जन करून ते सर्वजण झाडाखालीं आले, तेव्हां त्यांना एक मोठें आश्चर्य दृष्टीस पडलें व त्यांच्या तोंडांतून 'हें काय ?' असे उद्गार बाहेर पडले. कारण करंड्यांतील शालग्राम–जनार्दन जमिनीवर होता ! ४५–४६.

गंतुं गृहीत्वा तं मूढाः खननायोपचक्रमुः । एतस्मिन्नंतरे भूप व्योम्नि गीः समपद्यत ॥ ४७ ॥
स्थीयतामत्र भो विप्रास्तेभ्यः स्थानं भविष्यति । एष एव न संदेहो भविष्यति जनार्दनः ॥
युष्माकं कुलदैवत्वं श्रेयःप्राप्तिविवृद्धये[1] । इत्युक्त्वा सा भगवती तत्रैवांतर्हिता शिवा ॥ ४९ ॥
कैषा सरस्वती केन कारणेनोदिता किल । इति सर्वे समालोच्य हर्षनिर्भरयंत्रिताः ॥ ५० ॥
अस्मिन्नेव महाग्रामे निवासं कुर्महे वयम् । त्रिंशत्सद्मानि ते चक्रुर्ग्रामस्थानामनुज्ञया ॥ ५१ ॥
ऊषुस्ते कतिचित्कालं हव्यकव्यविवर्जिताः । न याताः पूर्वनिलयानात्मनो भवनं प्रति ॥ ५२ ॥
[2]एवमेवेति निश्चित्य स्वस्य पापेन शंकिताः । मुनिमालोकयामासुः पूर्वदृष्टं महाजनाः ॥ ५३ ॥
सोऽपि दृष्ट्वा महातेजा पावयामास शास्त्रतः । तप्तमुद्रांकितान्कृत्वा मतं वैष्णवसंमतम् ॥५४॥
तथैवाष्टाक्षरं मंत्रं परं चोपदिदेश सः । आनेभिरेति मंत्रेण मृदाहरणमुच्यते ॥ ५५ ॥
आमंद्रैरिति सूक्तेन मृदा लेपनमुच्यते । अक्षिभ्यांतेति मंत्रेण मृदा स्नानं विशिष्यते ॥ ५६ ॥
गुरोरनुज्ञां स्वीकृत्य वासं चक्रुरतंद्रिताः । तदाप्रभृति तद्ग्रामं बेलंजीति वदंति हि ॥ ५७ ॥
तत्र स्थितान्द्विजान्सर्वान्पतितान्प्रवदंति हि । बहुनात्र किमुक्तेन राजश्रेणिशिरोमणे ॥ ५८ ॥
तेषां दर्शनमात्रेण पातित्यं चानुयास्यति । प्रायश्चित्तं मया वक्तुं न शक्यं नृपनंदन ॥ ५९ ॥
साधारणेनैव वक्ष्ये कृच्छ्रचांद्रायणं चरेत् । तस्मिन्पनसवृक्षे तु महाकारुणिके स्थले ॥ ६० ॥
द्वंद्वमारोपयामास कूटस्थश्च महात्मभिः ।

सूत उवाच –

इदमेव पुराख्यातं शौनको ऋषिसत्तमः ॥ ६१ ॥
शतानीकाय राज्ञे तु ह्युक्तवान्सकलं द्विज ।

शौनक उवाच –

चरितमिदमशेषं दुर्वृत्तानां च वृत्तं मिथुनहरजनानां सम्यगुक्तं नरेंद्र ॥
सकलकलुषनाशं यः शृणोतीह लोके सकृदपि जनमध्ये साधनं मुक्तिहेतोः ॥ ६२ ॥

इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे उत्तररहस्ये मिथुनहरब्राह्मणकथनं नाम सप्तदशोऽध्यायः ॥ १७

# अथ अष्टादशोऽध्यायः ।

## पातित्यग्रामः ।

शौनक उवाच –

अन्यद् व्रतं प्रवक्ष्यामि भूदेवस्य महात्मनः । [3]कस्यचिद्घोराष्ट्रकस्य सावधानमनाः शृणु ॥ १ ॥
अभूत्कलिंगदेशे तु नाम्ना कांचनमालिनी । नारीनरसमायुक्ता हस्त्यश्वरथसंकुला ॥ २ ॥
तस्यां पुर्यां जगत्त्राता रविगोत्रसमुद्भवः । आसीत्पुरा हेममाली युधिष्ठिरसमप्रभः ॥ ३ ॥

१ श्रेयःप्राप्त । २ किमेतदिति । ३ कश्चिद् ।

म्हणून त्या मूर्खांनीं तो शालग्राम घेण्यासाटीं जमीन खणण्यास आरंभ केला; हे राजा, इतक्यांत आकाशवाणी झाली. ४७. विप्रहो, तुम्ही येथेंच रहा. हेंच तुमचें वसतिस्थान होय. हा शालग्राम जनार्दन निःसंशय तुमचें कुलदैवत होईल. हेंच कुलदैवत तुमची कल्याणवृद्धि करील असें बोलून ती भगवती पवित्र देवी तेथेंच अंतर्धान पावली. ४८–४९.

ही वाणी कोणाची आहे ? कशाकरितां प्रगट झाली ? अशा विचारानें ते सर्व हर्षभरित झाले ! व ह्या गांवांतच आम्ही वस्ती करूं या असा निश्चय करून ग्रामस्थांच्या अनुज्ञेनें त्यांनीं तेथें तीस घरें निर्माण केलीं. ५०–५१. हव्य कव्य वर्ज्य करून ते कांहीं काळ तेथेंच राहिले. ते आपल्या पूर्वीच्या घरांकडेही गेले नाहींत. ५२. आतां असेंच केलें पाहिजे असा निश्चय करून स्वतःच्या पापामुळेंच साशंक बनलेल्या त्या मंडळींनीं प्रथम भेटलेल्या मुनीचें दर्शन घेतलें. ५३. त्या महातेजस्वी मुनीनें त्यांना शास्त्रोक्त विधीनें पवित्र केलें. प्रथम त्यांस तप्तमुद्रांकित करून वैष्णवमत आणि ( ॐ नमो वासुदेवाय ) या अष्टाक्षरी मंत्राचा उपदेश केला. 'आनेभिः०' या मंत्रानें मृत्तिका आणावी. 'आमंद्रैः०' या सूक्तानें मृत्तिकालेपन करून 'अक्षिभ्यां ते०' या मंत्रानें मृत्तिकास्नान करावयाचें असतें. याप्रमाणें सर्व विधि करून गुरूच्या आज्ञेनुसार त्यांनीं तेथेंच वस्ती केली. तेव्हांपासून त्या गांवाला बेलंजीति म्हणूं लागले. ५४–५७.

तेथील सर्व द्विजांना पतित समजण्यांत येतें. फार काय सांगावें ? हे राजश्रेष्ठा, त्यांच्या दर्शनानेंच मनुष्य पतित होतो. हे नृपनंदना, मी त्यासाठीं प्रायश्चित्त सांगूं शकत नाहीं. ५८–५९.

तथापि सामान्यतः त्यासाठीं कृच्छ्र चांद्रायण व्रत करावें असा नियम आहे. त्या फणसाचें झाड असलेल्या जागीं मूळ महापुरुषानें एका दांपत्याची स्थापना केली. सूत म्हणाला, महात्म्यांनीं हेंच आख्यान पूर्वी सांगितलें होतें. नंतर ऋषिश्रेष्ठ शौनकानें शतानीक राजाला सर्वच कथानक सांगितलें.

शौनक म्हणाला, दंपतीची हत्या करणाऱ्या दुराचारी लोकांचें हें सर्व घडलेलें चरित्र उत्तम रीतीनें सांगितलें आहे. सर्व पाप नाश करणारें हें कथानक मनुष्यानें निदान एकदां तरी श्रवण करावें. ६०–६२.

## अठरावा अध्याय

### पातित्यग्राम

शौनक म्हणाला, गोराष्ट्रांतील एका उदार ब्राम्हणाचें आणखी एक व्रत मी तुला सांगतों. तें तूं एकाग्र मनानें ऐक. १. कलिंग देशांत कांचनमालिनी नांवाची एक नगरी होती. ती नरनारी, हत्ती, अश्व व रथ यांनी सदैव गजबजलेली असे. २. पूर्वी त्या नगरींत रविगोत्रोद्भव, विश्वरक्षक व धर्मराजासारखा तेजस्वी असा हेममाली नांवाचा राजा होता. ३.

धन्विनामग्रतः श्रेष्ठो महाबलपराक्रमः। युधि प्रख्यातकीर्तिश्च रथकुंजरवाजिमान् ॥ ४ ॥
दोर्दंडमंडलाग्रेण जितं सामंतमंडलम्। उदयाद्रिसमारूढमार्तंडद्युतिमानयम् ॥ ५ ॥
सोऽयं क्षमामंडलस्य चाखंडलसमप्रभः। महादाने चोपदाने ज्ञानिनं चेति तं विदुः ॥ ६ ॥
यस्य कीर्तिसुखाब्धेश्च संजातश्चंद्रमा इति। यस्य प्रतापात्संभूतो धनंजय इति स्फुटम् ॥ ७ ॥
कामोऽप्यनंगतां नीतो रूपं दृष्ट्वा च लज्जितः। गांभीर्यमस्य दृष्ट्वाथ कूपारो[1]ऽतिभयान्वितः ॥८॥
वृद्धिक्षयत्वं संप्राप्तस्तरंगैः सह कूजति। इत्थं गुणविशिष्टो यो धीमान् राज्यं प्रशास्ति ॥९॥
अनावृष्टिभयं किंचिन्नास्ति दुर्भिक्षजं भयम्। म्लेच्छतस्करशार्दूलवृ[2]कसिंहादिजं भयम् ॥ १०
एवं प्रवर्तमानस्य व्यतीयुर्बहवः समाः। कदाचिदागतः श्रीमान् वेदवेदांगपारगः ॥ ११ ॥
ललाटनेत्रात्संभूतवैश्वानरसमद्युतिः। तथापि शांतिसंयुक्तो मूर्तिमानवलक्ष्यते ॥ १२ ॥
सुमत्या भार्यया युक्तः शिष्यैः सततमावृतः। अग्रजस्यानुरोधो यन् तद्वाक्यं प्राकृते पदे ॥१३॥
प्रागुक्तात्तारकाच्छब्दात् परशब्दासनामवान्। समायातं द्विजं वीक्ष्य मधुपर्कासनादिभिः ॥१४॥
पूजयामास विधिवत् हेममाली नृपोत्तमः। प्रागल्भ्यं चास्य पश्याम इति कृत्वा मतिं द्विजः ॥
मंत्रपूता ह्यक्षताश्च प्रायच्छद्वामपाणिना। दृष्ट्वैनं राजशार्दूलः किंचिद्भयाकुलितेक्षणः ॥ १६ ॥
मंत्राक्षर[3]रमणीयं वाक्यं प्रष्टुं प्रचक्रमे। भो भो देव द्विजा लोके संति संवित्तमोत्तमाः ॥ १७ ॥
तेषां द्विजानां मध्ये तु नहि कोऽपि भवादृशः। ईदृशः[4] कर्मकर्ता[5] तु न दृष्टो जगतीतले ॥ १८ ॥
तस्य तद्वाक्यमाकर्ण्य भीति[6]शून्यं द्विजाग्रणीः। उवाच क्रोधताम्राक्षो वाक्यं हेत्वर्थसंयुतम् ॥
अस्माभिः पार्थिवा दृष्टा[7] बहवो नृपसत्तम। न दृष्ट[8]स्त्रिषु लोकेषु विवेकिषु[9] भवादृशः ॥ २० ॥
तथा भवतु दास्यामो दक्षिणेन करेण च। गृह्यतां यदि शक्तिश्चेन्नो चेन्मूर्ध्नि क्षिपाम्यहम् ॥
भस्मीभवंतु ते सर्वे पश्यंत्वत्र महाजनाः। इत्थं वदति विप्रेंद्रे पार्थिवस्तु तदा नृप ॥ २२ ॥
किरीटमणिदीपेन पादपीठांतभूतलम्। तदा नीरांजनं चक्रे तं विप्रं हर्षयन्निव ॥ २३ ॥
उत्तिष्ठोत्तिष्ठ राजेंद्र भीतिं त्यज महामते। दर्शयामोऽस्य माहात्म्यं पटं विस्तार्यतामिति ॥२४
उक्तवां[10]स्तस्य विप्रस्य दूरे तिष्ठन्नृपोत्तमः। पटं विस्तारयामास प्रभावं द्रष्टुमुत्सुकः ॥ २५ ॥
द्विज उवाच –
विप्रस्य दक्षिणे हस्ते शिखावानिति निश्चयम्। पश्येदानीं महाराज ज्वलंतं हव्यवाहनम् ॥
इत्युक्त्वा स[11] तदा राज्ञे दर्शयामास भूसुरः। स्वीयं प्रभावं मंत्रस्य सारं सारान्वितताय च ॥२७
वैश्वानरास्त्रं संधाय यत्क्षिप्तं चाक्षतैः सह। जाज्वल्यमानतेजोऽभूत्कृशानुः समुदैक्ष्यत ॥२८॥

---

१ कृपालो० । २ वक । ३ मंत्राक्षतमणीयंत्रे । ४ ईदृशं । ५ कर्तारं । ६ भीत० । ७ दृष्ट्वा ।
८ दृशं । ९ विवेकानां । १० उक्तवंतस्य । ११ सा ।

धनुर्धारी पुरुषांत श्रेष्ठ असा तो राजा बलवान व पराक्रमी होता. त्याच्याजवळ रथ, हत्ती व घोडेही पुष्कळ असून त्यानें युद्धांत कीर्ति संपादन केली होती. ४. सर्व मांडलिक राजे यानें आपल्या बाहुदंडाच्या बळानें जिंकले होते. त्याचें तेज उदयगिरीवरील सूर्यासारखें होतें. ५. असा तो पृथ्वीमंडलाचा राजा इंद्रासारखा तेजस्वी असून महादानांत व उपदानांत त्याला लोक ज्ञानवान् समजत असत. ६. निश्चित याच्याच कीर्तिसुखाच्या सागरापासून चंद्र निर्माण झाला व याच्याच प्रतापापासून धनंजय नांवाचा अग्नि उत्पन्न झाला. ७. याचें रूप पाहून कामदेव लज्जित झाला व अनंग बनला ! याचें गांभीर्य पाहून समुद्र घाबरून गेला ! त्यामुळें भरती व ओहोटी प्राप्त होऊन तो लाटांच्या रूपानें ओरडत असतो. असा हा राजा राज्य करीत असतां लोकांना अनावृष्टि व दुष्काळाची भीति नव्हती. म्लेंच्छ, चोर, वाघ, लांडगे, सिंह इत्यादिकांचें भयही नव्हतें. ८–१०. याप्रमाणें पुष्कळ वर्षें निघून गेल्यावर एकदां एक तेजस्वी व वेदवेदांगपारंगत ब्राम्हण त्या राजाजवळ आला. ११. ज्याच्या ललाटस्थ नेत्रांतून अग्नि निर्माण झाला, अशा शंकरासारखा तेजस्वी असूनही तो मूर्तिमंत शांतरसच वाटत होता. १२. त्याच्याबरोबर त्याची सुमति पत्नी व शिष्यसमुदाय होता. अशा प्रकारचा तो ब्राम्हणश्रेष्ठ आलेला पाहून नृपश्रेष्ठ हेममाली राजानें मधुपर्क, आसन इत्यादि उपचारांनीं त्याची विधियुक्त पूजा केली. याच वेळीं त्या ब्राम्हणाच्या मनांत राजाची परीक्षा घेण्याचा विचार उद्भवला. यासाठीं त्यानें अभिमंत्रित अक्षता राजाला डाव्या हातानें दिल्या. हें पाहून राजाचे नेत्र किंचित् विचलित झाले, १४–१६. व तो मंत्राक्षराप्रमाणें रमणीय वाक्य बोलला. अहो ब्राह्मणश्रेष्ठ, जगांत पुष्कळ श्रेष्ठ ज्ञानी आहेत. पण पृथ्वीतलावर त्या द्विजांमध्यें आपल्यासारखा एकही द्विज अशा प्रकारचें कर्म करणारा मला आढळला नाहीं. १७–१८. त्याचें तें भाषण ऐकून त्या द्विजश्रेष्ठाचे नेत्र आरक्त झाले व तो निर्भयपणें हेतुगर्भ वचन बोलला. १९.

हे राजश्रेष्ठा, आम्हांला पण तिन्हीं लोकांत विचारी पुरुषांमध्यें आपल्यासारखा पुरुष आढळला नाहीं. २०. ठीक आहे. मीं उजव्या हातानें मंत्राक्षता देतों. तुझी शक्ति असल्यास घे. नाहीं तर मी त्या अक्षता तुझ्या मस्तकावर टाकीन. २१. हें पाहणारे हे सर्व लोक देखील भस्म होतील. याप्रमाणें तो ब्राह्मण बोलतांच राजानें त्याला प्रणाम केला व आपल्या मुकुटांतील रत्नदीपाचें नीरांजन त्यांच्या चरणांना ओंवाळून त्यास आनंदित केलें. २२–२३. ' हे राजेंद्रा, ऊठ, ऊठ. भिऊं नकोस. ह्या माझ्या उजव्या हाताचें माहात्म्य मी तुला दाखवितों. वस्त्र पसर. ' असें तो द्विजश्रेष्ठ म्हणतांच राजा त्या ब्राह्मणापासून दूर अंतरावर त्याचा तो प्रभाव पाहण्यासाठीं उत्सुक होऊन वस्त्र पसरून उभा राहिला. २४–२५.

द्विज म्हणाला, ब्राह्मणाच्या उजव्या हातावर अग्नि असतोच ! महाराज, हा पहा प्रज्वलित अग्नि, असें म्हणून त्या भूदेवानें बलवान् राजाला आपला प्रभाव व मंत्रसामर्थ्य दाखविलें. २६–२७. त्यानें योजनापूर्वक अक्षतांसह अग्न्यस्त्र सोडलें. त्यामुळें अकस्मात् प्रज्वलित अग्नि व त्याचें तेज दिसूं लागलें. २८.

तत्पटं भस्मसात्कृत्य तां सभां दग्धुमुद्यतः । शिखावंतं तमालोक्य सर्वे संतापयंत्रिताः ॥२९॥
विप्रस्यांतिकमागम्य पेतुश्चरणयोर्मुदा । राजानमेनमस्मांश्च पाहि पाहि कृपाकर ॥ ३० ॥
हर संतापमस्माकमुपसंहर पावकम् । तेषां वाक्यमथाकर्ण्य सस्मितः स द्विजोत्तमः ॥ ३१ ॥
[1]ॐकारं भोजकुहरे स[2]मंत्रं व्याहरत्तदा । एवं कृते भगवति शांतोऽभूद्धव्यवाहनः ॥ ३२ ॥
अथ भूपो हि हर्षाब्धितरंगेषु ममज्ज सः । तदा द्विजातये प्रेम्णा चाष्टौ ग्रामानि दत्तवान् ॥
असंख्यातसुवर्णानि वस्त्राण्याभरणानि च । अनर्घ्यमणिसंयुक्तग्रैवेयकमदात्पुनः ॥ ३४ ॥
इंद्रनीलैः पद्मरागैः प्रतप्तं चांगदं ददौ । रूपौदार्यगुणैराढ्यं तस्मै दासीशतं ददौ ॥ ३५ ॥
तादृग्गुणविशिष्टस्य किं न देयं महीपतेः । तेन सन्मानितो विप्रः श्लाघयित्वा गुणादिकम् ॥
स्वस्ति तेऽस्तु गमिष्यामो यावदाचंद्रतारकम् । इत्युक्त्वा तु द्विजः श्रेष्ठः प्रतस्थे स्वपुरीं प्रति ॥
इति श्रीस्कंदपुराणे उत्तररहस्ये सह्याद्रिखंडे पातित्यग्रामकथनं नाम अष्टादशोऽध्यायः ॥३८॥

# अथ एकोनविंशतितमोऽध्यायः ।

## पातित्यग्रामः ।

शौनक उवाच –

परेद्युरथ विप्रोऽसौ सह शिष्यैर्मुदान्वितः । सोपस्कराणि संगृह्य स्थानं गंतुं प्रचक्रमे ॥ १ ॥
पश्यन् रम्याणि तीर्थानि क्षेत्राणि विविधानि च । क्रमादगादमेयात्मा सह्यपर्वतमुत्तमम् ॥ २
सा तत्र चंडिका नाम नदी कलिमलापहा । विमलोदकसंपूर्णा सिद्धर्षिगणसेविता ॥ ३ ॥
आनीलोत्पलकल्हारशतपत्रैरलंकृता । चकोरचक्रकारंडरथांगैः परिशोभिता ॥ ४ ॥
तां ददर्श महाभागस्तस्यां स्नातुं प्रचक्रमे । कृत्वा माध्यान्हिकं कर्म पंचयज्ञादिकाः क्रियाः ॥
समाप्य नित्यकर्माणि सभार्यस्तटिनीतटे । पशुपतिरुपास्तव्य इति चक्रे मतिं द्विजः ॥ ६ ॥
ततः सायान्हसमये समीरो मंदमाववौ । स तदा [3]दृष्टवान्कांचित् कांतां नारीकदंबके ॥ ७ ॥
षोडशाब्दां समानां तां स्मरशक्तिमिवोत्थिताम् । लसन्न सामायताक्षीं ताराधिपनिभाननाम् ॥
द्वितीयचंद्रलेखेव दृश्यमानललाटिकाम् । संप्राप्तषट्प[5]दांमीव विलसत्कर्णकुंडलाम् ॥ ९ ॥
कंबुकंठायतभुजां पीनोन्नतपयोधराम् । सूक्ष्ममध्यां शुभश्रोणीं नम्रांगीं नवयौवनाम् ॥ १० ॥
सुनितंबोज्ज्वलां सुभ्रूं पद्मिनीजातिसंभवाम् । दास्याः पुत्रीं च तां दृष्ट्वा सद्यः स्मरवशोऽभवत् ॥
एनां दृष्ट्वा रतिपतिः संदृढीकृतकार्मुकः । त्रिलोकीविजयः सोऽपि मज्जयामास संशये ॥ १२ ॥

---

१ तंकारं । २ संमंत्र्य प्राहरं यथा । ३ पृष्टवान् । ४ कांतासि । ५ पदानीव ।

तें या वस्त्रास व सर्व सभेस जाळींत असल्याचा भास होऊं लागतांच, तो अग्नि पाहून संतप्त झालेले सर्व लोक आनंदानें त्या ब्राह्मणास नमस्कार करून म्हणाले, हे दयाळू द्विजश्रेष्ठा, ह्या राजाचें व आमचें रक्षण कर. हा :अग्नि शांत करून आमचा ताप दूर कर. यांचें तें भाषण ऐकून ब्राह्मण हंसला. त्या राजाच्या कानांत भगवंतानें ॐकार म्हटला व लगेच अग्नि शांत झाला. २९–३२.

हें पाहून तो राजा आनंदसागराच्या तरंगांत बुडून गेला व त्यानें प्रेमपूर्वक ब्राह्मणाला आठ गांव दिले. ३३. सोन्याचीं असंख्य नाणीं, वस्त्रें, भूषणें व रत्नजडित अमूल्य कंठभूषणेंही त्यास दिलीं. ३४. इंद्रनीलमणि व माणकें जडवलेलें बाहुभूषण दिलें, व शंभर उत्कृष्ट दासी दिल्या! अशा असामान्य गुणी पुरुषाला हें सर्व कां देऊं नये! याप्रमाणें त्याचा सन्मान केल्यावर त्या ब्राह्मणानें राजगुणांची प्रशंसा केली व हे राजा, चंद्रतारका असेपर्यंत तुझें कल्याण असो! आम्ही आतां जातों, असें बोलून तो द्विजश्रेष्ठ आपल्या नगराकडे गेला. ३५–३७.

# एकोणिसावा अध्याय

## पातित्यग्राम

शौनक म्हणाला, दुसऱ्या दिवशीं तो ब्राह्मण आनंदित होऊन सर्व वस्तू बरोबर घेऊन शिष्यांसह स्वस्थानीं जाण्यास निघाला. १. सर्व रमणीय विविध क्षेत्रें क्रमानें पहात पहात तो उदार ब्राह्मणश्रेष्ठ सह्याद्रीवर पोहोंचला. २. तेथें कलियुगाचा दोष दूर करणारी चंडिका नांवाची नदी होती. ती नेहमीं स्वच्छ पाण्यानें भरलेली असून तिच्या तीरावर अनेक सिद्ध-मुनि रहात असत. ३. किंचित् निळीं कमळें, कल्हार व शतपत्रफुलांनीं ती नदी अलंकृत झाली होती; तसेंच चकोर, चक्र व चक्रवाक् पक्ष्यांनीं सुशोभित दिसत होती. त्या महाभाग ब्राह्मणानें तिचें दर्शन घेतलें व तो नदींत स्नान करूं लागला. स्नानानंतर दुपारचें आह्निक करून त्यानें पंचमहायज्ञ केले. ४–५. नित्यविधि आटोपल्यावर पत्नीसह त्यानें नदीतटावर बसून पशुपतीची उपासना करण्याचा विचार केला. ६.

संध्याकाळची वेळ होती. थंड वारा वहात होता. येवढ्यांत त्याला लोकसमुदायांत एक स्त्री दिसली. ७. पूर्णषोडशवर्षीय ती तरुणी जणूं मदनाची शक्तीच होती! तिचें नाक टसटशीत होतें. नेत्र विशाल होते. मुख चंद्रासारखें होतें. भालप्रदेश द्वितीयेच्या चंद्रकोरीप्रमाणें होता. कानांत लोंबणारीं सुंदर कुंडलें मुखकमळांवर गुंजारव करणाऱ्या भ्रमरासारखीं वाटत होतीं. ८–९. तिचा कंठ शंखाकृति, बाहु दीर्घ, पयोधर पुष्ट व उन्नत, कटि बारीक, नितंब रेखीव, याप्रमाणें सर्व अवयव रमणीय होते व ती तारुण्यानें मुसमुसलेली होती. १०. त्या सुंदरनितंब व उज्ज्वलवर्ण स्त्रीच्या भुंवया रेखीव होत्या. ती स्त्री पद्मिनी जातीची होती. एवंगुणविशिष्ट त्या दासीकन्येला पाहून तो तत्काळ कामातुर झाला. ११. तिला पाहून तीक्ष्ण-धनुर्धारी व त्रैलोक्यावर विजय मिळविणारा रतिपति मदनसुद्धां संशयांत पडला पाहिजे. १२.

यशः कीर्तिं च धैर्यं च साहसिकमनो नृप। तस्यामेव क्षपायां तु योजयामास मार्गणाम् ॥१३
न्हियां नतां हितां तन्वीं श्रीमतं भूसुराग्रजम्। युगपद्दंपतीभावं चंडिकाया नदीतटे ॥ १४॥
शौनक उवाच –
काचित्तन्वी द्विजः कोऽयं चित्रादिनयनैर्गतिः। स तस्यां पर्णशालायां तया सह मुदान्वितः॥
निनाय गणरात्रिं च चुंबनालिंगनादिभिः। अथ तस्या विशालाक्ष्याः स्नेहपात्रद्विजस्य च॥ १६
सुकुमाराः क्रमेणैव चाष्टौ पुत्रा भवन्किल। तान्विलोक्य मुदा प्राज्ञो ग्रामान्यष्टौ विभज्य च॥
पुत्रेभ्यः स्नेहयुक्तेभ्यो ददौ ग्रामान्यनुक्रमात्। एकस्यैकमथाज्ञाप्य शिक्षामित्थं चकार सः॥
यत्र यत्र शिवागारे तत्र तत्र ममाज्ञया। शिवनिर्माल्यभुंजानो छत्रवेत्रानुधारकाः॥ १९॥
संमार्जनादिकं कृत्वा तथा गोमयलेपनम्। अपांक्तेया विप्रसंघे संचरंतु ममाज्ञया॥ २०॥
कलिनाक्रांतमालोक्य तपसे कृतनिश्चयः। औरसं पुत्रमाहूय सुनीतं नाम कोविदम्॥ २१॥
आगमज्ञमभिज्ञं तं वाक्यमेतदुवाच ह। एते मम स्नेहपात्राः पुत्राः स्नेहेन यंत्रिताः॥ २२॥
प्राज्ञेन भवता सम्यक् स्नेहेन परिपाल्यताम्। इत्युक्त्वा विप्रवर्योऽसौ सभार्यस्तपसे ययौ॥
आगमोक्तेन स मुनिः पितुराज्ञा न लंघिता। चौलोपनीतिकर्माणि कारयामास तान्प्रति॥२४
शतानीक उवाच –
कथं चकार विप्रोऽसौ संस्कारं विधिपूर्वकम्। इति दासीतनूजानां शंकामाप्नोति मे मनः॥
शौनक उवाच –
साधु पृष्टं त्वया राजन् शंकास्थानमिदं खलु। तादृग् निवर्तयिष्यामि संजातां तव चेतसि॥
जघन्यजस्य क्षेत्रे तु यदि भूमिस्पृशः शिवः। विप्रवर्याच्च संजातो गोत्रप्रवरपूर्वकम्॥ २७॥
गोत्रसूत्रविहीनानां गोत्रं काश्यपमुच्यते। आश्वलायनसूत्रेण कार्या जन्मादिसत्क्रियाः॥ २८
कारयित्वाथ यो जन्मसंस्कारं विधिपूर्वकम्। काश्यपं कौशिकं चैव तत्तत्प्रवरभेदतः॥ २९॥
इत्यादिकैश्च गोत्राणि संदिदेश पृथक् पृथक्। इतरासां च चेटीनां संजातानां नृपात्मज॥३०
विवाहमष्टकन्यानां कारयामास शास्त्रतः। सांकर्यदोषविच्छित्त्यै विभागं कृतवानयम्॥ ३१॥
पुरा पराशरः साक्षात् नाविकां प्राप्तवान्किल। साक्षात्कुठारपाणिस्तु गोलकानुद्धार ह॥ ३२
एवं महानुभावानां सहजं गुणकीर्तनम्। इत्यादिविविधाः संति नात्र कार्या विचारणा ३३॥
एवं कृत्वा स भगवान् पुनः प्राह यथाक्रमम्। नातिक्राम्यंगुरोर्वाक्यं तथा कुरुत भूतले॥ ३४
दासीकदंबमाहूय संबभाषे द्विजात्मजः। आगता हि पुरा यस्मात्पुरं तदनुगम्यताम्॥ ३५॥
इत्युक्त्वा द्विजवर्योऽसौ गच्छति स्वनिकेतनम्। तदाप्रभृति तां दास्यश्चरंति पृथिवीतले॥३६॥
स्वीयां वृत्तिमनादृत्य निरातंका निरंकुशाः। एतेषां दर्शनात्पुंसां पातित्यमनुगच्छति॥ ३७॥

---

१ ह्रियानंतां। २ ते। ३ दास्यां।

हे राजा, त्या ब्राह्मणापाशीं यश, कीर्ति व साहसी मन होतें. तथापि मदनानें त्याच रात्रीं त्याच्यावर आपल्या बाणाचा प्रयोग केला. लज्जावनत व हितकारिणी ती नाजुक स्त्री आणि तो श्रीमान् ब्राह्मणश्रेष्ठ या दोघांमध्यें चंडिका नदीच्या तीरावर एकाच वेळी दांपत्यभाव निर्माण झाला. १३–१४. शौनक म्हणाला, काय आश्चर्य आहे! एक कृशांगी रमणी व एक कोणीतरी ब्राम्हण या दोहोंमध्यें नेत्रकटाक्षांनीं प्रेम निर्माण केलें! त्या पर्णशाळेंत त्यानें तिच्यासह मोठ्या आनंदानें चुंबन, आलिंगन इत्यादि विलास करीत पुष्कळ रात्री घालविल्या. १५. नंतर त्या विशालाक्षी स्त्रीला त्या स्नेहपात्र ब्राम्हणापासून क्रमानें आठ सुकुमार पुत्र झाले. विद्वान् ब्राम्हणानें गांवाचे आठ भाग करून आपल्या प्रेमळ मुलांना दिले, व प्रत्येकाला बोलावून उपदेश केला. १६–१८.

जेथें जेथें शिवालय असेल, त्या त्या ठिकाणीं माझ्या आज्ञेवरून शिवनिर्माल्य भक्षून देवाचें छत्र–वेत्र धारण करा. सडासंमार्जन व गोमयलेपन करून विप्रसंवांत रहा, पण तुम्ही अपांक्तेय आहांत. १९–२०. हा संसार कलीनें व्यापलेला आहे असें जाणून तपश्चर्येचा निश्चय केलेला तो ब्राम्हण प्रवीण, वेदज्ञ व ज्ञानी अशा आपल्या औरस पुत्राला बोलावून म्हणाला, बाळ, हे माझे आवडते पुत्र आहेत. २१–२२. तूं विद्वान् आहेस. तूं यांचें उत्तम रीतीनें पालन करावें, असें बोलून तो ब्राह्मण भार्येसह तपश्चर्येसाठीं गेला. २३. त्या औरस पुत्रानेंही वडिलांच्या आज्ञेला मान देऊन त्या सर्वांचे चौल–उपनयनादि संस्कार वेदोक्त मार्गानें केले. २४.

शतानीकानें प्रश्न केला, त्या दासीपुत्रांचे संस्कार वेदोक्त पद्धतीनें कसे केले, अशी शंका माझ्या मनांत येते! २५ शौनक म्हणाला, हे राजा, तूं ठीक विचारलेंस. ही एक योग्य शंका आहे. तुझ्या मनांतील शंकेचें निरसन मी करतों. २६. जर ब्राह्मणापासून शूद्र स्त्रीला एखादा आंधळा–पांगळा मुलगा निपजला तर त्याचें काश्यप गोत्र मानून आश्वलायन सूत्रानुसार संस्कार करावे. गोत्रसूत्र नसलेल्याचें काश्यपगोत्र मानावें अशी स्मृति आहे. २७–२८. नंतर त्यानें त्यांचें विधिपूर्वक संस्कार करून त्या त्या प्रवरांसह त्यांना काश्यप व कौशिक गोत्रें दिली. आणखीही कांहीं विविध गोत्रें त्यांना सांगितलीं. तसेंच जन्मास आलेल्या दुसऱ्या आठ दासी-कन्यांचा शास्त्रानुसार विवाह केला. संक्षेपतः संकरदोष दूर करण्यासाठीं त्यानें हा एक विभाग निर्माण केला. २९–३१.

पूर्वी साक्षात् पराशरानें धीवरकन्येशीं विवाह केला! साक्षात् परशुरामानें सर्व गोलकांचा, जारपुत्रांचा उद्धार केला. ३२. याप्रमाणें महानुभावांची ही सत्कीर्ति स्वाभाविक आहे. अशा आणखीही कथा आहेत. याविषयीं विशेष विचार करूं नये. ३३. भगवंताच्या आदेशानुसार त्यानें सर्व कांहीं केलें. गुरुवचनाचें उल्लंघन बिलकुल केलें नाहीं. ३४. सर्व दासींना बोलावून तो द्विजपुत्र म्हणाला, पूर्वी तुम्ही ज्या हेतूनें आलांत त्याप्रमाणें वर्तन ठेवा. ३५. असें बोलून तो द्विजश्रेष्ठ आपल्या घरीं निघून गेला. तेव्हांपासून त्या दासी त्याच्या उपदेशानुसार आपली पूर्ववृत्ति सोडून पृथ्वीवर वागूं लागल्या. यांच्या दर्शनामुळें पुरुषांना पातित्य प्राप्त होतें. ३६–३७.

कर्मषट्कं च षट्पुच्छमुपवीतद्वयं तथा। स्वपंक्तिभोजनं चैव पुराणश्रवणं तथा ॥ ३८ ॥
रुद्राक्षधारणं चैव तथोष्णीषनिबंधनम्। द्विजसंघप्रवेशं च नेत्याह भगवान्गुरुः ॥ ३९ ॥
बहुनात्र किमुक्तेन राजन् राजेंद्रनंदन। अपांक्तेयानां[1] ये तेषां नराणां नीचवर्तिनाम् ॥ ४० ॥
भुंजानानामधर्मार्थं गंगास्नानं विधीयते। सदा तेषां समाश्रित्य वर्तन्ते ते नराधमाः ॥४१॥
द्वादशाष्टप्रवास्तव्यं[2] वाराणस्यां न संशयः ॥ ४२ ॥
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे उत्तररहस्ये पातित्यग्रामे एकोनविंशतितमोऽध्यायः ॥१९॥

## अथ विंशतितमोऽध्यायः।

# सह्याद्रिखंडारंभः।

### इषुपातक्षेत्रमाहात्म्यम्। +

श्री गणेशाय नमः। श्रीसूत उवाच –
एकदा नैमिषे[3] क्षेत्रे ऋषयः सत्रमासते। शतसंवत्सरं दीर्घं ऋषिसंघसमावृतम्[4] ॥ १ ॥
तत्रासन्नृषयः सर्वे दिव्यभोगाश्च[5] नित्यशः। यज्ञनारायणः साक्षाद् यज्ञदेवैर्महर्षिभिः ॥ २ ॥
वेदैश्च सवनैः[6] स्तोत्रैः शास्त्रैरस्त्रैश्च संयुते। मंत्रानुमंत्रितसर्वदैवतानि वसन्ति हि ॥ ३ ॥
त्रयाणामपि लोकानामुत्सवः समभूत्तदा। इंद्रादयो देवगणा देवाचार्यपुरोगमाः ॥ ४ ॥+
शौनकं मुनिशार्दूलं पुरस्कृत्याययुस्तदा। तानागतान्समालक्ष्य ऋषयः प्रश्रयान्विताः ॥५॥ +
उत्तस्थुः[7] परमप्रीत्या शौनकं चेदमब्रुवन्। अहो धन्यतमो लोके[8] स एव पुरुषो महान् ॥ ६ ॥
यस्यागमनमात्रेण सर्वे प्रमुदिता जनाः। वयमत्र समासीनाः सत्रयागचिकीर्षया[9] ॥ ७ ॥
कर्मावसाने चास्माकं कालो नैवातिवर्तते। कथाभिः सुविचित्राभिर्नीतिशास्त्रैः पुरातनैः ॥८॥
त्वं नः सुखयितुं[10] कालमर्होऽसि पुरुषोत्तम। इत्युक्तो मुनिशार्दूलैः शौनकः करुणानिधिः ॥९॥
द्वैपायनं पुरस्कृत्य वरमासनमास्थितः। कथयामास विविधाः कथाः सर्वमनोरमाः ॥ १० ॥
धर्मान्देशाश्रितान् कालं युगपर्वतसंस्थितान्। वर्णसंकरजातांश्च कर्माण्युच्चावचानि च ॥ ११ ॥
एवं कथयतस्तत्र कालो बहुतरो गतः। कदाचिदागतस्तत्र ऋषिसंघसमावृतः ॥ १२ ॥
जामदग्न्यो मुनिवरस्तपसा प्रज्वलन्निव। तं दृष्ट्वा मुनयः सर्वे ज्वलन्तमिव पावकम् ॥ १३ ॥
प्रत्युत्थाय प्रणेमुस्ते ह्यर्घ्यहस्ताः समुत्सुकाः। अस्तुवञ्जामदग्न्यं च कृतासनपरिग्रहम् ॥१४॥

---

+ सरस्वतीमहल – तंजावर आणि सरस्वतीभवन – वाराणसी येथें एक नवीनच सह्याद्रिखंडाचें लिखित ( क्रमांक १०२६९ व १५९८३ ) मिळालें. मुद्रित सह्याद्रिखंडाचा २० वा अध्याय व या लिखिताचा प्रथम अध्याय समान आहेत. विशेष श्लोक+ चिन्हानें दर्शविले आहेत. सरस्वतीभवन–वाराणसीच्या लिखितांत ११ वा अध्याय असून तो अपुरा आहे.

१ याविसे। २ अष्टान्प्रवास्तव्ये। ३ निमिषे। ४ नाना परिवष्टि संकुलम् (त.) ५ भौमाश्च (त.)। ६ स्तवनैः। ७ ततस्तु। ८ लोकात्। ९ जिगीषया। १० सुखवसत्कालमहोऽसि।

षट्कर्में, षट्पुच्छ, दोन यज्ञोपवीतें, पंक्तींत भोजन, पुराणश्रवण, रुद्राक्षधारण, शिरोवेष्टन, द्विजसंघांत प्रवेश या गोष्टी यांना विहित नाहीत, असें गुरूनें सांगितलें आहे. ३८–३९. अधिक कांहीं मी सांगत नाहीं. पंक्तिनिषिद्ध व दुराचारी माणसांचें अन्नग्रहण करणाऱ्यांस पाप लागतें. त्यास गंगास्नान हें प्रायश्चित्त आहे. त्यांच्या आश्रयानें राहणारे सर्व नराधम होत. त्यांना वाराणशींत वीस दिवस प्रवास करण्यास भाग पाडावें हेंही एक प्रायश्चित आहे! ४०–४२.

# अध्याय २० वा

## क्षेत्रमाहात्म्य

सूत म्हणाला, एकदां नैमिषक्षेत्रांत शंभर दिवसांचा एक प्रदीर्घ यज्ञ चालू होता. त्यासाठीं अनेक ऋषिसंघ जमले होते. १. तेथें सर्व ऋषि व स्वर्गीय ऐश्वर्य असून प्रत्यक्ष यज्ञनारायण होता. यज्ञदेव व महर्षि यांनीं वेद, स्तवनें, स्तोत्रें यांच्याद्वारा आमंत्रित केलेलीं सर्व दैवतें तेथें उपस्थित होतीं, तसेंच सर्व शास्त्रें व अस्त्रेंही होतीं. २–३. जणुं तिन्हीं लोकांचा उत्सव चालू होता. देवगुरूसह सर्व इंद्रादि देव शौनक मुनीजवळ आले होते. त्यांना पाहून सर्व ऋषि नम्रपणें उभे राहिले, व शौनकाला प्रेमानें म्हणाले, ह्या मृत्युलोकांत तोच खरा महापुरुष धन्य होय कीं, ज्याच्या केवळ आगमनानें सर्व लोक आनंदित होतात. आम्ही येथें यज्ञयाग करण्यासाठीं बसलों आहोंत. ४–७. पण दैनिक कर्मसमाप्तीनंतरचा आमचा काल सुखानें व्यतीत व्हावा यासाठीं आपण आश्चर्यकारक कथा व प्राचीन नीतिशास्त्रें निवेदन करण्याची कृपा करावी. याप्रमाणें ते मुनिश्रेष्ठ बोलल्यावर श्रेष्ठासनावर विराजमान झालेल्या दयानिधि शौनकानें द्वैपायन ऋषीला प्रमुख स्थानीं बसवून सुंदर कथा सांगितल्या. ८–१०. तसेंच देशकालानुसार धर्म, सह्याद्रि इत्यादि युगपर्वतांवरचे वर्ण, संकरजाति व त्यांचीं लहानमोठीं कर्में त्यानें सांगितलीं. ११. हें सर्व सांगण्यांत त्याचा पुष्कळ काळ निघून गेला.

एकदां तेथें ऋषिगणांसह जामदग्न्य मुनि आले. तपश्चर्येमुळें तो मुनि अग्नीसारखा देदिप्यमान दिसत होता. त्याला पाहतांच सर्वांनीं उठून त्यास प्रणाम केला. तो आसनस्थ झाल्यावर त्यांनीं त्याची यथासांग पूजा करून स्तुति केली. १२–१४.

त्वं राम जामदग्न्योऽसि ब्रह्मक्षत्रमुपाश्रितः। क्षत्रियापसदं राज्ञां शिरश्चिच्छेद सत्वरम् ॥१५॥ +
कार्तवीर्यस्य राजर्षेर्बाहुच्छेदं चकार ह। भूमिं निःक्षत्रियां सर्वां पित्रोरर्थे चकार ह ॥ १६ ॥+
त्रिःसप्तविप्रसाद् भूमिं कृत्वा शांतिमुपाश्रितः+। लवणाब्धिस्तु[1] ते त्रासात्
सह्यात्स्रस्तोऽभवत्किल ॥ १७ ॥

तत्र ये स्थापिता विप्रास्ते विद्याधर्मतत्पराः। तव नामांकितं क्षेत्रं[2]मिषुपातसमन्वितम् ॥ १८ ॥
तत्र लिंगान्यनेकानि क्षेत्राणि विविधानि च। दाल्भ्याद्या ऋषयः सर्वे कृता[3]श्च क्षेत्रवासिनः ॥
त्वया संस्थापिता विप्रास्त्वन्नाम्ना[4] निवसन्ति च। अत्यल्पदानसंतुष्टाश्चित्तपूता[5] इति श्रुताः ॥२०
त्वया दत्तवरोदीर्णाश्चित्तपूर्णा भवन्ति हि। त्रैविद्याः सत्यसंकल्पाः श्रौतस्मार्तक्रियापराः ॥२१॥ +
आर्यवृत्ता[6] इति ख्याता आर्यास्ते परिकीर्तिताः। प्राग्ज्योतिषां समाख्याता आर्यास्ते
परिकीर्तिताः ॥ २२ ॥

मुहूर्तगुणदोषज्ञा दैवज्ञा इति विश्रुताः। मलयादागता[7] विप्रा मलयाः परिकीर्तिताः ॥ २३ ॥
वेदविद्याविहीनास्तेऽपांक्तेया परिकीर्तिताः। अन्येऽपि देवराष्ट्रीया देवराष्ट्रदुपागताः ॥ २४ ॥
तेऽप्यल्पतपसो मंदा वेदाध्ययनवर्जिताः। अपांक्तेयास्त्वया त्याज्यास्ते गिरिकांतारवासिनः ॥२५+
कूटस्थका (ला) इतिख्याताः सर्वे ते ब्राह्मणाधमाः। अन्येऽपि पदिका विप्राः पद्मत्रं पिपाठिनः ॥
स्वाधयायाध्ययने नार्हाः श्रौतकर्मविवर्जिताः। अन्येऽपि कोंकणाः विप्रा मरुदेशात्समागताः ॥२७
श्रौतस्[8]मार्तक्रियाचारा गिरिकूटनिवासिनः। ब्राह्मणा इति ते ख्याता अभोज्यान्नाश्च सर्वशः ॥२८
अन्येऽपि करहाटास्ते[9] कैहपृष्ठास्थिसंभवाः[10]। द्विज्याग्न्या ब्राह्मणा मुख्याः श्रौतस्मार्तक्रियापराः ॥
अनूचानाः[11] श्रोत्रियास्ते पूज्याश्च सर्वकर्मसु। अपरैर्[12]विन्ध्यदेशीयैर्गरदैर्ब्राह्मणाधमैः ॥ ३० ॥
अज्ञानाद् योनिसंबंधात् किंचिन्निंद्यत्वमागताः। अतस्त्वनार्यास्ते ज्ञेया विपदा ब्रह्मघातिनः ॥३१
सुवर्णस्तेयनिरता ग्रामेषु नगरेषु च। शुभकार्येषु सर्वेषु वर्ज्यास्ते विप्र यत्नतः ॥ ३२ ॥
अन्ये वर्णाः संकराश्च सुखवासार्थमागताः। त्वमनेनैव देहेन[13] मुनिसंघसमावृतः ॥ ३३ ॥

† [ क्षत्रसंहारकारेण त्रिलोकीस्थितिकारिणा। बलेन तपसा रुद्रशिष्येणामिततेजसा ॥ १ ॥
निर्मितं चेषुपाताख्यं क्षेत्रं शूर्पारकं शुभम्। नाकाधिकतरं नित्यं सदा सर्वर्तुसेवितम् ॥ २ ॥
तत्र हरिहरौ साक्षात् गुरुशिष्यौ परस्परम्। यत्र पद्मोमासहितौ स्वगणैः परिवेष्टितौ ॥ ३ ॥
स्थितःबसो वयं सर्वे तिष्ठामः सुचिरं सुखम्। तथ्यं तं शरणं चैतद् यूयं चादिपुरुषम् ॥ ४ ॥ +
स एष भवतां सद्यः सत्रश्रेयः प्रदास्यति। इति देववचः श्रुत्वा ऋषिसंघसमावृतः ॥ ५ ॥
ततः षष्टिकुलैः सद्यः सचतुर्दशगोत्रकैः। ऋषिभिः सत्रनिष्ठैश्च कश्यपः सत्रदीक्षितः ॥ ६ ॥
तपस्यन्तं जामदग्न्यं ब्रह्मविष्णुशिवात्मकम्। तप्तकांचनसंकाशं सर्वाभरणभूषितम् ॥ ७ ॥

---

१ लवणाब्धिसुतस्तत्र तयादृष्टोऽभवत्किल। २ क्षेत्रे मिषुप्रान्ते समुद्भवम्। ३ जाताः। ४ विप्रास्त्वं नामाभि। ५ पूर्णाः। ६ आर्यावृत्ताः। ७ यमलागता ... यामलाः। ८ प्रोक्ताः। ९ मांसाशिनो निर्दयास्ते। १० खरपृष्ठसमुद्भवाः। ११ अनुधानाः। १२ परितः। १३ क्षेत्रेषु।

† सरस्वतीभवन, वाराणसी. क्रमांक १६०९०. यांत आरंभीचा भाग नाहीं. १४ अध्याय पूर्ण आहेत. १५ वा अध्याय अपूर्ण आहे. यांत तीर्थमहिमा आहे.

हे परशुराम, तूं जमदग्निपुत्र असून तुझ्यापाशीं ब्रह्मतेज व क्षात्रतेजही आहे. तूं नीच क्षत्रियांचा शिरच्छेद केलास. राजर्षि कार्तवीर्याचा बाहुच्छेद केलास. अशा रीतीनें मातापित्यांसाठीं सर्व पृथ्वी निःक्षत्रिय करून ती एकवीस ब्राह्मणांना दान केलीस व शांत झालास. समुद्र तुझ्या भीतीनें सह्याद्रीपासून दूर झाला व तुझ्यासाठीं भूमि निर्माण केली. १५–१७. तुझ्या बाणपातानें निर्माण झालेल्या व तुझ्याच नांवानें प्रसिद्ध असलेल्या या भूमींत तूं स्थापन केलेले सर्व ब्राह्मण वेदविद्येंत व धर्मांत तत्पर असतात. १८. तसेंच त्या भूमींत अनेक लिंगें व विविध क्षेत्रें आहेत. दाल्भ्य वगैरे सर्व ऋषि तुझ्याच या क्षेत्रांत वास करतात. तूं स्थापिलेले विप्र तुझेंच नांव घेतात. अत्यंत थोड्याशा दानानेंही संतोष पावणारे हे विप्र चित्तपूत या नांवानें प्रसिद्ध आहेत. १९–२०. तुझ्या वरानें गर्विष्ठ बनलेल्या या विप्रांचें चित्त नेहमीं परिपूर्ण असतें. दृढ संकल्पी असे हे विप्र तिन्ही विद्यांमध्यें प्रवीण असून श्रौत–स्मार्त कर्मांत तत्पर असतात. २१. श्रेष्ठ वर्तन असणाऱ्यास आर्य म्हणतात; तसेच कामरूप देशांतील लोकांनाही आर्य हीच संज्ञा आहे. २२.

मुहूर्तांचे गुण–दोष जाणणाऱ्यांना दैवज्ञ हें नांव आहे. मलयपर्वतापासून आलेले ब्राह्मण मलय ( मल्याळी ) या नांवानें प्रसिद्ध आहेत. २३. वेदविद्या न शिकलेले सर्व ब्राह्मण पंक्तिपात्र नव्हेत. देवराष्ट्रातून आलेले विप्र देवराष्ट्रीय होत. २४. तसेंच कूटस्थ (कोटा), पाद्दिक ( पद्ये ), कोंकण, करहाट इत्यादि ब्राह्मण, अन्यवर्णीय व संकरजातीचेही लोक तुझ्या क्षेत्रांत येऊन सुखानें राहतात. त्या सर्वांचें रक्षण करण्यासाठीं तूं स्वतः प्रत्यक्ष सर्व मुनींसह राहतोस, असें आम्ही ऐकलें आहे. हें तुझें अद्‌भुत रामचरित्र ऐकून व आठवून आम्ही

तं भक्तवत्सलं देवं दशावतारधारिणम् । कृतांजलिपरो भूत्वा ऋषिः स्तोतुमपचक्रमे ॥ ८ ॥
अस्तवीद् विविधैः स्तोत्रैः नानाछन्दोपबृंहितैः । ततः स्तुष्टो ह्यहं चेदमब्रुवं प्रीतिपूर्वकम् ॥ ९ ॥
भवदागमनात्तुष्टिश्चेच्छा च सफला ह्यभूत् । धन्यं च मामकं क्षेत्रं तृप्तिं याताश्च पूर्वजाः ॥१०॥
तपःसिद्धिश्च संजाता चित्तस्य पावनं तथा । अतो ऋषिगणाः सर्वे यूयं च चित्तपावनाः ॥ ११ ॥
भवतामीप्सितं यद् यद् वृणुध्वं तद् ददामि वः । ततस्ते ब्राह्मणा एवमब्रुवंस्तपसां निधिम् ॥ १२॥
यज्ञस्य फलदाता त्वं साक्षाद् यज्ञस्वरूपवान् । अस्मद्यज्ञाश्च संजाताः सत्रस्य फलभागिनः ॥१३
ज्ञानं च निर्मलं प्राप्तं स्वर्गो दृष्टस्त्वयि प्रभो । स्वर्गप्राप्तेस्तव प्राप्तिः सुखदाप्यमृताधिका ॥ १४॥
अतो वृणीमस्त्वेतावद् दासाःस्यामस्तवान्तिके । तवैव भजनं नित्यं तथा तवांघ्रिपूजनम् ॥१५॥
अनुकंपा च तेऽस्मासु अधुनैवास्तु सर्वदा । तथेत्युक्त्वा ततस्तूर्णं ऋषिभिस्तैः समन्वितः ॥१६॥
वसाम्यहं महेंद्रेऽद्रौ जगदुद्धरिणीतटे । तत्र ते ऋषयः पूर्वं स्थापिता गृहमेधिनः ॥ १७ ॥
कश्यपोऽत्रिभरद्वाजो जामदग्न्यमितुंदनाः । वत्साश्च विष्णुवृद्धाश्च वासिष्ठाः कपयस्तथा ॥१८॥+
शांडिल्याः कौशिकाश्चैव ब्राभ्रव्या गार्ग्यसंज्ञकाः । कौंडिन्याश्चैव ते विप्रा मत्क्षेत्रे निवसन्ति हि ॥
सुखिनो हर्षयुक्ताश्च वेदाध्ययनतत्पराः । षट्कर्मनिरता नूनं महायज्ञक्रियापराः ॥ २० ॥
तेषु खेदः कथं वात्र मनीषा विफला कथम् । तद् वदस्व महाभाग त्वत्सिद्धिं करवाणि काम् ॥
दाल्भ्य उवाच –
सर्वतीर्थाधिकं तीर्थमत्रास्ति जगदीश्वर । त्वमेव विभुः साक्षाद् श्रीगंगा विष्णुपदा त्वियम् ॥ ]
तेषां संरक्षणार्थाय वसंसीत्यनुशुश्रुम । एवमादीनि ते राम चरितान्यद्भुतानि वै ॥ ३४ ॥
श्रुत्वानुस्मृत्य संकीर्त्य तिष्ठामः सुचिरं वने । त्वया विनिर्मिते क्षेत्रे तीर्थान्यायतनानि च ॥३५॥
मुनीनामाश्रमाश्चैव क्षेत्राणि विविधानि च । शिवलिंगानि यानीह विष्णुक्षेत्राणि सर्वशः ॥३६
गाणपत्यानि सौराणि शाक्तानि विविधानि च । सद्यः प्रत्ययैकारीणि गुह्यानि त्रिविधानि च ॥३७
तेषां फलं विधिं चैव माहात्म्यं वक्तुमर्हसि । सागरस्य च माहात्म्यं तत्र वासेन किं फलम् ॥३८
स्नानदानविधिं चैव तर्पणादिविधिं तथा । ब्रूहि राम महाबाहो रेणुकेय नमोऽस्तु ते ॥३९॥
इति तेषां वचः श्रुत्वा जामदग्न्यो महामुनिः । शौनकं प्रेरयामास क्षेत्रमाहात्म्यमीरितुम् ॥४०॥
इति श्रीस्कन्दपुराणे सह्याद्रिखंडे क्षेत्रमाहात्म्यं नाम विंशतितमोऽध्यायः ।

---

१ वाससान्यशुश्रुमः । २ प्रत्ययकारिण्यै ।

त्थें पुष्कळ काळ वास केला. तूं निर्माण केलेल्या या क्षेत्रांत तीर्थें, देवालयें, मुनींचे आश्रम व विविध क्षेत्रें आहेत. शिवलिंगें, विष्णुक्षेत्रें व गणपति, सूर्य, देवी इत्यादि साक्षात्कार देणारीं देवतेंही आहेत. कित्येक गूढ स्थानेंही आहेत. त्या सर्वांचीं फलें, विधि, माहात्म्य इत्यादि सांगून सागर–माहात्म्यही सांगावें. हे रेणुकापुत्र परशुरामा, स्नान, दान व तर्पण यांचाही विधि कृपा करून सांगावा. हे परशुरामा, तुला नमस्कार असो. २५–४०.

हें त्यांचें वचन ऐकून परशुराम महामुनीनें क्षेत्रमहात्म्य निवेदन करण्यासाठीं शौनकास प्रवृत्त केलें.

# अथ एकविंशतितमोऽध्यायः ।

## परशुरामस्य चतुर्दश बाणाः ।

शौनक उवाच –

शौनकोऽहं प्रवक्ष्यामि क्षेत्रमाहात्म्यमुत्तमम् । रामस्य रैणुकेयस्य इषुपातांकितस्य च ॥ १ ॥
रामेण रैणुकेयेन भूमिः सर्वस्वदक्षिणा । दत्ता विप्राय विधिवत्कश्यपाय महात्मने ॥ २ ॥
कश्यपेनैवामुक्तस्त्वं दत्ता भूः स्पृशसे कथम् । पादपांसुप्रसंगेन दत्तं प्रहरणं भवेत् ॥ ३ ॥
ततो विनिर्गतो रामः सागरांतिकमागमत् । सागरं प्रार्थयामास मेदिनीं देहि सागर ॥ ४ ॥
महोदधे महोदार सर्वसत्त्वालय प्रभो । मैनाकप्रमुखाः सर्वे गिरयस्त्वां समाश्रिताः ॥ ५ ॥
नदीनां सरसां चैव पुष्करीणां च सर्वशः । निर्झराणां च सर्वेषां त्वमेवैकायतनं महत् ॥ ६ ॥
अन्ये देवाश्च दैत्याश्च कालखंजादयस्तथा । त्वामेव शरणं प्राप्ता विष्णोस्त्वं शरणं महत् ॥७॥
मया प्रसादादज्ञत्वात्सर्वा भूर्विप्रसात् कृता । तत्र नाहं गमिष्यामि अतस्त्वं याच्यसे प्रभो ॥
वासार्थं मेदिनीं देहि पदमात्रां[1] च मे प्रभो । इत्येवमादिकरुणैर्वचनैः संप्रबोधितः ॥ ९ ॥
सागरः प्रकटीभूय प्रणम्य मुनिसत्तमम् । मेदिनीं न प्रदास्यामि विभोराज्ञां न लंघये ॥१०॥
सागराः स्थापिताः सर्वे विष्णुना प्रभविष्णुना । रेखामात्रमपि त्यक्तुं लंघितुं वा न च क्षमः ॥
अदेयं यश्च गृह्णाति यश्चादेयं प्रयच्छति । तावुभौ महतोऽप्युच्चैः पाविनाविति नः श्रुतम् ॥
तस्मात्त्वं मुनिशार्दूल गच्छ वा तिष्ठ वा सुखम् । इत्युक्त्वा जलधिः सद्यस्तत्रैवांतरधीयत ॥
क्रुद्धस्ततोऽसौ पुरुषप्रवीरो युगांतकालांतसमं त्विषुं वै ।
चिक्षेप रत्नाकरशोषणाय तत्रेषुपातं प्रबभूव तीर्थम् ॥ १४ ॥
स्मृत्वा पाशुपतं चास्त्रं रौद्रं कालाग्निसंनिभम् । विन्यस्य शरयोः शल्ये धनुः पस्पर्श सत्वरम् ॥
त्र्यंबके पादमेकं च हरीशस्य च मूर्धनि । द्वितीयं पादमास्थाय विचकर्ष महद्धनुः ॥ १६ ॥
ततो धनुः कर्षणनादभिन्नो मेरुस्तथान्ये गिरयश्च मेदिनी ॥
चचाल सर्वा स्फुरितैश्च तैः समं महोदधिः संशयमापतत्क्षणात् ॥ १७ ॥
तन्निनादमुपश्रुत्य सदेवासुरमानुषम् । बभूव चलितं सर्वमकस्मात् किं प्रवर्तते ॥ १८ ॥
ततस्तौ निःसृतौ बाणौ पतितौ लवणार्णवे । ज्वालामालासहस्राढ्यौ कल्पांतदहनोपमौ ॥१९॥
ताभ्यां समुत्थितो वह्निः प्रददाह महोदधिम् । तृणवत्तज्जलं सर्वमकस्माद् भस्मसात्कृतम् ॥
ततो हाहाकृतं सर्वं सदेवासुरमानुषम् । ब्रह्माद्या देवताः सर्वाः परं विस्मयमागताः ॥ २१ ॥
षड्योजनायतो दीर्घस्ततः शुष्को महोदधिः । ततस्तूर्णं समुत्थाय भीमशंकरमागतः ॥२२॥
तथैव संदधे बाणं कालाग्निसदृशप्रभम् । सोऽपि षड्योजनं तोयं प्रददाह महोदधेः ॥ २३ ॥

---

१ पठमात्रस्य

# अध्याय २१ वा

## परशुरामाचे चौदा बाण

शौनक म्हणाले, ऋषि हो, रेणुकापुत्र रामानें निर्माण केलेल्या या इषुपात क्षेत्राचें माहात्म्य मी तुम्हाला सांगतों. १. परशुरामानें कश्यपमुनीला सर्व पृथ्वी सर्वस्व दक्षिणा देऊन दान केली. २. दान केलेल्या पृथ्वीवर राहाण्याचा तुला काय अधिकार आहे ? माझ्या पृथ्वीवर तुझ्या चरणाची धूळ पडली तर तुझ्यावर प्रहार होईल ! असें कश्यपमुनि परशुरामास म्हणाले. ३. म्हणून परशुराम थेट समुद्राजवळ आला व त्यानें समुद्राकडे 'मला राहण्यास भूभाग दे' अशी मागणी केली. ४.

तो म्हणाला, हे महासागरा, तूं मोठा उदार आहेस. सर्व प्राण्यांचा तूं आश्रय आहेस. हे प्रभो, मैनाक इत्यादि प्रमुख पर्वत तुझाच आश्रय करतात. ५. नद्या, सरोवरें, तळीं व झरे या सर्वांचें तूंच एक मोठें आश्रयस्थान आहेस. ६. देव व कालखंजादि सर्व दैत्य तुलाच शरण आलेले असून विष्णूचाही तूंच मोठा आश्रय आहेस. ७. मी प्रसन्न होऊन अज्ञानानें सर्वच पृथ्वी ब्राह्मणांच्या स्वाधीन केली ! त्यामुळें मी त्या पृथ्वीवर राहूं शकत नाहीं ! म्हणून मी तुझ्याकडे पृथ्वीची याचना करतों. ८. हे प्रभो, मला राहण्यासाठीं पाय ठेवण्यापुरती जागा दे. ९. याप्रमाणें रामानें करुण वचनांनीं आवाहन केलें, तेव्हां सागर प्रकट होऊन राममुनीस म्हणाला, ईश्वराची आज्ञा मोडणें योग्य नव्हे, म्हणून मी तुला भूभाग देऊं शकत नाहीं. १०. प्रभु विष्णूनें जी सागरमर्यादा ठरविली आहे ती मी बिलकुल सोडणार नाहीं. ११. घेण्यास अयोग्य वस्तु जो देतो व जो ती वस्तु घेतो, ते दोघेही महापापी होत असें आम्ही ऐकलें आहे. १२. म्हणून हे मुनिश्रेष्ठा, तूं येथून जा किंवा येथें उभा रहा. असें बोलून सागर तत्काल अंतर्धान पावला. १३. त्याचें हें भाषण ऐकून तो पुरुषश्रेष्ठ अत्यंत क्रुद्ध झाला व त्यानें समुद्र-शोषणासाठीं प्रलयंकारी बाण फेंकला. त्यामुळें तेथें इषुपातक्षेत्र निर्माण झालें. १४.

प्रथम त्यानें प्रलयाग्नीसारख्या भयानक पाशुपतास्त्राचें ध्यान करून दोन तृण-बाण धनुष्यास जोडले. १५. एक पाय त्र्यंबकगिरीवर ठेवला व दुसरा हरीशपर्वतावर ठेवून दोरी ओढली. १६. त्या टणत्कारानें मेरु इत्यादि पर्वत दुभंगले, सर्व पृथ्वी हादरली, व समुद्रावर मोठें संकट कोसळलें ! १७. तो आवाज ऐकून देव, असुर व मानव यांसह सर्व विश्व आश्चर्यचकित झालें. काय होत आहे, हेंच त्यांना समजलें नाहीं ! १८. धनुष्यांतून सुटलेले ते दोन बाण समुद्रांत पडले तेव्हां त्यांतून प्रलयाग्नीसारख्या हजारों ज्वाळा बाहेर पडत होत्या. १९. त्या ज्वाळा महासागरास जाळूं लागल्या ! त्यामुळें त्याचें सर्व पाणी एकदम नष्ट झालें. २०. तेव्हां देव, असुर व मानव यांमध्यें हाहाःकार उडाला व ब्रह्मा इत्यादि सर्व देवांना मोठें आश्चर्य वाटलें. २१. सहा योजन रुंद व लांब एवढा समुद्र कोरडा झाला ! तेथून परशुराम लगेच भीमाशंकर येथें आला. २२. तेथेंही त्यानें कालाग्नीसारखा तेजस्वी बाण सोडला, समुद्राचें पाणी सहा योजनपर्यंत दग्ध केलें. २३.

एवं क्रमेण सह्याद्रेः शिखरं शिखरं प्रति । स्थित्वा स्थित्वा स मुमुचे बाणानब्धौ चतुर्दश ॥
ततो देवाः समागत्य रामं शस्त्रभृतां वरम् । प्रणेमुः शिरसा भूमौ स्पृष्ट्वा स्पृष्ट्वा पुनः पुनः ॥
नमस्ते मुनिशार्दूल रैणुकेय महाव्रत । त्वयायं विधृतो लोकः सदेवासुरमानुषः ॥ २६ ॥
तस्मात्त्वं विप्रशार्दूल बाणं संहर संहर । सागरे निहते तूर्णं लोकः सर्वो विनश्यति ॥ २७ ॥
सागराज्जायते वृष्टिस्ततो धान्यं ततो मखः । सस्यान्योषधयः सर्वा वृष्ट्यायत्तानि सर्वशः ॥२८
समस्तजीवलोकोऽयं देवलोकस्तथापरे । वृष्टिमेवाभिवाञ्छन्ति सा वृष्टिः सागरानुगा ॥२९॥
त्वमादिपुरुषः साक्षान्मायामानुषविग्रहः । ब्रह्मणा प्रार्थितः पूर्वमवतीर्णोऽसि भूतले ॥ ३० ॥
कार्तवीर्यवधार्थाय हैहयानां तथैव च । भूमेर्भारावताराय साधूनां पालनाय च ॥ ३१ ॥
विपरीतमिदं प्राप्तं त्रैलोक्यक्षयकारणम् । क्रोधं संहर देवेश त्रैलोक्यं परिपालय ॥ ३२ ॥
जंबुद्वीपादयो द्वीपाः सागरा लवणादयः । त्वयैव स्थापिताः पूर्वं तांस्त्वं संहरसे कथम् ॥३३
कृतापराधः पापोऽयं सागरः पयसां निधिः । स्वेनैव कर्मणा दग्धस्त्वमेनं क्षन्तुमर्हसि ॥ ३४
प्राञ्जलिः प्रणतो ह्येष प्रह्वस्त्वां संप्रतीक्षते । अनुकंपय देवेश अस्त्रं संहर संहर ॥ ३५

सागर उवाच –

कृष्णेन भाषितं पूर्वं ब्राह्मणा मामकी तनुः । मान्याः सर्वत्र पूज्याश्च नावमान्याः कदाचन ॥ ३६
मया मूढतमेनाद्य ब्राह्मं तेजस्तिरस्कृतम् । गच्छ वा तिष्ठ वेत्युक्तं याञ्चा ते विफलीकृता ॥ ३७
अपराधसहस्राणि कृतवानस्मि मंदधीः । एषां दण्डो मया प्राप्तः क्षन्तव्यमधुना विभो ॥ ३८
पावको मां दहत्येष रौद्रास्त्रेण प्रवर्धितः । नैव सोढुं समर्थोऽस्मि त्यक्ष्ये प्राणानहं विभो ॥३९॥
विलपन्तमतीवोच्चैः सागरं पतितं भुवि । रैणुकेयस्तु तं दृष्ट्वा कृपया क्लिन्नमानसः ॥ ४० ॥
अस्त्रं संहृतवानाशु मा भैस्त्वमिति चाब्रवीत् । मया संचालितः सह्याद् चतुर्भिर्दशभिः शरैः ॥
षड्योजनायतं दीर्घं चतुराशीतिमायतम् । इषुपातांकितं चाशु भविष्यति न संशयः ॥ ४२ ॥
इदं क्षेत्रं त्वया सिंधो रेखामात्रमपि क्वचित् । प्रलयेऽपि न चोल्लघ्यं वातव्याघूर्णनेन च ॥ ४३ ॥
मया संप्रेषिता बाणाः शिवरूपास्तवांतिके । प्रतिष्ठिता भविष्यंति तान् भजस्व निरंतरम् ॥४४॥
मर्यादावलयं त्वेतद् गृहाण पयसां निधे । स्वतीरे स्थापयाशु त्वं न तल्लिंतुमर्हसि ॥ ४५ ॥
ये शापाः ब्राह्मणैः पूर्वं दत्तास्ते पयसां निधे । ते सर्वे न भविष्यन्ति चतुराशीतियोजने ॥ ४६ ॥
मत्क्षेत्रवासिभिः सर्वैरन्यैर्देशांतरागतैः । संसेव्यः सर्वदा सिंधुः स्नानपानावगाहनैः ॥ ४७ ॥
अत्र वासं करिष्यन्ति वर्णाः संकरजातयः । मुक्ता एव भविष्यंति मत्प्रसादान्न संशयः ॥४८॥
गच्छ सागर भद्रं ते मयानुज्ञापितः सुखम् । महोदधे महाभाग विषादं मा करिष्यसि ॥४९॥
तदाज्ञां शिरसा वन्द्य प्रणिपत्य पुनः पुनः । पुनः प्रदक्षिणीकृत्य सागरः प्रययौ सुखम् ॥५०॥
इति श्रीस्कन्दपुराणे सह्याद्रिखंडे स्वायंभुवे इषुपातक्षेत्रोत्पत्तिनामै एकविंशतिमोऽध्यायः ।

अशा रीतीनें सह्याद्रीच्या शिखरांवरून त्यानें क्रमानें चौदा बाण समुद्रांत सोडले. २४. तेव्हां सर्व देव येऊन सर्वश्रेष्ठ शस्त्रधारी रामाला पुनः पुनः नम्रपणें प्रणाम करून म्हणाले, रेणुकेय मुनिश्रेष्ठा, तुला नमस्कार असो. देव, असुर व राक्षस यांसह सर्व विश्वाचा तूं आधार आहेस! यास्तव हे ब्राह्मणश्रेष्ठा, हा बाण तूं मागें घे. कारण सागर नष्ट झाल्यास सर्व लोक नाश पावतील. २५–२७. सागरापासून जी वृष्टि होते, त्या वृष्टीमुळेंच धान्य व यज्ञ होतात. धान्य, वनस्पति इत्यादि सर्व पर्जन्यावर अवलंबून असतें. २८. सर्व प्राणी व देव ज्या पर्जन्याची अपेक्षा करतात, तो पर्जन्य समुद्रावर अवलंबून असतो. २९. तूं साक्षात् आदि-पुरुष असून तुझें मानवी शरीर ही माया आहे. ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेवरून कार्तवीर्य व हैहय यांचा वध करून भूभार दूर करून संतांच्या रक्षणासाठीं तूं अवतरला आहेस. ३०–३१.

पण आज हें विपरीत होत आहे. यास्तव हे देवेशा, क्रोध आवर आणि त्रैलोक्याचें रक्षण कर. ३२. जंबुद्वीपादि द्वीपें व लवणादि सर्व सागर पूर्वी तूंच स्थापन केले आहेस, मग तूंच त्यांचा संहार कां करतोस? ३३. हा अपराधी सागर स्वतःच्याच पापकर्मामुळें दग्ध झाला आहे. आतां त्याला आपण क्षमा करावी. ३४. कारण हा नम्र समुद्र हात जोडून तुझ्याकडे दयेची याचना करीत आहे. देवेशा, कृपा करून अस्त्र मागें घे. ३५. सागर म्हणाला, सर्व ब्राह्मण स्वतःचें शरीर असल्याचें कृष्णानें यापूर्वी सांगितलें आहे; म्हणून माननीय ब्राह्मण हे सर्वत्र पूज्य होत. त्यांचा अवमान कधींही करूं नये. ३६. मी मूर्खानें मात्र आज ब्राह्मतेजाचा अवमान केला. 'निघून जा किंवा येथें उभा रहा,' असें बोलून मी त्याची याचना निष्फल केली. ३७. मी हजारों अपराध केले. मी मूर्ख आहें. मला माझ्या कुकर्माची शिक्षा मिळाली. हे विभो, आतां मला क्षमा करावी. ३८. रौद्रास्त्राचा हा भडकलेला जाळ मला जाळीत आहे. मला सहन होत नाहीं. अशानें मी मरून जाईन. ३९. याप्रमाणें मोठ्यानें विलाप करून पृथ्वीवर लोळण घेतलेल्या सागरास पाहून परशुरामाचें मन द्रवलें व लगेच त्यानें अस्त्र मागें घेतलें. राम सागरास म्हणाला, सागरा, भिऊं नकोस. मी चौदा बाणांनीं तुला मागें हटविलें आहे. त्यामुळें सहा योजन रुंद व चौऱ्याऐंशीं योजन लांब असें इषुपातक्षेत्र निश्चित निर्माण होईल. ४०–४२. हे सिंधो, प्रलयकाळींसुद्धां वावटळीनें तूं या क्षेत्रावर तसूभरही आक्रमण करतां कामा नये. ४३. तुझ्याजवळ मी शिवस्वरूप बाण टाकले आहेत. ते स्थिर राहतील. त्यांचा नित्य आदर कर. ४४. जलनिधे, हें मर्यादावलय घे व तुझ्या तीरावर ठेव. त्याचें उल्लंघन तूं करूं नकोस. ४५. तुला ब्राह्मणांनीं जे शाप दिले असतील, ते सर्व शाप या चौऱ्याऐंशीं योजनांच्या अंतरांत व्यर्थ होतील. ४६. या क्षेत्रांतील लोक व परदेशांतून आलेले लोक स्नान, पान, अवगाहन इत्यादि रूपानें तुझें सेवन करतील. ४७. जे वर्ण व संकर जाति येथें वास करतील, ते सर्व माझ्या प्रसादानें निश्चित मुक्त होतील. ४८. जा, सागरा आतां सुखानें जा. माझी तुला परवानगी आहे. माझ्या कृपेनें तुझें कल्याण होईल. विषाद मानूं नकोस. ४९. नंतर परशुरामाची आज्ञा मान्य करून व पुनः पुनः त्यास प्रदक्षिणा व प्रणाम करून सागर आनंदानें निघून गेला. ५०.

# अथ द्वाविंशतितमोऽध्यायः

परशुराम इषुपातक्षेत्रे ऋषीन् देवांश्च स्थापयति ।

ऋषय ऊचुः –

सिंधुराजमनुप्राप्य रामः शास्त्रभृतां वरः । ततः परं किमकरोत् कथयस्व महामुने ॥ १ ॥

शौनक उवाच ।

पुरः पश्चादधश्चोर्ध्वं दग्धं पाशुपताग्निना । तत्क्षेत्रमवलोक्याथ सर्वप्राणिविवर्जितम् ॥ २ ॥
प्रोक्षयामास मंत्रेण स्वकमंडलुवारिणा । बीजामृतरूपेण जीवयन्निव सत्वरम् ॥ ३ ॥
तत्रागच्छन्नगस्त्याद्या ऋषयः सह्यशैलतः । बोधायनो वसिष्ठश्च दाल्भ्यो व्याडीशवेलणः ॥ ४ ॥
कहोड्रो व्याघ्रपाच्चैव तृणबिन्दुश्च कश्यपः । हिरण्यकेशी औचथ्यः सत्याषाढश्च शैशिरः ॥ ५ ॥
अत्रिश्च पुलहश्चैव बाष्कलश्चाश्वलायनः । आगमन्नृषयश्चान्ये शतशोऽथ सहस्रशः ॥ ६ ॥
कैलासादागमच्छंभुरुमागणशसैर्वृतः । कार्तिकेयो गणेशश्च वीरभद्रस्तथैव च ॥ ७ ॥
वैकुण्ठादागतो विष्णुः सनकाद्यैः सपार्षदैः । ब्रह्मा वेदैस्तदंगैश्च नारदाद्यैः समागमत् ॥ ८ ॥
इंद्राद्या लोकपालाश्च यक्षगंधर्वकिन्नराः । अप्सरोभिश्च सिद्धैश्च सर्वदेवगणैः सह ॥ ९ ॥
तानागतान्समालोक्य प्रफुल्लनयनोऽब्रवीत् । मया विनिर्मितं क्षेत्रं समुद्रांतर्गतं महत् ॥ १० ॥
भवदागमनाज्जातं सर्वतीर्थोत्तमोत्तमम् । युष्मांश्च प्रार्थयाम्येकं सर्वान् देवर्षिसत्तमान् ॥ ११ ॥
शंभो त्वमुमया सार्धं गणैः स्कंदादिभिः सह । विष्णो त्वं रमया सार्धं सनकाद्यैः स्वपार्श्वगैः ॥१२॥
ऋषिभिर्देवगंधर्वैरप्सरोभिश्च किंनरैः । सहैव सर्वैः स्थातव्यं व्याप्य क्षेत्रमिदं शुभम् ॥ १३ ॥
आशिषश्च प्रदातव्याः क्षेत्रस्यास्य महोदयाः ।

इति श्रीस्कन्दपुराणे सह्याद्रिखंडे क्षेत्रमाहात्म्ये देवर्षिस्थापना नाम द्वाविंशतितमोऽध्यायः ।

# अथ त्रयोविंशतितमोऽध्यायः ।

समुद्रस्नानविधिः ।

देवा ऊचुः –

सर्वदैव वयं सर्वे तिष्ठामस्त्वदनुज्ञया । आश्रमान् विविधान् कृत्वा लिंगक्षेत्राणि सर्वशः ॥ १ ॥

ऋषय ऊचुः –

अगस्त्यप्रमुखाः सर्वे सिद्धगंधर्वकिंनरैः । अप्सरोभिः सहैवात्र त्वत्प्रीत्या निवसामहे ॥ २ ॥
क्षेत्रं त्वदीयं सर्वत्र सर्वलोकसुखावहम् । सर्वसस्ययुतं धन्यं गोमहिष्यादिसंकुलम् ॥ ३ ॥
प्रकामवर्षी पर्जन्यः सर्वरोगविवर्जितम् । दुर्भिक्षादि भयं नात्र न हि दुर्भिक्षपीडिताः ॥ ४ ॥
अत्र स्थिताः प्रजाः सर्वा यान्ति देशान्तरं क्वचित् । देशान्तरादत्र यान्ति आपदं
निस्तरन्ति ते ॥ ५ ॥

# अध्याय २२ वा

## इषुपातक्षेत्रांत ऋषि-देवांची स्थापना

ऋषि म्हणाले, महामुने, त्यानंतर श्रेष्ठ शस्त्रधारी रामानें समुद्राजवळ जाऊन काय केलें, तें सांगा. १.

शौनक म्हणाले, पाशुपतास्त्राच्या अग्नीमुळें तें क्षेत्र सर्व बाजूंनीं दग्ध व सर्वप्राणिरहित केलेलें पाहून परशुरामानें आपल्या कमंडलूंतील पाण्यानें मंत्रोच्चारपूर्वक त्यावर प्रोक्षण केलें, व जणुं काय त्यास अमृत देऊन तें सजीव केलें. २–३. म्हणून सह्याद्रीवरून अगस्ति ऋषि, बोधायन, दाल्भ्य, सत्याषाढ, शौशिर, अत्रि, पुलह, बाष्कल, आश्वलायन आणि अन्य शेंकडों, हजारों ऋषि तेथें आले. ४–६. कैलासावरून उमा व अखिल गणांसह श्रीशंकर, कार्तिकेय, गणेश व वीरभद्र तेथें आले. ७. वैकुंठांतून सनकादि व पार्षद यांसह श्रीविष्णु, सांगवेद व नारदादिकांसह श्रीब्रह्मदेव तेथें आले. ८. इंद्रादि लोकपाल, यक्ष, गंधर्व, किंनर, अप्सरा व सिद्ध यांसह सर्व देव तेथें उपस्थित झाले. ९. उपस्थित झालेल्या त्या सर्वांना पाहून आनंदानें रामाचे नेत्र विकसित झाले. तो म्हणाला, मी समुद्रांत निर्माण केलेलें हें महाक्षेत्र तुमच्या आगमनानें सर्वश्रेष्ठ तीर्थ बनलें आहे. म्हणून तुम्हां सर्व देवर्षींना मी प्रार्थना करतों. १०–११. हे शंभो, तूं उमा व स्कंदादि गणांसह येथें वास करावा. १२. हे विष्णो, तूं रमा व सनकादि पार्षदगणांसह येथें रहावें. १३. तसेंच ऋषि, देव, गंधर्व, अप्सरा व किंनर या सर्वांनींही हें सर्व क्षेत्र व्यापून येथें रहावें व या क्षेत्रास आशीर्वाद द्यावा. १४.

# अध्याय २३ वा

## समुद्रस्नानविधि

देव म्हणाले, आम्ही सर्व तुझ्या अनुज्ञेनें येथें विविध आश्रम व लिंगक्षेत्रें करून राहतों. १. ऋषि म्हणाले, सिद्ध, गंधर्व, किंनर, अप्सरा यांसह आम्ही अगस्तिप्रमुख सर्व ऋषि तुझ्या प्रेमासाठीं येथेंच राहूं. २. तुझें हें क्षेत्र सर्व लोकांस सुखावह, धान्यसंपन्न व गाईमहिषी यांनीं परिपूर्ण असें होईल. ३. हें क्षेत्र रोगरहित होऊन येथें पाऊस भरपूर पडेल. येथें दुष्काळाची भीति राहाणार नाहीं. ४. जे लोक येथून अन्यत्र जातील, तसेंच जे येथें अन्य देशांतून येतील, ते सर्व आपत्तींतून मुक्त होतील. ५.

सर्वदा फलिनो वृक्षाः पनसाम्रकपित्थकाः । पूगाश्च नागवल्यश्च मरीचानां च वल्लयः ॥ ६ ॥
नारिकेल्यः कदल्यश्च फलभारनताः सदा । नातिवृष्टिर्नातिवात्या नात्युल्काबाधनं क्वचित् ॥७
देवानां च ऋषीणां च तपःसाधनमुत्तमम् । इषुपातांकितं रामक्षेत्रं ख्यातिं गमिष्यति ॥ ८ ॥
इत्याशिषः संप्रयुज्य स्थितास्तत्रैव देवताः ।
ब्रह्मोवाच –
रामराम महाभाग रेणुकानंदवर्धन ॥ ९ ॥
समुद्रस्नानमाहात्म्यं क्षेत्रमाहात्म्यमुत्तमम् । सागरस्य च माहात्म्यं क्षेत्रवासे च यत्फलम् ॥
क्षेत्रेऽस्मिन् म्रियमाणानां गतिं वद सुविस्तरात् ।
राम उवाच –
ब्रह्मविष्णूद्भवा लोकाः सागरास्त्वत्प्रतिष्ठिताः ॥ ११ ॥
त्वं सर्वं वेत्थ भगवन् किं मां प्रष्टुमिहेच्छसि । तथापि त्वत्प्रसादेन किंचिद् वक्ष्यामि तच्छृणु ॥
पृथिव्यां सन्ति तीर्थानि गोदाकृष्णे च जाह्नवी । सागरस्य ध्वनिं श्रुत्वा दृष्ट्वा च पयसां निधिम् ॥ १३ ॥
मासद्वयकृतात् पापान्मुच्यते नात्र संशयः । चान्द्रैः षण्मासमभ्यस्तैर्यत्फलं लभते नरः ॥ १४
सकृत्स्नानादवाप्नोति तत्फलं पयसां निधौ । संगमे द्विगुणं तस्मात् त्रिगुणं शिवसंनिधौ ॥ १५॥
संगमे शिवसांनिध्ये तीर्थे सागरगेऽपि च । चतुर्णां संगमो यत्र तत्र स्नानं सुदुर्लभम् ॥१६॥
चान्द्रैः संवत्सराभ्यस्तैर्यत्फलं प्राप्यते नृभिः । तत्फलं समवाप्नोति तत्र स्नानान्न संशयः ॥
देशकालावनुस्मृत्य पुलिने पयसां निधेः । स्मृत्वा रामं च सीतां च हनूमन्तं तथांगदम् ॥१८
बिभीषणं च सुग्रीवं वालिनं कपिपुंगवम् । तीक्ष्णदंष्ट्रमहाकायं भैरवं तीर्थरक्षकम् ॥ १९ ॥
नमस्कृत्य नमस्कृत्य लब्ध्वानुज्ञां च भैरवात् । पिप्पलादसमुद्भूतां कृत्यां सागरसंस्थिताम् ॥
आहारं वालुकापिंडं तस्मै दत्वा पुनः पुनः । प्रविश्य तीर्थराजानं संतर्प्याः पितृदेवताः ॥ २१
रामः सीता लक्ष्मणश्च हनूमांश्च तथांगदः ।
इतिश्री स्कान्दे पुराणे सह्याद्रिखंडे समुद्रस्नानविधिर्नाम त्रयोविंशतितमोऽध्यायः ।

## अथ चतुर्विंशतितमोऽध्यायः ।

### तीर्थमहिमावर्णनम् ।

श्रीराम उवाच –
अश्वत्थसागरौ सेव्यौ न स्प्रष्टव्यौ कदाचन । अश्वत्थं मंदवारे तु सागरं पर्वणि स्पृशेत् ॥ १ ॥
विना मंत्रं विना पर्व क्षुरकर्म विना नरैः । कुशाग्रेणापि देवेश न स्प्रष्टव्यो महोदधिः ॥ २ ॥
वृषभस्तत्र दातव्यः प्रवृत्ते क्षुरकर्मणि । प्रथमं स्नाति यः सिंधौ तस्यायमुदितो विधिः ॥ ३ ॥
ततः परं पूर्वविधिरब्धिस्नाने च कीर्तितः । रामक्षेत्रमिदं ब्रह्मन् कोंकणाधः प्रतिष्ठितम् ॥ ४ ॥
समुद्रगर्भ इत्येतद् भूखंडादतिरिच्यते । शंखोद्धारे निवसतां द्वारकावासिनां तथा ॥ ५ ॥
प्रयागवासिनां नित्यमविमुक्तनिवासिनाम् । यत्फलं तदवाप्नोति क्षेत्रे निवसतां नृणाम् ॥ ६ ॥

पनस, आम्र, कपित्थ, नारिकेल, कदली, मरीचलता, नागवल्ली व पूग हे वृक्ष भरपूर फळें देतील. ६. येथें अतिवृष्टि, मोठी वावटळ व उल्कापात यांची बाधा होणार नाहीं. ७. देव व ऋषि यांच्या तपाचें उत्तम साधन असें हें रामाचें इषुपातक्षेत्र प्रसिद्ध होईल. ८. याप्रमाणें आशीर्वाद देऊन सर्व देव तेथें राहिले. ब्रह्मदेव म्हणाले, हे रेणुकानंदवर्धन रामा, प्रथम समुद्रस्नान, रामक्षेत्र व सागर यांचें माहात्म्य सांगून त्यानंतर क्षेत्रनिवासाचें फल सांग. तसेंच या क्षेत्रांत मृत्यु पावणाऱ्या प्राण्यांना कोणती गति मिळते, तेंही सविस्तर सांग.

परशुराम म्हणाले, हे तिन्ही लोक ब्रह्मदेव व विष्णु यांपासून उत्पन्न झाले असून सर्व सागरांचा आधार तूं आहेस. हे भगवन्, हें सर्व तुला माहित आहेच! मग मला कां विचारतां? तथापि तुझ्याच प्रसादानें मी सांगतों, ऐक. ९–१२. पृथ्वीवर गोदावरी, कृष्णा, गंगा इत्यादि अनेक तीर्थें आहेत. पण केवळ समुद्रदर्शनानें व त्याचा ध्वनि ऐकल्यानें दोन महिन्यांचें पाप नष्ट होतें. सहा महिने चांद्रायण व्रत केल्यानें मनुष्याला जें फल मिळतें, तें फल केवळ एकदां समुद्रस्नान केल्यानें मिळतें. संगमस्नानानें दुप्पट व शिवसान्निध्यांत तिप्पट फल मिळतें. १३–१५. एक वर्ष चांद्रायणव्रत केल्यानें जें फल मिळतें, तें फल चार नदीच्या संगमांत स्नान केल्यानें मिळतें. समुद्रतीरावर देशकालानुसार राम-सीता, हनुमान, अंगद, बिभीषण, सुग्रीव व वाली यांचें स्मरण करावें. महाकाय व तीक्ष्णदंष्ट्र भैरवनाथ या तीर्थरक्षकास नमस्कार करावा. त्यांची अनुज्ञा घेऊन पिप्पलाद ऋषीपासून उत्पन्न झालेल्या समुद्रवासी कृत्येला वालुकापिंड अर्पण करावा. त्यानंतर तीर्थराज समुद्रांत स्नान करावें. पितर, देवता व राम, लक्ष्मण, सीता, हनुमान, अंगद यांचें तर्पण करावें. १६–२१.

## अध्याय २४ वा

## तीर्थमहिमा

श्रीराम म्हणाले, अश्वत्थ व सागर यांची सेवा करावी, त्यांना कधीं स्पर्श करूं नये. फक्त शनिवारीं अश्वत्थाला व पर्वकालीं समुद्राला स्पर्श करावा. १. हे देवेशा, पर्वकालीं मंत्रोच्चार व क्षौर केल्याखेरीज महासागराला दर्भाग्रानें सुद्धां स्पर्श करूं नये. २. क्षौरविधि झाल्यावर वृषभदान करावें. प्रथमच स्नान करणाऱ्यांसाठीं हा विधि सांगितला आहे. त्यानंतरच्या समुद्रस्नानाविषयींचा विधिही पूर्वी सांगितला आहे. हे ब्रह्मन्, हें रामक्षेत्र कोंकणच्या खालीं असून हा भाग समुद्राच्या आंतील असल्यानें भूखंडाहून श्रेष्ठ आहे. शंखोद्धार, द्वारका, प्रयाग व अविमुक्त वाराणसी येथें वास केल्यानें जें फल मिळतें. तें या क्षेत्रांत वास केल्यानें मिळतें. ३–६.

ये म्रियन्ते चाब्धिगर्भे क्षेत्रे रामविनिर्मिते । सत्यलोकमुषित्वान्ते मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः ॥ ७ ॥
पुलिने ये प्रस्त्रीयन्ते दह्यन्ते पुलिने च ये। साक्षान्मोक्षो भवेत्तेषां सत्यं सत्यं वदाम्यहम् ॥ ८ ॥
जामदग्न्ये वदत्येवमाकाशादभवद् ध्वनिः । मा कुरुष्वात्र संदेहं श्रुतिरेषा सनातनी ॥ ९ ॥
इति श्रुत्वा तयोर्वाक्यं विश्वस्ताः सर्वदेवताः । नित्रासं प्रययुः सर्वे विस्त्रब्धाश्चाकुतोभयाः ॥१०॥
शिवो त्रिश्वेश्वरं लिंगं प्रतिष्ठाप्योमया सह । स्थितस्तत्रैव सगणो रामस्य मुदमावहत् ॥ ११ ॥
रामबाणोऽभवल्लिंगं ततो बाणेश्वरं महत् । सप्तर्षिस्थापितं लिंगं सप्तकोटीश्वरं ततः ॥ १२ ॥
ततः परं महातेजाः कुनिकेतो महानृषिः । कुनिकेतेश्वरं लिंगं सर्वलोकनमस्कृतम् ॥ १३ ॥
स्थापयामास विधिवत् तत्र देवः स्वयं स्थितः । तत्र वैतरणी गंगा स्वयं सागरगामिनी ॥१४॥
कर्हपृष्ठात् समायातः करहाटो महानृषिः । करहाटेश्वरं लिंगं स्थाप्य तत्रैव संस्थितः ॥ +
तदुत्तरे बदरिका नरनारायणाश्रमः । +
तत्र वेदध्वनिर्नित्यं निशीथे श्रूयतेऽधुना । कार्तिकेयो गुहः साक्षाद् वरदांबासमन्वितः ॥१५॥
आश्रमं कृतवान् सिंधोस्तीरे नाम्ना गुहाकरम् । गुहाकरं गुहक्षेत्रं सर्वसिद्धिनिषेवितम् ॥१६॥
पंचशीर्षो महादेवः पंचोपनिषदात्मकः । पंचब्रह्ममयः साक्षात् पंचनारायणात्मकः ॥ १७ ॥
ऋषेर्व्याडेस्तपःसिद्धिं कर्तुमाविरभूत्स्वयम् । तच्च व्याडीश्वरं लिंगं स्वयं ज्योतिः प्रतिष्ठितम् ॥
यद् द्रष्टुं सिद्धगन्धर्वाः प्रदोषे यांति नित्यशः । यत्र सत्यानृते व्यस्ते दृश्येते प्राणिनां स्फुटम् ॥
यत्र दाशरथी रामो रामक्षेत्रदिदृक्षया । चरन् गुहाश्रमं प्राप्तस्तत्र स्कंदं ददर्श ह ॥ २० ॥
तं दृष्ट्वा च तदा रामो नमस्कृत्याब्रवीद् वचः ।
राम उवाच –
कार्तिकेय महाभाग तारकासुरसूदन ॥ २१ ॥
देवसेनाधिपविभो दिष्टया दृष्टोऽसि सुव्रत । पंचवक्त्रान्महादेवादधिकस्त्वं षडानन ॥२२॥
त्वां दृष्ट्वा कृतकृत्योऽस्मि प्राप्तोऽस्मि निर्वृतिं पराम् ।
स्कन्द उवाच –
राम राम महाभाग जानकीवल्लभ प्रभो ॥ २३ ॥
स्वराज्यं च परित्यज्य किमर्थमटसि प्रभो । न हि क्षत्रियबंधूनां प्रव्रज्या विहिता क्वचित् ॥
राम उवाच –
पितुराज्ञां पुरस्कृत्य तेनाज्ञप्तोऽस्मि सुव्रत । चतुर्दश समा राम वनवासं कुरुष्व ह ॥ २५ ॥
शिरसाधाय तामाज्ञां विचरामि महीमिमाम् ।
स्कन्द उवाच –
यदर्थमिह यातोऽसि यदर्थमटसे महीम् ॥ २६ ॥
यान् हन्ता हतवान् यांश्च तत्सर्वं विदितं मया । देवकार्यमिदं सर्वं त्वया कार्यमरिंदम ॥२७॥
दशकंठवधार्थाय साधूनां पालनाय च । अवतीर्णोऽसि भगवन् तत्कुरुष्वाविलंबितम् ॥ २८ ॥
लक्ष्मणः शेषनागोऽयं दृष्ट्वा धक्ष्यति राक्षसान् । मायेयं वैष्णवी साक्षात् सीतारक्षोवधार्थिनी ॥
त्वं राम रघुनाथोऽसि मायामानुषविग्रहः । सच्चिदानंदरूपस्त्वं श्रुतीनामप्यगोचरः ॥ ३० ॥
दिष्ट्यायातोऽसि भगवन् प्रायो मय्यनुकंपया । तिष्ठ त्वमाश्रमे रम्ये सिद्धदेवर्षिसेविते ॥३१॥

परशुरामानें निर्माण केलेल्या या सागरगर्भस्थ क्षेत्रांत जे मरण पावतात ते सर्व पापांतून मुक्त होतात व त्यांना सत्यलोकाची प्राप्ति होते. ७. ज्यांना या समुद्राच्या वाळवंटांत मृत्यु येतो, त्यांना मोक्ष मिळतो, हें मी त्रिवार सत्य सांगतों. ८. परशुराम हें बोलत आहे, तोंच आकाशवाणी झाली कीं, याविषयीं संदेह बाळगूं नका, कारण ही सनातन श्रुति आहे. ९.

हें त्या उभयतांचें भाषण ऐकून देवतांना विश्वास उत्पन्न होऊन त्या तेथें निर्भयपणें राहूं लागल्या. १०. श्रीशंकर विश्वेश्वराची स्थापना करून पार्वती व गणांसह तेथेंच राहिले; त्यामुळें परशुराम संतुष्ट झाला. ११. तेथें रामबाणाचें एक मोठें बाणेश्वर नांवाचें लिंग बनलें. त्याची स्थापना सप्तर्षींनीं केली, म्हणून तें सप्तकोटीश्वर या नांवानें प्रसिद्ध झालें. १२. कुनिकेत नांवाच्या महातेजस्वी महर्षीनें कुनिकेतेश्वर लिंगाची विधियुक्त स्थापना केली. या ठिकाणीं प्रत्यक्ष देवाचा वास आहे. तेथें वैतरणी गंगा सागराला मिळते. या ठिकाणीं नित्य रात्रीच्या वेळीं वेदध्वनि ऐकूं येतो व समुद्रतीरावर कार्तिकेय गुह वरदांबेसह आश्रम करून राहिला आहे. सर्वसिद्धिसंपन्न असें गुहाकर क्षेत्र आहे. १३-१६. व्याडि ऋषींची तपःसिद्धि करण्यासाठीं पंचोपनिपदात्मक, पंचब्रम्हमय, व पंचनारायणात्मक असा साक्षात् पंचशीर्ष महादेव येथेंच प्रकट झाला. तेंच ज्योतिर्लिंग व्याडीश्वर या नांवानें प्रतिष्ठा पावलें. १७–१८. याच्याच दर्शनासाठीं प्रदोषकालीं सिद्धगंधर्व नित्य येत असतात. येथेंच पाण्यामध्यें सत्य व असत्य स्पष्ट पृथक असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. १९. रामक्षेत्र पाहण्यासाठीं दाशरथि राम फिरत असतां गुहाश्रमामध्यें पोंचला व येथेंच त्याला स्कंददर्शन झालें. २०. त्याला पाहतांच नमस्कार करून राम म्हणाला, हे महाभाग कार्तिकेया, तूं तारकासुराचा वध केलास. हे विभो, तूं देवसेनेचा स्वामी आहेस. हे सुव्रता, माझ्या भाग्यानेंच मला तुझें दर्शन झालें ! तूं पंचमुख महादेवाहून श्रेष्ठ आहेस. कारण तुला सहा मुखें आहेत. २१–२२. तुझ्या दर्शनानें मी कृतकृत्य झालों व मला फार मोठें समाधान लाभलें आहे.

स्कंद म्हणाला, हे प्रभो, महाभाग रामा, तूं जानकीचा प्राणवल्लभ आहेस. मग स्वतःचें राज्य सोडून कां भटकतोस ? क्षत्रियबंधूंना धर्मशास्त्रांत संन्यासदीक्षा सांगितली आहे काय ?

राम म्हणाला, चौदा वर्षें वनवास कर अशी पित्याची आज्ञा शिरसावंद्य मानून मी पृथ्वीवर भटकत आहे.

स्कंद म्हणाला, ज्या कारणासाठीं तूं घरांतून निघून पृथ्वीवर फिरत आहेस, ज्यांचा वध तूं केलास व करणार आहेस, हें तुझें सर्व देवकार्य मला विदित झालें आहे. हे शत्रुनिषूदना, ज्या रावणवधासाठीं व साधूंच्या रक्षणासाठीं तूं अवतार घेतला आहेस, तें कार्य हे भगवन्, तूं लवकर पूर्ण कर. २३–२८. लक्ष्मण प्रत्यक्ष शेषनाग आहे ! राक्षस दृष्टीस पडतांच तो त्यांना जाळून टाकील. २९. राक्षसवधासाठीं निर्माण झालेली सीता प्रत्यक्ष विष्णूची माया आहे. हे राम, तूं रघुनाथहि मायेच्या योगानें मानवशरीर धारण केलेला सच्चिदानंदस्वरूप परमेश्वर आहेस. वस्तुतः तुझें स्वरूप वेदांनाही अगोचर असूनहि केवळ सुदैवानें व तुझ्या दयेनें मला तुझें दर्शन झालें आहे. ३०–३१.

स्कंदप्रार्थनया रामः स्थितवानाश्रमे शुभे । रामेश्वरं महालिंगं स्थापयामास राघवः ॥ ३२ ॥
सिंधुलिंगांतरालं यत् सा तत्र मणिकर्णिका । तारकं यन्महत्क्षेत्रं सर्वप्राणिविमुक्तिदम् ॥३३॥
रामक्षेत्रमिति ख्यातं सर्वतीर्थोत्तमं महत् । यत्रास्थितोयसंसर्गाद् द्रव एव भवत्यहो ॥ ३४ ॥
यत्र क्वापि मृतानां च यत्र देहो विलीयते । पशूनां वा नराणां वा ते सर्वे भुक्तिभागिनः ॥३५॥
तेभ्यो देहान्तरं दत्वा ज्ञानं तान् प्रदिशाम्यहम् । ततस्ते मुक्तिमायान्ति वदत्येतत् स्वयं शिवः ॥
सीताकृतं महालिंगं लक्ष्मणो वालुकामयम् । वालुकेशमिति ख्यातं स्थापयामास सिद्धिदम् ॥
तदुत्तरे महातीर्थं वरुणाख्यं महाद्भुतम् । तत्र स्नात्वा शिवं दृष्ट्वा शिवं याति न संशयः ॥३८॥
तस्यैव पूर्वदिग्भागे घृणितीर्थमकल्पषम् । घृणिं प्रसाद्य तत्रैव सांबः कुष्ठादमुच्यत ॥ ३९ ॥
इति श्रीस्कन्दपुराणे सह्याद्रिखंडे तीर्थमहिमावर्णनं नाम चतुर्विंशतितमोऽध्यायः ।

## अथ पञ्चविंशतितमोऽध्यायः ।

### तीर्थवर्णनम् ।

ऋषय ऊचुः –
कोऽसौ सांबः कथं कुष्ठी घृणिश्चामोचयत्कथम् । शुश्रूषवो वयं सर्वे वद शौनक विस्तरात् ॥१॥
त्वन्मुखांभोजगलितं पियूषं पिबतां च नः । न चैव तृप्तिमायाति तर्षयत्यधिकं पुनः ॥ २ ॥
शौनक उवाच –
प्रश्नो महोदयश्चायमृषीणामूर्ध्वरेतसाम् । इतिहासं प्रवक्तुं मां मुदा संप्रेरयत्यहो ॥ ३ ॥
पुरा कश्चिन्महापापः सांबः क्षत्रियपांसुनः । बभूव पृथिवीपालः शठः परमदारुणः ॥ ४ ॥
स भ्रमन्मृगयाव्याजादृषीणामाश्रमं गतः । स तत्राश्रममद्राक्षीत् सर्वजन्तुमनोरमम् ॥ ५ ॥
सर्वर्तुकुसुमोपेतं कूजन्मधुकरावृतम् । पनसैर्नारिकेलैश्च कदलीभिर्विराजितम् ॥ ६ ॥
सुगंधहोमधूमैश्च वेदध्वनिनिनादितम् । वेदवादैः सामघोषैः क्रियमाणैरहर्निशम् ॥ ७ ॥
शिष्यैर्विनयसंपन्नैर्भूतैर्वेदै रिवावृतम् । वेदनिष्ठैस्तपोनिष्ठैर्ब्रह्मनिष्ठैरकल्मषैः ॥ ८ ॥
अन्वितं मुनिशार्दूलैः सत्यलोकमिवापरम् । दृष्ट्वा तदाश्रमपदं परं विस्मयमागतः ॥ ९ ॥
तमागतं मुनिश्रेष्ठाः पूजयन्ति स्म सादरम् । तथापि नासौ विमनाः सौमनस्यमवाप यत् ॥१०
बहिःप्रसन्नो विमनास्तान् साधूनवदत्स्वयम् । प्रपद्य पूजयामास प्रश्नं च कृतवानिमम् ॥११
प्रश्नं मनोगतं मेऽद्य तथ्यं वदत सुव्रताः । यं यं ते कथयामासुस्तं तं नैवेति चावदत् ॥ १२॥

असो. आज तूं देव, ऋषि व सिद्ध यांच्या या आश्रमांत वास कर. स्कंदाच्या या र्थनेला अनुसरून राम त्या सुंदर आश्रमांत राहिला, व रामेश्वर महालिंगाची स्थापना केली. मुद्र व रामेश्वर महालिंग यांच्यामध्यें मणिकर्णिका तीर्थ आहे. ते तारकतीर्थ सर्व प्राण्यांना क्ति देणारें असून रामतीर्थ या नांवानें प्रसिद्ध आहे. या तीर्थांत अस्थि वितळून जातात, हणून हें तीर्थ सर्वश्रेष्ठ आहे. या क्षेत्रांत ज्या मनुष्याचा किंवा पशूचा देह विलीन होतो, त्याला ोक्ष मिळतो. प्रथम मी त्यांना दुसरा देह व तत्त्वज्ञान देतों. त्यामुळें त्यांना मुक्ति मिळते, सें स्वतः श्रीशंकरानें सांगितलें आहे. यानंतर येथें सीतेनें महालिंग स्थापना केली. लक्ष्मणानें ालुकालिंग स्थापिलें; तेंच सिद्धि देणारें लिंग वालुकेश या नांवानें प्रसिद्ध झालें. ३२–३७.

त्याच्या उत्तरेला वरुण नांवाचे मोठें अद्भुत महातीर्थ आहे. यांत स्नान केल्यानें शिवदर्शन होऊन मानव शिवस्वरूप होतो. त्याच्याच पूर्वेला पापनाशक वृणितीर्थ आहे. तेथें वृणीला प्रसन्न करून सांब नांवाचा मनुष्य कुष्ठ रोगांतून मुक्त झाला. ३८–३९.

# अध्याय २५ वा

## तीर्थवर्णन

ऋषींनीं प्रश्न केला, ज्याला वृणीनें कुष्ठ रोगांतून मुक्त केलें, तो कुष्ठी सांब कोण ? हें सर्व आम्ही ऐकूं इच्छितों. म्हणून हे शौनका, हें सर्व विस्तारपूर्वक सांगा. तुझ्या मुखकमलांतून बाहेर येणारें अमृत आम्ही कितीही प्यालों, तरी आमची तृप्ति होत नाहीं, उलट तृषा अधिकच वाढत आहे. १–२.

शौनक म्हणाला, ऊर्ध्वरेत ऋषींच्या या प्रश्नानें हा इतिहास आनंदानें सांगण्यास मला उत्साह आला आहे. ३. पूर्वी सांब नांवाचा एक मनुष्य महापापी व अधम होता. तो लबाड व क्रूरही होता. ४. तो एकदां मृगयेच्या निमित्तानें फिरत असतां त्याला सर्वप्रकारचे प्राणी असलेला मनोहर ऋषि–आश्रम दिसला. ५. त्यांत सर्व ऋतूंतील फुलें असून त्यांवर भ्रमर गुंजारव करीत होते. फणस, नारिकेल व कर्दळी या झाडांनीं तो अधिकच सुंदर दिसत होता. ६. होमाचा सुगंधित धूर पसरला होता. वेद व सामघोष यांचा आवाज रात्रंदिवस ऐकूं येत होता. ७. तेथील विनयी शिष्यांमुळें तो आश्रम मूर्तिमंत वेदांनींच भरल्यासारखा भासत होता. वेदनिष्ठ, तपोनिष्ठ, ब्रह्मनिष्ठ व निष्पाप मुनींमुळें तो आश्रम त्याला जणुं दुसरा सत्यलोकच वाटून तो फार विस्मित झाला. ८–९.

त्या मुनिश्रेष्ठांनीं त्याचा सत्कार केला. तथापि सांबाचें दुष्ट मन चांगलें बनलें नाहीं. १०. आपलें मन प्रसन्न झाल्याचा त्यानें देखावा केला. साधूंची पूजा करून सांब त्यांना म्हणाला, सुव्रत हो, माझें सत्य मनोगत ओळखा पाहूं ! ऋषींनीं जें जें मनोगत म्हणून त्याला सांगितलें, तें तें तो सांब खोटेंच म्हणाला. ११–१२.

वाचः कूटेन तान्सर्वान् क्षोभयामास दुर्मतिः । ततस्ते कुपिताः सर्वे शेपुस्तं क्षत्रपांसनम् ॥१३
कुष्ठी भव महापाप गलद्गो विशेषतः । ब्रह्मशापहतः पापः खलः परमदारुणः ॥ १४ ॥
गलत्कुष्ठयभवत्सोऽपि सद्यस्तच्छापयंत्रितः । तानृषीञ्छंदयामास विलापैः करुणैरहो ॥ १५ ॥
मया पापेन मूढेन कृतं कर्म सुदारुणम् । को मूढश्चालयेद् वृंदं मुनीनामूर्ध्वरेतसाम् ॥१६॥
को विषं भक्षयेत्प्राज्ञः पन्नगान्कः प्रबोधयेत् । सैषातिदारुणा बुद्धिः सर्वपापसमुद्भवा ॥१७॥
प्रविश्य मां पापरतिं यूयं संक्षोभिता यया । ब्रह्मिष्ठा ऋषयः सर्वे क्रोधलोभविवर्जिताः ॥
समाश्रमपदं प्राप्तं ब्रह्मघ्नं निरपत्रकम् । कृतघ्नं शरणं प्राप्तमनुकंपितुमर्हथ ॥ १९ ॥
तेषामुद्दालको नाम ऋषिः कारुणिकस्तदा । विलपन्तमुवाचाथ मा भैस्त्वं क्षत्रियाधम ॥२०॥
ब्रह्मशापकृतश्चायं व्याधिः परमदारुणः । न चान्यथयितुं शक्यः कृतैः पुण्यशतैरपि ॥ २१ ॥
इति श्रीस्कान्दपुराणे सह्याद्रिखंडे तीर्थवर्णनं नाम पञ्चविंशतितमोऽध्यायः ।

# अथ षड्विंशतितमोऽध्यायः ।

## गुहाश्रमवर्णनम् ।

उद्दालक उवाच –
पुरा कश्चिन्महाकुष्ठी मुंडिलो नाम तापसः । ब्रह्माणं तोषयामास ब्रह्मजाप्येन सर्वदा ॥ १ ॥
प्रातः स्नात्वा नित्यकर्म समाप्य प्रथतोऽन्वहम् । ब्रह्मोपस्थमुपस्थाय जपति स्म निरन्तरम् ॥
तुष्टस्तपसा ब्रह्मा सर्वलोकपितामहः । आकाशे गिरमुश्चैस्तां श्रावयामास सत्वरम् ॥ ३ ॥
वरं वरय मे ब्रह्मन् प्रसन्नोऽहं वरप्रदः ।
मुंडिल उवाच –
यदि प्रसन्नो भगवान् व्याधेरस्मान् विमोचय ॥ ४ ॥
ब्रह्मोवाच –
गच्छ शीघ्रं महाक्षेत्रं रैणुकेयशरांतिकम् । तत्रापि कार्तिकेयस्य क्षेत्रं पुण्यकरं महत् ॥ ५ ॥
यत्रांबा वरदा साक्षाद् भक्तानां वरदायिनी । तया संलालितो नित्यं गुहः क्षेत्रं न मुञ्चति ॥ ६ ॥
तत्क्षेत्रं पश्चिमांभोधेस्तीरे गव्यूतिमायतम् । तदर्धविस्तृतं क्षेत्रं सर्वदांभोधिसेवितम् ॥ ७ ॥
उत्तरे जंबुकादेवी दक्षिणे वालुकेश्वरम् । पश्चिमे रामतीर्थं च हयतीर्थं तु पूर्वतः ॥ ८ ॥
तस्यैवाग्नेयदिग्भागे घृणितीर्थमनुत्तमम् । नित्यं प्रस्रवणोपेतमशोकवनराजितम् ॥ ९ ॥
शिंशुपावनसंवीतं रसालवनराजितम् । तत्र गच्छ महाभाग घृणितीर्थमनुस्मरन् ॥ १० ॥
प्रदक्षिणां नमस्कारान् कृत्वा स्नानपरायणः । त्रिरात्रान्मुच्यते कुष्ठाद् नान्यथा मम भाषितम् ॥
तच्छ्रुत्वा मुंडिलस्तस्माद् घृणितीर्थमुपागमत् । कार्तिकेयं गुहं नत्वा मातरं वरदांबिकाम् ॥१२
सौरमष्टाक्षरं मंत्रं वरदांबोपदेशितम् । घृणितीर्थमनुस्मृत्य तत्र स्नानपरायणः ॥ १३ ॥
कुष्ठव्याधिविनिर्मुक्तस्त्रिरात्रात्स व्यराजत । अतस्त्वमपि राजेन्द्र शीघ्रं गच्छ गुहाश्रमम् ॥१४॥

शिवाय त्यानें कूट शब्दांचा प्रयोग करून ऋषींना क्षुब्ध केलें. तेव्हां त्यांनीं क्रुद्ध होऊन क्षत्रियाधमास शाप दिला. हे पापी, तुझें सर्वांग कुष्ठरोगानें सडून जाईल! ब्राह्मणांच्या त्या पामुळें तो पापी क्रूर पुरुष तत्काळ कुष्ठी झाला. त्यानें पुष्कळ करुण विलाप करून ऋषींची नवणी केली. १३–१५. मी पापी व मूर्ख आहें, म्हणून हें अत्यंत दारुण कर्म माझ्याकडून डलें. ऊर्ध्वरेत ऋषींना चिथावण्याचें कुकर्म कोणता मूर्ख मनुष्य करील! १६. कोणता हाणा मनुष्य विषभक्षण करील! सर्पांना कोण जागृत करील! पण तुमच्यासारख्या क्रोध–भ–हीन अशा ज्ञानी ऋषींना प्रक्षुब्ध करण्याची बुद्धि मला माझ्याच पापकर्मांनीं दिली. ७–१८. खरोखर मी निर्लज्ज व कृतघ्न आहे! तथापि आपल्या आश्रमांत येऊन मी गपणांस शरण आलों आहें. यासाठीं आपण माझ्यावर कृपादृष्टि करावी. १९. यावेळीं त्या ऋषिजनांत उद्दालक नांवाचा एक दयाळू ऋषि होता. तो विलाप करणाऱ्या सांबास म्हणाला, क्षत्रियाधमा, भिऊं नकोस. हा दारुण रोग ब्रह्मशापमूलक असल्यानें शेंकडों पुण्यकर्मांनीही तो बरा होणार नाहीं. २०–२१.

# अध्याय २६ वा

## गुहाश्रमवर्णन

उद्दालक म्हणाला, पूर्वी मुंडिल नांवाचा एक पुरुष अत्यंत कुष्ठ रोगी होता. त्यानें सतत ब्रह्मजप करून ब्रह्मदेवाला प्रसन्न केलें. १. रोज सकाळीं स्नान करून नित्यकर्म केल्यावर ब्रह्मदेवाजवळ जाऊन तो जप करीत असे. २. त्याच्या त्या तपानें प्रसन्न झालेल्या सर्वलोकपितामह ब्रह्मदेवानें आकाशवाणीद्वारा त्याला सांगितलें. हें ब्राह्मणा, मी वरदाता प्रसन्न झालों आहें. वर माग. ३. मुंडिल म्हणाला, जर आपण माझ्यावर प्रसन्न आहांत, तर मला व्याधिमुक्त करा. ४. ब्रह्मदेव म्हणाला, तूं ताबडतोब परशुरामाच्या इषुपात क्षेत्रांत जा. तेथें कार्तिकेयाचें फार पवित्र क्षेत्र आहे. तेथें भक्तांना वर देणारी साक्षात् वरद अंबा वास करीत असते. म्हणून तिचा लाडका पुत्र गुह तें क्षेत्र सोडून जात नाहीं. ५–६. पश्चिम समुद्राच्या तीरावर तें क्षेत्र दोन कोस लांब व एक कोस रुंद आहे. ७. त्याच्या उत्तरेला जंबुकादेवी, दक्षिणेला वाळुकेश्वर, पश्चिमेला रामतीर्थ व पूर्वेला हयतीर्थ आहे. ८. त्याच्याच आग्नेय दिशेला घृणितीर्थ असून त्यांत सतत वाहणारा झरा आहे. अशोक, शिंशुप व आम्र या वृक्षांनीं तो भाग संपन्न आहे. तेथें तूं घृणिमंत्राचा जप करीत जा. ९–१०. या तीर्थांत स्नान करून ईश्वराला प्रदक्षिणा व नमस्कार करीत जा. याप्रमाणें तीन रात्रीं आचरण केल्यावर तूं कुष्ठ रोगांतून मुक्त होशील. माझें वचन खोटें होणार नाहीं. ११. ही आकाशवाणी ऐकून मुंडिल घृणितीर्थावर गेला; व तेथें स्नान करून कार्तिकेय गुह व माता वरदांबा यांना नमस्कार करून वरदांबिकेनें उपदेशिलेल्या अष्टाक्षरी सौर मंत्राचा त्यानें जप केला. १२–१३. याप्रमाणें तीन रात्री गेल्यावर तो रोगमुक्त होऊन चांगला झाला. राजेंद्रा, म्हणून तूंही लवकर गुहाश्रमांत जा. १४.

वरदांबां कार्तिकेयमुपास्य ध्यानतत्परः । अधिगम्य ततो मन्त्रं वरदांबोपदेशितम् ॥ १५ ॥
कोटिवारमंत्रजपात् स्नानात् त्रिपवणेरितात् । मुच्यसे ब्रह्मशापात्त्वं मासैस्त्रिभिरतंद्रितः ॥१६॥
इत्युद्दालवचः श्रुत्वा सांबस्तानृषिपुंगवान् । प्रदक्षिणीकृत्य ययौ घृणितीर्थमनुस्मरन् ॥ १७ ॥
ब्रह्मशापहतः सांबः शुद्धस्तत्राभवत्पुरा । तस्यैवोत्तरदिग्भागे क्षयरोगहरं महत् ॥१८ ॥
यत्र चन्द्रस्तपस्तप्त्वा क्षयरोगाद् व्यमुच्यत ।
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे गुहाश्रमवर्णनं नाम षड्विंशतितमोऽध्यायः ।

# अथ सप्तविंशतितमोऽध्यायः ।

## रामक्षेत्रमाहात्म्यम् ।

ऋषय ऊचुः –
सर्वज्ञोऽसि महाभाग वेत्थ त्वं सर्वसंहितम् । चंद्रतीर्थस्य माहात्म्यं वद शौनक विस्तरात् ॥१
शौनक उवाच –
दक्षात्कन्याशतं जज्ञे सप्तविंशाधिकं पुरा । तासां मध्ये चंद्रमसे सप्तविंशतिकन्यकाः ॥ २ ॥
ददौ दक्षः समाहूय प्रजासर्गनियंत्रितः । तासां मध्ये प्रियतमां रोहिणीमन्वपद्यत ॥
इतराश्चाभ्यसूयन्त रोहिण्यै भृशदुःखिताः । शेपुस्तां रोहिणीं सर्वास्ततः सा शकटाभवत् ॥
चंद्रं शशाप दक्षोऽपि ततः क्षीणोऽथ सोऽन्वहम् । विरूपा रोहिणी जाता कलाहीनश्च चंद्रमाः ॥
निशाकरविहीना सा रजनी नान्वशोभत । निशाकरकरस्पृष्टं जगत्तद्दीप्यतेऽखिलम् ॥ ६ ॥
तद्विहीनं जगत्सर्वं शून्यालयसमप्रभम् । ततस्तु देवताः सर्वाः शिवविष्णुपुरोगमाः ॥ ७ ॥
दक्षं ते भर्त्सयामासुर्धिग् बस्तमुखजीवितम् । चंद्रः सर्वस्वमस्माकं लोकत्रयविभूषणम् ॥ ८ ॥
विना वृष्ट्यापि जीवन्ति प्रजाश्चन्द्रकरैः सदा । दक्षः पापः पापमतिर्वीरभद्रेण शासितः ॥९॥
तथापि खलु तां स्वीयां नैव मुंचति मंदधीः । दक्षस्ततो विनिर्विण्णः परं विस्मयमागतः ॥
वेपमानो जगादोच्चैः क्षम्यतां दुष्कृतं मम । मया पापेन शप्तोऽयं चंद्रः कथमबुद्धिना ॥ ११ ॥
यदत्र साधु भविता तत्कुरुध्वमतंद्रिताः । दक्षस्य वचनं श्रुत्वा ततः स चाब्रवीदिदम् ॥ १२॥
देवदेव महादेव दक्षयज्ञविघातक । उमापते पशुपते चंद्रशेखर ते नमः ॥ १३ ॥
शरणं त्वां प्रपन्नोऽस्मि दक्षशापं निवारय ।
महादेव उवाच –
चातुर्वर्ण्यं पुरा सृष्टं ब्रह्मणा परमेष्ठिना ॥ १४ ॥
तथाप्युपायं वक्ष्यामि अगदो भविता यथा । स्त्रीषु साम्येन वर्तस्व कालस्य समभागतः ॥१५
क्षयस्तेऽन्यतरे पक्षे वृद्धिस्तेऽन्यतरा भवेत् । आपूर्णता ते भविता कालेन करयोगतः ॥१६॥
तद्वियोगात्कलाहानिः पूर्णस्त्वं सर्वदा क्षयः ।
चंद्र उवाच –
दक्षशापात् कलाक्षीणस्तेजो मे विफलीकृतम् ॥ १७ ॥
सकलोऽहं कथं भूयां तेजश्चासीत्र निर्मलम् । तमुपायं वद विभो करुणाकर शंकर ॥ १८ ॥

वरदांबा व कार्तिकेय यांची उपासना व ध्यान करून वरदांबेचा एक कोटी जप कर. तीर्थांत त्रिकाळ स्नान कर. त्या योगानें तीन महिन्यांत ब्रह्मशापांतून तूं मुक्त होशील. १५–१६.

हें उद्दालकाचें वचन ऐकून सांब त्या ऋषींना प्रदक्षिणा करून वृणितीर्थावर गेला. १७. तेथें तो अशा प्रकारच्या उपासनेनें ब्रह्मशापांतून मुक्त झाला. त्याच्याच उत्तरेला क्षयरोग बरा करणारें महातीर्थ आहे. येथेंच तप करून चंद्र क्षयरोगांतून बरा झाला. १८.

# अध्याय २७ वा

## रामक्षेत्र माहात्म्य

ऋषि म्हणाले, हे महाभाग शौनका, तूं सर्वज्ञ असल्यानें तुला सर्व कांहीं माहीत आहे. यास्तव चंद्रतीर्थाचें माहात्म्य आम्हाला विस्तारपूर्वक सांग. १.

शौनक म्हणाला, दक्षाला १२७ कन्या होत्या. त्यानें चंद्राला बोलावून त्यांपैकीं २७ कन्या चंद्राला अर्पण केल्या. पण चंद्रानें रोहिणीला प्रियतमा मानून तिचाच स्वीकार केला. त्यामुळें बाकी कन्या प्रजावंचित झाल्या. तेव्हां अतिदुःखी झालेल्या इतर कन्यांनीं रोहिणीचा मत्सर केला व तिला शाप दिला. त्यामुळें रोहिणी शकटाकार झाली. २–४. दक्षानेंही चंद्राला शाप दिला. त्यामुळें चंद्र प्रतिदिन क्षीण व कलाहीन होऊं लागला. रोहिणी कुरूप बनली ! चंद्ररहित रजनी शोभेनाशी झाली ! चंद्रकिरणांनीं सर्व जग दैदीप्यमान दिसत असे; पण चंद्रच निस्तेज झाल्यामुळें सर्व जग ओसाड घरासारखें भासूं लागलें. यासाठीं शिवविष्णुप्रमुख सर्व देवांनीं दक्षाची निंदा सुरू केली. हे अजमुख दक्षा, तुझ्या जीवनाचा धिक्कार असो ! चंद्र हें आमचें सर्वस्व असून तो तिन्ही लोकांचा अलंकार आहे. पर्जन्यावांचूनही केवळ चंद्रकिरणांच्या योगानें सर्व प्रजा जिवंत राहते. दुष्ट दक्षाची बुद्धीही पापी होय, म्हणून वीरभद्रानें त्याला शासन केलें. ५–९. तरी पण मूर्ख दक्षानें आपली पापबुद्धी सोडून दिली नाहीं ! ही निंदा ऐकून दक्ष फार दुःखी व विस्मित झाला. १०. दुःखानें कांपणारा दक्ष मोठ्यानें म्हणाला, माझ्या दुष्कृत्याची मला तुम्ही क्षमा करा. मी पापी व निर्बुद्ध आहे. म्हणून मी चंद्राला शाप दिला. यासाठीं लवकर कांहीं चांगलें होईल, असें करा. हें दक्षाचें भाषण ऐकून चंद्र म्हणाला, दक्षयज्ञविध्वंसक देवाधिदेव, उमापते, पशुपते, चंद्रशेखरा, तुला नमस्कार असो. ११–१३. हे महादेवा, मी तुला शरण आलों आहे. मला ह्या दक्षाच्या शापांतून मुक्त कर.

महादेव म्हणाले, पूर्वी परमेष्ठी ब्रह्मदेवानें चार वर्ण निर्माण केले. १४. तथापि मी तुला औषध म्हणून एक उपाय सांगतों. कालाचे समभाग करून सर्व स्त्रियांशीं तूं समान वृत्ति ठेव. त्यामुळें एका पक्षांत तुझा क्षय व दुसऱ्या पक्षांत तुझी वृद्धि होईल ! अशा रीतीनें प्रथम झालेली कलाहानि पुनः भरून येईल. चंद्र म्हणाला, दक्षशापामुळें माझ्या कला नाश पावल्या व माझें तेजही मंद झालें ! यासाठीं मी कलापूर्ण होऊन सतेज होण्यासाठीं, हे कृपाळु शंकरा, मला उपाय सांगा. १५–१८.

महादेव उवाच –
इषुपातांकितं क्षेत्रं रामनाम्ना विभूषितम् । तत्रापि यद् गुहक्षेत्रं बडिशाधिष्ठितं महत् ॥१९॥
तस्याग्नेयदिशो भागे चंद्रतीर्थमनामयम् । तद् गच्छ तपसः सिद्ध्यै ततः सिद्धो भविष्यसि ॥
इति श्रीस्कन्दपुराणे सह्याद्रिखंडे रामक्षेत्रमाहात्म्यं नाम सप्तविंशतितमोऽध्यायः ।

# अथ अष्टाविंशतितमोऽध्यायः ।

## रामक्षेत्रमाहात्म्यम् ।

चंद्रस्तद्वचनं श्रुत्वा चंद्रतीर्थं जगाम ह । तत्राश्रमपदं कृत्वा शैवं पंचाक्षरं जपन् ॥ १ ॥
समाः सहस्रं कृतवान् तपः परमदारुणम् । तदधस्तात्तपश्चक्रे रोहिणी चंद्रवल्लभा ॥ २ ॥
ततः काले बहुतिथे पार्वतीवल्लभः शिवः । चंद्राश्रमपदं प्राप्तः क्रीडन्वल्लभया सह ॥ ३ ॥
तत्र चंद्रमसं दृष्ट्वा क्षीणं प्रक्षीणकल्मषम् । पस्पर्श करुणाविष्टः करेणामृतवर्षिणा ॥ ४ ॥
ततस्तु सकलो जातः प्रतपन्निव चन्द्रमाः । रोहिणी पार्वतीं दृष्ट्वा दिव्यरूपधराऽभवत् ॥ ५ ॥
ततश्चान्द्रमसं तीर्थं त्रिषु लोकेषु विश्रुतम् । तत्पुरस्ताद्देवतीर्थं यत्र देवः पुरा स्थितः ॥ ६ ॥
पार्वतीवल्लभः साक्षात् सर्वदेवमयः स्थितः । देवसंज्ञं तदद्यापि लिंगाकारं प्रदृश्यते ॥ ७ ॥
तत्पुरस्ताद्विभूतीनां कुंडं परमदुर्लभम् । यस्य संस्पर्शनादेव दारिद्र्यं नाप्नुयान्नरः ॥ ८ ॥
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे रामक्षेत्रमाहात्म्यवर्णनं नाम अष्टविंशतितमोऽध्यायः ।

# अथ एकोनत्रिंशत्तमोध्यायः ।

## विभूतिकुण्डमाहात्म्यम् ।

विभूतिकुंडमाहात्म्यं वद शौनक विस्तरात् । धन्या वयं न तृप्यामः पिबतस्त्वत्कथामृतम् ॥
शौनक उवाच –
देवदेव पुरा शक्रो विभूतिमदगर्वितः । नारदं दृष्ट्वा तन्मार्गे न ननाम यथा पुरा ॥ २ ॥
तेन दत्तां पुष्पमालां कूजद्भ्रमरसंकुलाम् । ऐरावतगजस्कन्धे स्थापयामास मंदधीः ॥ ३ ॥
इंद्रस्याविनयं दृष्ट्वा देवर्षिः प्रत्युवाच तम् । त्वमिंद्र देवराजोऽसि यज्ञभागभुजां वरः ॥ ४ ॥
मया प्रसादाद् दत्तेयं माला ब्रह्मविनिर्मिता । वीणादण्डसमाश्लिष्टा दातुं योग्या न कस्यचित् ॥
इत्युक्त्वादाय तां मालां वीणादंडे न्ययोजयत् । मत्प्रसादकृतं राज्यमधितिष्ठसि सर्वदा ॥
इदानीं मामवज्ञाय वर्तसे भूतिगर्वितः । मघवन्मदमत्तोऽसि विभूतेस्त्वं विमोक्ष्यसि ॥ ७ ॥
इत्युक्त्वा नारदस्तस्माद् विमना इव निर्ययौ । इंद्रस्यैरावतगजस्तत्रैवांतरधीयत ॥ ८ ॥
उच्चैःश्रवाश्वरत्नं च रत्नान्यन्यानि सर्वशः । अदृष्टान्यभवन् विप्रा नारदस्यावमाननात् ॥ ९ ॥

महादेव म्हणाले, रामनामानें सुशोभित झालेलें इषुपात नांवाचें क्षेत्र आहे. त्यांत गुहक्षेत्र असून तेथें कोळ्यांची मोठी वस्ती आहे. १९. त्याच्या आग्नेय दिशेला मनुष्याला निरोगी करणारें चंद्रतीर्थ आहे. तपःसिद्धीसाठीं तेथें जा. तुला लवकर सिद्धि प्राप्त होईल. २०.

# अध्याय २८ वा

## रामक्षेत्रमाहात्म्य

त्याचें तें वचन ऐकून चंद्र लगेच चंद्रतीर्थावर गेला, व तेथें आश्रम तयार करून पंचाक्षरी शिवमंत्राचा जप करूं लागला. १. अशा रीतीनें त्यानें एक हजार वर्षें अतिदारुण तप केलें. त्याच्या जवळ राहून चंद्रवल्लभा रोहिणीनेंही तप केलें. २. याप्रमाणें पुष्कळ काळ निघून गेल्यावर पार्वतीपति शिव आपल्या प्रियेसह क्रीडा करीत चंद्राच्या आश्रमाजवळ आला. ३. तेथें पापशुद्ध व क्षीण चंद्राला पाहून शंकरास त्याची दया आली. म्हणून त्यानें आपल्या अमृतमय हस्तानें त्यास स्पर्श केला. ४. रोहिणीनेंही पार्वतीला स्पर्श केला; त्यामुळें ती दिव्यरूप बनली. ५. त्या क्षणापासून चंद्रतीर्थ तिन्ही लोकांत प्रसिद्ध झालें. त्याच्याच समोर देवतीर्थ आहे. येथें पूर्वी साक्षात् महादेव पार्वतीसह राहिले होते. तें देवसंज्ञक लिंग अद्यापि दिसतें. त्याच्या पुढें एक विभूतिकुंड आहे. यांतील तीर्थस्पर्शानें दारिद्र्यनाश होतो. ६–८.

# अध्याय २९ वा

## विभूतिकुंडाची महती

ऋषि म्हणाले, शौनका, आतां आम्हांस विभूतिकुंडाची महती सांगा. आम्ही तुमच्या कथा ऐकून धन्य झालों. तुमचें कथामृत कितीही प्यालों तरी आमची तृप्ति होत नाहीं. १. शौनक म्हणाले, पूर्वी ऐश्वर्यमदानें गर्विष्ठ झालेल्या इंद्राला एकदां मार्गांत नारदाची भेट झाली. पण इंद्रानें त्यास पूर्वीप्रमाणें नमस्कार केला नाहीं व पूर्वी एकदां नारदानेंच दिलेली विकसित पुष्पमाला त्या मूर्खानें ऐरावताच्या गळ्यांत घातली. २–३. इंद्राची ही उद्दाम वृत्ति पाहून देवर्षि त्याला म्हणाले, इंद्रा, तूं श्रेष्ठ यज्ञभागभोक्ता आहेस! म्हणून मी माझ्या वीणेवर विराजमान असणारी माला तुला प्रेमानें दिली होती. ही माला ब्रम्हदेवानें निर्माण केली होती. अशी ही माला तूं कोणाला तरी द्यावीस, हें योग्य नव्हे! ४–५. असें बोलून नारदानें ती माला घेऊन पूर्ववत् आपल्या वीणादंडावर ठेविली, व म्हणाला, हे इंद्रा, माझ्याच कृपेनें तूं राज्य भोगतोस! पण गर्विष्ठ होऊन आतां तूं माझी अवज्ञा केलीस, यास्तव तूं ऐश्वर्यभ्रष्ट होशील. एवढें बोलून खिन्न होऊन नारद तेथून निघून गेला. तेवढ्यांत इंद्राचा ऐरावत अंतर्धान पावला. उच्चैःश्रवा इत्यादि रत्नेंसुद्धां नारदाचा अवमान केल्यामुळें अदृश्य झालीं. ६–९.

ततः परमनिर्विण्णो मघवानिदमब्रवीत् । विभूतिमदतस्तस्य जातः सर्वधनक्षयः ॥ १० ॥
ज्ञानांजनमिदं प्राप्तं दारिद्र्यं सर्वभेषजम् । बृहस्पतिः सुराचार्यः क यातो न तु लक्ष्यते ॥ ११ ॥
धन्वंतरिर्भिषग्रत्नं नायातो नाश्विनावपि । रंभा नाद्य समायाता मेनका च तिलोत्तमा ॥ १२ ॥
मृदंगश्रुतिनादेन क यातेति न लक्ष्यते । घृतकुंडं सदा मथ्यं शुष्कं पल्वलसंनिभम् ॥ १३ ॥
दृष्ट्वा हृदि विदाहो मे मरणायैव कल्पते । इंद्राणि त्वमिहागच्छ स्थिराभव मदासने ॥ १४ ॥
विवशो मघवान् प्राह पुनः पुनरिदं वचः । भयेनांतर्गतः शक्रः शचीं तामन्वशोधयत् ॥ १५ ॥
मघवा विललापोच्चैः क याता प्राणवल्लभा । मामभाग्यं विशोचन्तं विलपन्तमनाथवत् ॥१६॥
नायात्यद्यापि सा सुभ्रूर्मय्यनुक्रोशवत्यपि ।
इति ब्रुवन्तं विलपन्तमुच्चकैर्विविग्नचित्तं विवशं शुचार्पितम् ।
वृथातपत्रं च भवनान्तराले विकत्थमानं मुहुरात्मचेष्टितम् ॥ १८ ॥
तदिन्द्रचेष्टितं सर्वं नारदो ब्रह्मणेऽवदत् । ततस्तूर्णमुपव्रज्य शंभवे विष्णवेऽवदत् ॥ १९ ॥
ततस्तूर्णमुपस्थाय पुनरिंद्रमुपागतः । नारदस्य वचः श्रुत्वा उपेंद्रः खगपृष्ठगः ॥ २० ॥
जगाम नंदनवनं तत्रेंद्रं न ददर्श ह । अवाक्शिरा बभूवेन्द्रो दृष्ट्वोपेन्द्रं च दूरतः ॥ २१ ॥
रुरोद सन्नकंठोऽपि मरुत्वान् बालवत्तदा । उपेंद्रस्तमुवाचाथ रोदिषि त्वं कथं प्रभो ॥ २२ ॥
कस्मादिदं ते कलिलं तद् वदस्वाविलंबितम् ।

इंद्र उवाच –

नारदस्य प्रकोपान्मे सर्वापि श्रीः क्षयं गता ॥ २३ ॥
गौतमस्य सती भार्या त्वहल्या पतिदेवता । वस्त्रं परिगतं यन्मे तदकस्मान्न दृश्यते ॥ २४ ॥
इतोऽधिकं किं वक्तव्यं सर्वज्ञोऽसि जगत्पते । तस्यापराधात्सर्वांगे संजातोऽस्मि भगव्रणी ॥२५॥
वृत्रहत्यावृतः पूर्वं भ्रममाण इतस्ततः । पुरोहितशिरश्छेदादगाधे दुःखसागरे ॥ २६ ॥
मग्नस्त्वां नावमारुह्य मुक्तस्तस्मान्महाभयात् । इत्येवमादि दुःखानि स्वकृतान्यकृतानि च ॥२७॥
निस्तीर्णानि महाबाहो त्वदग्रे जन्मजाद् बलात् । इदं कष्टतरं दुःखं नारदस्य प्रकोपजम् ॥२८॥
इदं त्रैविष्टपं राज्यं सर्वं निहतकंटकम् । नारदस्य प्रसादेन सर्वदा भुज्यते मया ॥ २९ ॥
नारदो बुद्धिदो नित्यं पिता माता च नारदः । सखा भ्राता च बंधुश्च शास्ता सान्त्वयिता मम ॥ ३० ॥
दैत्यानां विषमे युद्धे ऋषीणां चैव संकटे । नारदोक्तेन मंत्रेण जितवानस्मि तान् रिपून् ॥३१॥
तमहं नैव पश्यामि नारदं पितरं मम । नारदेन विना देव दीनोऽस्मि कृपणोऽस्म्यहम् ॥३२॥
नान्यं नाथं च पश्यामि शरणं यं व्रजाम्यहम् । पुरंदरवचः श्रुत्वा नारदः प्रकटोऽभवत् ॥३३॥
प्रणेमुर्देवताः सर्वा दृष्ट्वा देवर्षिमागतम् । देवराजः प्रमुदितो दंडवत्पतितो भुवि ॥ ३४ ॥
देवर्षे त्वां प्रपन्नोऽस्मि दीनोऽस्मि कृपणोऽस्म्यहम् ।
अनुकंपय मानाथं त्वां नाथं शरणागतम् ॥ ३५ ॥

नारद उवाच –

मा भैस्त्वं देवदेवेश स्मृत्या हीनोऽसि सांप्रतम् ।
पुनः संयोक्ष्यसे स्वाभिर्विभूतीभिरसंशयम् ॥ ३६ ॥

म्हणून अत्यंत दुःखी झालेला इंद्र म्हणाला कीं, एश्वर्यमदामुळें माझा सर्व धनक्षय झाला आहे. १०. ज्ञानांजनासारखें सर्व रोगांवरील औषध दारिद्र्य हेंच आहे. देवगुरु बृहस्पति कोठें निघून गेले कळत नाहीं. वैद्यरत्न धन्वन्तरी व अश्विनीकुमार आलेच नाहींत. रंभा, मेनका, तिलोत्तमा इत्यादि अप्सरा मृदंगध्वनीसह कोठें गेल्या कळत नाहीं. तुपाचें भांडें डबक्याप्रमाणें कोरडें पडलें. हें सर्व पाहून अंतःकरण जळत असून मृत्यूच ओढवल्यासारखा भास होत आहे. हे इंद्रायणी, तूं इकडे येऊन माझ्या आसनावर ठीक बैस. ११–१४.

इंद्र भयाकुल व विवश होऊन पुनः पुनः असेंच बोलूं लागला! तेव्हां इंद्रायणीनें त्याचें सांत्वन केलें. १५. तथापि इंद्रानें पुनः मोठा विलाप केला कीं, मी शोकाकुल होऊन एवढा विलाप करीत असतांना माझी प्राणप्रिया मला अभाग्याला टाकून कोठें गेली? माझी प्रेमळ व सुंदर प्रिया अजून कशी आली नाहीं? याप्रमाणें इंद्राचा शोक व विलाप, छत्रावांचून भ्रमण, व्यर्थ बरळणें हें सर्व वर्तन नारदानें ब्रम्हदेवाला कथन केलें. लगेच त्यानें ही सर्व हकीकत विष्णूला व महादेवाला निवेदन केली व तो स्वतः पुनः इंद्राकडे आला. नारदानें सांगितलेला वृत्तांत ऐकून विष्णु गरुडावर बसून नंदनवनांत आला. प्रथम त्याला इंद्र तेथें दिसला नाहीं. पण जेव्हां इंद्राला विष्णु दिसला, तेव्हां तो अधोवदन होऊन लहान मुलासारखा रडूं लागला. विष्णूनें त्याला प्रश्न केला, प्रभो, तुम्हीं असे रडतां कां? १६–२१.

लवकर तुमच्या दुःखाचें कारण सांगा. इंद्र म्हणाला, नारदाच्या कोपानें माझें सर्व ऐश्वर्य नाश पावलें. गौतमपत्नी अहल्या खरोखरच पतिव्रता. त्या प्रसंगीं माझ्या शरीरावरील वस्त्र कोठें गेलें हें मलाच समजलें नाहीं! यापेक्षां अधिक मी काय सांगावें. जगत्पते, तूं सर्वज्ञ आहेस. त्या अपराधामुळें माझ्या सर्वांगावर भगव्रण निर्माण झाले. मागें एकदां वृत्रासुराची हत्या माझ्या मागें लागली म्हणून मी सर्वत्र भटकत राहिलों! तसेंच पुरोहिताचा शिरच्छेद केला गेल्यामुळें मी दुःखसागरांत बुडालों होतों! त्याही वेळीं तूंच मला आधार दिला होतास व त्यामुळें मी दुःखसागर पार केला होता! याप्रमाणें कृताकृत सर्व पापांतून मी तुझ्याच बळावर मुक्त झालों होतों. २२–२७.

पण नारदाच्या अवकृपेमुळें हें अतिशय कष्टदायक संकट ओढवलें आहे. आतांपर्यंत स्वर्गाचें हें निष्कंटक राज्य मी उपभोगीत आलों. वस्तुतः नारदच माझा मातापिता व बुद्धिदाता आहे. फार काय, तोच माझा मित्र, भाऊ, नातलग, शास्ता व सांत्वन करणारा आहे. २८–२९. दैत्यांशीं चाललेल्या कठीण युद्धाच्या प्रसंगीं व ऋषींवर संकट ओढवलें असतां नारदाच्याच सल्ल्यानें मी त्या सर्वांवर विजय मिळविला आहे. तो माझा पिता आतां कोठेंही दिसत नाहीं. ३०–३१. नारदावांचून मी दीन दुःखी बनलों आहें. मला माझा रक्षणकर्ता कोणी दिसत नाहीं, यासाठीं मी तुला शरण आलों आहे. ३२. हें इंद्राचें वचन ऐकून नारद प्रगट झाला. त्याला सर्व देवांनीं प्रणाम केला. देवराजानेंही त्यास प्रणाम केला. इंद्र त्यास म्हणाला, तूं माझा नाथ आहेस. मी तुला शरण आलों आहें. माझ्यावर दया कर. ३३–३५.

नारद म्हणाला, देवदेवेशा, भिऊं नकोस. कारण तुला आतां माझें स्मरण झालें आहे. तुला तुझें सर्व ऐश्वर्य पुनः निश्चित प्राप्त होईल. ३६.

उपायं तं प्रवक्ष्यामि गच्छ शीघ्रं गुहाश्रमम् । प्रपद्यस्व गुहं शीघ्रं वरदांबां च मातरम् ॥३७॥
आपदुद्धरणं मंत्रं प्रपद्यस्व महामते । ताभ्यां कृतप्रसादः सन् गच्छ कुंडं विभूतिदम् ॥३८॥
तत्राश्रमपदं कृत्वा समाराधय शंकरम् । आपदुद्धारकं देवं भैरवं बटुकाभिधम् ॥ ३९ ॥
ततस्तुष्टो देवदेवो विभूतिं ते प्रदास्यति । नारदस्य वचः श्रुत्वा तूर्णं गत्वा गुहाश्रमम् ॥४०॥
गुहामंत्रमुपागम्य कुंडं गत्वा विभूतिदम् । तोषयामास देवेशं नाम्ना बटुकभैरवम् ॥ ४१ ॥
महापद्मश्च पद्मश्च शंखो मकरकच्छपौ । मुकुंदकुंदनीलाश्च निधयस्ते प्रजज्ञिरे ॥ ४२ ॥
हाहाहूहूश्च गंधर्वौ रंभाद्याश्चाष्ट नायिकाः । मृदंगश्रुतिगीतेन तोषिताश्चोपतस्थिरे ॥ ४३ ॥
ऐरावतो गजेन्द्रश्च चतुर्दंतविराजितः । घंटाघर्घरिकानादैः प्रज्ञातः पुरतः स्थितः ॥ ४४ ॥
पतिव्रताशिरोरत्नं शची दासीशतैर्वृता । आस्थिता शिबिकां साक्षात् पुरस्तात्प्रत्यदृश्यत ॥
बृहस्पतिः शिष्टसहस्रसंयुतः समुद्गिरन् ब्रह्म मुहुः सनातनम् । तेजस्विना देवगणेन सार्धं भुवं दिवं खं च विभूषयन् स्थितः ॥ ४६ ॥
ततः सर्वे देवगणाः परिवार्योपतस्थिरे । बटुको भैरवः साक्षात् शंकरो लोकशंकरोः ॥ ४७ ॥
वृषपृष्ठमुपाश्रित्य पुरस्तात्प्रत्यदृश्यत । दृष्ट्वा तं देवराजोच्चैर्जयशब्दं चकार वै ॥ ४८ ॥
जय शंभो महादेव जय चिन्त्योऽजयो भव । जय विश्वस्य संहर्त्रे निहंत्रे सुरविद्विषाम् ॥४९॥
आपत्पयोनिधौ मग्नः प्रपन्नस्त्वां पदांबुजम् । प्रसादं कुरु देवेश श्रीर्यथा मां न मुंचति ॥५०॥
भैरव उवाच –
मा भैस्त्वं देवराजोच्चैः श्रियायुक्तो भविष्यसि । ऋषयः सर्वदेवाश्च निधयश्चाप्सरोगणाः ॥५१॥
बृहस्पतिः पुरोधास्ते शची वानन्यगामिनी । हयश्चोच्चैःश्रवाश्चायं गजेन्द्रो निजवाहनम् ॥५२॥
एतच्च प्राप्स्यसे सर्वं सर्वस्वं मत्प्रसादतः । भवेदक्षय्यमेवाशु त्वं गच्छ निजमंदिरम् ॥ ५३ ॥
इत्येवमुक्तस्तुषितेन शंभुना पुरंदरो नारदतुंबुराद्यैः । प्रस्तूयमानः शुशुभे सुरावृतैः प्रकीर्यमाणः कुसुमैर्दिशश्च्युतैः ॥ ५४ ॥
ऐरावतं देवगजेन्द्रमुच्चकैः पुरोधसां मंत्रिगणैःपुरस्कृतम् । अधिष्ठितः सर्वसुरैकसेव्यः प्रगीयमानोऽप्सरसां गणैश्च ॥ ५५ ॥
ततः सर्वे देवगणाः प्रणेमुस्तं सुराधिपम् । तुष्टुवुर्देवगंधर्वा ननृतुश्चाप्सरोगणाः ॥ ५६ ॥
जयशब्दं चकारोच्चैः पुरोधास्तदनन्तरम् । ततस्तीर्थजलैः सर्वैरभिषेकं चकार ह ॥ ५७ ॥
शच्या सुरक्तया सार्धं ययौ नाकं पुरंदरः ।
शौनक उवाच –
इदमाख्यानकं सर्वं पुरंदर जयावहम् ॥ ५८ ॥
यः पठेच्छृणुयाद् वापि संपद्भिर्न वियुज्यते ।
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे रामक्षेत्रमाहात्म्ये एकोनत्रिंशत्तमोऽध्यायः ।

यासाठीं तुला मी एक उपाय सांगतों. तूं आतां लवकर कार्तिक स्वामीच्या आश्रमांत माता वरदांबेला शरण जा. हे महामते, तिच्यापासून आपदुद्धारक मंत्र संपादन कर. ३७. तिची कृपा संपादन करून तूं विभूति कुंडाकडे जा. तेथें आश्रम करून रहा व आपत्ती दूर करणाऱ्या शंकराची व बटुक भैरवाची आराधना कर. ते संतुष्ट होऊन तुला ऐश्वर्य देतील. ३८–३९. नारदाचा उपदेश ऐकून इंद्र गुहाश्रमांत गेला. तेथें मंत्र संपादन करून तो विभूति कुंडाकडे गेला. त्यानें तेथें देवेश व बटुक भैरव यांचें नामसंकीर्तन करून त्यांना संतुष्ट केलें. त्यामुळें त्याला पद्म, महापद्म, शंख, मकर, कच्छप, मुकुंद, कुंद व नील हे सर्व निधि त्याला मिळाले. ४०–४१. 'हाहा', 'हुहू' गंधर्व रंभादि अष्ट नायिका मृदंग वाजवीत, गायन करीत उपस्थित झाल्या. चतुर्दन्त ऐरावत समोर हजर झाला व शेंकडों दासींसह पतिव्रताशिरोमणी इंद्राणी पालखींत बसून उपस्थित झालेली त्याला दिसली. ४२–४५.

हजारों श्रेष्ठ देवांसह गुरु बृहस्पती सनातन वेदाचें पठन करीतच उपस्थित झाले. त्यांच्याबरोबर तेजस्वी देवसमुदाय होता. त्यामुळें पृथ्वी, अंतरिक्ष व स्वर्ग यांना शोभा आली होती. त्यानंतर बटुक भैरव आणि लोककल्याणकर्ते श्री शंकर उपस्थित झाले. त्यांना पाहून देवराजानें त्यांचा जयजयकार केला. ४६–४८. श्री महादेव शंभूचा जयजयकार असो. विश्वसंहार करणाऱ्या व देवशत्रूंचा नाश करणाऱ्या देवाचा जयजयकार असो. मी संकटसागरांत बुडालों आहे! यासाठीं मी तुझ्या चरणकमळाला शरण आलों आहें. हे देवेशा, माझ्यावर तुम्ही अशी कृपा करा कीं, ज्या योगानें लक्ष्मी माझा त्याग करणार नाहीं. ४९–५०.

भैरव म्हणाला, देवराज, तुम्ही बिलकूल भिऊं नका. तुम्ही श्रेष्ठ ऐश्वर्यशाली व्हाल. ऋषि, सर्व देव, सर्व निधि, अप्सरांचा समुदाय, पुरोहित, बृहस्पति, पतिव्रता शची, उच्चैःश्रवा, अश्व, ऐरावत हें सर्व तुला माझ्या प्रसादानें प्राप्त होईल. तूं आतां लवकर आपल्या मंदिराकडे जा. ५१–५३.

यानंतर संतुष्ट शंकर, नारद व तुंबुरु यांनी त्याची स्तुति केली. चहूंकडून त्याच्यावर पुष्पवृष्टि झाली. गजेंद्र ऐरावतावर इंद्र आरूढ झाला. पुरोहित वेदमंत्रोच्चारपूर्वक त्याला वारा घालूं लागले. अप्सरा नाचूं लागल्या. सर्व देवांनीं त्याला प्रणाम केला. देव–गंधर्व त्याची स्तुति करूं लागले. त्यानंतर पुरोहितानें उच्चरवानें जयजयकार केला, व प्रेममय शचीसह पुरंदराला राज्याभिषेक केला. नंतर इंद्र इंद्राणीसह स्वर्गांत गेला. हें सर्व इंद्राचें विजयाख्यान जो श्रवण करील व पठण करील, तो कधींही दरिद्री होणार नाहीं. ५४–५८.

# अथ त्रिंशत्तमोऽध्यायः ।

## महालिंगेशमहिमा ।

शौनक उवाच –

भगवन् त्वन्मुखांभोजकथां पापप्रणाशिनीम् । श्रुत्वा न तृप्तिं भगवन् पिबन्मर्त्यो यथामृतम् ॥
पुनश्च श्रोतुमिच्छामि प्रभावं विप्रपुंगव । क्षेत्रस्यास्य महाभाग विस्तारं ब्रूहि मे मुने ॥ २ ॥
किं पुण्यमत्र स्नानेन नियमः कोऽत्र गृह्यते । उपवासफलं किंवा नृणां श्रेयः कथं भवेत् ॥३॥
एतच्चान्यच्च भगवन् मह्यं त्वं वक्तुमर्हसि । कीदृशं रूपमास्थाय शंभुर्वसति शौनक ॥ ४ ॥

शौनक उवाच –

ततस्ते पांडवा राजन्नर्चयित्वा हरिंहरम् । सर्वान्कामानवाप्याथ प्रसादाद्देवदेवयोः ॥ ५ ॥
शत्रूणां निधनं चैव स्वराज्यप्राप्तिमुत्तमाम् । वंश[1]कोशाभिवृद्धिं च धनमक्षय्यमेव च ॥ ६ ॥
देवदेवेशयोर्लब्ध्वा कृत्वा क्षत्रस्य रक्षणम् । लोके विधाय महतां मुनींद्राणां च पूजनम्[2] ॥ ७ ॥
प्रदक्षिणं प्रकुर्वन्तस्तीर्थस्नानं च भारत । स्ववासं पुनराजागमुर्धर्मभीमा[3]दयः पराः ॥ ८ ॥

शतानीक उवाच –

सोमवंशोद्भवो राजा ययातिर्नाम वीर्यवान् । तस्य पुत्रो वसुर्नाम रूपौदार्य[4]गुणान्वितः ॥ ९ ॥
तपसा कामगं लब्ध्वा विमानं देववर्चसम् । महेंद्रभवनं गत्वा देवशत्रून्जघान ह ॥ १० ॥
वैणवीं जयदां यष्टिं[5] ध्वजरूपान्मनोहरान् । सर्वैश्वर्यप्रदां दिव्यां वसवे[6]ऽदाच्छतक्रतुः ॥ ११ ॥
जिगाय तेन भूपालान् वसुः शतपराक्रमः । यज्ञैश्च बहुलैरीजे[7] शंभवे च महोत्सवम्[8] ॥१२॥
शुक्तिमत्यास्तथा नद्यास्तीरे मुनिगणान्विते । कैलासवासगौरीशो लिंगरूपी सदाशिवः ॥१३॥
अर्चितो मुनिभिश्चास्ते महालिंगेशसंज्ञया । अत्र स्थित्वा मुनिवरा तपस्तप्त्वा सुदुस्तरम् ॥१४॥
स्नात्वा नद्यां शुक्तिमत्यां प्रत्यहं च यथाविधि । महालिंगं पूजयित्वा गताःसिद्धिं सुदुर्लभाम् ॥
तत्र तीर्थान्यनेकानि ऋषिभिः सेवितानि वै । तत्र स्नात्वा सर्वपापान्मुच्यते[9] भुवि मानवः ॥
अगस्त्यतीर्थं देवस्य पूर्वस्यां दिशि संस्थितम् । क्षिप्रं सिद्धिकरं नृणां स्नातानां मनुजाधिप ॥
पुरागस्त्यः कुंभयोनिस्तपस्तप्त्वा सुदुश्चरम् । स्वनाम्ना ह्यकरोत्तीर्थं सर्वपापहरं शुभम् ॥ १८
तत्तीर्थे प्रत्यहं स्नात्वा पूजयित्वा महेश्वरम् । लोपामुद्राधरः सिद्धिमगमद् वृषभध्वजात् ॥१९
वासिष्ठं तीर्थमाग्नेय्यां महालिंगात्तु संस्थितं । वसिष्ठोऽपि तपस्तप्त्वा निर्ममे तपसो बलात् ॥२०
सदाशिवं पूजयित्वा तस्माल्लेभे मुदान्वितात् । महादेवाद्दक्षिणस्यां तीर्थं कण्वविनिर्मितम् ॥२१॥
तत्राभिषिक्तो यो मर्त्यो महालिंगं च पूजयेत् । सर्वपापविनिर्मुक्तो याति शिवपदं महत् ॥ २२ ॥

---

१ वंशाभिवृद्धिकोशस्य । २ पूजयेत् । ३ राजाग्र्या । ४ शीलादयः । ५ जयदान्यष्टिं । ६ वसने । ७ रीज्ये । ८ महदुत्सवं । ९ पापैर्मुच्यते ।

# अध्याय ३० वा

## महालिंगेशमहिमा

शौनक म्हणाला, भगवन्, तुझ्या मुखांतून निघालेली अमृततुल्य व पापनाशक कथा मनुष्यानें कितीही ऐकली तरी त्याची तृप्ति होत नाहीं ! १. हे विप्रश्रेष्ठा, म्हणून या क्षेत्राचा प्रभाव मी पुनः ऐकूं इच्छितों. हे महाभाग मुने, ह्या क्षेत्राचा विस्तार मला सांगा. २. येथील स्नानाचें फल काय ? नियम कोणता ? उपवासाचें फल कोणतें ? तसेंच माणसाचें कल्याण कशानें होईल ? ३. हे शौनका, येथें शंभू कोणत्या रूपांत असतो ? मला आणखीही विशेष कृपया सांगावें. ४. शौनक म्हणाला, हे राजा, हरिहरांची पूजा केल्यावर त्या श्रेष्ठ देवांच्या प्रसादानें पांडवांच्या सर्व कामना पूर्ण झाल्या. ५. शत्रू नाश पावले. श्रेष्ठ राज्य मिळालें. वंश व कोष यांची मोठी वृद्धि झाली. हरिहरांच्या कृपेनें अक्षय्य धन मिळालें. क्षत्रियवंशाचें रक्षण केलें. त्यांनीं श्रेष्ठ मुनींचें पूजन करून त्यांना प्रदक्षिणा केली. शेवटीं हे भारता, ते श्रेष्ठ तीर्थस्नान करून पुनः आपल्या निवासस्थानीं आले. ६–८. शतानीक म्हणाला, सोमवंशांत ययाति नांवाचा एक पराक्रमी राजा होऊन गेला. त्याचा पुत्र वसु हा रूप, औदार्य वगैरे गुणांनीं संपन्न होता. ९. तपश्चर्या केल्यामुळें त्याला देवांसारखे तेजस्वी व इच्छागामी विमान मिळालें. त्या विमानानें स्वर्गांत जाऊन त्यानें देवशत्रूंचा वध केला. १०. तेथें त्याला इंद्रानें नेहमी विजयी व मनोहर अशी एक ध्वजयुक्त बांबूची काठी दिली होती. ती दिव्य काठी सर्व अधिकाराचें व ऐश्वर्याचें चिन्ह होती. ११. इंद्रतुल्य पराक्रमी वसूनें सर्व राजांचा त्या काठीनें पराजय केला. शंकरासाठीं त्यानें मोठ्या उत्साहानें पुष्कळ यज्ञ केले. १२. शुक्तिमती नदीच्या तीरावर पुष्कळ मुनि रहात असत. तेथें जाऊन त्यानें सर्व मुनींसह लिंगरूप कैलासाधिपति शंकराची पूजा केली. त्या लिंगाचें नांव महालिंगेश होतें. श्रेष्ठ मुनींनी येथेंच राहून अत्यंत दुश्चर तप केलें. शुक्तिमती नदींत प्रतिदिन स्नान करून व विधियुक्त महालिंगपूजन करून मोठी दुर्लभ अशी सिद्धि मिळविली. १३–१५. येथें अनेक तीर्थें असून त्या ठिकाणीं पुष्कळ ऋषि राहातात. यांत स्नान केल्यानें मानव सर्व पापांतून मुक्त होतो. १६. त्या देवाच्या पूर्वेस अगस्तितीर्थ आहे. हे राजा, यांत स्नान केल्यानें मनुष्याला तत्काल सिद्धि मिळते. १७. पूर्वी कुंभयोनि अगस्तीनें दुष्कर तप करून सर्व पाप दूर करणारें सुंदर असें आपल्या नांवाचें तीर्थ निर्माण केलें. १८. याच तीर्थांत स्नान करून महेश्वराची पूजा केल्यामुळें अगस्तीला सिद्धि मिळाली. १९.

महालिंगाच्या आग्नेय दिशेला वासिष्ठ तीर्थ आहे. कारण वसिष्ठानें आपल्या तपोबलानें तें निर्माण केलें होतें. २०. महादेवाच्या दक्षिणेला कण्वऋषिनिर्मित तीर्थ आहे. महादेवाची पूजा केल्यानें संतुष्ट होऊन महादेवानें त्याला तें तीर्थ दिलें होतें. २१. त्यांत स्नान करून महालिंगाची पूजा करणारा मनुष्य सर्व पापांतून मुक्त होऊन श्रेष्ठ शिवपदाला प्राप्त होतो. २२.

नैर्ऋत्यां दिशि पापघ्नं तीर्थं गालवनिर्मितम् । सर्वं पापहरं पुण्यं स्नातानां च नराधिप ॥२३॥
वारुण्यां गौतमकृतं तीर्थं पापविनाशनम् । क्षिप्रं सिद्धिकरं नृणां स्नातानां तत्प्रसादतः ॥२४॥
वायव्यां वर्तते तीर्थं भारद्वाजेन निर्मितम् । महालिंगेश्वरात्सर्वपापहानिः सुपुण्यदम् ॥ २५ ॥
तत्र स्नात्वा नरो याति शिवलोकं च शाश्वतम् । लिंगात्सोमस्य दिग्भागे तीर्थमांगिरसंस्मृतम् ॥
विहिताभिषवस्तत्र शिवलोके महीयते । वामदेवकृतं तीर्थमीशान्यां तस्य शूलिनः ॥ २७ ॥
तत्र स्नात्वा विप्रवराः प्राप्नुवंति परां गतिम् । स्नात्वा सर्वेषु तीर्थेषु पूजयित्वा महेश्वरम् ॥२८॥
भुक्त्वा च विमलान्भोगानंते रुद्रमवाप्नुयुः । वसोरागमने चैव महालिंगस्य वैभवम् ॥२९॥
तत्क्षेत्रस्य सांनिध्यं वरं वसुविनिर्मितम् । शुक्तिमत्यास्तथा नद्याः कथां पापप्रणाशिनीम् ॥३०॥
तत्रस्थानां च तीर्थानामुत्पत्तिं कथयामि ते । कैलासवासी भगवान् तत्र दृश्यो महामते ॥३१॥
न्यवसद्देवदेवेशः कुर्याल्लोकहिताय वै । यस्मात्स्वागमवेलायां कोटिलिंगात्मकः शुभः ॥ ३२ ॥
आविर्भूतो मया दृष्टस्तस्मादत्र वसाम्यहम् । इति निश्चित्य मनसा पौरा जानपदैः सह ॥३३॥
पुरे च कारयामास वाराह्याश्च तटे शुभे । वसुना कारिता सा तु वासवीत्यभिधीयते ॥३४ ॥
चतुरंगबलोपेता पौरजानपदैर्वृता । निवासमकरोत्तत्र वासव्यां वसुभूपतिः ॥ ३५ ॥
कमंडलुकृतावासं शुक्तिमत्यां च भूसुरम् । कदाचिन्नृपतिर्वस्तुं प्रार्थयामास वै सुराः ॥ ३६ ॥
वसुर्विप्रान् यदामंत्र्य वाराह्यामकरोत्स्थलम् । तदाप्रभृति विप्रेंद्राः शुक्तिमत्यभिधानतः ॥३७॥
ख्याताः सर्वेषु लोकेषु पश्चिमाब्धिं गताश्च ते । पुण्या शुक्तिमती कुब्जा खेटकी चक्रिणी नदी॥३८
सौपर्णेया च विप्रेंद्राः पंचनद्यः प्रकीर्तिताः । एताः पुण्यतमा लोके प्रत्येकं पापनाशनी ॥३९॥
मीलिताः संगमे यत्र पापहेत्ति किमद्भुतम् । कदाचित्कार्तिके मासि सोमवारे प्रदोषके ॥४०॥
शुक्तिमत्यास्तटे स्थाप्य लिंगं वै वालुकामयं । पूजयामासविधिवदागमज्ञैर्द्विजैर्वसुः ॥ ४१ ॥
धत्तूरैर्बिल्वपत्रैश्च पुंनागैर्नागकेसरैः । सहस्रकमलैश्चापि माधवीजातिकेसरैः ॥ ४२ ॥
द्रोणकल्हारकाश्मीरैः सुगंधिकुसुमैः शुभैः । अलंकृत्य महादेवं भक्त्यावनतकंधरः ॥ ४३ ॥
नैवेद्यं विधिवत्कृत्वा भक्ष्यभोज्यादिभिर्नृपः । नृत्यगीतैःस्तवैश्चापि दंपतीपूजनैरपि ॥ ४४ ॥
तोषयित्वा शिवं सांबं दंडवत्प्रणनाम सः । प्रदक्षिणामनुव्रज्य पूजां तस्मै समर्प्य च ॥ ४५ ॥
नद्यां क्षिप्तुं महाराज यत्नं चक्रे द्विजोत्तमः । साहसं मा कुरुष्वेति वागश्रूयत खे तदा ॥४६॥
सर्वे वै विस्मिताः प्रोचू राजानं साधुसाध्विति । जागरेणैव सा रात्रिः सर्वेषामगमद् द्विजाः ॥४७
महत्वाच्चैव तल्लिंगं महादेवेति कीर्तितम् । शुक्तिमत्यां कृतं स्नानं महादेवार्चनं तदा ॥ ४८ ॥
इह संपत्समोपेतो देहान्ते शिवतां ययौ । चिरकालं तपस्तप्त्वा महालिंगेशमव्ययम् ॥ ४९ ॥
स्वाधीनं कारयित्वाथ स्वनाम्ना कारिता पुरी । आश्रमं तत्र कृत्वाथ निनाय बहुवत्सरम् ॥

हे राजा, नैर्ऋत्य दिशेला गालवऋषिनिर्मित सर्वपापनाश करणारें पापघ्न तीर्थ आहे. त्यांत स्नान करणाऱ्यास पुण्यप्राप्ति होते. २३. पश्चिमेला गौतमनिर्मित तीर्थ आहे. तें पापनाश करणारें असून त्यांत स्नान केल्यानें तत्काल सिद्धि मिळते. २४. वायव्येला भारद्वाजनिर्मित तीर्थ आहे. तें श्रेष्ठ तीर्थ पुण्य देणारें असून महालिंगेश्वराच्या कृपेनें सर्वपाप नाश करणारें आहे. २५. तेथें स्नान केल्यानें मनुष्याला शाश्वत शिवलोकप्राप्ति होते. या लिंगाच्या उत्तर दिशेला अंगीरस तीर्थ आहे. २६. तेथें स्नान केल्यानें मनुष्य शिवलोकीं पूज्य होतो. त्या शंकराच्या ईशान्येला कामदेव तीर्थ आहे. २७. तेथें स्नान केल्यावर ब्राह्मणश्रेष्ठांना सद्गति मिळते. सर्व तीर्थांत स्नान केल्यावर व महेश्वराची पूजा केल्यावर मनुष्यांना विपुल भोग प्राप्त होऊन शेवटीं रुद्रप्राप्ति होते. वसूच्या आगमनानंतर त्यानें निर्माण केलेलें महालिंग वैभव, त्या क्षेत्राचें सुंदर सान्निध्य, शुक्तिमती नदीची पवित्र कथा व तेथील तीर्थोत्पत्ति मी तुला सांगतों. हे महामते, तेथें साक्षात् कैलासवासी भगवान् शंकर आहे. २८–३०. तो लोककल्याणकर्ता देवदेवेश तेथें राहिला आहे; व येथें कोटिलिंगात्मक भगवान शंकर प्रगट झाल्याचें मी स्वतः येथें आलों तेव्हां पाहिलें. म्हणूनच मी येथें राहात आहें. नागरीक लोकसुद्धां हें सत्य जाणूनच जानपदांसह येथें राहूं लागले. ३२–३३. वाराही नदीच्या सुंदर तीरावर वसूनें एक सुंदर नगरी वसविली. म्हणून त्या नगरीला वासवी म्हणतात. ३४. तेथें चतुरंग सैन्य होतें; पौर व जानपद लोकांनीं ही नगरी सदैव गजबजलेली असे. या नगरींत स्वतः वसु राजा रहात होता. ३५.

एकदां वसु राजानें ब्राह्मणांना तेथें येऊन राहण्याची विनंति केली; व त्यांना वाराही नदीच्या तीरावर राहण्यास जागा तयार करून दिली. तेव्हांपासून पश्चिम समुद्राजवळ वास करणारे हे ब्राह्मण शुक्तिमती या नांवानें जगांत प्रसिद्ध झाले. शुक्तिमती, कुब्जा, खेटकी, चक्रिणी व सौपर्णेया अशा पांच नद्या तेथें असून त्या सर्वच पापनाशिनी म्हणून प्रसिद्ध आहेत. ३६–३९. मग या सर्व नद्यांचा संगम पापनाश करणारा झाल्यास नवल नाहीं.

एकदां कार्तिक महिन्यांत सोमप्रदोषकालीं शुक्तिमती नदीच्या तीरावर बसून वसु राजानें वालुका–लिंगाची स्थापना करून वैदिक ब्राह्मणांकडून त्याची विधियुक्त पूजा केली. ४०–४१. धोतरा, बिल्वपत्र, पुंनाग, नागकेशर, सहस्रकमल, कस्तुरमोगरा, जाई, बकुल, द्रोण, श्वेत कमल, केशर व दुसरी सुगंधी फुलें यांनी महादेवाला नम्र भावानें अलंकृत केलें; ४२–४३. भक्ष्य–भोज्याचा विधियुक्त नैवेद्य अर्पण करून नृत्य, गीत, स्तोत्र आणि दंपतीभोजन यांनीं पार्वतीसह शिवाला संतुष्ट केल्यावर साष्टांग प्रणाम केला व प्रदक्षिणा करून सर्व पूजा शिवार्पण केली. ४४–४५. ब्राह्मण हो, शेवटीं महाराजानें नदींत लिंगोत्सर्ग करण्याचा प्रयत्न केला! इतक्यांत आकाशवाणी झाली, ‘ साहस करूं नकोस ’. ४६. ती वाणी ऐकून सर्वच विस्मित झाले व राजाला उद्देशून म्हणाले, हे राजा, तूं धन्य आहेस! त्या रात्रीं सर्वांनाच जागरण झालें. ४७. तें लिंग फार विशाल होतें, म्हणून त्या लिंगाला लोक ‘ महादेव ’ म्हणूं लागले. शुक्तिमती नदींत स्नान करून महादेवाची पूजा केल्यानें मनुष्याला इहलोकीं संपत्ति प्राप्त होऊन देहत्यागानंतर शिवरूपाची प्राप्ति होते. याप्रमाणें वसूनें चिरकाल तप करून आणि अव्यय महालिंगाची पूजा करून महादेवाला वश करून घेतलें. स्वतःच्या नांवाचें नगर वसविलें व आश्रम करून तेथें पुष्कळ वर्षें घालविलीं. ४८–५०.

कदाचिद् भार्गवः श्रीमान् सर्वक्षत्रकुलांतकः । गोकर्णं गंतुकामोऽसौ महेंद्राद्रौ जगाम सः ॥५१
तत्र तत्र च तीर्थानि ऋषिनामाश्रमाणि च । शनैः पश्यन्नमेयात्मा देवतायतनानि च ॥ ५२ ॥
तत्र सह्याद्रिशिखरे ह्यदूरे दृष्टवान् मुनिः । दिव्यौषधितपोयोगैर्मंत्रसिद्धैर्महर्षिभिः ॥ ५३ ॥
जुष्टं किन्नरगंधर्वैरप्सरोभिश्च चारणैः । नानारत्नमयैः शृंगैरिंद्रनीलविचित्रितैः ॥ ५४ ॥
नानातरुलतागुल्मैश्चित्रैर्मृगविभूषितैः । नानाफलप्रस्त्रवणैर्नानाकंदरसानुभिः ॥ ५५ ॥
अवतीर्य ददर्शाथ तौलवं देशमुत्तमम् । तत्क्षेत्रं प्राप्तवान् रामो मेधावी भृगुनंदनः ॥ ५६ ॥
महालिंगेश्वरं सम्यक् पूजयामास शास्त्रतः । सूर्येन्दुवन्हिनयन भस्मोध्दूलितविग्रह ॥ ५७ ॥
एवं स्तुत्वा तदा रामः कृतांजलिपुटः सुधीः । स्तुत्वा नत्वाथ तं देवं प्रतस्थे चोत्तरां दिशम् ॥
तत्र शुक्तिमतीं दिव्यां विमलोदकपूरिताम् । मंदाकिनीप्रतिनिभामघौघपरिवर्जिनीम् ॥५९॥
तां ददर्श महाभागः तस्यां स्नातुं प्रचक्रमे । विधाय नित्यकर्माणि सोऽहं ब्रह्मेति भावयन् ॥
ददर्श भार्गवं राजा चतुर्भिः सचिवैः सह । अविदूरे तपस्यंतं साक्षाद्वन्हिशिखोपमम् ॥६१॥
कोटिभानुप्रतीकाशं नासाग्रकृतलोचनम् । ददर्श भार्गवं हृष्टस्तस्यांतिकमुपाविशत् ॥ ६२ ॥
पाहि पाहि महाबाहो सर्वभूतदयानिधे । दुःखान्नस्तारय विभो संरक्ष करुणाकर ॥ ६३ ॥
पुण्यलेशेन महता त्वद्दर्शनमभूद्विभो । कृपां कुरु दयासिंधो मां पालय दयानिधे ॥ ६४ ॥
इति तस्य वचः श्रुत्वा प्रहृष्टोऽभूत्तदा मुनिः । तेनैव सह संप्राप्तो देवेशं भद्रदायकम् ॥ ६५ ॥
दर्शनं कारयामास यथाभक्तिर्भविष्यति । क्रियतामत्र संवासं किंचित्कालमतंद्रिताः ॥ ६६ ॥
इति श्रीस्कंदपुराणे सह्याद्रिखंडे उत्तररहस्ये महालिंगेशमहिमावर्णनं
नाम त्रिंशत्तमोऽध्यायः ॥ २१ ॥

## ॥ ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥

# ॥ स्कंन्दपुराणान्तर्गतं सह्याद्रिखण्डम् ॥

## चंद्रचूड ( चंद्रेश्वर ) माहात्म्यं प्रारभ्यते ।

### अथ प्रथमोऽध्यायः ।

ऋषिरुवाच –
सर्वज्ञनन्दन स्कन्द सर्वशास्त्रविदां वर । त्वया कथयता चोक्तं माहात्म्यं हाटकेश्वरम् ॥ १ ॥
चन्द्रचूडाभिधं[1] क्षेत्रं हाटकेश्वरदक्षिणे । परमं पावनं लोके नानाख्यानसमन्वितम् ॥ २ ॥
चन्द्रचूडाभिधः[2] कोऽसौ कथं नामास्य विश्रुतम्[3] । कदाप्रभृति तत् क्षेत्रं ख्यातं त्रैलोक्यपावनम् ॥

१ वधीरिति गो. न. क. पु. पा. । २ वधीकोशौ इति सि. न. मु. क. को. चि. पु. । ३ विभृत-मिति न. गो. पाठः ।

एकदां क्षत्रियांतक श्रीमान् भार्गव गोकर्णाला जातांना मार्गांत महेंद्र पर्वतावर गेला. ५१. सर्वत्र तीर्थें, ऋषींचे आश्रम, देवालयें, सावकाशपणें पहात असतां त्या उदार परशुरामाची दृष्टि सह्याद्रिशिखराकडे गेली. त्या शिखरावर दिव्य औषधि, तपस्वी व मंत्रसिद्ध महर्षि होते. किन्नर, गंधर्व, अप्सरा, चारण यांची तेथें वस्ती होती. त्या सह्याद्रीचीं शिखरें इंद्रनील मणि इत्यादि विविध रत्नांमुळें रंगीबेरंगी दिसत होतीं. विविध वृक्षलता, झाडी, हरणें, फळें, झरे व गुहा पण तेथें होत्या. ५२–५५. त्या पर्वतावरून खालीं उतरल्यावर तेथील उत्तम तौलव देश पाहून मेधावी भार्गवराम त्या क्षेत्रांत आला. तेथें त्यानें महालिंगाची विधियुक्त पूजा करून हे सूर्यचंद्राग्निनयन व भस्मचर्चितशरीर अशा शंकरा, तुला माझा प्रणाम असो, अशी हात जोडून स्तुति केली; व नमस्कार करून तो उत्तरेकडे निघाला. ५६–५८. तेथें त्याला गंगेप्रमाणें पापनाश करणारी व स्वच्छ पाण्यानें भरलेली शुक्तिमती नदी दिसली. भाग्यशाली रामानें तींत स्नान केलें, व नित्यविधि करून तो 'सोऽहं ब्रह्म' असें ध्यान करीत बसला. ५९–६०. इतक्यांत चार सचिवांसह वसुराजाला त्या तपस्वी भार्गवरामाचें दर्शन झालें. यावेळीं तो मूर्तिमंत अग्निसारखा किंवा कोट्यवधि सूर्यासारखा तेजस्वी दिसत होता. त्याची दृष्टि नासिकाग्रावर स्थिर होती. भार्गवरामाला पाहातांच वसुराजाला आनंद झाला व तो त्याच्याजवळ जाऊन बसला. ६१–६२. व म्हणाला,

हे महाबाहो, आमचें रक्षण कर; सर्वभूतदयानिधे, माझें दुःख दूर कर; हे करुणाकर प्रभो, माझें रक्षण कर. ६३. हे विभो, केवळ माझ्या मोठ्या पुण्याईमुळें मला तुझें दर्शन झालें. हे दयासिंधो, कृपा कर व माझें पालन कर. ६४.

त्याचें हें वचन ऐकून भार्गवमुनीला फार आनंद झाला; व तो वसुराजासह कल्याणकर्त्या देवेशाकडे आला. ६५. राजाला शंकराचें दर्शन देऊन भार्गवराम त्याला म्हणाला, तुझ्या भक्त्यनुसार सर्व कांहीं होईल. आळस टाकून तूं येथें कांहीं काल रहा. ६६.

# अध्याय १ ला

## चंद्रचूड ( चंद्रेश्वर ) माहात्म्य

ऋषि म्हणाले, बुद्धिमान् लोकांना आनंद देणाऱ्या हे कार्तिकेया, तूं सर्वशास्त्र पारंगत आहेस. तूं मला हाटकेश्वराचें माहात्म्य सांगितलेंस. १. हाटकेश्वराच्या दक्षिणेला चंद्रचूड नांवाचें क्षेत्र आहे. त्याच्याविषयीं अनेक कथा प्रचलित आहेत. २. हा चंद्रचूड कोण ? चंद्रचूड हें नांव कां प्रसिद्ध झालें ? ह्याचा महिमा कोणता ? ह्याची उत्पत्ति कशी झाली ? हें क्षेत्र त्रिभुवनाला पवित्र करणारें कसें ? हें सर्व कृपा करून सविस्तर सांग. ३–४.

को वाऽस्य महिमा प्रोक्तः प्रादुर्भावोऽस्य वै कथम् । तत्सर्वं नः समासेन कथयस्व ससादतः॥
स्कन्द उवाच –
शृणु त्वं मुनिशार्दूल चन्द्रचूडाभिधस्य तु । महिमानं पुराणेषु बहुधा परिकीर्तितम् ॥ ५ ॥
पुरातनमिदं क्षेत्रंऋषिवृन्दाधिवासितम् । पश्चिमे कुशवत्याद्यां[1] नद्योऽनन्तफलप्रदाः ॥ ६ ॥
यस्य क्षेत्रस्य पुरतो नदी मुनिनिषेविता । ख्याता कुशवती लोके ह्यवग्रांहो[2] ह्यभूत्तदा ॥ ७ ॥
ब्रह्मपादसमुद्भूता देवतारूपिणी शिवा । ऋषिप्रिया कुशवती यथार्थं नामधारिणी ॥ ८ ॥
अस्यास्तु महिमा लोकेऽजायत परमर्षिणा । हाटकेशं द्रष्टुकामस्त्वरया निःसृतो यदा ॥ ९ ॥
दृष्ट्वा मुनिस्तस्य[3] तनुमगस्तिर्लोकविश्रुतः । कृत्वा सव्यविभागेन ह्येकदेशेन सा शुभा ॥१०॥
ऋषेस्तु वचनात्सा तु शंखेशमभिवारिधिम् । एकदेशेन संगत्य याता वै हाटकेश्वरम् ॥ ११ ॥
आगता देवदेवेशं ख्याता पञ्चनदीति च । इयं कुशवती पुण्या जाता चोभयतोमुखी ॥१२॥
शृण्वाना परमां पुण्यां लवणोदधिगर्जनाम् । सेव्यमाना कुशवती ह्यघसंचयहारिणी ॥ १३ ॥
अवग्रहः पुरा चाऽसीदेकदा लोकशासनः । समाश्चायुतपर्यन्तं न ववर्ष बलाहकः ॥ १४ ॥
तदा वै ऋषयः सर्वे शंसितांस्त्वभिवाहिनीम्[4] । केचिंद्वनं[5] नदीं जग्मुस्तथा चैव मरुद्धाम् ॥१५
केचित् कुशवतीं प्राप्ता ज्ञात्वाऽक्षय्यजलामिति । न्यवसन्मुनिशार्दूला जलाधारा धृतव्रताः ॥
नियुतं परिसंख्याताः क्षुधिताः सपरिग्रहाः । अस्तुवन् देवमीशानं संवृत्तिपरिकर्षिताः ॥ १७ ॥
ऋषय ऊचुः –
जय शम्भो मृडानीश प्रणतार्तिप्रभंजन । जय जय जगन्नाथ कैलासशिखरालय ॥ १८ ॥
भालदेशे समुद्भ्राजच्चंद्रांक जगतां गुरो । जीवयास्मान्महादेव दुःखितान्वृत्तिकर्षितान् ॥१९॥
स्कन्द उवाच –
एवं स्तुतस्तदा देवः शर्वः सर्वाघनाशनः । प्रादुरासीत्पुरो भागे पर्वताकारवर्ष्मभृत् ॥ २० ॥
अनेकरत्ननिचयः सोमकान्तशिवालयः । योजनोच्छ्रायसंयुक्तो वपुषो यस्य नोपमा ॥ २१ ॥
मेघगम्भीरया वाचा ह्युवाच मुनिपुंगवान् । मद्देहक्लेदनोद्भूतैरद्भिर्वो जीवनं भवेत् ॥ २२ ॥
अमृतांशोः सुसंपर्कात्सम्भूता ह्यापो भूरिशः[6] । जीवनं कल्पयिष्यन्ति भवतां चाघनाशनम् ॥ २३
एवं वदंति ते सर्वे ह्युदीर्योत्सार्यमानुजाः ।*

इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे सह्याचलोपाख्याने चन्द्रचूडमाहात्म्ये प्रथमोऽध्यायः॥

---

१ त्याद्यैनघानन्तेति को. चं. न. सि. पाठः । २ वग्रहोपीति को. वा. गो. पाठः ।
३ तस्यतमं गस्ति लोकेति मु. को. न. सि. चं. क. पु. पा. । ४ संश्रीतस्त्वेति न. गो. मु. पा. ।
५ केचिद्दंनदीति क. न. मु. सि. पा. । ६ भूरिशो ह्यपान् ।

कार्तिकेय म्हणाला, हे मुनिश्रेष्ठा, ऐक. ह्या चंद्रेश्वराचें माहात्म्य पुराणामध्यें विविध प्रकारचें आहे. ५. ऋषिश्रेष्ठांनीं वास केलेलें हें क्षेत्र फार प्राचीन आहे. क्षेत्राच्या पश्चिमेला कुशवतीसारख्या आनंददायक पवित्र नद्या आहेत. ६. क्षेत्राच्या समोर वाहणारी ही प्रसिद्ध नदी मुनिजनांवर उपकार करणारी आहे. ७. ब्रह्मदेवाच्या चरणकमलांपासून उत्पन्न झालेली, अत्यंत पवित्र, देवतास्वरूप व ऋषिजनप्रिय अशा या नदीचें कुशवती हें नांव सार्थ आहे. हिचा महिमा लोकप्रसिद्ध आहे. अगस्ति ऋषि चंद्रशेखराला पाहण्याकरितां गेला असतांना त्याचें शरीर पाहून त्या नदीचा एक भाग हाटकेश्वराच्या दक्षिणेकडे वळवून दुसरा भाग त्यानें शंखनिधि समुद्राला जोडला. ८–११. अगस्तीनें नदीतीरावर संचार केला. त्या दोन नद्या पंचगंगा या नांवानें प्रसिद्ध झाल्या; आणि कुशवती नदी द्विमुख बनली. १२. पातकांचा नाश करणारी ही कुशवती नदी लवण समुद्राची गर्जना श्रवण करीत त्याच्याशीं एकरूप होत होती. १३. एकदां पुष्कळ काळपर्यंत पर्जन्यवृष्टि झालीच नाहीं. त्यामुळें फार मोठा दुष्काळ पडला. १४. म्हणून सर्व ऋषींनीं त्या नदीची स्तुति केली. कित्येक लोक वनांत निघून गेले, व कित्येक लोक कधीं शुष्क न होणाऱ्या ह्या देवनदीवर आले! १५. शेंकडों व्रतस्थ मुनिजन आपल्या परिवारासह भुकेनें व्याकूळ होऊन पाणी पिऊन राहिले. कित्येक ऋषिलोक उपजीविकेचें साधन नसल्यानें केवळ देवस्तुति करीत राहिले. १६–१७. ऋषि म्हणाले, हे पार्वतीपते शंकरा, तूं विनीत भक्तांचें दुःख दूर करणारा आहेस. हे जगन्नाथ कैलासपते, हे चंद्रशेखर जगद्गुरो महादेवा, आम्ही सर्व लोक दुःखानें गांजलों आहोंत. तूं आमचें रक्षण कर. १८–१९.

कार्तिकेय म्हणाला, याप्रमाणें स्तुति केल्यावर अघविनाशी महादेवानें कित्येक योजन ऊंच असें पर्वतप्राय रूप धारण केलें तो त्यांच्यासमोर प्रगट झाला. २०. त्या शिवमंदिरावर विविध रत्नें चमकत होतीं! फारच भव्य असें तें मंदिर चंद्रकांतीनें उजळलें होतें, व अनुपम सुंदर होतें! २१. महादेव मेघगंभीर वाणीनें मुनिश्रेष्ठांना उद्देशून म्हणाला, माझ्या शरीरापासून उत्पन्न झालेल्या पाण्यानें तुमची उपजीविका होईल. २२. तसेंच चंद्रसंपर्कानें स्रवलेल्या पाण्यामुळें तुमचा पापनाश होऊन तुमचें जीवनही समृद्ध होईल. २३.

# अथ द्वितीयोऽध्यायः ।

## चंद्रचूडप्रादुर्भावः ।

स्कन्द उवाच –

सोमकान्तशिला लोके दृष्टी सोमस्य मस्तके । अद्यापि स्रवते वारि सा शिला नश्यते नहि ॥१॥
तदा पर्वतसम्भूता आपो वै सर्वतो ऋषीन् । जीवयामासुः सुरसं किलाराममनत्ययम् ॥ २ ॥
अवग्रहान्ते ऋषयो धूर्जटिं ते विजिज्ञपुः । धूर्जटे देवदेवेश प्रार्थयामः सुतर्पिताः ॥ ३ ॥
तव वर्ष्मसमुद्भूतैर्जीवनैः परमाद्भुतैः । वरं देहि मृडानीश भक्तानां च हितप्रदम् ॥ ४ ॥

शिव उवाच –

वृणुध्वं भो मुनिवरा मत्तो यद्वांछितं वरम् । नादेयमस्ति जगति त्विति मे निश्चितं वच : ॥५॥

स्कन्द उवाच –

भवस्य वचनं श्रुत्वा ऋषयः संशितव्रताः । ऊचुः सर्वे महेशानं लोकानां हितकाम्यया ॥ ६ ॥

ऋषय ऊचुः –

अनेन वपुषा देव स्थातव्यं चन्द्रशेखर । त्वां दृष्ट्वा जन्तवः सर्वे मुच्यंते सर्वतो भयात् ॥ ७ ॥
त्वांगक्लेशसंभूता आपो लोकान् पुनंति हि । पंचतीर्थानि पर्यंतभूम्यां तिष्ठंति सर्वतः ॥ ८ ॥
पावनार्थं हि लोकानां वान्ति यत्तेषितात्मनाम् । सरितस्त्वद्य संभूताः सन्तु ता लोकपावकाः ॥
तव नाम्ना सुविख्यातं क्षेत्रं भवतु धूर्जटे ।

स्कन्द उवाच –

तेषां वचः समाकर्ण्य तथेत्युक्त्वा जगत्पतिः ॥ १० ॥
शिखरे लिंगरूपेण स्थितस्त्रैलोक्यपावनः । तं दृष्ट्वा च नमस्कृत्य स्मृत्वा भावेनाहर्निशम् ॥ ११ ॥
नरो मुच्येत दुरितैः प्रयात्येवं परां गतिम् । तद् दृष्ट्वा महदाश्चर्यं देवाश्चापि दिवौकसः ॥ १२ ॥
अद्यापि परितिष्ठन्ति सिद्धपीठे मनोरमे ।

इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे चन्द्रचूडप्रादुर्भावो नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

# अथ तृतीयोऽध्यायः ।

## तीर्थप्रशंसा ।

स्कन्द उवाच –

अत्र स्थिते त्र्यंबके वै तदा पर्वतवर्ष्मणम् । भैरवः प्रमथो नाथं ह्यागतस्तत्र पर्वतम् ॥ १ ॥
उवाच प्राञ्जलिर्भूत्वा किमर्थं पार्वतीपते । त्यक्त्वा कैलासशिखरं तथा मन्दरपर्वतम् ॥ २ ॥

---

१ दृष्ट्वा । २ जीवयामास । ३ किल राममरात्यय । ४ तं । ५ न चां० । ६ पपौ । ७ पर्याप्त्यैव

# अध्याय २ रा

## चंद्रचूडाचा प्रादुर्भाव

कार्तिकेय म्हणाला, त्यावेळीं चंद्रेश्वराच्या मस्तकावर लोकांना सोमकांतशिला दिसली. तिच्यांतून सतत जलधारा वहात होती! ती शिला अक्षय होती. १. पर्वतापासून उत्पन्न झालेल्या त्या जलौघानें ऋषि लोकांना जीवन दिलें. २. दुष्काळ संपल्यावर त्या संतुष्ट ऋषींनीं देवदेवेश शंकराची प्रार्थना केली. हे शंकरा, ह्या दुष्काळांत तुझ्या शरीरापासून उत्पन्न झालेल्या पाण्याच्या योगानें आम्ही संतुष्ट झालों. तेव्हां भक्तांचें कल्याण करावें अशा इच्छेनें श्रीशंकर म्हणाले, मुनिश्रेष्ठांनो, तुम्ही इच्छित वर मागा. तुम्हाला न देतां येण्याजोगें असें मला काय आहे? ३–५. स्कंद म्हणाला, शंकराचें तें भाषण ऐकून लोककल्याणाकरितां ते सर्व व्रतस्थ ऋषि शंकराला म्हणाले, हे चंद्रशेखरा, आपण ह्याच स्वरूपांत येथें वास करावा. तुमच्या दर्शनानें सर्व प्राणी पूर्णपणें भयमुक्त होतील. ६–७. तुमच्या शरीरापासून उत्पन्न झालेलें हें पाणी आम्हां सर्वांना पवित्र करीत आहे. पृथ्वीवर लोकपावन पंचतीर्थेंही प्रसिद्ध आहेत. तृषित लोक ह्या नद्यांचें पाणी पिऊन गेले आहेत. ह्या सर्वच नद्या तुमच्या शरीरापासून निर्माण झाल्या आहेत. तशी ही गंगासुद्धां लोकांना पवित्र करो; व हे शंकरा, हें क्षेत्रसुद्धां तुमच्या नांवानें प्रसिद्ध होवो.

स्कंद म्हणाला, त्यांचें तें बोलणें ऐकून व ‘तथास्तु’ असें म्हणून जगत्पति त्रैलोक्यपावन शंकर लिंगरूपानें त्याच पर्वतावर राहिले. त्या लिंगाचें दर्शन घेऊन त्यास नमस्कार करावा; भक्तिपूर्वक त्याचें रात्रंदिवस स्मरण करावें; त्या योगानें मानव सर्व पापांतून मुक्त होतो, व त्यास शेवटीं सद्गति मिळते. हें सर्व मोठें आश्चर्य पाहून स्वर्गस्थ देवसुद्धां त्या सुंदर सिद्धपर्वतावर अजून वास्तव्य करतात. ८–१२.

# अध्याय ३ रा

## तीर्थप्रशंसा

स्कंद म्हणाला, श्रीशंकर त्या सिद्धपर्वतावर राहूं लागले; म्हणून त्या पर्वतावर प्रथम भैरव हा गणसुद्धां आपल्या स्वामींकडे आला व हात जोडून म्हणाला, हे पार्वतीपते, हें तुम्ही काय केलें! रमणीय असें कैलासशिखर, मंदार व हिमाचल पर्वत या सर्वांचा त्याग करून आपण इकडे कां आलांत? तुमच्यावांचून तिकडे राहणें आम्हांला शक्य नाहीं; म्हणून

हित्वा हिमवतं रम्यं सांप्रतं त्वमिहागतः । न शक्तोऽहं त्वया तत्र विना स्थातुं कृपाकर ॥
अद्यैव सह गच्छामः कैलासं पर्वतोत्तमम् । तस्य तद्वचनं श्रुत्वा जहास गिरिजाधवः ॥ ४ ॥
त्वयापि चात्र वस्तव्यं भक्तानामभयप्रद । अत्र स्थितानां पुण्यानां वरदानां च योगिनाम् ॥
मत्पुरे स्थीयते भूतसंघैश्चापि समन्वितैः । ते प्रत्यूहैः परित्यक्ता लभंते परमेप्सितम् ॥ ६ ॥

स्कन्द उवाच –

तदाप्रभृति वै तत्र भैरवो भूतनायकः । सोमेशं शम्भुमीशानं भक्तानामभयप्रदम् ॥ ७ ॥
अनुपम्यमिदं क्षेत्रं क्षेत्राणां पावनं द्विजाः । अनेकाश्चर्यसंयुक्तमृषिजुष्टं पुरातनम् ॥ ८ ॥
अनेकऋषयश्चात्र यथा क्षेत्रेषु सत्तमाः । क्षेत्रस्यास्य प्रभावेन सिद्धिं प्राप्ताः परां गताः ॥ ९ ॥
येन येनाधिष्ठितं यत् समन्तात्पर्वतस्य च । तीर्थेन सेवितं नाम्ना विख्यातं पावनं परम् ॥
कपिलं गौतमं सोमं भारद्वाजं तथैव च । चन्द्रोदयं सुशर्मिष्ठमम्बष्ठं कामदं नृणाम् ॥ ११ ॥
एतान्यन्यानि तीर्थानि सिद्धिदानि युगे युगे । न जानन्ति जना मूढाः पापोपहतचेतसः ॥
सर्वतीर्थानि वै[3] सद्यो भावहीनान्नराधमान् । तस्माद्भावात्पुनन्तोमाँल्लोकान्सर्वान्न संशयः॥
व्रतैः शुद्धिर्द्विजातीनां पदप्राप्तिस्तथैव च । शूद्राणां द्विजशुश्रूषा स्त्रीणां स्वपतिसेवनम् ॥ १४
अशक्यास्ते कलौ यज्ञा इति मत्वा स्वयंभुवा । पुण्यतीर्थावगाहनं यज्ञानां फलदं कृतम् ॥
महाव्रतानां फलदं पुण्यतीर्थनिषेवणम् । तस्मात्तीर्थं नृभिः सेव्यं पुण्यकाले विशेषतः ॥१६॥
कर्मणामविरोधेन सर्वयज्ञाधिकं यतः । तस्मात्सर्वप्रयत्नेन तीर्थं सेव्यं द्विजातिभिः ॥ १७ ॥
इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखंडे चन्द्रचूडमाहात्म्ये तीर्थप्रशंसा नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

# अथ चतुर्थोऽध्यायः ।

## अंबष्ठचरितम् ।

स्कन्द उवाच –

श्रूयतामिदमाख्यानमद्भुतं सुमहत्तरम् । अंबष्ठचरितं लोके शृण्वतां रोमहर्षणम् ॥ १ ॥
अंबष्ठो नाम पापाब्धिः कुशवत्याः समीपतः । निवसन् चौरवृत्त्या वै कुटुंबपरिपोषकः ॥ २ ॥
मृगान्हत्वा तु सततं निर्दयः पिशिताशनः । तया वृत्त्या सुसंतुष्टस्तत्रैव जरठोऽभवत् ॥ ३ ॥
कदाचिद्विस्मयाविष्टो दृष्ट्वा कुशवतीं शुभाम् । ह्यागतश्चंद्रचूडश्च पौर्णमास्यां नभस्य च ॥४॥
इन्दोर्वै वासरे लोका मीलिताश्चाप्यनेकशः । तद् दृष्ट्वा महदाश्चर्यं पूजोत्सवसमन्वितम् ॥
यावद्दिनावसानं हि स तत्र संस्थितः खलः । क्षुधितश्चातिदुःखार्तो दुर्गं हित्वा दिनांतिके ॥

---

१ हिमवंतं रमणंकंसामिति मु. को. सि. न. पु. पा. । २ योवतः इति पु. पा. । ३ सर्वभावे वस्मत्रामिति मु. को. न. पु. पा. । ४ ह्यागतश्चंद्र मूढाच इति मु. गो. क. न. पु. पा. । ५ अद्वसंनं सुदुखा दुर्गंहित्वा तुनिशामुखे इ. मु. सी. न. को. क. पु. पा. ।

आज आमच्यासह पर्वतश्रेष्ठ कैलासपर्वतावर चला. त्याचें तें भाषण ऐकून गिरीजापति शंकर हंसले व म्हणाले, हे प्रमथा, तूंसुद्धां येथेंच रहा. कारण हें स्थान पुण्यवान् व वरद अशा भक्तांना अभय देणारें आहे. म्हणून भूतसंघासह ह्या माझ्या नगरींत जे राहतील, तें निर्विघ्न होऊन त्यांना इष्टप्राप्ति होईल. १–६.

स्कंद म्हणाला, तेव्हांपासून भूतनायक भैरव भक्तांना अभयदायक चंद्रशेखर शंकराजवळ राहूं लागला. ७. ब्राह्मण हो, हें क्षेत्र सर्व क्षेत्रांत अद्वितीय आहे. येथें ऋषि रहात असून तें अनेक आश्चर्यांनी भरलेलें आहे. श्रेष्ठ लोक हो, अन्य क्षेत्राप्रमाणें येथेंही ऋषींना क्षेत्रप्रभावानें सिद्धी मिळाली आहे. ८–९. ह्या पर्वताच्या आसपास जो जो ऋषि राहिला, त्याच्याच नांवानें तें स्थान प्रसिद्ध झालें आहे. कपिल, गौतम, सोम, भारद्वाज, चंद्रोदय, सुशर्मिष्ठ हीं सर्व तीर्थें मनुष्यांची इच्छा पूर्ण करणारीं असून प्रत्येक युगांत सिद्धि प्राप्त करून देणारीं आहेत. हें पापी व मूर्ख लोकांना समजत नाहीं. १०–१२. व्रतामुळें ब्राह्मणांची (शारीरिक व मानसिक) शुद्धि होऊन त्यांना श्रेष्ठ पद प्राप्त होतें. अशा ब्राह्मणांच्या सेवेमुळें शूद्रांची शुद्धि होते, पतिसेवेमुळें स्त्रिया शुद्ध होतात व त्यांना श्रेष्ठ पदाची प्राप्ति होते. १३–१४. कलियुगांत यज्ञ करणें अशक्य आहे; हें जाणून ब्रह्मदेवानें यज्ञफळ देणारें पवित्र तीर्थस्नान आहे असें सांगितलें आहे. पुण्यतीर्थाचें सेवन केल्यानें महाव्रताचें फळ मिळतें. म्हणून विशेषतः पर्वकालीं तीर्थस्नान करावें. म्हणून ब्राह्मणांनी आपलें नित्यकर्म प्रयत्नपूर्वक सतत चालू ठेवून यज्ञाहून अधिक फळ देणारें तीर्थसेवन करावें. १५–१७.

## अध्याय ४ था

## अंबष्ठचरित्र

कार्तिकेय म्हणाला, अतिविस्तृत असें हें अंबष्ठचरित्र ऐक. हें ऐकल्यानें अंगावर रोमांच उभे राहतात. १. कुशावती नदीच्या जवळ जणूं पापाचा सागरच असा अंबष्ठ नांवाचा एक पुरुष चोऱ्या करून आपल्या कुटुंबाचें पालनपोषण करीत असे. २. रक्तमांसभक्षक निर्दय असा तो नित्य पशुहत्या करीत असे व त्यांतच त्याला आनंद वाटत असे. शेवटीं तो म्हातारा झाला. ३. एकदां पवित्र कुशावती नदी पाहून तो आश्चर्यचकित झाला व भाद्रपद महिन्याच्या पौर्णिमेला चंद्रचूड मंदिराजवळ आला. ४. त्या दिवशीं सोमवार होता. पूजोत्सवाच्या निमित्तानें तेथें पुष्कळ लोक जमले होते. तें मोठें आश्चर्य पाहून तो दुष्ट सायंकाळपर्यंत तेथेंच राहिला. अत्यंत क्षुधेमुळें तो व्याकुळ झाला. यासाठीं दुर्गभेद करून तो गाभाऱ्यांत शिरला,

आगतो वै परिसरे दीपं प्रज्वाल्य वर्णकम् । शिवमुद्दिश्य बुभुजे क्षुधया परिबाधितः ॥ ७ ॥
कंठलग्नेन ग्रासेन मृतो वै मृत्युना तदा । स्मरन्कृतानि पापानि पश्चात्तापसमन्वितः ॥ ८ ॥
यमदूतास्तदा प्राप्ता नेतुं तं पापिनां वरम् । बद्ध्वा तु सुदृढैः पाशैः कशाघातैश्च ताडयन् ॥
तदानीमेव संप्राप्ताः सेवां शिवनियोजिताः । अम्बष्ठं नेतुकामास्ते रुद्राक्षांकितवक्षसः ॥ १० ॥
विमानवरसंयुक्ताः विनिन्युर्यमकिंकरान्[1] । अंबष्ठसूचिवांसस्ते तदा वातायनानुगाः ॥ ११ ॥
अस्य तीर्थस्य निकटे मृतो याति शिवालयम् । पापनाशनकं तीर्थं शिवसन्निधिमात्रतः ॥ १२
मृगान् हत्वा तु सततं निर्दयः पिशिताशनः । शिखरात्पूर्वदिग्भागे कुशवत्याश्च पश्चिमे ॥ १३ ॥
पापौघनाशनं लोके सेवितं यदि मानवैः । यदा कदा तु पूर्णा वै चेंदुवारेण संयुता ॥ १४ ॥
तदा[2]ऽघं संपरित्यज्य याति शीघ्रं परां गतिम् । इति श्रुत्वा वचस्तेषां सुबुद्ध्या यमकिंकराः ॥
ज्ञात्वा सुतीर्थमहिमा प्रस्तुवंतः पुरीं गताः । दिव्यं विमानमारुह्य गतोऽसौ शिवमन्दिरम् ॥
तदाप्रभृति तत्तीर्थमंबष्ठमिति विश्रुतम् । धर्मदं सर्वजंतूनां पापाद्रिकुलिशोपमम् ॥ १७ ॥
इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे चंद्रचूडमाहात्म्ये अंबष्ठतीर्थमहिमवर्णनं नाम चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

# अथ पंचमोऽध्यायः ।

## कापिलतीर्थम् ।

स्कन्द उवाच --

कापिलं परमं तीर्थं सेवितं परमर्षिणा । रजस्तमःस्वभावा ये ज्ञानलेशेन विस्मिताः ॥ १ ॥
ते यान्ति कापिलं भावं तस्मात्तत् कापिलं विदुः । कपिलो नाम वै पूर्वं राजा शत्रुपराजितः ॥
त्यक्त्वा सर्वं सहायान् वै निर्वेदं परमं गतः । अत्रागत्य महेशानमाराध्य परिचर्यया ॥ ३ ॥
तीर्थत्रिषवणस्नायी मिताहारो विमत्सरः । जगाम परमां सिद्धिं वरदानात्तु धूर्जटेः ॥ ४ ॥
जित्वा शत्रुगणान् सर्वान् स्वधर्मे दृढनिश्चयः । तीर्थस्य च प्रभावेन जातो धर्मपरायणः ॥५॥
तस्मादिदं कापिलनाम चास्य जातं सुराणामपि कामदं भुवि ।
जानन्ति लब्धा[3]धिवरा महेशाद्भवंति सर्वाशिषभाजनानि ॥ ६ ॥
ततोऽधिकतरं पुण्यं गौतमं गौतमस्य नु । शिखराद्दक्षिणे भागे परमं पावनं नृणाम् ॥ ७ ॥
गौतमो वै पुरा विप्रो युगचर्यां पुरास्थितः । तपसा भावितः शंभुः परिक्षीणकलेवरः ॥ ८ ॥
नित्यमायाति पूजार्थं व्योमकेशस्य वै ऋषिः । शतरुद्रीयसूक्तेन सद्योजातेन वै तथा ॥ ९ ॥
मृडं पशुपतिं देवं नत्वा याति स्वमालयम् । तस्य तं नियमं घोरं दृष्ट्वा देवो वृषध्वजः ॥ १०
आविरासीत्तु तत्तीर्थे गुहाद्वारेण वै मृडः । दृष्ट्वा देवं पशुपतिं वरदानाय चोद्यतम् ॥ ११ ॥

---

१ निर्बेदुर्यभकिंकार इति मु. गो. न. पा. । २ तद्योगेसोदयनादियात्यजतुपरांगतिमिति सी. क. का. न. चं. मु. पु. पा. । ३ लब्धाहिवरा ।

व दीप प्रज्वलित करून शंकराचें नाम घेऊन अधाशासारखा खाऊं लागला. तेव्हां एक घास त्याच्या घशांत अडकल्यामुळें तो कासावीस झाला व त्याला पूर्वपापें आठवूं लागलीं. शेवटीं पश्चात्ताप होऊन तो मरण पावला. ५–८. त्यास नेण्यासाठीं यमदूत आले व त्याला पाशबद्ध करून मारूं लागले. ९. त्याच वेळीं गळ्यांत रुद्राक्ष धारण केलेले शिवसेवक अंबष्ठास नेण्यासाठीं तेथें उपस्थित झाले, व त्यांनीं यमकिंकरांस शिक्षा केली. १०. विमानांत बसून जातांना ते अंबष्ठास म्हणाले, हें पापनाशन तीर्थ शिवालयाजवळ आहे. पशुघाती, निर्दय व सतत रक्तमांसभक्षक असा कोणी पुरुष ह्या पर्वताच्या पूर्वेला व कुशवतीच्या पश्चिमेला असलेल्या ह्या पापविनाशी तीर्थाचें सोमवारयुक्त पौर्णिमेच्या दिवशीं सेवन करील व येथेंच जर त्याला मृत्यु येईल, तर तो सर्व पापांतून मुक्त होतो व त्यास मुक्ति मिळते. हें त्यांचें वचन ऐकून व त्या तीर्थाचा महिमा जाणून तो त्या श्रेष्ठ विमानांत बसून शिवमंदिराकडे गेला. ११–१६.

तेव्हांपासून सर्व प्राण्यांच्या पर्वतप्राय पापांना वज्रतुल्य असलेलें हें पुण्यप्रद तीर्थ प्रसिद्ध झालें. १७.

## अध्याय ५ वा

## कपिलतीर्थ

स्कंद म्हणाला, कपिल महामुनीनें ह्या तीर्थाचें सेवन केलें होतें. जे रजोगुणी व तमोगुणी अज्ञ लोक ह्या तीर्थाचें सेवन करतात, ते कपिलरूप होतात, म्हणून ह्या तीर्थाला कपिलतीर्थ म्हणतात. पूर्वी कपिल नांवाचा एक राजा होता. शत्रूंनीं त्याचा पराजय केला. त्यामुळें अत्यंत दुःखी होऊन तो आपल्या सर्व मंडळींना सोडून येथें आला, व भक्तिपूर्वक शंकराची सेवा करूं लागला. १–३. त्रिकाल तीर्थांत स्नान करून अल्पोपहार केल्यामुळें तो मत्सरहीन झाला. पुढें शंकराच्या वरदानामुळें त्याला मोठी सिद्धि प्राप्त झाली. ४. स्वधर्माविषयीं श्रद्धा उत्पन्न होऊन त्या राजानें सर्व शत्रू जिंकले; व ह्या तीर्थाच्या योगानें तो अतिधार्मिक बनला. ५. देवांची सुद्धां इच्छा पूर्ण करणारें हें कपिलतीर्थ आहे, अशी त्या तीर्थाची ख्याति झाली. ह्यांत स्नान केल्यानें सर्व मानव आशीर्वादपात्र होऊन महेशापासून श्रेष्ठ वर मिळवितात. ६. ह्या पर्वताच्या दक्षिणेला मनुष्यांना पावन करणारें गौतमीतीर्थ आहे. हें तीर्थ कपिलतीर्थाहून अधिक पवित्र आहे. पूर्वी युगानुसार आचरण करणारा गौतम नांवाचा ऋषि होता. त्यानें शंकराला प्रसन्न करून घेण्यासाठीं तपश्चर्येनें आपलें शरीर अत्यंत क्षीण केलें. ७–८. तो ऋषि नित्य येऊन रुद्र सूक्तानें शंकराची पूजा करीत असे; व सद्योजात मंत्रानें नमस्कार करून आपल्या घरीं जात असे. त्याचें तें कठोर व्रत पाहून त्या तीर्थांतील गुहेच्या द्वारांतून वृषभध्वज देव त्याच्यासमोर प्रकटला. वर देण्यास उद्युक्त झालेल्या शंकराला पाहून गौतम ऋषीनें त्याची

अस्तौषीत् परया भक्त्या स्तवैः परमपावनैः । ततः प्रसन्नो भगवानुवाच ऋषिसत्तमम् ॥१२॥
वरं वृणुष्व भो विप्र सिद्धोऽसि तपसाऽचिरम् । श्रुत्वा स वचनं तस्य गौतमो लोकविश्रुतः ॥
उवाच वचनं धीरो स्वकर्मफलहेतुकम् । मन्नाम्नाऽऽख्याहि तं मायाकामरूपं नृणां कुरु ॥१४॥
तथेति च शिवेनोक्तो ऋषिर्योगपरायणः । अवाप परमां सिद्धिं सर्वयोगोपबृंहिताम् ॥ १५ ॥
तदाप्रभृति तत्तीर्थं तन्नाम्नाऽऽख्यातिमागतम् । सर्वपापहरं नृणां कामदं मोक्षसाधनम् ॥ १६
न जानंति जना मूढा मोहिता देवमायया ।
अनेकसिद्धिमापन्नाः सुखेन भुवि मानवाः । ज्ञात्वा तीर्थवरं लोके मूढानां गतिदायकम् ॥१७॥
इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे तीर्थमहिमवर्णनं नाम पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥

# अथ षष्ठोऽध्यायः ।

## सौभतीर्थम् ।

स्कन्द उवाच –
यत्रासीद्भवतः पूर्वमाराध्य जगतां पतिम् । गुहाश्रितो महादैत्यः पापकर्मरतः सदा ॥ १ ॥
स्नानं कृत्वा त्रिवारं वै गुहाविष्टो महामतिः । जजाप परमं जाप्यं धृत्वा निरशनं व्रतम् ॥२॥
मृत्युंजयं समाराध्य लेभे वरमनुत्तमम् । विमानं कामदं दिव्यं देवैरपि दुरासदम् ॥ ३ ॥
तदाप्रभृति तत्तीर्थं सौभनाम्ना प्रथां गतम् । तीर्थप्रस्रवणं पुण्यं सर्वयज्ञफलप्रदम् ॥ ४ ॥
षड्वारवेदाध्ययनाद्यत्फलं प्राप्यते नरैः । तत्फलं समवाप्नोति तीर्थे स्नात्वा ह्यनुत्तमे ॥ ५ ॥
क्षयार्तोऽधिपतिः पूर्वं तपस्तेपे समाहितः । आग्नेय्यां गिरिराजस्य दिशि सोमोदके शुभे ॥६॥
तीर्थस्यास्य प्रभावस्तु चोक्तो वै राजलक्षणः । तदाप्रभृति तत्तीर्थं ख्यातं चंद्रोदयं भुवि ॥ ७
रोगिणः परिमुच्यंते तीर्थोदकनिषेवणात् । गिरेश्चोत्तरदिग्भागे तीर्थं कामप्रपूरणम् ॥ ८ ॥
भाति सौभाग्यतिलकं पार्वत्या वरदानतः । ऋषिकन्या पुरा चैका समाराध्य [1]शिवामिमाम् ॥
पार्वत्यनुग्रहात्सद्यः सख्यं प्राप्तं तया सह । मन्दिरे पर्वतवरे दिव्यभोगपराऽभवत् ॥ १० ॥
पुरा ह्यप्सरसां श्रेष्ठा शर्मिष्ठा नाम सुंदरी । रूपौदार्यगुणाढ्या सा लास्यहास्यवती शुभा ॥११॥
शालां प्रविश्य यज्वनः कामयंती न चापरम् । तदा तदप्स[2]रोरूपं दृष्ट्वा संमोहिता द्विजाः ॥१२॥
अवगम्य द्विजगणा नौर्वं च महर्षिं तथा । तदौर्व[3]स्तपसां राशिर्दृष्ट्वा स्वस्यावहेलनम् ॥ १३ ॥
शशाप परमक्रुद्धः शर्मिष्ठां देवसम्मताम् । कुलटे निर्घृणे हंजे कस्माद्दूषितवत्यपि ॥ १४ ॥
आश्रमं मे मुनिवरैर्ऋषिपुत्रैरलंकृतं । अतोऽपसर्प दुःशीले तपःक्षयकरे परे ॥ १५ ॥
मर्त्यलोके तनुं प्राप्य निंद्यं वपुरवाप्नुहि । शापं श्रुत्वा ऋषेः सद्यो न्यपतत्तु धरातले ॥ १६ ॥
दैवयोगेन वै प्राप्ता तीर्थं कामप्रपूरणम् । निंद्यं वपुः समासाद्य चिरं रोगेण चित्रिता ॥ १७ ॥

---

१ शिवां रमौ । २ अप्सरं रूपं । ३ तदौर्वा ।

भक्तिपूर्वक मोठी स्तुति केली. त्यामुळें प्रसन्न झालेले भगवान् शंकर त्या ऋषिश्रेष्ठाला म्हणाले, हे ब्राह्मणा, वर माग. तूं तपानें लवकरच्च सिद्धि मिळविली आहेस. त्याचें तें वचन ऐकून लोकप्रसिद्ध व धैर्यवान् गौतम आपल्या कर्माचें फळ मिळावें ह्या हेतूनें म्हणाला, सर्वांची इच्छा पूर्ण करणारें हें तीर्थ माझ्या नांवानें प्रसिद्ध होईल, असें करा. ९ – १४.

शंकरानें 'तथास्तु' म्हटल्यावर गौतमऋषीला सर्वश्रेष्ठ सिद्धि प्राप्त झाली. तेव्हांपासून तें तीर्थ त्याच्याच नांवानें प्रसिद्ध झालें. हें तीर्थ मनुष्याचें सर्व पाप दूर करणारें, इच्छा पूर्ण करणारें व मोक्षसाधन आहे, हें देवमायेमुळें मूर्ख लोकांना समजत नाहीं. पण ज्यांना ह्या तीर्थाची महती समजली, त्यांना अनेक सिद्धि सहज प्राप्त झाल्या. जगांत मूर्खांना सुद्धां सद्गति देणारें हें तीर्थ आहे. १५ – १७.

## अध्याय ६ वा

## सौभतीर्थ

स्कंद म्हणाला, तुमच्याही अगोदर एक महादैत्य गुहेंत जगत्पति देवाची आराधना करीत असे. १. तो महामति दैत्य रोज त्रिवार स्नान करून गुहेंत बसत असे व उत्तम रीतीनें जप करीत असे. व्रतस्थ असतांना तो कांहींही खात नसे. याप्रमाणें मृत्युंजयाची आराधना केल्यावर त्याला श्रेष्ठ वर व देवदुर्लभ इच्छागामी विमान मिळालें. २–३. सर्व यज्ञाचें फळ देणारें पवित्र व उत्तम झरे असलेलें तें तीर्थ सौभ या नांवानें प्रसिद्ध झालें. सहा वेळां वेदाध्ययन केल्यानें जें फळ मनुष्यांना मिळतें, तेंच फळ ह्या तीर्थांत एकदांच स्नान केल्यानें प्राप्त होतें. ४–५. पूर्वी एकदां गिरिराजाच्या आग्नेय दिशेला एका क्षयरोगी राजानें एकाग्र चित्तानें चंद्रतुल्य पाण्यामध्यें स्नान करून तप केलें; तो बरा झाला व त्यानें त्या तीर्थाचा प्रभाव सांगितला. तेव्हांपासून तें तीर्थ चंद्रोदय या नांवानें प्रसिद्ध झालें. ६–७. ह्या तीर्थस्नानानें रोगी रोगमुक्त होतो. ह्या पर्वताच्या उत्तर दिशेला इच्छा पूर्ण करणारें हें तीर्थ असून पार्वतीच्या वरदानामुळें सौभाग्य-तिलकाप्रमाणें शोभतें. पूर्वी एका ऋषीकन्येनें पार्वतीची आराधना केली; पार्वतीच्या अनुग्रहामुळें तत्काळ तिला पार्वतीशीं सख्यत्व लाभलें व श्रेष्ठ पर्वतावरील मंदिरांत तिला दिव्य भोग मिळाले. ८–१०. पूर्वी अप्सरांमध्यें श्रेष्ठ अशी शर्मिष्ठा नांवाची एक सुंदर अप्सरा होती. रूप, गुणांनीं संपन्न अशी ती नृत्य करणारी व हसतमुख होती. ती यजमानांच्या आश्रमांत जात असे. दुसऱ्या कोणाविषयीं तिला आकर्षण नव्हतें, पण ब्राह्मण मात्र तिचें रूप पाहून मोहित झाले. ती शर्मिष्ठा सर्व ब्राह्मणांचा व और्व ऋषीचा अपमान करीत आहे, असें जाणून तो ऋषि अत्यंत क्रुद्ध झाला व त्यानें देवमान्य शर्मिष्ठेला शाप दिला. हे निर्दय कुलटे, मुनिवर व ऋषिपुत्रांनीं सुशोभित अशा ह्या आश्रमाला तूं कां बरें दूषित केलें आहेस? हे दुराचारी, तपक्षयकारिणी स्त्रिये, तूं येथून दूर हो. मृत्युलोकांत तुला निंद्य शरीर प्राप्त होईल. ऋषिशाप ऐकतांच ती मृत्युलोकांत दैवयोगानें इच्छा पूर्ण करणाऱ्या या तीर्थावर जन्मास आली. रोगामुळें तिचें शरीर विद्रूप दिसत होतें. ११ – १७.

स्नानं करोति दुर्गन्धिक्षालनाय दिनोदये। एवं दशाब्दपर्यंतं स्थिता कन्दफलाशना ॥ १८ ॥
तीर्थोदकप्रभावेन जाता दिव्यस्वरूपिणी। तस्मिन्तीर्थे वसन्सिद्धो दृष्टः सोऽप्सरसा तदा ॥१९॥
ईदानीं देवतां प्रार्थ्य तनुः कस्मात्समाश्रिता।
अप्सरा उवाच –
औत्र्सा येन संप्राप्ता तनुर्निन्द्या महामुने ॥ २० ॥
शर्मिष्ठानामाप्सराऽहं देवलोकनिवासिनी। सौष्ठवस्य निदानं वै न जाने दैन्यमाश्रिता ॥ २१ ॥
शर्मिष्ठावचनं श्रुत्वा योगी ध्यानेन चाखिलम्। कारणं सौष्ठवस्यापि ज्ञात्वा विस्मितमानसः ॥
न्यवेदयत्तु सर्वेभ्यो तीर्थस्य महत्त्वं शुभम्। एतस्मिन्नन्तरे तत्र विमानं कामगं शुभम् ॥ २३ ॥
ह्यागतं देवलोकाद्वै नेतुं तामप्सरां शुभाम्। सिद्धेन सा ह्यनुज्ञाता याता स्वर्गमनुत्तमम् ॥२४॥
तदाप्रभृति तत्तीर्थं तन्नाम्ना ख्यातिमागतम्।

इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सनत्कुमारसंहितायां सह्याद्रिखण्डे तीर्थमहिमानं नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

# अथ सप्तमोऽध्यायः।

## सिद्धधारातीर्थम्।

स्कन्द उवाच –
अद्रिजानि सुतीर्थानि सन्त्यन्यानि द्विजोत्तमाः। तेषु च प्रवरं तीर्थं मूलगंगाभिधं महत् ॥ १ ॥
ईशान्यां चन्द्रचूडात्तु लोकोपकरणोद्यतम्। निर्गतं हि जटाशंभोर्देवैः सर्वैस्तु सेवितम् ॥ २ ॥
यत्र देवगणाः सर्वे ऋषयः शंसितव्रताः। अरुणोदयवेलायां स्नानं कुर्वन्ति नित्यशः ॥ ३ ॥
सर्वान्कामानवाप्नोति लोकोऽयं नात्र संशयः। रुजार्दिता नराः सर्वे पापोपहतवर्ष्मणः ॥ ४ ॥
मासमेकं तु तत्स्नानान्मुच्यंते रोगसंचयैः। वन्ध्यास्त्रिषवणस्नायी त्रिरात्रनियतो व्रती ॥ ५ ॥
वीरसूर्जायते साध्वी सतीनां तु वरा परा। दरिद्रो धनमाप्नोति विद्यां वै ब्राह्मणो लभेत् ॥ ६ ॥
क्षत्रियो राज्यमाप्नोति राजा साम्राज्यमाप्नुयात्। पुरा शकुन्तला साध्वी स्नाता सा सोभवे स्थिता ॥ ७ ॥
सुतं शाकुन्तलं नाम सुषुवे चक्रवर्तिनम्। लेभे चापि महाकामान् स्थलस्थाश्च जलौकसः ॥ ८ ॥
खगा मृगादिका यांति सिद्धपीठनिवासिनः। किं पुनर्मानवाः सर्वे गच्छन्ति शिवसन्निधिम् ॥९॥
मूलगंगाम्भसि स्नात्वा नत्वा देवगणान् नरः। चन्द्रचूडं सकृद् दृष्ट्वा शिवेन सह मोदते ॥१०॥
मासक्षणयुतः पूर्णालब्धकामश्च मानवः। स्नात्वा यत्नात् सिद्धपीठे यतवाग्यतमानसः ॥ ११ ॥
समभ्यर्च्य मृडानीशं वाञ्छितं लभते पदम्। वाञ्छन्ति पितरो लोके मूलगंगोदकं शुभम् ॥
तिलमिश्रेण तोयेन तर्पयित्वा प्रयत्नतः। संतुष्टाः पितरस्तेन सायुज्यां गतिमाप्नुयुः ॥ १३ ॥
शिवनिकेतनदर्शनलालसाः सकलकल्मषबीजनिवाहकाः।
अभिविशन्ति हि सिद्धपरं पदं सकलसम्पदयुतं सदैव हि ॥ १४ ॥

दुर्गंधीचा पूर्ण नाश व्हावा यासाठीं ती तीर्थस्नान करीत असे. याप्रमाणें कंदमूळ खाऊन ती दहा वर्षे राहिली व तीर्थप्रभावानें दिव्यस्वरूप बनली. तेथें एक सिद्ध रहात होता. त्यानें त्या अप्सरेस प्रश्न केला, तुला हें दिव्य रूप कसें प्राप्त झालें? अप्सरा म्हणाली, हे सिद्धपुरुषा, और्वऋषीच्या शापानें निंद्य बनलेलें माझें शरीर दिव्यरूप कसें झालें हें मला माहीत नाहीं. मी देवलोकांतील शर्मिष्ठा अप्सरा आहें. शर्मिष्ठेचें वचन ऐकून सिद्धाला ध्यानाच्या योगानें तिच्या सौष्ठवाचें कारण समजलें व फार आश्चर्य वाटलें. त्यानें तिला तीर्थमहिमा सांगितला. इतक्यांत अप्सरेला नेण्यासाठीं देवलोकांतून इच्छागामी सुंदर विमान आलें. तिनें सिद्धाचा निरोप घेतला व विमानांत बसून ती श्रेष्ठ स्वर्गांत गेली. तेव्हांपासून तें तीर्थ शर्मिष्ठा नांवानें प्रसिद्ध झालें. १८-२४.

# अध्याय ७ वा

## सिद्धधारा तीर्थाचें माहात्म्य

स्कंद म्हणाला, ब्राह्मणश्रेष्ठहो, पर्वतावर आणखी पुष्कळ तीर्थे आहेत. त्यांमध्यें मूलगंगा नांवाचें मोठें श्रेष्ठ तीर्थ आहे. तें चंद्रचूडाच्या ईशान्येला असून लोकोपकारी जटाशंभूपासून निर्माण झालें. त्या तीर्थावर सर्व देव राहातात. तसेंच सर्व देव, व्रतस्थ ऋषि नेहमीं अरुणोदयीं त्या तीर्थांत स्नान करतात. १-३. ह्यांत स्नान करणाऱ्यांच्या सर्व इच्छा सफल होतात. रोगानें गांजलेले व महापापी लोक ह्यांत एक महिना स्नान केल्यास सर्व रोगांतून मुक्त होतात. तीन रात्री व्रतस्थ राहून यांत त्रिकाल स्नान करणारा पुरुष वन्दनीय होतो. ४-५.

पतिव्रता श्रेष्ठ स्त्रीला वीर पुत्र होतो, दरिद्याला धन मिळतें. ब्राह्मणास विद्या प्राप्त होते, क्षत्रियाला राज्य मिळतें. राजाला साम्राज्य लाभतें. पूर्वी सोमतीर्थांत स्नान केल्यानें शकुंतलेला चक्रवर्ती पुत्र झाला. तिच्या सर्व इच्छाही पूर्ण झाल्या. सिद्धपीठनिवासी मृगादि स्थलचर, जलचर व खेचर ह्या सर्वांना शिवसांनिध्य प्राप्त होतें; मग मानवाविषयीं काय सांगावें! ६-९.

मूलगंगेंत स्नान करून व देवगणांना नमस्कार करून एक वेळ चंद्रचूडदर्शन घेतल्यानें मनुष्यास शंकराचें सांनिध्य लाभतें. १०. वाणी व मन यांचें नियमन करून महिन्यांतून एक क्षणभर सिद्धपीठांत स्नान केल्यास मनुष्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात. पार्वतीपतीचें पूजन केल्यास इच्छित पदाची प्राप्ति होते. सर्व पितर शुभ अशा मूल गंगोदकाची आशा करतात. ११-१२.

हिच्या तिलमिश्र पाण्यानें तर्पण केल्यास पितर संतुष्ट होतात व त्यांना सायुज्य गति प्राप्त होते. १३. त्यांच्या सर्व पापांचा नाश होतो. शिवस्थानाचें दर्शन व्हावें अशी त्यांना इच्छा उत्पन्न होऊन ते सर्व पितर सिद्धपदीं जातात. तेथें सर्व संपत्ती असतात. १४.

सर्वतीर्थवरा गंगा पापनाशाय निर्मिता । प्रदक्षिणीकृत्य [1]गिरिं तीर्थे संगत्य सर्वतः ॥ १५ ॥
पापौघनाशनार्थाय ईशान्ये परिकल्पिता । सिद्धधारेति वै ख्याता याता सा लवणोदधिम् ॥
सिद्धधाराजलं पीत्वा वीरो भवति मानवः ।
इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सनत्कुमारसंहितायां सह्याद्रिखण्डे चन्द्रचूडाख्याने तीर्थमहिमा नाम सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

# अथ अष्टमोऽध्यायः ।

## पर्वतोपाख्यानम् ।

स्कन्द उवाच –

पश्चिमे मालती नाम नदी तापससेविता । कर्मनिष्ठैर्द्विजवैररग्निहोत्रपरायणैः ॥ १ ॥
श्रेयस्कामैस्तथा चान्यैर्नियमव्रतधारिभिः । तस्यास्तीर्थं [2]विलभ्यते मन्दाकिन्याः सुरैर्यथा ॥ २ ॥
मालतीजलसंलीनमस्तका भास्करा इव । शोभमाना विजृंभंते सर्वे विगतमत्सराः ॥ ३ ॥
यस्यां नाम नरा नित्यं स्नानं कृत्वा तु धूर्जटिम् । अवलोक्य पदं यांति योगिनां च दुरासदम् ॥
इदं तीर्थवरं लोके शिवेन परिनिर्मितम् । पावनं सर्वलोकानां पापौघैर्दूषितात्मनाम् ॥ ५ ॥

ऋषय ऊचुः –

चन्द्रचूडं सकृद् दृष्ट्वा नत्वा भावेन दूरतः । मुच्यते क्षुद्रपापेभ्यो नरो नास्त्यत्र संशयः ॥ ६ ॥
नरः प्रदक्षिणां कृत्वा शिवमद्रिस्वरूपिणम् । मुच्यते दुरितैः सर्वैर्मानवो भुवि सर्वदा ॥ ७ ॥
कुशावत्यां कृतस्नातो नरो नियतवाक् शुचिः । अगस्त्यशिवपूजां च देवदेवं वृषध्वजम् ॥ ८ ॥
वाजिमेधसहस्रस्य गतिं याति न संशयः । पंचक्रोशात्मकं लिंगं चन्द्रचूडाभिधं महत् ॥ ९ ॥
न जानाति नरो मर्त्ये भागधेयवशं गतः । सकृत्प्रदक्षिणां कृत्वा नरो याति शिवालयम् ॥ १० ॥
क्षेत्रवासी नरो लोके रुद्र एव न संशयः । संन्यस्य सर्वकर्माणि क्षेत्रवासपरायणः ॥ ११ ॥
नरो न निरयं याति वसनात्पर्वतोत्तमे । नित्यं स्नात्वा सिद्धपीठे दृष्ट्वा वै पार्वतीपतिम् ॥
दैहिकैर्न स युज्येत नरो गच्छेत्परां गतिम् । इमां श्रुत्वा सुमहतीं कथां दिव्यां पुरातनीम् ॥ १३
चक्रुर्वै मुनयो वासं पर्वतस्य समन्ततः । इतीदं शृणुयान्नित्यं पुराख्यानमनुत्तमम् ॥ १४ ॥
लभते वाञ्छितां सिद्धिं पुत्रपौत्रादिकं नरः । अंते शिवपदं याति चन्द्रचूडप्रसादतः ॥ १५ ॥
इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सनत्कुमारसंहितायां सह्याद्रिखंडे चन्द्रचूडमाहात्म्ये पर्वतोपाख्यानं नाम अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥

---

१ गिरेस्तीर्थे । २ विलभते ।

तीर्थश्रेष्ठ अशी ही गंगा पापनाशासाठींच निर्माण झाली आहे. पर्वताला प्रदक्षिणा करून गंगातीर्थावर यावें. ही पापनाशिनी सिद्धधारा तीर्थ या नांवानें प्रसिद्ध असून ती पर्वताच्या ईशान्य दिशेला समुद्राला मिळाली आहे. सिद्धधारेचें जलप्राशन केल्यानें मनुष्य वीर बनतो.

# अध्याय ८ वा

## पर्वताचें उपाख्यान

स्कंद म्हणाला, ह्याच पर्वताच्या पश्चिमेला मालती नांवाची नदी आहे. तपस्वी लोक तिचें सेवन करतात. गंगानदीचें सेवन करावें त्याप्रमाणें कर्मनिष्ठ, अग्निहोत्री व श्रेयस्कर असे व्रतस्थ ब्राह्मण ह्या नदीतीर्थाचें सेवन करतात. १–२. मालती नदींत स्नान केल्यानें सर्व ब्राह्मण मत्सरहीन होऊन सूर्याप्रमाणें तेजस्वी होतात. ३. या नदींत सदैव स्नान करून धूर्जटीचें दर्शन घ्यावें. त्यामुळें मनुष्यास योगिदुर्लभ स्थान प्राप्त होतें. ४. अनेक पापांनीं दूषित झालेल्या सर्व लोकांना पवित्र करण्यासाठींच शंकरानें हें तीर्थ जगांत निर्माण केलें आहे. ५. ऋषि म्हणाले, दूर अंतरावरूनसुद्धां एकदांच चंद्रचूडदर्शन घेऊन त्यास नमस्कार केल्यास मनुष्य सर्व क्षुद्र पापांतून मुक्त होतो, यांत संशय नाहीं. ६. या पर्वतरूपी शंकरास प्रदक्षिणा केल्यास मनुष्य पृथ्वीवरील सर्व पापांतून मुक्त होतो. ७. जो मौन धारण करून कुशवतींत स्नान करील व पवित्र होऊन अगस्त्यरूपी शिवाची व वृषभध्वज देवेश्वराची पूजा करील त्याला सहस्र अश्वमेध यज्ञ केल्याचें श्रेय निश्चित मिळेल. ८–९. पण मृत्युलोकांत दैवाधीन असलेल्या मानवास पंचक्रोश परिमाण असलेल्या ह्या चंद्रचूड महालिंगाची माहिती नाहीं. ह्या क्षेत्रांतील मानव पर्वतरूपी महालिंगाला प्रदक्षिणा करून केवळ एकदांच देवालयास प्रदक्षिणा करील, तर तो निश्चित रुद्ररूप होईल. या क्षेत्रांत सतत राहून सर्व कर्मांचा त्याग केलेल्या मनुष्यास नरकवास भोगावा लागत नाहीं. ह्या पर्वतोत्तमावर राहून गंगेंत स्नान केल्यास मनुष्याला श्रेष्ठ गति लाभते. त्याला शारीरिक कर्माचें फळ भोगावें लागत नाहीं. ही प्राचीन दिव्य कथा ऐकून सर्व ऋषि ह्या पर्वताच्या सभोंवार राहूं लागले. हें सर्वश्रेष्ठ आख्यान जो नेहमीं श्रवण करील, त्याला पुत्रपौत्रादि प्राप्त होऊन अंतीं तो चंद्रचूडकृपेनें शिवपदीं जाईल. १०–१५.

## ॥ ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥

# अथ नागाव्हयमाहात्म्यं प्रारभ्यते ।

## प्रथमोऽध्यायः ।

### नागभयदूरीकरणम् ।

शौनक उवाच –

सूत सर्वज्ञ शास्त्रज्ञ ज्ञानार्णवमहोदय । नागाव्हयपुराख्यानं वद कारुण्यसागर ॥ १ ॥
कथं नागाव्हयं नाम प्राप्तं क्षेत्रस्य वै मुने । समासाद्वद तत्सर्वं चास्माकं करुणाकर ॥ २ ॥

सूत उवाच –

शृणुध्वमृषयः सर्वे नागाव्हयकथानकम् । आसीद् भार्गवमेदिन्यां पुरी नागाव्हयी शुभा ॥ ३
अनेकवसुसंयुक्ता जनैः सर्वैः समन्विता । अघाशीनामनद्याश्च सागरस्य समीपतः ॥ ४ ॥
यंत्र तिष्ठति देवेशः शंकरो लोकशंकरः । पार्वत्या सह देवेशः सर्पनागसमन्वितः ॥ ५ ॥
नागानामभयं दत्वा तेषां प्रीत्या च संस्थितः ।

शौनक उवाच –

नागानां किं भयं चासीत् कथं च तन्निवारितम् ॥ ६ ॥
एतत् सर्वं समाचक्ष्व क्षेत्रमाहात्म्यमेव च ।

सूत उवाच –

पुरा नागास्तपस्तेपुः पुरे नागाव्हये मुने ॥ ७ ॥
सह्याद्रेः पश्चिमे देशे जामदग्न्येन निर्मिते । अनेकद्विजसंघातैर्वेदघोषैश्च घोषिते ॥ ८ ॥
अग्निहोत्रादिनिरतैश्चतुराश्रमिभिर्वृते । स्वधर्मनिरते देशे नाम कोंकणसंज्ञिते ॥ ९ ॥
तपतां तत्र नागानां दिव्यवर्षशतं गतम् । ततः प्रसन्नो भगवान् रामो भार्गवपूजितः ॥ १० ॥
क्षत्रियांतकरः शूरो भजता कामधेनुकाम् । व्रीयतां वर इत्युक्ते रामेण फणिनां गणः ॥ ११ ॥
उवाच भार्गवं रामं प्रणिपत्य द्विजोत्तम । वैनतेयभयं ब्रह्मन्निवारय जगत्प्रभो ॥ १२ ॥
इति नागवचः श्रुत्वा जगाद ह्यभयं तदा । भवतां भयनाशाय क्षेत्रस्य रक्षणाय च ॥ १३ ॥
आनयामि शिवं देवं पार्वत्या सह शंकरम् । इत्युदीर्य नागगणांस्ततश्चान्तरधीयत ॥ १४ ॥
कैलासमगमद्धीमान् रामो भार्गवपुंगवः । ददर्श तत्र देवेशमुमया सह त्र्यंबकम् ॥ १५ ॥
योगसिद्धासने दिव्ये संस्थितं ज्ञानमुद्रया । नारदादिमुनींद्रैश्च सिद्धैः सह विभूषितम् ॥१६॥

१ त्रय । २ श्रुणुउत्तमेति चं. को. पु. पा. । ३ नारदादिमुनिभिश्चेति चं. गो. को. पु. पा. ।

# अध्याय १ ला

## नागांनां अभयदान

शौनक म्हणाले, हे सूता, तूं सर्वशास्त्रज्ञ आहेस. तूं ज्ञानाचा व दयेचा सागर आहेस. मला नागाव्हय नगराचें आख्यान सांग. १. हे करुणाकरा, त्या नगराला क्षेत्राचें माहात्म्य कसें प्राप्त झालें, हें थोडक्यांत सांग. २. सूत म्हणाले, ऋषींनो, नागाव्हय* कथानक ऐका. या भार्गवभूमीवर अघाशी नगरी व समुद्र यांच्याजवळ एक सुंदर नागाव्हय नगरी होती. त्या धनसंपन्न नगरींत पुष्कळ लोक रहात असत. तेथें लोककल्याणकर्ता, नागभूषण शंकर पार्वतीसह नागांना अभयदान देऊन प्रेमानें रहात असे. शौनक म्हणाले, नागांना कशाचें भय होतें व तें त्यानें कसें दूर केलें हें सर्व क्षेत्रमाहात्म्य मला सांग.

सूत म्हणाले, हे मुने, पूर्वी ह्या नगरांत नागांनीं तपश्चर्या केली. ही परशुराम–निर्मित नगरी सह्याद्रीच्या पश्चिम दिशेला असून, तेथें असंख्य ब्राह्मणांचा वेदघोष चालत असे. ३–८. अग्निहोत्री व चारही आश्रमांतील ब्राह्मण तेथें वास करीत असत. स्वधर्मरत अशा या देशाचें नांव कोंकण होय. ९ येथें नागांनीं शंभर वर्षें दिव्य तप केल्यावर क्षत्रियांतक शूर भार्गवराम प्रसन्न झाला. कामधेनुभक्त रामानें ‘ वर माग ’ असें म्हणतांच भार्गवरामांना प्रणाम करून सर्प म्हणाले, हे द्विजोत्तमा, जगत्प्रभो ब्रह्मन् , गरुडापासून आमचें रक्षण करा. १०–१२. नागांची ही प्रार्थना ऐकून राम ‘ अभय असो ’ म्हणाला, व तुमच्या रक्षणासाठीं पार्वतीसह शंकरासच येथें आणतों असें नागांना सांगून राम तेथेंच अंतर्धान पावला. १३–१४. भार्गवश्रेष्ठ श्रीमान् परशुरामानें कैलासास जाऊन उमापति शंकराचें दर्शन घेतलें. १५. तेथें शंकर योग–सिंहासन घालून व ध्यानमुद्रा धारण करून बसले होते. १६.

---

* सध्याचें नागवें

दृष्ट्वा प्रोवाच तं ब्रह्मन् तारकाद्यसुरान्तकम् । शिवोऽपि भार्गवं रामं ददर्शामिततेजसम् ॥१७॥
आसनात्सहसोत्थाय कृतो वै प्राञ्जलिः स्थितः । प्रत्युद्ययौ प्रहर्षेण रामपादाभिवंदनम् ॥ १८॥
आसनं च ततो दत्त्वा पूजयामास भक्तितः । शिवस्तं प्राह भगवान् सादरं मुनिपुंगवम् ॥१९॥
किमागमनकार्यं ते कथ्यतां करवाण्यलम् । इत्युदीरितमाकर्ण्य रामः शंकरमब्रवीत् ॥ २० ॥
राम उवाच –
शिव शंकर लोकेश नीलकंठ महाबल । एहि मत्क्षेत्ररक्षार्थं तत्रैव वसतिं कुरु ॥ २१ ॥
अघाशीनामनद्याश्च तीरे सह गणोत्तमैः । नागानां वसतिर्यत्र मया पूर्वं हि कल्पिता ॥ २२ ॥
तेन नागाव्हयं नाम ग्रामः परमशोभनः । इति रामवचः श्रुत्वा शंकरो लोकशंकरः ॥ २३ ॥
करिष्येऽहं तथैवोक्तं रामो दिशतु सादरम् । ययौ क्षेत्रं महापुण्यं गोमन्तादक्षिणे स्थितम् ॥
यत्र नागास्तपस्तेपुस्तत्र गत्वा सहोमया । नागानामन्तिके स्थित्वा तानुवाच महाप्रभुः ॥२५
शंकर उवाच –
नागाः शृणुत मे वाक्यं भवतां च शुभावहम् । वरं वृणुत भद्रं वो रामेण प्रेषितोऽस्म्यहम् ॥
इति तद्वचनं श्रुत्वा नागा हर्षसमन्विताः । प्रफुल्लनयनाः सर्वे प्रोचुः प्रांजलयस्तदा ॥ २७ ॥
नागा ऊचुः –
भगवन् देवदेवेश वैनतेयभयार्दिताः । त्वामद्य शरणं याता रामसंस्थापिता वयम् ॥ २८ ॥
अन्तर्भूमिस्थिता नित्यं रामसंस्मरणाद्विभो ।
सूत उवाच –
एतस्मिन्नन्तरे ब्रह्मन् वैनतेयो भयंकरः ॥ २९ ॥
बुभुक्षितश्च तान्नागान् भोक्तुमाविशद् भृशम् । वैनतेयभयान्नागाः शंभुं शरणमाययुः ॥३०॥
शिवस्यांगे स्थिताः सर्वे भूषणैस्तनुभूषिताः । अथाऽऽह भगवान् रुद्रो गरुडं शंसितव्रतम् ॥
मम देहगतान्नागान् त्वं न भक्षितुमर्हसि । इति शम्भोर्वचः श्रुत्वा ययौ रामकृतिं स्मरन् ॥
रामक्षेत्रं विहायाथ वैनतेयः स्थलान्तरम् । ततःप्रभृति लोकेषु स रुद्रो नागभूषणः ॥ ३३ ॥
बभूव लोकविख्यातः सर्वलोकेषु पूजितः । तदा सर्वे जनपदा ब्राह्मणाद्याः सहस्रशः ॥ ३४ ॥
तत्रागत्य शिवं प्रोचुर्दण्डवत् पतिता भुवि । नीलकंठं महादेवं नागभूषणभूषितम् ॥ ३५ ॥
नमो नमस्ते देवेश सर्वलोकभयापह । इति प्रार्थितमाकर्ण्य भक्तानामभयंकरः ॥ ३६ ॥
प्रसन्नः सुमुखो भूत्वा प्राह नागाव्हयान् द्विजान् । इदं क्षेत्रं महापुण्यं सर्वसंपद्विधायकम् ॥
नागाव्हयं श्रियोपेतं स्थितोऽस्मिन् रामनिर्मिते । इयं भगवती देवी भवतां च वरप्रदा ॥३८॥
नागोपहारबलिना पूजिता सुखदायिनी । स्थिता परमकल्याणी पूजयध्वमतन्द्रिताः ॥ ३९ ॥

---

१ ददर्शसूर्यदीप्तिमान इति च. को. गो. सि. मु. चि. पा. । २ समिद्भिसहोमया इति को. सि. न. उ. क. चि. पु. पा. । ३ कृत्वासनें सनिश्चयेति मु. च. को. पु. पा. । ४ शमादिश्यतु सादरमिति को. न. पु. पा. । ५ ततोतेवेण्यास्तेनागा इति चं. को. न. मु. पु. पा. । ६ संस्थितापुरा इति चं. न. पु. पा. । ७ स्थितोस्मिरामनिर्मिताः रामनिर्मिते रामसुन इति न. को. ख. ड. च. चि. पु. पा. ।

तारकासुरादिकांचा अंतक अशा शंकराला पाहून भार्गव कांहीं बोलणार तोंच अद्वितीय तेजस्वी भार्गवरामाला पाहून शंकर लगेच आसनावरून उठले व त्यांनीं त्याचें स्वागत केलें. भार्गवाला आसनावर बसवून त्यांनीं भक्तिपूर्वक त्याचा सत्कार केला. शेवटीं शिवानें श्रेष्ठ मुनीला आदरानें विचारलें, १७-१९. आपल्या आगमनाचें कारण काय ? मी आपल्यासाठीं काय करूं ? हें ऐकून राम शंकराला म्हणाला —

हे महाबल नीलकंठ जगदीश शंकरा, माझ्या क्षेत्ररक्षणासाठीं या व तेथेंच अघाशी नदीच्या किनाऱ्यावर आपण आपल्या श्रेष्ठ गणांसह रहा. मी तेथें अगोदरच नागांची वस्ती केल्यामुळें त्या क्षेत्राला नागाव्हय म्हणतात. गांव फार सुंदर आहे. हें रामाचें भाषण ऐकून लोककल्याणकारी शंकर म्हणाला, मी तुमच्या सांगण्याप्रमाणें करतों. याप्रमाणें बोलून जेथें नागांनीं तप केलें होतें त्या गोमंतकाच्या दक्षिणेकडील पवित्र क्षेत्रांत प्रभु शंकर गेले व नागांना उद्देशून म्हणाले, नागांनो, तुमच्या कल्याणासाठीं भार्गवरामानें मला पाठविलें आहे. तुम्ही इच्छित वर मागा. २०–२६.

शंकराचें हें भाषण ऐकून आनंदित झालेले नाग हात जोडून म्हणाले, हे भगवन्, आम्ही वैनतेयाच्या भीतीनें फार व्याकुळ झालों आहों. रामानेंच आम्हांला येथें आणून ठेविलें आहे. म्हणून आम्ही त्याचें स्मरण करतों. हे प्रभो, आम्ही तुम्हाला शरण आलों आहों. आम्ही पृथ्वीमध्यें राहात आहों.

सूत म्हणाला, इतक्यांत भयंकर वैनतेय बुभुक्षित होऊन नागभक्षणासाठीं तेथें आला. लगेच सर्व नाग त्याला घाबरून शंकराला शरण गेले. २७–३०. नागांनीं शिवशरीराचा आश्रय घेतला. सर्व नाग शिवभूषण बनले. नागभूषण भगवान् रुद्रव्रती गरुडाला उद्देशून म्हणाले, माझें शरीरभूषण बनलेल्या नागांना खाऊं नकोस. हें शिवबचन ऐकून वैनतेय तें रामक्षेत्र सोडून अन्य स्थानीं निघून गेला. तेव्हांपासून सर्वपूज्य रुद्र नागभूषण या नांवानें प्रसिद्ध झाले. त्यावेळीं देशांतील ब्राह्मणादि हजारों लोक नागभूषित शिवाला वंदन करून म्हणाले, हे शंकरा, तूं सर्वांचें भय दूर करतोस. तुला नमस्कार असो. ही लोकांची प्रार्थना ऐकून शंकर प्रसन्न झाले व नागनामक द्विजांना म्हणाले, हे नागाव्हय क्षेत्र मोठें पवित्र व सुंदर असून संपत्ति देणारें आहे. या रामक्षेत्रांत मी राहतों व तुमची वरदा भगवती देवी-सुद्धां येथें रहात आहे. ३१–३८. तत्पर होऊन तुम्ही नागोपहारानीं तिची पूजा करा. त्यामुळें तुम्हांला सर्व सुखें प्राप्त होतील. ती कल्याण करणारी देवी आहे. ३९.

सर्वभूतवशं कर्तुं भूतनाथोऽत्र तिष्ठति । इति तेषां वरं दत्त्वा तत्रैवान्तर्दधौ हरः ॥ ४० ॥
नागाव्हये महाक्षेत्रे भूम्यामर्थः स्थितो विभो ।
इतिश्री स्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे सूतशौनकसंवादे नागाव्हयमाहात्म्ये नागभयदूरीकरणं नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

# अथ द्वितीयोऽध्यायः

## श्रीशान्तादुर्गाप्रादुर्भावः ।

सूत उवाच –
अथान्यदपि ते वच्मि नागक्षेत्रमहोदयम् । [1]देवी तथानिरुद्धश्च ह्यासीच्छान्ता दयापरः ॥१॥
तत्र कश्चिद् द्विजवरः शांतो नाम महामुनिः । वेदाध्ययनसम्पन्नः पुराणश्रवणे रतः ॥ २ ॥
रामध्यानपरो नित्यं भगवत्यंतिके ततः । श्रीसूक्तशान्तिपाठांश्च सदा कुर्वन्समास्थितः ॥३॥
ततो भगवती देवी प्रसन्नाऽभून्महामुने । तस्मै कामवरं दातुं कन्यारूपेण संस्थिता ॥ ४ ॥
सखीद्वयसमायुक्ता चामरव्यजनादिभिः । स्तूयमाना देवगणैर्नागकन्याभिरर्चिता ॥ ५ ॥
तदग्रे संस्थिता बाला सर्वाभरणभूषिता । नागनूपुरशब्देन चलन्ती समुपागता ॥ ६ ॥
तां दृष्ट्वा सहसोत्तस्थौ ननाम चरणाब्जयोः । तुष्टाव परया भक्त्या शान्तिसूक्तेन भूयसा ॥७॥
यां सदा सर्वभूतानि स्थावराणि चराणि च । सायं प्रातर्नमस्यंन्ति सा मां सन्ध्याऽभिरक्षतु ॥ ८
क्षीरेण स्नापिते देवि चन्दनेनाऽनुलेपिते । बिल्वपत्रार्चिते देवि दुर्गेऽहं शरणं गतः ॥ ९ ॥
नमो भगवति शान्ते सर्वमंगलदायिनि । नागपीठे स्थिते भद्रे त्राह्यस्मान् कुलदैवते ॥ १० ॥
ततोऽग्निं च प्रतिष्ठाप्य जुहोमि सोममंजसा । देवाय दीयते[2] रात्रौ जुहोमि जातवेदसे ॥ ११ ॥
स नो दुर्गाणि विश्वानि प्रतिपालय मे स्वयम् । दुरितानि च सर्वाणि यथाऽग्निं संस्थितनृणाम् ॥
रक्ष त्वमनु[3]बन्धूंश्च त्वद्भक्तिनिरतात्मनः । इति स्तुत्वा नमस्कृत्य श्रीसूक्तान्यजपत् पुनः ॥
एवं जपन्तं तं साधुं शान्तं नाम महामुनिम् । प्रसन्ना वरदा देवी वचनं चेदमब्रवीत् ॥ १४
देव्युवाच –
सन्तानार्थं त्वया भद्र धनार्थं च द्विजोत्तम । तपस्तप्तं मम प्रीत्यै तत्रेदं कारणं शृणु ॥ १५ ॥
अ[4]ग्रे सृष्टं जगत् सर्वं त्रैलोक्यं सचराचरम् । सोऽनिरुद्धो जगत्स्रष्टा शान्तादेव्या सह[5]प्रभुः ॥
ते हृत्कमलमध्यास्ते [6]तमाराधय सुव्रत । भक्त्या सम्पूजितो देवो भुक्तिं मुक्तिं प्रदास्यति ॥१७॥

---

१ देवश्चैवानिरुद्धश्चशान्ति दव्यासद्रवमिति पु. पाठः । २ देवाय दहते रात्रीन् इति को. सि. न. चं. पु. पा. । ३ रक्षत्वनुदिबंधुनावेवमनवः इति सि. न. को. पु. पा. । ४ अग्रेसृष्टिंकृतायेन ब्रह्माण्डंचविनिर्मितमिति सि. को. न. चं. पु. पा. । ५ सहसमप्रभुरिति न. चं. को. पु. पा. ६ तस्माराधय सुव्रतेति को. न. पु. पा.

सर्व भूतांना वश करण्यासाठीं भूतनाथही येथें रहात आहे. असा वर देऊन श्रीशंकर अंतर्धान पावले. नागाव्हयामध्यें खूप संपत्ति आहे. ४०.

# अध्याय २ रा

## शांतादुर्गेचा प्रादुर्भाव

सूत म्हणाला, मी तुला नागक्षेत्राचा आणखी एक भाग्योदय सांगतों. या नागक्षेत्रांत शांतादेवी व दयाळू अनिरुद्ध देव आहेत. तेथेंच पुराण श्रवण करणारा एक शांत नांवाचा ब्राह्मणमुनि रहात असे. १–२. तो नित्य रामाचें ध्यान करून भगवतीसमीप श्रीसूक्त व शांतिपाठ म्हणत असे. ३. त्यामुळें भगवती देवी प्रसन्न झाली व त्याला इच्छित वर देण्यासाठीं त्याच्यासमोर कन्यारूपानें उभी राहिली. ४. तिच्याबरोबर दोन सख्या होत्या, त्या चामर–व्यजन वगैरे घेऊन तिची सेवा करीत होत्या व नागकन्या तिची पूजा करीत होत्या. ५. सर्वालंकारभूषित अशी ती बाला नागकन्यांच्या नुपुरध्वनीसह चालत येऊन त्याच्यासमोर उभी राहिली. ६. तिला पाहतांच त्या ब्राह्मणानें उठून तिच्या चरणकमलांना प्रणाम केला व मोठ्या भक्तिभावानें शांती सूक्त म्हणून तिची स्तुति करण्यास आरंभ केला.

चराचर सर्व महाभूतें सदासर्वकाळ जिला नमस्कार करतात ती सन्ध्यादेवी माझें रक्षण करो. ७–८. हे देवी, मी तुला दुधाचा अभिषेक केला. चंदनानुलेपन केलें. बिल्वपत्रें अर्पण केलीं. हे दुर्गादेवी, मी तुला शरण आलों आहे. ९. हे सर्वमंगलदायक भगवती शांते, तुला नमस्कार असो. नागपीठवासिनी कुलदेवते, आमचें रक्षण कर. १०. रात्रीच्या वेळीं अग्नीची स्थापना करून मी सोमरसाचें हवन करीत असतों. अग्नि जसा सर्व आहुति भक्षण करतो, त्याप्रमाणें तूं सर्व पापनाश करून माझें संकटांपासून रक्षण कर. मनःपूर्वक तुझी भक्ति करणाऱ्या सर्व लोकांचें रक्षण कर. याप्रमाणें देवीची स्तुति करून झाल्यावर त्यानें देवीस प्रणाम केला व पुनः श्रीसूक्ताचा जप केला. ११–१३. याप्रमाणें शांत नांवाच्या त्या महामुनीनें जप केल्यावर वरदादेवी प्रसन्न होऊन त्याला म्हणाली, हे द्विजोत्तमा, माझ्या कृपेनें संतति व संपत्ति प्राप्त व्हावी यासाठीं तूंही तपश्चर्या केलीस, म्हणून संतति–संपत्ति प्राप्त करून देणारी मी देवताच तुला सांगत आहे, ऐक. १४–१५. ज्यानें हें चराचर त्रैलोक्य निर्माण केलें तो जगदुत्पादक अनिरुद्ध शांतादेवीसह तुझ्या हृदयांत वास करतो. त्या देवाची तूं भक्ति कर. तो तुला सर्व ऐश्वर्य व मुक्ति देईल. १६–१७.

इत्युक्त्वा तं भगवती वल्मीकान्तरधीयत। द्विजो भगवतीवाक्यं हृदि कृत्वा दृढं तथा ॥१८
भजन्तद्यज्ञपुरुषं शान्तादेव्याः पतिं प्रभुम्। हृत्पद्मकर्णिकायां च तत्राष्टदलसंयुते ॥ १९ ॥
[1]नवशक्तिर्मध्यगताऽनन्तपीठे स्थितं हरिम्। भक्त्या विरक्तज्ञानेन योगयुक्तेन चेतसा ॥२०॥
अपश्यत्पुरुषं दिव्यं नारायणमनामयम्। पीताम्बरधरं देवं [2]रत्नाभरणभूषितम् ॥ २१ ॥
शंखचक्रगदापद्मैः शोभितं च चतुर्भुजम्। श्रीवत्सवक्षसं शान्तं कौस्तुभं वनमालिनम् ॥२२॥
प्रसन्नवदनांभोजं पद्मपत्रनिभेक्षणम्[3]। लक्ष्मीकराभ्यामाश्लिष्टं योगिध्येयांघ्रिपंकजम् ॥ २३ ॥
तद्ध्याने निष्ठया[4] भक्त्या मुनिः सानन्दनिर्भरः। ततश्चान्तर्हितो देवो बहिः स्थित्वा तमब्रवीत् ॥
वरं वरय भद्रं ते ददामि तव वाञ्छितम्। इति देववचः श्रुत्वा स शान्तो मुनिरब्रवीत् ॥२५॥
देवदेव जगन्नाथ भक्तानुग्रहकारक। अत्रैव स्थीयतां नित्यं सह शान्त्या वरप्रद ॥ २६ ॥
मद्वंशप्रभवैः सर्वैरेतत्क्षेत्रनिवासिभिः। पूज्योऽभीष्टप्रदो नित्यं भवेस्त्वं विभवैः स्वकैः ॥ २७
त्वत्प्रसादेन सर्वेऽपि भुक्तिमुक्तिसुखान्विताः। भविष्यन्ति यथा देव तथा देयो वरो मम ॥ २८
इति विप्रवचः श्रुत्वा तमाह भगवान् हरिः।

श्रीभगवान उवाच –

स्थितोऽस्मि [5]भवतां क्षेत्रे स्मरतां मुक्तिसिद्धये ॥ २९ ॥

इयं च देवी शान्तिर्वा ह्यस्तु सौभाग्यदायिनी। स्थिता संरक्षणार्थाय क्षेत्रस्थानां[6] शिवाय च ॥
सोमश्चापि शुभं छत्रं सुवर्णकलशान्वितम्। नानारत्नमयं दंडमाविष्कृतान्तरिक्षगम् ॥ ३१ ॥
पूज्यः पराहुतीभिश्च प्रार्थितः सन् वरप्रदः। भजतां च मनोऽभीष्टं भविष्यति शुभंशुभम् ॥
त्वमेवासि क्षेत्रमुख्यो ग्रामादिपुरुषो भव। इत्युक्त्वा चाभयं दत्त्वा तत्रैवान्तर्दधे हरिः ॥३३॥
ततः प्रभृति तत्क्षेत्रे षडिष्टानि भवन्ति हि। विष्णुर्मुक्तिप्रदस्तत्र शान्ता सौभाग्यदायिनी ॥३४
शिवः संरक्षणार्थाय कार्ये भगवती तथा। विघ्ननाशाय वै तत्र विघ्नराजस्तु तिष्ठति ॥ ३५ ॥
भूतबाधाविनाशार्थं भूतनाथोऽत्र तिष्ठति। विष्णवाद्याः सम्मुखास्तेषां ये नराः सन्मुखे स्थिताः ॥
विमुखा विमुखानां तु नेतरेषां कदाचन।

सूत उवाच –

एतत्सर्वं भृगुश्रेष्ठ रामेण परिपालितम् ॥ ३७ ॥

इत्येतत् कथितं सर्वं क्षेत्रमाहात्म्यमुत्तमम्। धन्यं यशस्यमायुष्यं सुखकीर्तिविवर्धनम् ॥३८॥
शृणुयाच्छ्रावयेन्मर्त्यो मुक्तिं भुक्तिं च विन्दति।

इति श्रीस्कांदे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे नागाव्हयमाहात्म्ये सूतशौनकसंवादे शान्तादुर्गाप्रादुर्भावो नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

---

१ सूर्यहुताशानां मंडलत्रिलयेस्थितमिति न. गो. क. को. सि. पु. पा. । २ काचिदामविभूषितमिति मु. न. को. पु. पा. । ३ पत्ररुणेक्षणमिति को. न. सि. क. चि. पु. । ४ वृत्तयाभक्त्या इति न. को. मु. सि. पु. पा. । ५ स्थितोस्मिभवत् क्षेत्रेति मु. को. न. सि. पु. पा. । ६ स्थिता संरक्षणार्थाय शिवाभ्यामति–सोमश्चाविशुभंछत्रमिति सि. चं. को. न. मु. पु. पा. ।

असें त्याला सांगून भगवती वारुळांत अंतर्धान पावली. ब्राह्मणानें देवीच्या वचनावर पूर्ण श्रद्धा ठेविली. १८. हृदयांतील अष्टदल कमलवासी, शांतादेवीपति प्रभु यज्ञपुरुष याची तो भक्ति करूं लागला. त्या कमलाच्या मध्यभागीं शक्ति असून तेथेंच भगवान् योगी श्रीहरी होता. त्याच्या त्या वैराग्यपूर्ण भक्तियोगानें त्याला दिव्यपुरुष आदिनारायण याचें दर्शन झालें. त्या पीतांबरधारी देवाच्या शरीरावर रत्नाभरणें शोभत होता. चारी हातांत शंखचक्रगदापद्में होतीं. वक्षस्थलावर श्रीवत्स चिन्ह होतें. गळ्यांत कौस्तुभमणि व वनमाला होती. मुखकमल प्रसन्न असून नेत्र पद्मपत्रासारखे होते. योगी लोक त्या लक्ष्मीनारायणाच्या चरणकमलांचें मनःपूर्वक ध्यान करीत होते. त्यांच्या त्या एकनिष्ठ भक्तीमुळें मुनि आपल्या ध्यानावस्थेंतच अत्यंत आनंदित झाला.

त्याच्या एकनिष्ठ भक्तियोगामुळें भगवान् त्यांच्या अंतःकरणांतून बाहेर येऊन उभे राहिले व त्याला म्हणाले, तुझें कल्याण असो, तुला मी इच्छित वर देतों. देवाचें तें वचन ऐकून शांतमुनि म्हणाला, हे जगन्नाथ देवा, तूं भक्तांवर अनुग्रह करणारा आहेस. हे वरप्रदा, तूं शांतादेवीसह येथेंच वास कर. १९–२६. या क्षेत्रांत राहाणारे माझे जे वंशज आपल्या वैभवानुसार तुझी भक्ती करतील, त्यांचें तूं कल्याण कर. २७. तुझ्या कृपेनें त्यांना सर्व ऐश्वर्य प्राप्त होऊन शेवटीं मुक्तिलाभ होईल, असा वर मला द्यावा. २८. हें त्या ब्राह्मणाचें वचन ऐकून श्रीभगवान् म्हणाले, मी या क्षेत्रांत तुमच्या मुक्तीसाठीं राहिलों आहें. क्षेत्रवासी लोकांच्या रक्षणासाठीं व कल्याणासाठीं ही शांतादेवी येथें वास करीत आहे. ती तुम्हांला सौभाग्य देईल. २९–३०. येथें सुवर्णकलश व रत्नखचित दंड असलेलें छत्र आहे व त्यावर चंद्रयुक्त आकाशच प्रकट झालें आहे. ३१. यांची भक्ति करणाऱ्यांच्या सर्व इच्छा पूर्ण होतील. तूं ह्या क्षेत्राचा प्रमुख आहेस, यास्तव गांवचा आदिपुरुषही तूंच हो. ३२–३३. तेव्हांपासून या क्षेत्रांत मुक्तिदाता विष्णु, सौभाग्यदायिनी शांता, संरक्षक शिव, भगवतीदेवी, कार्यांत विघ्ननाशक विघ्नराज, भूतबाधाविघातक भूतनाथ व विष्णुप्रमुख इष्टदेवता राहूं लागल्या; पण भक्तिहीनांसमोर ह्या देवता कधीं प्रकट होत नाहींत.

सूत म्हणाला, भृगुश्रेष्ठा, रामानेंच ह्या सर्व क्षेत्राचें रक्षण केलें आहे. ३४–३७. मी सांगितलेलें हें श्रेष्ठ क्षेत्रमाहात्म्य यश, कीर्ति, सुख व आयुष्य वृद्धिंगत करणारें आहे. जो मनुष्य हें श्रवण करील त्याला भाग्य व मुक्ति यांचा लाभ होईल.

## ॥ ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥

# अथ वरुणापुरमाहात्म्यम् ।

### प्रथमोऽध्यायः ।

शौनक उवाच –

भगवन् सूत सर्वज्ञ ह्यस्मद्भाग्यमहोदय । वरुणापुरमाहात्म्यं विस्तराद् गदतो वद ॥ १ ॥

सूत उवाच –

वरुणस्य पुरी रम्या नानारत्नसमन्विता । तस्य क्षेत्रस्य माहात्म्यं[1] शृणु शौनक सादरम् ॥ २ ॥

तत्र सर्वे जनपदा नित्यं धर्मपरायणाः । राममाराधयन्सर्वे वेदतत्त्वार्थकोविदाः ॥ ३ ॥

ज्योतिष्टोमेन विधिना सर्वलोकहिताय च । रामः प्रत्यक्षरामश्च देवो यत्राक्षिगोचरः ॥ ४ ॥

तस्मिन्यज्ञसमाम्नाये तृप्ता देवा महर्षयः । तथा[2] रामस्तु सन्तुष्टो वरुणं चेदमब्रवीत् ॥ ५ ॥

जलाधिप महाबाहो कुरुष्वात्र ममालयम् । दिव्यैर्मुनिगणैः[3] सेव्यं निर्मितं रत्नसंचयैः ॥ ६ ॥

इति[4] रामवचः श्रुत्वा तथेत्युक्त्वा महोदधिः । कारयामास वरुणो यथैवं भवनं स्वकम् ॥ ७ ॥

रामाय भार्गवेंद्राय निवेद्य प्रांजलिः पुरः । स्थित्वा संप्रार्थयामास पश्येदं भार्गव प्रभो ॥ ८ ॥

अथाह भार्गवो रामो वरुणं प्रीतिसंयुतम् ।

श्रीराम उवाच –

मनोहरं कृतं भद्र वरुणेदं सुखप्रदम् ॥ ९ ॥

रत्नकांचनसंयुक्तं प्रियं स्वभवनं यथा[5] । त्वन्नामवाचकं क्षेत्रं वरुणापुरमित्यथ ॥ १० ॥

तदाप्रभृति तत्क्षेत्रं वरुणापुरसंज्ञकम् । बभूव लोके विख्यातं धर्मसम्पत्समृद्धिमत् ॥ ११ ॥

वेदा यज्ञाश्च दानानि सदैवातिथिपूजनम् । तोयस्त्रावि शुभं छत्रं सुवर्णकलशान्वितम् ॥ १२ ॥

नानारत्नमयं दिव्यं तत्र विश्रांतरिक्षगम् । तत्रस्थेभ्यो द्विजेन्द्रेभ्यो वरं दत्त्वा ययौ हरिः ॥ १३

जामदग्न्यो भृगुश्रेष्ठः प्रत्यक्षो येन स स्मृतः । कदाचिन्माघवे मासि तत्र चासीन्महोत्सवः ॥

नवम्यां भृगुवारे तु सर्वलोकसमन्वितः । रामोत्सवे तु सम्प्राप्ते सत्रे[6] सप्तदिनात्मके ॥ १५ ॥

केचिद् गर्जन्ति देवेशं रामं यज्ञपतिं प्रभुम् । दानानि त्रिविधान्येव कुर्वन्ति हि तथाऽपरे ॥

ब्राह्मणान् भोजयंत्यन्ये रसैः षड्भिः समन्वितैः । केचित् गायन्ति नृत्यन्ति रामगाथां पुनः पुनः

---

१ शृणुभार्गवनन्दनेति मु. न. सि. पु. पा. । २ यथारायास्त्वंति न. को. सि. क. पु. पा. ।
३ दिव्यंमुनिगणै. – गणा. – गण शेव्यमिति मु. न. सि. को. क. चं. गो. चि. पु. पा.
४ इतिरामोवचोदेवस्तथैवाभिसादरमिति गो. क. न. पु. पा. । ५ तथाइति मु, न. सि. पु. पा.।
६ रात्रे सप्तदिनात्मकेति को. क. सी. मु. पा. ।

# अध्याय १ ला

## वरुणापूर–माहात्म्य

शौनक म्हणाले, हे भगवन् सूत, तुम्ही आमचे भाग्यविधाते आहांत. आम्हांस वरुणापूर–माहात्म्य विस्तारपूर्वक सांगा. १.

सूत म्हणाले, वरुणापुरी रत्नसंपन्न व रमणीयही आहे. शौनका, त्या क्षेत्राचें माहात्म्य ऐक. २. तेथील धार्मिक लोक वेदार्थ जाणणारे असून रामभक्त होते. ३. त्यांनीं एकदां लोककल्याणासाठीं ज्योतिष्टोम यज्ञ केला. त्यांत सर्वांना प्रत्यक्ष भार्गवराम देवाचें दर्शन झालें. सर्व देव व ऋषि तृप्त झाले. तेव्हां राम संतुष्ट होऊन वरुणाला म्हणाला, हे बाहुशाली जलाधीशा, येथें माझ्यासाठीं रत्नमय निवासस्थान निर्माण कर. तें स्थान स्वर्गीय ऋषींनां राहावयास योग्य असावें. ४–६. तें रामाचें वचन ऐकून व 'ठीक आहे' असें बोलून वरुणानें स्वतःच्या घरासारखेंच एक मंदिर तेथें निर्माण केलें, व भार्गवश्रेष्ठ परशुरामापुढें तो हात जोडून उभा राहिला. त्यानें त्याला तें मंदिर पाहण्याची प्रार्थना केली. ७–८. नंतर प्रीतिसंपन्न वरुणाला भार्गवराम म्हणाला, हे भद्रपुरुष वरुणा, तूं स्वतःच्या मंदिराप्रमाणेंच हें मंदिरसुद्धां रत्नसुवर्णखचित व मनोहर बनविलें आहेस. यासाठीं 'वरुणापुर' (सध्याचें 'वेरणें') याच नांवानें तें प्रसिद्ध होवो. ९–१०. तेव्हांपासून तें क्षेत्र 'वरुणापुर' नांवानें प्रसिद्ध होऊन धर्म, संपत्ति व ऐश्वर्य यांनीं समृद्ध झालें. ११. येथें वेदघोष, यज्ञ, दानें व अतिथिपूजा नित्य होत राहोत. जल स्रवणारें, सुवर्णकलशयुक्त, रत्नजडित व गगनचुंबी असें हें दिव्य छत्र येथें असेल. असा ब्राह्मणांना आशीर्वाद देऊन परशुराम तेथून गेला. १२–१३. भृगुश्रेष्ठ परशुरामाचें जो चिंतन करतो, त्याला तो प्रभु प्रत्यक्ष दिसतो. एकदां वैशाखांतील नवमी तिथीला शुक्रवारीं तेथें सात दिवसांचा राम–महोत्सव सुरू झाला. १४–१५. यासाठीं तेथें यज्ञपति प्रभु रामाच्या नामाचा घोष, विविध दानें व षड्रसयुक्त ब्राह्मणभोजनें सुरू झालीं. कांहीं लोक नाच व रामगाथेचें गायन करूं लागले. १६–१७.

तदा कश्चिन्महादैत्यः सन्मुखो यो महाबलः । पीडयामास तान् लोकान् वरुणापुरवासिनः ॥
दैत्यपीडां ततो दृष्ट्वा रामं शरणमाययुः । स्मरन्तो रामरामेति ध्यायन्तश्चरणाम्बुजम् ॥१९॥
हे राम जगतामीश जामदग्न्य महाप्रभो । दुष्टक्षत्रियसंहार भक्तानुग्रहकारक ॥ २० ॥
देवदेव जगन्नाथ सर्वलोकभयापह । वयं त्वां शरणं याता त्वदीया रक्षितास्त्वया ॥ २१ ॥
त्राहि त्राहि भृगुश्रेष्ठ त्वद्दर्शनमभीप्सवः । इति तेषां वचः श्रुत्वा रामः प्रत्यक्षमागमत् ॥२२॥
तं दृष्ट्वा सहसोत्तस्थुः सर्वे प्रांजलयोऽभवन् । स्तुतिमारेभिरे सर्वे वरुणापुरवासिनः ॥ २३ ॥
नमो नमस्ते भृगुवर्य देव नमो नमस्ते द्विजपेन्द्रसूर्य । नमो नमस्तेऽखिलदावदाह
नमो नमस्तेऽखिलकामदोह ॥ २४ ॥
नमो नमः कारणपूरुषाय स्वभक्तसंसारतरोः कुठार । स्वक्षेत्ररक्षाधृतचापबाण स्वकीय-
दुःखाब्धिविशोषणेश ॥ २५ ॥
इति स्तुतोऽथ भगवान् रामः परपुरंजयः । गम्भीरश्लक्ष्णया वाचा तानुवाच द्विजोत्तमान् ॥
श्रीराम उवाच –
विप्राः शृणुत मे वाक्यं सर्वेषां वः सुखावहम् । दैत्यदानवघाताय देवी संस्थापिता मया ॥२७
सर्वलक्षणसंपन्ना मायावच्छक्तिपूजिता । रत्ननूपुरपादाभ्यां चलंती लोकपावनी ॥ २८ ॥
बाला कन्याकुमारी च युवतिर्मनमोहिनी । वृद्धा च शासती शुद्धा सर्वकार्यार्थदायिनी ॥२९॥
प्रातःसंगवमध्यान्हे ह्यपराण्हे तथैव च । सायं प्रदोषरात्रौ च ह्यर्धरात्रौ तथाऽपरा ॥ ३० ॥
नवरूपसमायुक्ता नवनामान्तिका भुवि । आदिशक्तिर्महामाया मूलप्रकृतिरीश्वरी ॥ ३१ ॥
गन्धद्वारा दुराधर्षा नित्यपुष्टा करीषिणी । श्रीदेवी सर्वभूतानामिति वेदविदो विदुः ॥ ३२ ॥
भविष्याणि च नामानि कथयामि द्विजोत्तम । दुर्गेति भद्रकालीति विजया वैष्णवीति च ॥ ३३
कुमुदा दण्डिका कृष्णा माधवी कन्यकेति च । माया नारायणी शान्ता शारदा ह्यंबिकेति च ॥
कात्यायनी बालदुर्गा महायोगिन्यधीश्वरी । योगनिद्रा महालक्ष्मीः कालरात्रिश्च मोहिनी ॥३५
सर्वदेव नमस्कुर्यां[3] तामिहोपव्हये श्रियम् । इत्यर्च्य भारतीं नित्यं चतुर्विंशतिनामभिः ॥३६॥
सर्वकामप्रदा तेषामभीष्टफलदायिनी । सेव्या भगवती देवी वारुणे भवनोत्तमे ॥ ३७ ॥
मया[4] प्रस्थापिता चास्ति पुरेदं विदितं मम । सर्वविघ्नप्रशमनीं तां भजध्वं द्विजोत्तमाः ॥ ३८
तोयस्रावि शुभं छत्रं सुवर्णकलशान्वितम् । नानारत्नमयं दण्डं तत्राविष्टान्तरिक्षगम् ॥ ३९ ॥
पूजोपहारनुतिभिः प्रार्थिताऽऽस्ते वरप्रदा । भवतां च मनोऽभीष्टं वदिष्यति शुभाशुभम् ॥४०॥
इत्युक्त्वा स्वजनं रामस्ततो गोमांतकं ययौ ॥
इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे सूतशौनकसंवादे वरुणापुरमाहात्म्ये देवीस्थापनं नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

---

१ कदाकश्चिदिति सि. न. पा. । २ कारयामासेति मु. न. क. गो. पु. पा. । ३ नमस्कार्याइति मु. न. गो. पु. पा. । ४ मयाप्रस्थापितचास्थीति न. गो. सि. पु. पा. ।

अशा वेळीं एक मोठा बलिष्ठ महादैत्य त्या वरुणापुरवासी लोकांना पीडा देऊं लागला. १८. ते पीडित लोक रामाला शरण गेले, राम राम असें म्हणून त्याच्या चरणकमलाचें ध्यान करूं लागले. हे जगदीश रामा, हे जामदग्न्य महाप्रभो, दुष्टक्षत्रियसंहारका, भक्तानुग्रहकारका, हे जगन्नाथ देवेशा, तूं लोकांचें भय दूर करणारा आहेस. आम्ही तुला शरण आलों आहों. आम्ही तुझेच असून तूंच आमचें रक्षण केलें आहेस. तुझ्या दर्शनासाठीं आम्ही तळमळत आहों. आमचें रक्षण कर. हें त्यांचें वचन ऐकून राम तेथें उपस्थित झाला. १९-२२.

रामाचें दर्शन होतांच ते सर्व वरुणापुरवासी लोक हात जोडून उभे राहिले व त्याची स्तुति करूं लागले. २३. हे भृगुश्रेष्ठा, तूं सूर्यतुल्य द्विजश्रेष्ठ आहेस. तुला नमस्कार असो. तूं दुःख दूर करणारा दावानल आहेस. तूं सर्व कामना पूर्ण करणारा आहेस. तुला नमस्कार असो. २४. तूं आदिपुरुष असून भक्तजनांच्या संसारवृक्षासाठीं कुऱ्हाड असल्यानें मुक्तिदाता आहेस. आपल्या क्षेत्रवासी लोकांचें रक्षण करण्यासाठीं तूं धनुर्बाण धारण केला असून, लोकांचा दुःखसागर तूं शुष्क करतोस. तुला नमस्कार असो. २५. याप्रमाणें स्तुति केल्यावर भगवान् राम गंभीर व गोड वाणीनें त्या द्विज श्रेष्ठांना म्हणाला —

विप्रहो, तुम्हां सर्वांना हितावह असें जें मी सांगतों, त्याकडे लक्ष द्या. येथें मी दैत्य-दानवांच्या संहारासाठीं देवीची स्थापना केली आहे. २६-२७. ही देवी सर्वलक्षणसंपन्न, मायायुक्त व शक्तिपूजित आहे. 'लोकपावनी' अशी ही देवी आपल्या रत्नजडित नूपुरधारी पायांनीं चालून जगाला पवित्र करणारी बाला आहे. कन्या, कुमारी, मनमोहिनी युवति, शासन करणारी व सर्वेच्छा पूर्ण करणारी वृद्धा अशींही हिचीं अनेक रूपें आहेत. २८-२९.

प्रातःकाळ, पूर्वाण्ह, मध्यान्ह, अपराण्ह, सायंकाल, प्रदोष, रात्र, मध्यरात्र, अपररात्र ह्या नऊ वेळीं पृथ्वीवर नऊ रूपें धारण करणाऱ्या या भूत-धात्री देवीचीं १. आदिशक्ति, २. महामाया, ३. मूलप्रकृति, ४. ईश्वरी, ५. गन्धद्वारा, ६. दुराधर्षा, ७. नित्यपुष्टा, ८. करीषिणी व ९. श्रीदेवी, अशीं नऊ नांवें आहेत, असे वेदवेत्ते समजतात. ३०-३२.

दुर्गा, भद्रकाली, विजया, वैष्णवी, कुमुदा, दण्डिका, कृष्णा, माधवी, कन्यका, माया, नारायणी, शांता, शारदा, अंबिका, कात्यायनी, बालदुर्गा, महायोगिनी, अधीश्वरी, योगनिद्रा, महालक्ष्मी, कालरात्रि, मोहिनी, सर्वदेवनमस्कार्या, भारती अशा २४ नांवांनीं त्या श्रीस आवाहन करून पूजा करा. ३३-३६. ही देवी सर्व कामना पूर्ण करणारी व सर्व फल देणारी आहे. वरुणाच्या ह्या श्रेष्ठ मंदिरांतील देवीची तुम्ही सेवा करा. ३७. मीच हिची पूर्वी स्थापना केली असून इच्छा पूर्ण करणाऱ्या या देवीची भक्ति करा. ३८. तिचें सुंदर छत्र जल स्रवणारें असून त्यावर सुवर्णकलश आहे. छत्राचा दांडा रत्नखचित असून तें गगनचुंबी आहे. ३९. पूजा, बलि व नमस्कार करून तिची प्रार्थना करा. ती तुम्हाला हवा असलेला वर देईल. तुमच्या सर्व शुभाशुभ कामना निवेदन करील. ४०. असें सर्वजनांना सांगून राम गोमंतक पर्वतावर गेला. सूत म्हणाला, नंतर रामाच्या आज्ञेप्रमाणें सर्व वरुणापुरवासी लोकांनीं महालसादेवीची स्तुति करून तिला नमस्कार केला.

# अथ द्वितीयोऽध्यायः ।

### श्रीमहालसाप्रभावः ।

सूत उवाच –
अथ रामाज्ञया सर्वे वरुणापुरवासिनः । महालसां तथा देवीं स्तुत्वा नत्वाऽथ योषितम् ॥१॥
पूजयित्वा यथान्यायं सर्वे तां शरणं ययुः । कृताञ्जलिपुटा भूत्वा स्वानुभूतं न्यवेदयन् ॥ २ ॥
नमो देवि जगद्धात्रि सृष्टिस्थित्यन्तकारिणि । त्वामद्य शरणं याताश्चण्डासुरभयार्दिताः ॥ ३ ॥
रक्ष रक्ष महादेवि दुष्टदैत्यवधं कुरु । एवं स्तुत्वा तदा देवी सन्तुष्टवचसाऽब्रवीत् ॥ ४ ॥
मा भैष्ट विप्रास्तं दैत्यं घातयिष्ये न संशयः । इत्युक्त्वा खड्गमादाय हंतुं चण्डासुरं ययौ ॥५॥
तेन सार्कं महद्युद्धं कृत्वा घोरेतरं[2] तदा । शिरो जहार दैत्यस्य हत्वाऽसुरचमूं तथा ॥ ६ ॥
तच्छिरं वामहस्तेन गृहीत्वा साऽऽलयं ययौ । अथ देवगणाः सर्वे सिद्धचारणगुह्यकाः ॥ ७ ॥
मुमुचुः कुसुमासारं शंसंतः कर्म तत्तदा । जगुर्गन्धर्वपतयस्तुष्टुवुर्मुनयो मुदा ॥ ८ ॥
महामाये महालक्ष्मि महायोगीन्यधीश्वरि । जयेति विजयेत्येवं सर्वलोकनमस्कृते ॥ ९ ॥
स्तुता सम्पूजिता देवी सर्वलोकफलप्रदा । बभूव लोकविख्याता सर्वमंगलदायिनी ॥ १० ॥
तदा सर्वे जनपदा वरुणापुरमागताः । उत्सवं कारयामासुर्महाफलसमृद्धये ॥ ११ ॥
माघे मासे सिते पक्षे षष्ठ्यां भक्तिसमन्विताः । येऽर्चयन्ति नरा भक्त्या देवीं त्रिभुवनेश्वरीम् ॥१२
मनोरथं प्राप्नुवन्ति सर्वे लोका न संशयः । यस्यां तिथौ हतो दैत्यः सा[3] तिथिस्तत्प्रियाऽभवत् ॥१३
इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे सूतशौनकसंवादे वरुणापुरमाहात्म्ये महालसाप्रभावकथनं नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

# अथ कामाक्षीमाहात्म्यम् ।

## प्रथमोऽध्यायः ।

### श्रीकामाक्षीदेवी ।

देवर्षेर्नारदाच्छ्रुत्वा माहात्म्यानि बहून्यपि । अंबरीषो नृपश्रेष्ठः पुनः पप्रच्छ तं मुनिम् ॥ १ ॥
अंबरीष उवाच –
कस्य देवस्य का शक्तिर्महिषासुरमर्दिनी । कुतो रैक्षेत्रे कामाक्षी काऽभूत् तद्वदस्व मे ॥ २॥
आकर्ण्य बहुशश्चापि त्वन्मुखात् सत्कथामृतम् । न तृप्तिर्जायते चातो मम नारद पृच्छतः ॥३
इत्याकर्ण्य वचस्तस्य ह्यम्बरीषस्य भूपतेः । कथां रैक्षेत्रकामाक्ष्या व्याहर्तुमुपचक्रमे ॥ ४ ॥

---

१ ज्ञायमिति पृ. उ. को. पु. पा. । २ कृत्वाघोर ततोइति मु. को. गो. सि. पु. पा. ।
३ सषष्ठितत्प्रियाभवेदिति न. गो. सि. चं. को. क. पु. पा. ।

# अध्याय २ रा

## श्रीमहालसेचा प्रभाव

नंतर रामाज्ञेप्रमाणें विधियुक्त पूजा करून ते सर्व देवीला शरण गेले व हात जोडून त्यांनीं तिची प्रार्थना केली. १.

हे जगद्धात्री देवी, तूंच सृष्टीची स्थिति व लय करणारी आहेस. चंडासुराला घाबरून आम्ही तुला शरण आलों आहों. २-३. ह्या दुष्ट दैत्याचा वध कर व आमचें रक्षण कर. याप्रमाणें स्तुति केल्यावर देवी प्रसन्न शब्दांत बोलली —

ब्राह्मणांनो, भिऊं नका. मी दैत्याला निश्चित ठार करीन असें सांगून ती खड्गधारी देवी चंडासुराला मारण्यासाठीं निघाली. ४-५. त्याच्याशीं मोठें युद्ध करून सर्व असुरसैन्य तिनें कापून काढलें व शेवटीं त्या दैत्याचें अति भयानक शिर कापलें. ६. त्याचें तें शिर डाव्या हातांत धरून देवी मंदिरांत गेली. त्यावेळीं सर्व सिद्ध, चारण, गुह्यक व देव यांनीं तिच्या त्या कार्याची स्तुति करून तिच्यावर पुष्पवर्षाव केला. श्रेष्ठ गंधर्वांनीं गायन केलें. सर्व मुनि आनंदानें महामाया, महालक्ष्मी, महायोगिनी, अधीश्वरी, जया, विजया, सर्वलोकनमस्कृता या नांवांनीं तिची स्तुति करूं लागले. ७-९. याप्रमाणें लोकांनीं देवीची स्तुति व पूजा केली व ती सर्वमंगलदायिनी देवी जगप्रसिद्ध झाली. १०. नंतर सर्व लोक वरुणापुरांत आले व त्यांनीं फलसमृद्धीसाठीं मोठा उत्सव करविला. ११. ज्या दिवशीं तो दैत्य मारला गेला, ती तिथि तिला प्रिय होय; म्हणून माघ महिना शुक्लपक्ष षष्ठी तिथि या दिवशीं जे लोक मोठ्या भक्तीनें त्रिभुवनेश्वरी देवीची पूजा करतात त्यांचे सर्व मनोरथ निश्चित पूर्ण होतात. १२-१३.

# अध्याय १ ला

## कामाक्षीदेवी

नृपश्रेष्ठ अंबरीषानें देवर्षि नारदापासून पुष्कळ माहात्म्यें ऐकलीं व पुनः त्या मुनीला प्रश्न केला, महिषासुरमर्दिनी ही कोणत्या देवीची शक्ति आहे? रै-क्षेत्र कसें निर्माण झालें? कामाक्षी कोण देवी आहे? हें सर्व मला सांग. १-२. नारदा, तुझ्या मुखांतून कितीही कथामृत प्राशन केलें, तरी तृप्ति होत नाहीं! ३. हें अंबरीष राजाचें वचन ऐकून रैक्षेत्रवासी कामाक्षीची कथा सांगण्यास नारदानें आरंभ केला. ४

नारद उवाच—

क्षीराब्धेः पश्चिमे तीरे ग्रामे सर्वसंयुते । विप्रक्षत्रियविट्शूद्रैश्चातुर्वर्ण्यसमन्विते ॥ ५ ॥

स्वधर्मनिरतैर्विप्रैः शान्तैर्दान्तैस्तपोधनैः । पतिव्रताभिः सौभाग्यवनिताभिः सहार्भकैः ॥ ६ ॥

राजा च दिव्यवीर्येण क्षत्रियोऽसौ सदा मुदा । पण्यदक्षैर्महावैश्यैः शूद्रैः सेवानुतत्परैः ॥ ७ ॥

ब्रह्मचर्यरतैस्तत्र गृहिभिर्धर्मतत्परैः । वानप्रस्थैर्भिक्षुकैश्च स्वैस्वधर्मानुकूलकैः ॥ ८ ॥

नारिकेरैस्तथा पूगैः कदलीभिर्विराजितम् । आम्रैर्बिल्वैश्च गन्धैश्च पनसैरुपशोभितैः ॥ ९ ॥

चम्पकैः खदिरैश्चैव पिप्पलैः किंशुकैर्वटैः । नारिंगैर्मातुलिंगैश्च जम्बूभिः परिशोभितैः ॥ १० ॥

दाडिमैर्यावनालैश्च वेणुस्तम्भसमोत्तमैः । जातिभिर्जलजोत्फुल्लवल्लीस्थभ्रमरैस्तथा ॥ ११ ॥

सुगन्धपुष्पनिर्युक्तैर्निनदैः कोकिलादिभिः । सच्छन्दैर्भाषितालोककुसुमैः सुमनोद्भवैः ॥ १२ ॥

समुद्रोर्मिभिरुत्तुंगैस्तत्तीरस्थनिकेतनैः । प्रासादैः कुड्यसोपानैर्महाध्वनिसमाकुलम् ॥ १३ ॥

यथा चैत्ररथो रम्यस्तथा द्वीपमशोभत । तत्र वासं प्रकुरुते हरिर्विष्णुर्जगत्पतिः ॥ १४ ॥

तत्रेश्वरेति नाम्ना वै भवानीरमणो हरः । नारायणेति नाम्नाऽस्ति कमलावल्लभो हरिः ॥ १५ ॥

भक्तसंरक्षणार्थाय वसेते तत्र तावुभौ । भैरवः पुरुषश्चैव ह्युभौ दूतौ महाबलौ ॥ १६ ॥

तस्मिन्ग्रामे द्विजश्रेष्ठो ह्यासीदग्निमुखाभिधः । ऋग्यजुःसामवेदानां पारगोऽथर्वणादिनाम् ॥

षडंगज्ञोऽर्थशास्त्रज्ञो मीमांसाज्ञोऽर्थवादिकः । बहुश्रुतः पुराणानां साक्षात् सूर्य इवापरः ॥ १८

गार्हस्थ्यधर्मनिरतः सकुटुंबो महातपाः । निर्वैरः सत्यसंपन्नस्तस्य पुत्रो गुणाकरः ॥ १९ ॥

बालिशः पितृभक्तश्च कृतमौंजीविधिस्तदा । स विप्रोऽग्निमुखो नित्यमुञ्छवृत्तिपरायणः ॥ २०

तयोरसिशयां[11] नित्यं पूजार्चां प्रकरोति हि । वैष्णवैः सूक्तपाठैश्च पावमानेन सूक्तिभिः ॥२१॥

सहस्रनामगीताभिर्नारायणमतोषयत् । तया विष्णुरमाधीशसाक्षात्कारोऽभवत्ततः ॥ २२ ॥

तस्य पुत्रः कदा काले समित्कुशसमृद्धये । गतोऽरण्यं समीपस्थं नालभत्तत्र योजितम् ॥२३॥

पितुराज्ञाप्रमाणत्वाद्ययौ घोरं महावनं । सिंह[12]व्याघ्रसूकरकपिदंष्ट्रमृगाकुलम् ॥ २४ ॥

संचारं तत्र कृत्वा स भीतो भीतः शनैः शनैः । यावदागच्छति गतः पंथाः सन्मंत्रपाठकः ॥२५

तावद् दृष्टो महाघोरो दैत्यो महिषवंशजः । कानीनो महिषाख्यस्य किमसौ प्रतिमाहिषः ॥ २६

---

१ शूद्रैश्च स्वसेवतेनरैः इति मु. को. चं पु. पा. । २ धर्मसत्तरैः इति गो. मु. क. को. न. पु. पा. ३ कैश्चसब्दुत्थिरुणसते रुपासते इति को. क. सि न. पु. पा. । ४ सपनैर्महाध्वानीति न. को. क. सि. पु. पा. । ५ यथान्चित्ररथंरम्यं तथैवंतद्विशोभते इति को. गो. न. सि. क. पु. पा. । ६ नत्रासांचाक्रुदेवो हरिविष्णुजगत्पतिरिति मु. को. क. सि. पु. पा. । ७ शर्याश्चरेतिनाम्नाज्ञा इति न. को. क. सि. पु. पा. । ८ भक्तसंरक्षणायैववर्तते तत्रतावुभौ इति न. सि. क. पु. पा. । ९ मीमासस्त्वत्वशारदाइति न. गो. क. सि. पु. पा. । १० बहुतपुराणश्चेति गो. को. सि. पु. पा. । ११ तयोर्वीष्णीशयो नित्यमिति सि. गो. क. न. पु. पा. । १२ सिव्हव्याघ्रमकरकदष्टमगाकुलेति न. क. पा. सि. को. मु. पु. पा. ।

नारद म्हणाला, क्षीराब्धीच्या पश्चिम तीरावर रै ( सध्याचा राय ) नांवाचा एक संपन्न गांव आहे. तेथें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण राहात होते. ५. तेथें स्वधर्मतत्पर, शांत, इंद्रियनिग्रही व तपस्वी ब्राह्मण होते. सौभाग्यवती पतिव्रता स्त्रिया तेथें नांदत होत्या. ६. क्षत्रिय राजा आपल्या पराक्रमानें राज्य करीत होता. व्यापारांत चतुर असे वैश्य, सेवातत्तर शूद्र, ब्रह्मचारी, धर्मतत्तर गृहस्थ, स्वधर्मदक्ष वानप्रस्थ व भिक्षुक तेथें रहात असत. ७–८. तेथें नारळ, पोफळी, कर्दळी, आंबे, बेल, फणस, चांफा, खैर, पिंपळ, पळस, वड, नारिंग, मातुलिंग, जांब, डाळिंब, जोंधळा, बांबू, जाई इत्यादि फळझाडें होतीं. जिकडे तिकडे सुगंध दरवळत होता. पाण्यांतील पुष्पलतांवरील भ्रमर व कोकिळ इत्यादि पक्ष्यांचे गोड आवाज ऐकूं येत होते. समुद्रावर उत्तुंग लाटा उसळत होत्या व त्यांचा आवाज तीरावरील मोठमोठीं घरें व राजवाडे, भिंती व पायऱ्या यांमुळें प्रतिध्वनित होत होता. ९–१३. कुबेराच्या उपवनाप्रमाणें तें बेट शोभत होतें, कारण तें जगत्पति विष्णूचें अधिष्ठान होतें. तसेंच भवानीपति हर हे ईश्वर या नांवानें व कमलापति हरि हे नारायण या नांवानें भक्तरक्षणार्थ तेथें वास करीत होते. त्यांचें रक्षण करण्यासाठीं भैरव व पुरुष हे दोन बलवान् दूतही तेथें रहात होते. १४–१६.

त्या गांवांत अग्निमुख नांवाचा एक श्रेष्ठ ब्राह्मण रहात असे. तो ऋक्, यजुस्, साम व अथर्व या चार वेदांत पारंगत होता. तो शिक्षाकल्पादि सहा वेदांगें व मीमांसा यांत प्रवीण असून पुराणांत बहुश्रुत होता. जणुं तो दुसरा सूर्यच होता. १७–१८. तो सहकुटुंब गृहस्थधर्मात तत्पर व तपस्वी होता. ह्या सत्यनिष्ठ व अजातशत्रु ब्राह्मणाला गुणाकर नांवाचा एक मुलगा होता. बालपणांतच त्या पितृभक्त मुलाचा व्रतबंध झाला होता. तो अग्निमुख ब्राह्मण उञ्छवृत्तीनें उपजीविका करून हरिहरांची पूजा-अर्चा करीत असे. विष्णुसूक्तें व सहस्रनाम यांचें पठन करून त्यानें नारायणाला संतुष्ट केलें. त्यामुळें त्याला रमापति विष्णूचा साक्षात्कार होत असे. १९–२०.

एकदां त्याचा पुत्र समिधा व दर्भ आणण्यासाठीं जवळच्या वनांत गेला होता. पण त्याला दर्भ–समिधा मिळाल्या नाहींत. म्हणून पित्राज्ञा प्रमाण मानून तो घोर वनांत गेला. त्या वनांत सिंह, वाघ, रानडुक्कर, माकडें व डुक्कर इत्यादिकांचा सुळसुळाट होता. पुष्कळ फिरून झाल्यावर भयभीत होऊन तो मंत्र म्हणत घराकडे येऊं लागला, तोंच त्याला एक महाबलवान् दैत्य दिसला. तो महिषासुराचा कानीन पुत्र प्रतिमहिषासुरच होता. त्याचा आकार गोल असून डोळे लाल होते. केंस रांठ उभे, जीभ लांब, दांत दीर्घ, स्वभाव क्रूर असा तो दैत्य दिसण्यांत भयानक होता. २१–२७.

[1]वर्तुलस्ताम्रनयन ऊर्ध्वकेशी भयंकरः । [2]लम्बजिव्हो महाक्रूरो दीर्घदन्तो[3] महाबलः ॥ २७ ॥
दृष्ट्वा विप्रसुतं बालं नाम्नैव हि गुणाकरम् । [4]घर्घरं शब्दमकरोत्तेन[5] व्याप्तं दिगन्तरम् ॥ २८ ॥
तेन शब्देन महता कम्पिता सकला मही । स बालो भयभीतश्च [6]सम्मुखो याति भास्करम् ॥
अतीव तेन संक्रुद्धो दैत्यो बालमुपागमत् । करालवदनो धावन्नुपधाव्य वदन्महत् ॥ ३० ॥
अतीव भीतो बालोऽसौ मूर्च्छां प्राप तत्क्षणात् । तमभक्षत्तदाश्वेष वक्त्रेणामिषगन्धिना ॥ ३१
अत्यजच्च समिद्दर्भं गृहस्यैवांतिके स वै । [8]तस्यासीज्जनको वीरो नागतः किं ममात्मजः ॥३२
विचिंत्य च मुहुः स्वांते मार्गयन्स वनं गतः । यत्रास्ति दैत्यो बालं न दृष्ट्वा पप्रच्छ तं द्विजः ॥३३
इतस्ततः केन कृताः समिधश्च[9] कुशा अपि । त्वया दृष्टोऽस्ति वा पुत्रो मम नाम्ना गुणाकरः ॥ ३४ ॥
इति श्रुत्वा वचस्तस्य दैत्यः प्राह द्विजं[10] प्रति । मयैव भक्षितः पुत्रस्तव[11] भो द्विजसत्तम ॥३५
इदानीं भक्षयामि त्वामिति श्रुत्वाऽग्निवक्त्रकः । अधावद् भयभीतः सन् क्रंदनो[12] ह्यतिदुःखितः ॥३६
पृष्ठतश्च महादैत्यो भक्षणार्थं कृतोद्यमः ।
स विप्रराजः पठमानमन्त्रो नानाप्रयोगैर्विनिवारयंस्तम्[13] ॥ ३७ ॥
स्मृत्वा हरिं सोऽभयभीतचित्तः समागमद्विष्णुहरान्तिके द्राक् ।

इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे सह्याचलोपाख्याने नारदांबरीषसंवादे कामाक्षीमाहात्म्यं नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

# अथ द्वितीयोऽध्यायः ।

## भक्तब्राह्मणः ।

नारद उवाच –

दुःखितो भयभीतः सन् चकितश्च द्विजोत्तमः । हरिहरान्तिके गत्वा तूष्णीं तस्थौ तदेकदृक् ॥
तं दृष्ट्वा सात्विकं विप्रं स्वभक्तं सर्वदा स्थितम् । जातं तु म्लानवक्त्रं तत् कमलापार्वतीपती ॥ २

हरिहरावूचतुः –

किं विषण्णोऽसि विप्रेंद्र भक्तराजोऽस्तु ते शिवं । सांप्रतं किमभूत्तत्र तद्वदस्व सविस्तरम् ॥३॥
इति तद्वचनं श्रुत्वा तौ प्राहाश्रिमुखो द्विजः ।

---

१ वर्तलाताम्रनयनमिति न. गो. क. पा. । २ बहुजिव्होमक्रुद्धा–द्धो– धेद्वति वा न. को. सि. मु. पु. पा. । ३ अस्तिदन्तेति सी. को. क. पा. । ४ घघरमिति सि. न. गो. च. को. पाठः । ५ व्याप्तस्वभूदिगन्तरमितिक को. च. व. मु. पु. पा. । ६ सन्मुखोचेमुकुचभास्करमिति क. न. को. गो. सि. मु. पु. पा. । ७ मूर्छापापततक्षिणात्–तक्षिकान्–तक्षिणः इति वा पु. पा. । ८ तस्यासौइति क. चं. मु. न. पु. पा. । ९ समिधश्चेति मु. पा. । १० प्राहविजातममिति मु. न. को. क. पु. पा. । ११ तपभोइति न. गो. सि. पु. पा. । १२ कन्दमोदि दुःखितः इति मु. सी. क. पु. पा. । १३ प्रयोगैर्विवारयदैत्यं–यैदत्य–दत्तामिति मु. गो. सि. न. को. च. क. पु. पा. ।

त्या विप्रपुत्र बाल गुणाकाराला पाहून त्यानें एक डरकाळी फोडली. त्या आवाजानें दशदिशा दणाणून गेल्या, व पृथ्वी कंपित झाली. तो मुलगा फार घाबरून गेला व सूर्याकडे तोंड करून उभा राहिला. २८–२९. अक्राळविक्राळ वदनाचा तो क्रुद्ध दैत्य धांवत त्या मुलाकडे आला, त्याच क्षणीं तो मुलगा मूर्च्छित झाला. लगेच त्या राक्षसानें आपल्या मांसगंधी मुखानें त्या बाळाचा घास घेतला व त्याच्या दर्भसमिधा घराच्या आसपास टाकून दिल्या. मुलाचा पिता शूर होता. माझा मुलगा अजून घरीं कां आला नाहीं, अशी चिंता करीत त्याच्या शोधासाठीं तो वनांत गेला. जेथें दैत्य रहात असे तेथें तो पोंचला. पण त्याला त्याचा मुलगा दिसला नाहीं. म्हणून त्यानें ह्या दर्भ-समिधा येथें कोणी टाकल्या? माझा मुलगा कोठें आहे? माझा पुत्र गुणाकर तुला आढळला का? अशी चौकशी त्या दैत्याकडे केली. ३०–३४. हें त्याचें भाषण ऐकून दैत्य त्या द्विजाला म्हणाला, द्विजोत्तमा, तुझा पुत्र मीच खाऊन टाकला. आतां तुलाही मी खाऊन टाकतों. हे त्याचे शब्द ऐकूनच अग्निमुख फार घाबरला व आक्रोश करीत पळत सुटला! त्याच्या मागून तो दैत्यही धावूं लागला; पण शेवटीं त्या श्रेष्ठ ब्राह्मणानें मंत्र म्हणून व अन्य विविध उपायांनीं त्या राक्षसाचें निवारण केलें. नतर भयभीत झालेला तो ब्राह्मण हरिस्मरण करीत हरिहरांच्या जवळ आला. ३५–३७.

# अध्याय २ रा

## भक्त ब्राह्मण

नारद म्हणाला, दुःखी, भयभीत व चकित झालेला तो ब्राह्मण हरिहरांजवळ गेला, व त्यांच्याकडे एकटक लावून स्तब्ध उभा राहिला. १. आपल्या सात्त्विक भक्ताचें तें म्लान वदन पाहून हरिहर त्याला म्हणाले, विप्रेंद्रा, तूं आमचा भक्तराज आहेस. मग एवढा दुःखी कां? तुझें कल्याण असो! तुझें दुःख सविस्तर सांग. २–३.

अग्निमुख उवाच –

भवत्कृपातिवृद्धोऽहमेतावत्समयावधि ॥ ४ ॥

न दृष्टवानशुभं क्वापि सोऽहं[1] मद्विमुखं गतः। मत्पुत्रः समिधाद्यर्थं प्रेषितो धर्मसिद्धये ॥५॥

सोऽद्य[2] माहिषदैत्येन भक्षितोऽस्ति हि मे प्रभो। मां[3] भक्षितुं समायातस्तं दृष्ट्वा निःसृतोऽस्म्यहम्॥

तस्मात् पुत्रस्य जीवार्थं दैत्यस्य वधकांक्षया। कर्म[4]धर्मस्य रक्षार्थमुपायः क्रियतां त्वया ॥७॥

हरिहरावूचतुः –

अशुद्धस्य विशुद्ध्यर्थं करटस्य विपं प्रति*। गच्छाशु निर्विकल्पस्त्वमंग ते निर्ज्वरः सुतः ॥८॥

कामाक्षिका यत्र भक्तहिताऽस्ति श्रीविष्णुरुद्रादिकृतश्च वासः।

तत्रादिमायां महिषमारणार्थं गत्वाऽऽशु तां प्रार्थय सर्वभूताम् ॥ ९ ॥

अस्मन्नाम्ना तु कुशलं पृष्ट्वा तस्या द्विजोत्तम। सह देव्या तया प्रीत्या समागच्छेष्टसिद्धये ॥१०॥

इति तद्वचनं श्रुत्वा ताभ्यामाश्वासितो द्विजः। तुष्टावोभावभीष्टयर्थं वाणीभिः सोऽग्निवक्त्रकः ॥

अग्निमुख उवाच –

नमो नमो ब्रह्मसुरेन्द्रवन्द्यनारायणायेत्यखिलेश्वराय।

रा[5]मेश्वरायापि नमोऽस्तु तस्मै यः सर्वभक्ताभयदः प्रभो ते ॥ १२ ॥

कैटभं ब[6]डिशं बाणं शकटं योऽवधीद्धरिः। अन्धकं त्रिपुरं रुद्रस्ताभ्यां भूयो नमो नमः ॥ १३॥

कमलापार्वतीशाभ्यां हरये शम्भवे नमः। विष्णवे शिवरूपाय विष्णुरूपाय शम्भवे ॥ १४ ॥

नारद उवाच –

इ[7]ति तयोः स्तुतिं कृत्वा स्मृत्वा नारायणं परम्। रमानाथं शिवाधीशं ययौ कामाक्षिकास्थलम्॥

तस्या निकेतनं गत्वा[8] तां दृष्ट्वा जगदम्बिकाम्। सर्वं चाकथयत्तस्यै तुष्टाव च सुरेश्वरीम् ॥१६॥

नमः कामाक्षिकायै ते भक्तानामभयप्रदे। हितं कुरु नमोऽस्तु ते सर्वदेवाभिवन्दिते ॥ १७ ॥

कामाक्ष्युवाच –

गच्छाव आशु रैग्रामं तं हनिष्यामि माहिषम्। तव पुत्रं प्रदास्यामि मा भैष्टं[9] द्विजसत्तम॥ १८

इति चाऽऽभाष्य तत्काले सह तेन द्विजन्मना। ग[10]च्छाऽऽगच्छामि मे तत्र पर्वते यत्र तावुभौ

तच्छ्रुत्वा सकलो लोक उ[11]पर्युपरि संस्थितः। तदा वै ह्यागतो राजन्नंबरीषः सकौतुकम् ॥२०॥

तदाऽभवत्पुष्पवृष्टिर्वाद्यादिनिनदो ह्यभूत्। जगुर्भक्तास्तद्गुणांश्च देव्याययौ काउराव्यात् ॥

---

१ सोहमद्यामुखंगतः इति न. गो. को. क. पु.। २ सोद्यमाहिषवश्येन दैत्येनगिलितास्तिहीति को. चं. मु. पा.। ३ माचमक्षितुभयातौनिवृत्त संशाया क्वचिदिति मु. गो. न. सी. को. क. पु. पा.। ४ सर्वधर्मस्यरक्षर्थेति मु. गो. सि. पु. पा.। ५ रामेश्वरायेति मु. गो. सी. न. क. को. पु. पा.। ६ डिब्कमिति मु. गो. न. पु. पा.। ७ इतितोस्तूष्णीत्यष्णीशौ स्मृत्वनारायणं परमिति मु. को. न. गो. क. पु. पा.। ८ कृत्वाइति सि. चं. गो. क. पु. पा.। ९ तस्यामीमाभीतोभवसत्रमइति सि. न. को. पु. पा.। १० ऐच्छादागंतुमैत्रववर्ततेयत्रेति न. सि. गो. क. पु. पा.। ११ उपरिपर्यसंस्थितइति को. क. न. गो. मु. पु. पा.।

हें त्याचें वचन ऐकून अग्निमुख ब्राह्मण म्हणाला, आतांपर्यंत तुमच्याच कृपेनें मी अत्यंत वृद्ध झालों. पण मला शुभ असें कांहींच पाहण्यास मिळालें नाहीं. देवा, तूं मला विमुख झालास. धर्मकार्यासाठीं समिधा आणण्यास मी माझ्या मुलास पाठविलें असतां, त्याला आज महिषासुरानें खाऊन टाकलें. तो मलाही खाण्यास आला असतां, त्याला पाहून मी पळून आलों. ५–६. म्हणून माझा पुत्र जिवंत व्हावा, दैत्याचा वध व्हावा व धर्मकर्माचें रक्षण व्हावें, यासाठीं तुम्ही उपाय करावा. ७.

हरिहर म्हणाले, विप्रा, निश्चिंत होऊन जा. तुझ्या पुत्राला बिल्कूल अपाय होणार नाहीं. ८. जेथें भक्तांचें कल्याण करणारी कामाक्षिका आहे, जेथें श्रीविष्णु-रुद्र इत्यादिकांचा वास आहे, त्या रैक्षेत्रांत जाऊन सर्व भूतधात्री आदिमायेला महिषासुरवधासाठीं प्रार्थना कर. ९. हे द्विजोत्तमा, आमच्या सांगण्यावरून देवीला कुशल विचारून तिच्यासह ये. म्हणजे तुझी इष्टसिद्धि होईल. १०. हें त्याचें बोलणें ऐकून अग्निमुख ब्राह्मणाला जरा धीर आला व त्यानें अभयसिद्धीसाठीं हरिहरांची स्तुति करण्यास आरंभ केला. ११.

हे देवा, ब्रह्मदेव व इंद्रादि देव यांनासुद्धां तूं वंदनीय आहेस. अखिलेश्वर नारायणा, तुला नमस्कार असो. सर्व भक्तांना अभय देणाऱ्या प्रभो रामेश्वरा, तुला नमस्कार असो. १२. ज्यांनीं कैटभ, बडिश, बाण, शकट, अन्धक व त्रिपुर या असुरांचा वध केला, त्या हरिहरांना नमस्कार असो. १३. कमलापति हरि व पार्वतीपति हर यांना नमस्कार असो. परमेश्वरांनो, विष्णुरूप शिव आणि शिवरूप विष्णु अशा तुमच्या उभय रूपांना प्रणाम असो. १४.

नारद म्हणाला, याप्रमाणें त्या हरिहरांची स्तुति करून कुलाधीश, रमानाथ नारायणाचें स्मरण करीत तो कामाक्षिकेच्या क्षेत्रीं निघून गेला. १५. कामाक्षी मंदिरांत जाऊन त्यानें देवीचें दर्शन घेतलें, सर्व वृत्तांत निवेदन केला, व तिची स्तुति केली. १६. हे देवी, तूं भक्तांना अभय देणारी कामाक्षिका देवी आहेस, तुला नमस्कार असो. सर्व देवांनीं तुला वंदन केलें आहे. हे स्तवनीय देवते, माझें कल्याण कर.

कामाक्षी म्हणाली, द्विजोत्तमा, आपण सत्वर रैग्रामीं जाऊं या. मी त्याचा वध करीन व तुझा पुत्र तुला देईन. तूं भिऊं नकोस. १७–१८. असें त्या ब्राह्मणास बोलून ती देवी पुनः म्हणाली, ब्राह्मणा, तूं पुढें जा, हरिहर जेथें वास करतात त्या पर्वतावर मी लगेच येईन. १९. हें वर्तमान समजतांच सगळे लोक लगेच वरच्या जागीं उभे राहिले. आश्चर्यानें अंबरीषराजाही उपस्थित झाला. २०. पुष्पवृष्टि झाली, वाद्यें वाजूं लागलीं, भक्तलोक प्रेमानें देवीचें गुणगान करूं लागले. अशा वेळीं काउराहून देवी येऊं लागली. २१.

कुत्रचिच्छीघ्रगा देवी क्वचिन्मंथरगाऽभवत् । एतादृशं हि तत्कर्म भक्तप्रीतिविवर्धनम् ॥२२॥
यत्र यत्राभवच्चिंता तत्र तत्र स्थिताऽभवत् । अपूजयच्च तत्पादौ भक्त्या सोऽग्निमुखो द्विजः ॥
ततः सा पठनामानं ग्रामं प्राप्ता महेश्वरी । सत्कृत्य भैरवाख्यो हि तस्थौ तत्रैककं दिनम् ॥
द्वितीये सह चेश्वर्या भैरवो गन्तुमुद्यतः । तं प्रत्याह जगन्माता कामाक्षी भक्तपालिका ॥२५

कामाक्ष्युवाच –

स्वग्रामे तिष्ठ भद्रं ते भैरवोत्तम सन्मते । गच्छामि परदेशं ह तत्र किंचित्प्रयोजनम् ॥ २६ ॥
तच्छ्रुत्वा भैरवः प्राह भवती यत्र वर्तते । तत्राहं विषये ग्रामे सत्यमेवाप्युदीरितम् ॥ २७ ॥
विज्ञाय तस्य तद्भावं कामाक्षी सर्वबोधिनी । भैरवाग्निमुखाभ्यां हि सह रायन्तिकेऽगमत् ॥

कामाक्ष्युवाच –

गच्छाग्निमुख तौ देवी ह्यागतास्तीति ब्रूहि च ।
ज्ञापयित्वाऽखिलं ताभ्यां मा गच्छस्व विलंब्य तौ ॥ २९ ॥
ततस्तदाज्ञया विप्रो गत्वा नारायणेश्वरौ । आगता सा जगन्माता इत्येवं कथयत्तदा ॥ ३० ॥
तदा तु लोकशैव्यैश्च सह तौ प्रीतिभावतः । प्रवेशाय च रैक्षेत्रे ह्यागतौ तत्समीपतः ॥ ३१॥
सा सत्कृता हरिहरद्विजभैरवाद्यैः वाद्यैश्च गायनमहोत्सवितैः समेता ।
सर्वैः स्तुता जयजयेति च पूर्णकामा कामाक्षिका प्रथितरैनगरं गताऽभूत् ॥ ३२ ॥

इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे सह्याचलोपाख्याने नारदांबरीषसंवादे कामाक्षी-माहात्म्ये द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

# अथ तृतीयोऽध्यायः ।

## महिषसैन्यवधः ।

नारद उवाच –

यदा प्रविष्टा कामाक्षी तत्रैव नगरे शुभे । सानन्दोऽभूज्जनः सर्वस्तत्रत्यः संप्रहर्षितः ॥ १ ॥
रामेश्वरस्य पार्श्वे तु स्थित्वा कामाक्षिकाम्बिकाम् । ऊचाते हरिगौरीशौ प्रसन्नां सुमुखीं शिवाम्

हरिहरावूचतुः –

विश्रभ्य दिवसं चैकं देवि शक्रादिवन्दिते । मत्तं तं महिषं हन्तुमुद्योगो विहितस्तव ॥ ३ ॥

नारद उवाच –

इति सम्प्रोचुस्ते देवाः श्रुतं तत्रत्यैः सर्वशः । श्रुत्वा परस्परं लोका मनस्यैवं व्यचिन्तयन् ॥४॥
महिषोन्मत्ततां दृष्ट्वा सा दुर्गा बलवर्धिनी । योद्धव्यं तैर्महादैत्यैः सहायबलवर्धनैः ॥ ५ ॥
इति संचिंत्य मनसि दैत्यान् पातालवासिनः । आहूय मण्डलं चक्रे नानाशस्त्रास्त्रधारिणाम् ॥६॥
ततो द्वितीयदिवसे सा माता जगदम्बिका । हरिणा च हरेणापि भैरवेण द्विजेन च ॥ ७ ॥
समन्विता गणैः सर्वैर्भूतानां षष्टिसम्मितैः । सार्द्धकोटित्रयैर्भूतैस्तीक्ष्णैर्मुखकरालकैः ॥ ८ ॥

ती कोठें शीघ्र गतीनें व कोठें मंद गतीनें चालत असे. जो कोणी तिचें चिंतन करीत असे त्याच्यासमोर ती उपस्थित होत असे. तिची प्रत्येक हालचाल भक्तांना आनंददायक होत असे. त्या अग्निमुख ब्राह्मणानें तिचें भक्तिपूर्वक पादसंवाहन केलें. नंतर ती महेश्वरी देवी पठ गांवीं पोंहोंचली, तेव्हां भैरवानें तिचा सत्कार करून तोही एक दिवस तेथें राहिला. दुसऱ्या दिवशीं भैरवही महेश्वरीसह निघण्यास तयार झाला. तेव्हां जगदंबा कामाक्षी त्याला म्हणाली—

हे भैरवोत्तमा, तूं विचारी आहेस. तूं आपल्याच गांवीं रहा. तुझें कल्याण असो. मी कांहीं कारणासाठीं परगांवीं जात आहें. २२–२६. तें ऐकून भैरव म्हणाला, देवी, जेथें आपण आहांत, त्या गांवीं मी असतों, असें सर्व म्हणतात. तें सत्यच झालें पाहिजे! २७. त्याची ती भक्ती पाहून सर्वज्ञ कामाक्षी देवी भैरव व अग्निमुख यांसह रैक्षेत्रीं गेली. २८.

कामाक्षी म्हणाली, अग्निमुख, त्या हरिहरांकडे जा व मी आल्याचें त्यांना निवेदन कर. विलंब लावूं नकोस. २९. नंतर तिच्या आज्ञेनें तो ब्राह्मण हरिहरांजवळ गेला व त्यांना जगदीश्वरी आल्याचें त्यानें सांगितलें. ३०. त्यावेळीं त्रैलोक्यांतील सर्व देवांसह हरिहर रैक्षेत्रीं तिच्या स्वागतासाठीं तिच्याजवळ उपस्थित झाले. ३१. हरिहर, द्विज व भैरव यांनीं तिचा सत्कार केला. वाद्यें वाजूं लागलीं. महोत्सव झाला. सर्वांनीं तिचा जयजयकार केला. अशा रीतीनें कामना पूर्ण करणारी देवी प्रसिद्ध रैनगरांत राहिली. ३०.

# अध्याय ३ रा

## महिषराक्षसाच्या सैन्याचा संहार

नारद म्हणाले, कामाक्षी देवीनें त्या सुंदर नगरांत प्रवेश केला, तेव्हां सर्व लोक आनंदित झाले. हरिहर रामेश्वरापाशीं उभे राहून प्रसन्न अशा कामाक्षीला म्हणाले, हे देववंद्य देवते, एक दिवस विश्रांति घेऊन महिषासुराला ठार मारण्याचें कार्य कर. १–३. नारद म्हणाला, हें देवांचें बोलणें सर्व लोकांनीं ऐकलें व ते लोकही महिषासुराचा उन्मत्तपणा पाहून चिंतित झाले. प्रबल होणाऱ्या या महादैत्याशीं मित्रसैन्याची मदत घेऊन युद्ध केलें पाहिजे, असा त्या बलवर्द्धिनी दुर्गेनें मनांत विचार केला. तिनें पातालवासी दैत्यांना युद्धाचें आव्हान देऊन नानाशस्त्रधारी सैन्याचा मंडलाकार व्यूह तयार केला. ४–६. दुसऱ्या दिवशीं हरि, हर, भैरव व द्विज यांसह सज्ज होऊन देवी वनांतील त्या बलवान् दैत्याचा वध करण्यासाठीं निघाली.

नानावादित्रनिर्घोषैः स्तुतिभिः सत्यभाषितैः । अर्थवादिद्विजश्रेष्ठैर्गीयमाना महाबलम् ॥ ९ ॥
जगाम वनसंस्थं तं दैत्यं हन्तुं कृतोद्यमा । तां दृष्ट्वा महिषो दैत्यो धावन्नागच्छदम्बिकाम् ॥ १० ॥
कामाक्ष्या बलवर्धिन्याजघ्ने तत्सैन्यनिष्ठया । ततोऽसौ भयभीतः सन् जगाम शरणं शिवाम् ॥ ११
रक्ष रक्ष कृपानेत्रे[1] दासोऽहं तव ह्यम्बिके । प्राप्तोऽद्य शरणं त्वाऽहमुपेक्षां मा कुरुष्व मे ॥ १२ ॥
नारद उवाच –
तेनोक्तमिति यद्वाक्यं तच्छ्रुतं हरिपूर्वकैः । ऊचुस्तं माहिषं शीघ्रं देह्यग्न्याख्यमुखात्मजम् ॥ १३ ॥
कामाक्ष्युवाच –
देह्यग्निमुखविप्रस्य सुतं बालं यथागतम् । पातालं गम्यतां शीघ्रं यदि जीवितुमिच्छसि ॥ १४ ॥
मामयं शरणं प्राप्तः[3] करोम्येवं[4] वधं तव । तच्छ्रुत्वा महिषो दैत्यो ह्युदीर्याग्निमुखात्मजम् ॥ १५॥
ददाम्यग्निमुखाख्याय विप्रराजाय ह्यम्बिके । गच्छामीत्यतिदुःखेन गतः पातालमन्दिरम् ॥ १६
प्राप्तः स विप्रतनयो हास्य[5]युक्तमुखः सुखः । कामाक्षीभक्ति[6]योगेन हरी रुद्रगुरू तथा ॥ १७॥
ततस्तु ह्यग्निवक्राद्याः स्तुतिं कर्तुं प्रचक्रमुः । कामाक्षिका जगन्माता हर्षोत्फुल्लविलोचना[7] ॥ १८
नमः कामाक्षिके तुभ्यं भक्तानां भयनाशिनि । सर्वकल्याणपदे देवि शर्वेन्द्रादिकवन्दिते ॥ १९॥
नमो देव्यै नमः शैव्यै वैष्णव्यै ते नमो नमः । हितायै हितकारिण्यै नमो देवि शुभप्रदे ॥ २०
शुभायै शुभरूपिण्यै शुभे शक्त्यै [8]नमो नमः । शूलादिधारके पुष्टे शुभदे बलवर्धिनि ॥ २१ ॥
भक्तसंकटघोरघ्ने देवि भूयो नमोऽस्तु ते । इति स्तुताग्निवक्राद्यैः सुप्रसन्ना सुरेश्वरी ॥ २२ ॥
शिवमस्तु सदाकालमित्याह च पुनः पुनः । तदा विष्णुशिवाद्यैश्च सहिता रैपुरेऽगमत् ॥ २३
तदष्टकेतने दिव्ये तस्थौ देवी च भैरवी । तस्य देवालये रम्ये या घंटा पट्टघट्टिते ॥ २४ ॥
तस्य गर्जनमात्रेण सर्वसंकटनाशनम् ।
कामाक्ष्युवाच –
मद्भक्तायां यदा काले संकटं जायते महत् ॥ २५ ॥
चोरप्रेतपिशाचादिभयं कुर्याद्विदारणम् । घंटावादनमात्रेण भैरवस्य महोजसः ॥ २६ ॥
सान्निध्यं जायते तत्र सर्वसंकटमुक्तये । गणाः षष्ठिसहस्रं च भूतसार्धत्रिकोटयः ॥ २७ ॥
आयान्ति तत्र नि[9]त्यं च भयनाशश्च जायते । तत्रैकं वर्तते कुण्डं सत्यार्थप्रतिपादकम् ॥ २८ ॥
तस्योर्ध्वं पट्टघंटा च सर्वसंकटनाशिनी । तच्छ्रुत्वाऽग्निमुखो विप्रो भूयो भूयः प्रणम्य ताम् ॥ २९
जगाम सह पुत्रेण निर्भयः सुप्रसन्नधीः ।

---

१ कृपापात्रेइति सि. गो. पु. पा. । २ गत्वाग्निमुखविप्रस्यगन्तव्यद्ग्रसातत्रमिति मु. को. सि. पु. पा. । ३ प्राता– प्राप्तमिति गो. न. क. को. पु. पा. । ४ चोचेकुरुवर्धनमिति सि. गो. को. मु. पु. पा. । ५ हासेति गो. को. पु. पा. । ६ भक्तितो नेमेइति मु. सि. न. पु. पा. । ७ विलोचनैरिति को. न. पाठः । ८ नयोदिवीशुभप्रदेति क्वचित्पाठः । ९ नित्यर्थमिति क. को. मु. गो. पु. पा. ।

तिनें बरोबर साडेतीन कोटी साठ भूतगण घेतले होते. त्यांची तोंडें तीक्ष्ण व भयानक होतीं. वाद्याचा घोष चालला होता. अर्थवादी द्विजश्रेष्ठ तिच्या शक्तींचें स्तुतिगायन करीत होते. अशा त्या जगदंबेला पाहतांच तो महिषासुर धांवत आला. ७–१०. त्याच्यावर बलवर्धिनी कामाक्षीनें आपल्या सैन्यांत स्थिर राहूनच प्रहार केला. त्यामुळें भयभीत होऊन तो दैत्य शिवादेवीला शरण येऊन म्हणाला, हे कृपानेत्र अंबिके, माझें रक्षण कर. मी तुझा दास आहें, तुला शरण आलों आहें. माझी उपेक्षा करूं नकोस. ११–१२. नारद म्हणाला, त्याचे ते उद्गार हरिहरांनी ऐकले व ते महिषासुराला म्हणाले, अग्निमुख ब्राह्मणाचा पुत्र लवकर त्याच्या स्वाधीन कर. १३.

कामाक्षी म्हणाली, तुझे प्राण तुला पाहिजे असल्यास अग्निमुख ब्राह्मणाचा पुत्र दे आणि तावडतोब पूर्ववत् पाताळांत निघून जा. १४. तूं मला शरण आला आहेस. न पेक्षां मी तुझा वधच केला असता. हें ऐकून अग्निमुखाचा मुलगा आपल्या उदरांतून बाहेर टाकून दैत्य म्हणाला, हे अंबिके, हा मुलगा अग्निमुखाला देऊन मी पाताळमंदिरांत जातों. १५–१६. नंतर कामाक्षीच्या भक्तीमुळें तो हंसतमुख आनंदी द्विजपुत्र हरिहर गुरूंना पुनः मिळाला. १७. अग्निमुख इत्यादिकांनीं देवीची स्तुति केली. जगन्माता कामाक्षीदेवीचे नयनही आनंदानें विकसित झाले. १८.

हे कामाक्षिके, तूं भक्तांचें भय दूर करणारी आहेस, तुला नमस्कार असो. रवि इत्यादि अखिल देवता तुला वंदन करतात. तूं सर्वांचें कल्याण करणारी देवी आहेस. तुला नमस्कार असो. १९. शैवी व वैष्णवी देवीला नमस्कार असो. हिता, हितकारिणी, शुभप्रदा, शुभा, शुभरूपिणी, शक्ति, शूलधारिका, पुष्टा, शुभदा, बलवर्धिनी अशीं तुझीं रूपें असून तूं भक्तांचें घोर संकट दूर करणारी आहेस. तुला नमस्कार असो. अग्निवक्त्र इत्यादिकांच्या स्तुतीमुळें देवी प्रसन्न झाली, २०–२२. व तुमचें सर्वकाळ कल्याण असो, असा आशीर्वाद देऊन ती विष्णु-शिव-देवांसह रैनगरांत गेली. तेथें ती दिव्य अष्टकेतन मंदिरांत राहिली व भैरवनाथ घंटांची लोखंडीपट्टी जोडलेल्या सुंदर देवालयांत राहिला. २३–२४.

त्याच्या केवळ गर्जनेनें सर्व संकटांचा नाश होतो. कामाक्षी म्हणाली, जेव्हां माझ्या भक्तांना चोर, प्रेत, पिशाच इत्यादिकांचें भय उत्पन्न होईल, तेव्हां महाप्रतापी भैरवाच्या घंटानादानें त्यांचें तें भय नाश पावेल. २५–२६. त्यांचें संकट दूर करण्यासाठीं साठ हजार गणांचें सांनिध्य असेल व साडेतीन कोटी भूतें सदैव येत राहतील, त्यामुळें भयनाश होईल. तेथें एक वस्तुस्थिति सांगणारें कुंड आहे. त्यावर सर्वसंकटनाशिनी घंटापट्ट आहे. हें सर्व ऐकून अग्निमुखानें देवीला नमस्कार केला, आणि निर्भय व आनंदित होऊन पुत्रासह तो घरीं गेला.

नारद उवाच –

ततः सहेशानरमापतिभ्यां स्वसेवकाभ्यां स्वगणैश्च देवी ।

तस्थौ च रैग्राम इयं सदैव कामाक्षिका भक्तवरप्रदात्री ॥ ३० ॥

इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे सह्याचलोपाख्याने कामाक्षीमाहात्म्ये महिषसैन्यादिवधो नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

## अथ चतुर्थोऽध्यायः ।

### महिषासुरमर्दिनी ।

अंबरीष उवाच –

कथं देवी जगन्माता महिषासुरमर्दिनी । अभूत् कामाक्षिका नाम्ना तद्वदस्व सविस्तरम् ॥

नारद उवाच –

अभवन्माहिषो नाम पुरा काले महासुरः । शक्रादीनमरान् जित्वा स्वयं जातः पुरंदरः ॥२॥

हृताधिकारास्त्रिदशा ब्रह्माणं शरणं ययुः । तैः सार्धं परमेष्ठी च शिवहर्यन्तिके ययौ ॥ ३ ॥

ताभ्यां चाकथयत्सर्वं महिषासुरचेष्टितम् । शरणं हि युवां सार्धं देवैरद्यागतोऽस्म्यहम् ॥ ४ ॥

तदा तौ प्राहतुस्तं च शक्रादीन् विबुधोत्तमान् । स्तुहि स्तुहि च तां देवीं मोहिनीं वैष्णवीं शुभाम् ॥ ५ ॥

ब्रह्मोवाच –

नमो देव्यै शिवायै ते वैष्णव्यै ते नमो नमः । अवाच्यायै ह्यनन्तायै सुरेश्वर्यै नमो नमः ॥६॥

महामाहेश्वरी या सा तस्यै देव्यै नमो नमः । इति स्तुता तदा देवी देवैर्ब्रह्मपुरःसरैः ॥ ७ ॥

अंबरीष उवाच –

वैष्णवी का भवानी का कस्य देवस्य साम्बिका । शक्तिः सर्वेश्वरी देवी यथा तद्वक्तुमर्हसि ॥

नारद उवाच –

विष्णोः शिवस्य चान्येषां ब्रह्मादीनां पृथक् पृथक् ।

बलाज्जातशरीरा सा तच्छस्त्राभरणान्विता ॥ ९ ॥

ततोऽभूत्प्रकटा देवी सहस्रार्कसमप्रभा । सर्वेष्टफलदा सर्वा सर्वचेतोविमोहिनी ॥ १० ॥

सुमुखी किं विशेषेण बहुसर्वांगसुन्दरी । अतिसुंदरनेत्राभ्यां कामाक्षीति च वि[illegible]ता ॥ ११॥

सिंहारूढा महावीर्या सुवस्त्रा पीवरस्तनी । घंटाहस्ता दिव्यरूपा त्रिशूलायुधभूषिता ॥ १२ ॥

सर्वदेवैः समायुक्ता जगाम महिषासुरम् । रथस्थैर्बहुभिर्दैत्यैर्महावीर्यैर्महाबलैः ॥ १३ ॥

महिषेण समं दैत्यं विश्राणं दीर्घशृंगकान् । हुंकारैर्गां कम्पयंती जघान स्वस्य शूलतः ॥१४॥

---

१ महाबलमिति गो. न. सि. पु. पा. । २ रकुरैप्रकम्पयन्तिगामिति सि. न. गो. क. पु. पा. ।

नारद म्हणाला, त्यावेळेपासून शंकर, रमापति आणि आपलें गण यांसह वरदा कामाक्षिका सदैव रैश्रामीं राहिली. २७–३०.

# अध्याय ४ था

## महिषासुरमर्दिनी

अंबरीष म्हणाला, जगन्माता कामाक्षीदेवी महिषासुरमर्दिनी कशी झाली, हें सविस्तर सांगा. १.

नारद म्हणाला, पूर्वी माहिष्र नांवाचा एक महासुर होता. इंद्रादिदेवांना जिंकून तो स्वतः पुरंदर बनला. २. तेव्हां अधिकारभ्रष्ट झालेले सर्व देव ब्रह्मदेवाला शरण गेले. नंतर त्या सर्वांस बरोबर घेऊन ब्रह्मदेव हरिहरांकडे गेला. ३. त्यांना महिषासुराची हकीगत सांगून चतुर्मुख म्हणाला, सर्व देवांसह मी तुम्हांला शरण आलों आहें. ४. तेव्हां शक्रादि सर्व देवांना उद्देशून हरिहर म्हणाले, तुम्ही शुभ अशा वैष्णवीमोहिनीची स्तुति करा. ५. ब्रह्मदेव म्हणाला, हे देवी, तुझ्या वैष्णवी व शिवशक्तीला नमस्कार असो. अवाच्या, अनन्ता, व सुरेश्वरी यांना नमस्कार असो. त्या महामाहेश्वरी देवीला नमस्कार असो. याप्रमाणें ब्रह्मादि सर्व देवांनी देवीची स्तुति केली. ६-७.

अंबरीषानें प्रश्न केला, वैष्णवी, भवानी, अम्बिका, शक्ति व सर्वेश्वरी देवी या सर्वांचें योग्य प्रकारें स्वरूपवर्णन करून मला सांगा. ८.

नारद म्हणाले, विष्णु, शिव व दुसरे ब्रह्मादि विविध देव यांच्या शक्तीपासून शस्त्राभरणसंपन्न अशी मूर्ति निर्माण झाली. ९. त्या देवीचें तेज सहस्रसूर्यासारखें असून ती इष्ट फल देणारी व सर्वांचें मन मोहित करणारी होती. त्या सर्वांगसुंदरी व सुवदना देवीचे नेत्र विशेष सुंदर होते, म्हणून ती कामाक्षी या नांवानें प्रसिद्ध झाली. १०–११. महापराक्रमी व पीवरस्तनी ती देवी महावस्त्र नेसून सिंहावर बसली. तिचें रूप दिव्य होतें. एका हातांत घंटा असून अन्य हातांत त्रिशूळ इत्यादि आयुधें शोभत होतीं. मोठ्या थाटांत ती देवी सर्व देवांसह महिषासुरावर चाल करून गेली. महिषासुर महिषाप्रमाणें महाशृंगधारी होता हा महाबलवान् व पराक्रमी दैत्य रथांत बसून लढण्यासाठीं आला. पण जिच्या केवळ हुंकारानें पृथ्वी कांपत होती अशा त्या देवीनें आपल्या त्रिशूळानें महिषासुराचा वध केला. १२–१४.

देवदुंदुभयो नेदुर्ननृतुश्चाप्सरोगणाः । जेगुर्गंधर्वपतयः पुष्पवृष्टिः पपात च ॥ १५ ॥
नमो नमोऽस्तु ते देव्यै कामाक्ष्यै भयनाशिनि । इति ब्रह्मादयो देवा भूयस्तां तुष्टुवुः पुनः ॥
इति देव्याः समाख्यातं तुभ्यं राजेन्द्र पृच्छते । श्रीकामाक्षिकामाहात्म्यं सर्वपापप्रणाशनम् ॥

अम्बरीष उवाच –

माहात्म्यं जगदंबायाः किमिदं कौतुकं शृणु । यथा पूर्वं तथैवैतद्रैक्षेत्रे नु कथानकम् ॥ १८ ॥
तथा चतुर्मुखो ब्रह्मा देवौ हरिहरावुभौ । सैव कामाक्षिका देवी महिषो महिषासुरः ॥ १९ ॥

नारद उवाच –

य इदं पठते पुण्यं शृणुते वा नराधिप । रैक्षेत्रगायाः कामाक्ष्या माहात्म्यं पापनाशनम् ॥ २० ॥
संवत्सरकृतात्पापान्मुच्यते नात्र संशयः । मनोरथाः प्रसिध्यन्ति प्राप्नोति परमां गतिम् ॥ २१
आराधयेद्धि यो नित्यमिमां भक्तेष्टदायिनीम् । कामाक्षीमेकभक्तिः सन् स लभेद्वाञ्छितं फलम् ॥
धर्मार्थकाममोक्षांश्च शीघ्रं चास्याः प्रसादतः । शमं दमं सुखं वित्तं सौभाग्यं लभते नरः ॥ २३ ॥
पुत्रपौत्रप्रजाकीर्तीः पशुं स्वर्गपरं पदम् । अस्याः प्रसादतोऽलभ्यं नास्ति किंचिन्महामते ॥२४॥
रैक्षेत्रं परमं पुण्यमिदं कामाक्षिकालयम् । संघा यत्राम्बिकाविष्णुपुरुषेश्वरभैरवाः ॥ २५ ॥
अन्यत्र वर्षतः पुण्यं कृत्वा यल्लभते फलम् । तदत्र मासमात्रेण नात्र कार्या विचारणा ॥ २६ ॥
यो नरः कार्तिके मासे शुक्ले च द्वादशीनिशि । नारायणोत्सवं कुर्यात्क्षेत्रे भक्तसत्तमः ॥ २७ ॥
यो नरोऽप्यथ कृष्णायां चतुर्दश्यां प्रसन्नधीः । शिवरात्र्यामीश्वरस्य महोत्साहं करोति च ॥२८॥
यो नरश्चाश्विने शुक्ले नवरात्रेऽम्बिकोत्सवम् । कामाक्ष्या उत्सवं कुर्यात्तस्य पुण्यफलं शृणु ॥२९॥
धनं धान्यं पशून्पुत्रान् दीर्घमायुर्लभेत सः । भुक्त्वेह सकलान् भोगान् याति विष्णोः परम्पदम् ॥

नारद उवाच –

इति ते कथितं राजन् रैकामाक्षीकथाफलम् । पठतः शृण्वतश्चापि सर्वाभीष्टप्रदायकम् ॥ ३१ ॥
इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे सह्याचलोपाख्याने कामाक्षीमाहात्म्ये चतुर्थोऽध्यायः

---

१ जगुर्गंध–गाध– र्व– बगन्धर्वाते–द्याश्वसिति न. गो. कां. चं. को. पु. पा. ।

देवांच्या दुंदुभी वाजूं लागल्या; अप्सरा नाचूं लागल्या. गंधर्व गाऊं लागले व पुष्पवृष्टि झाली. १५. भयनाशिनी कामाक्षी देवी, तुला नमस्कार असो, अशी ब्रह्मदेवानें तिची पुनः स्तुति केली. १६. हे राजेन्द्रा, तूं विचारलेंस म्हणून तुला हें देवीचें आख्यान सांगितलें आहे. हें कामाक्षीमाहात्म्य सर्व पाप नाश करणारें आहे. १७.

नारद म्हणाले, हे राजा, रैक्षेत्रस्थ कामाक्षीचें हें पापविनाशी व पवित्र माहात्म्य जो वाचतो किंवा ऐकतो, तो एक वर्षपर्यंत केलेल्या पापांतून निश्चित मुक्त होतो. त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात व शेवटीं त्याला श्रेष्ठ गति मिळते. २०–२१. भक्तकामना पूर्ण करणाऱ्या ह्या देवीची जो एकनिष्ठ भक्त नित्य आराधना करील, त्याच्या इच्छा पूर्ण होईल. २२. हिच्या प्रसादानें मनुष्याला धर्म, अर्थ, काम, मोक्ष, शम, दम, सुख, वित्त व सौभाग्य यांचा लाभ होतो. २३. हे महामते, हिच्या प्रसादानें मनुष्याला पुत्रपौत्र, संतति, कीर्ति, पशु व स्वर्गाहून श्रेष्ठ स्थान मिळतें; त्याला दुर्लभ असें कांहींच नाहीं. २४. जेथें अंबिका, विष्णु, पुरुष, ईश्वर व भैरव आहेत तें हें रैक्षेत्र कामाक्षिकास्थान आहे. २५. अन्य क्षेत्रांत एक वर्ष पुण्य केल्यानें जें फल मिळतें, तें फल येथें एका महिन्यांत मिळतें. २६. जो मनुष्य कार्तिक महिन्यांतील शुक्ल पक्षाच्या द्वादशीच्या रात्रीं रैक्षेत्रांत नारायणोत्सव करील, जो कृष्ण चतुर्दशी शिवरात्रीं ईश्वराचा महोत्सव करील व जो आश्विन महिन्याच्या शुक्ल पक्षांत देवी कामाक्षीचा नवरात्रमहोत्सव करील, त्याचें फल ऐक. २७–२९. त्या मनुष्याला धनधान्य, पशु, पुत्र व दीर्घायुष्य प्राप्त होईल. त्याला सकल ऐहिक भोग प्राप्त होऊन शेवटीं विष्णुपदाचीही प्राप्ति होईल. ३०.

नारद म्हणाला, हे राजा, रैक्षेत्रस्थ कामाक्षीच्या कथेचें फल तुला सांगितलें आहे. जो हें वाचील व ऐकील त्याच्याही सर्व इच्छा पूर्ण होतील. ३१.

## ॥ ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥

# अथ मांगीशमाहात्म्यम् ।

## प्रथमोऽध्यायः ।

शंकरपार्वत्योर्द्यूतम् ।

सूत उवाच –

इत्थं निशम्य शितिकंठसुतात्पवित्रामानंदकाननकथामथ सोऽप्यगस्त्यः ।
नत्वाऽथ षण्मुखपदं परमादरात्तं प्रष्टुं प्रचक्रम इदं स्वमनीषितं यत् ॥ १ ॥

अगस्त्य उवाच –

षडानन महाप्राज्ञ सर्वशास्त्र[1]विशारद । विश्वेश्वरकथां रम्यां ब्रूहि सर्वाघनाशिनीम् ॥ २ ॥

स्कंद उवाच –

शृणु ब्रह्मन् कथां रम्यां विश्वे[2]श्वरकथान्वितां[3]म् । सूतः प्रोवा[4]च यां साक्षाच्छृण्वतो मुनिसत्तमान् ॥ ३ ॥

देवर्षिर्नारदो ब्रह्मन्पर्यटन् भुवनत्रयम् । केनचित्त्वथ कालेन महादेवनिकेतनम् ॥ ४ ॥
कैलासमगमद्धीमान् द्रष्टुं सर्वेश्वरं प्रभुम् । ददर्शाऽप्य[5]थ तं देवं सर्वज्ञं त्रिपुरान्तकम् ॥ ५ ॥
तत्र[6] सिंहासने दिव्ये पार्वत्या सह संस्थितम् । स्तुतं गन्धर्वसंघैश्च गीतं[7] ब्रह्मर्षिभिः स्वयम् ॥
सनकाद्यैर्यो[8]गसिद्धैः सेवितं भक्तकामदम् । नीलकंठं पंचवक्त्रं शुद्धस्फटिकसन्निभम् ॥ ७ ॥
तं शम्भुं नारदः प्राह तोषयित्वा स सामभिः । वचनैर्विविधैः श्लक्ष्णैः प्रणिपत्य पुनः पुनः ॥८॥

नारद उवाच –

भगवन्त्वामहं प्रष्टुमि[9]च्छाम्येकं वदस्व मे । केन केनावतीर्णोऽसि रूपेण त्वं महीतले[10] ॥ ९ ॥
यानि ते क्षेत्रमुख्यानि लिंगान्यायतनानि च । तथैव दिव्यलिंगानि दर्शनात् पुण्यदान्यलम् ॥
तत्सर्वं तु त्वमेवाद्य[11] वेत्सि नान्यस्तु कश्चन[12] । अतो वयं च जानीमः श्रुत्वा त्वन्मुखपंकजात् ॥
अतः[13] कथय नो देव कथां कलिमलापहाम् । सर्वपापहरां पुण्यां सर्वसंपत्प्रदायिनीम् ॥ १२ ॥

स्कंद उवाच –

इत्थं तद् विष्णुभक्तस्य मुनेर्वाक्यं निशम्य च । शंकरः प्रहसन्नाह देवर्षिं नारदोत्तमम् ॥१३॥

---

१ विद्याविशारदेति यत्नितपुस्त० । २ महादेव मि. यं. पुं. पा. । ३ कथाश्रितामिति यं. पु. पा. । ४ प्रोवाच्चयां सुतस्साक्षादियं मु. को. पु. पा. । ५ ददर्शाव्यथतमिति यं. पु. पा. । ६ तस्मिन्सीव्हानेति यं. पु. पा. । ७ जुतमिति यं. मु. पु. पा. । ८ योगिभिश्चेति व. क्वचित्पाठः । ९ आगतोहंवदस्वमे इति यं. पु. पा. । १० महेश्वरेति यं. पु. । ११ वाद्धावेत्सीति यं. पु. । १२ किंचनेति यं. मु. पु. पा. । १३ आगस्तेतंश्रीमहादेवउवाचेति यं. पु. पा. ।

# अध्याय १ ला

## शंकर व पार्वती यांचे वृत्त

सूत म्हणाले, याप्रमाणें अगस्त्यानें शिवसुताकडून आनंदकाननाची कथा ऐकली, व षण्मुखाच्या चरणांना वंदन करून आपल्या मनांतील हेतु त्यास विचारला. अगस्त्य म्हणाले, षडानना, तूं महाबुद्धिमान व सर्वशास्त्रविशारद आहेस; यासाठीं सर्व पापनाश करणारी विश्वेश्वराची रमणीय कथा सांग. २.

स्कंद म्हणाला, हे ब्रह्मन्, विश्वेश्वराची सुंदर कथा ऐक. हीच कथा पूर्वी सूतानें मुनिश्रेष्ठांना सांगितली होती. ३. एकदां श्रीमान् देवर्षि नारद तिन्ही लोकांत फिरत फिरत महादेवाचें स्थान कैलास येथें आले. तेथें त्याला पार्वतीसह दिव्य सिंहासनावर बसलेले त्रिपुरांतक सर्वज्ञ शंकर दिसले. त्यावेळीं गंधर्व त्यांची स्तुति करीत होते. प्रत्यक्ष ब्रह्मर्षि गायन करीत होते. योगसिद्ध सनकादि मुनि त्याची सेवा करीत होते. स्फटिकधवल, नीलकंठ, पंचमुख, व भक्तकामना पूर्ण करणाऱ्या शंकरास सामवेदानें संतुष्ट करून व पुनः प्रणाम करून नारद गोड शब्दांनीं बोलूं लागला ––

नारद म्हणाला, हे भगवन्, मी तुम्हांला एक प्रश्न विचारूं इच्छितों. या पृथ्वीतलावर तुम्ही कोणकोणत्या रूपानें अवतार घेतला आहे ? ४–९. तसेंच ज्यांच्या दर्शनानें पुण्यप्राप्ति होते अशीं क्षेत्रप्रमुख लिंगें, दिव्य लिंगें, देवालयें याविषयींची माहिती आम्हांस सांगा. कारण तुमच्याशिवाय दुसरा कोणीही हें सांगूं शकणार नाहीं. म्हणून तुमच्याच मुखकमलांतून ही कथा आम्ही ऐकूं इच्छितों. कलिमल दूर करणारी, सर्व पापनाशिनी व संपत्तिदायक अशी ही कथा सांगा. १०–१२.

स्कंद म्हणाला, विष्णुभक्त नारदाचें हें भाषण ऐकून शंकर हंसले व देवर्षि नारदाला म्हणाले, १३.

सहादेव उवाच –

साधु पृष्टं महाभाग लोकानां हितकाम्यया । भगवद्भक्तियुक्तानां किमज्ञातं भवादृशाम् ॥१४॥
जंगमस्थावराणां च सिद्धानमपि योगिनाम् । दिवौकसां खेचराणां जलस्थलनभौकसाम् ॥१५॥
आत्माऽसौ भगवान्विष्णुः परमात्मा सनातनः । त्वद्हृत्कमलमध्यास्ते सर्वज्ञोऽसि ततो भवान् ॥
अथापि वत्स यन्मां त्वं पृष्टवानसि सत्कथाम् । तत्तेऽहं संप्रवक्ष्यामि लोकनिर्वाणहेतवे ॥१७॥
कथयिष्ये शुभां रम्यां कथां पापप्रणाशिनीम् । यामहं प्रोक्तवान् स्कंद ह्यात्मजाय पुरा मुने ॥
कैलासशिखरे रम्ये पार्वत्या द्यूतमारभे । मया दत्तो जयस्तस्यै कौतुकाय च नारद ॥ १९ ॥
तदा द्यूते जितो वत्स पार्वत्याऽहं मुनीश्वर । बहुधा विप्रलब्धोऽपि निष्ठुरैर्वाग्विजृंभितैः ॥ २० ॥
पार्वत्या भाषितोऽहं च निर्वेदं परमं गतः । तत् स्थानं त्यक्तुमिच्छा मे जाता निर्वेदतो मुने ॥२१
तस्मात् स्त्रीसहवासी च दुःखमाप्नोत्यसंशयम् । स्त्रीणां खलानां संसर्गाद्भवेयुर्दुःखहेतवः ॥२२॥
वनितासहवासेन भवेद्दुःखस्य भाजनम् । योषित्संगवशादेव सर्वे नष्टास्तु जंतवः ॥ २३ ॥
इंद्रोपेंद्रसुरज्येष्ठाश्चंद्रादित्यादयो ग्रहाः । तस्माच्च बुद्धिमान् नारीं दूरतः परिवर्जयेत् ॥ २४ ॥
द्यूते मद्ये स्त्रियां धूर्ते मूर्खे च कितवे तथा । विश्वासो नैव कर्तव्यो य इच्छेच्छुभमात्मनः ॥२५॥
यथा वन्हिशिखा दीप्ता विषं वा स्वल्पमात्रकम् । प्रमादादप्रमादाद्वा दहेत्येव कुलं सकृत् ॥२६
इति संचिन्त्य मनसा सर्वसंगविवर्जितः । तदाऽहं पार्वतीं त्यक्त्वा जगाम तपसे वनम् ॥ २७ ॥
इति श्रीस्कन्दपुराणे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे शंकरनारदसंवादे मांगीशमाहात्म्ये प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

## अथ द्वितीयोऽध्यायः ।

### शंकरतपश्चर्या ।

अगस्त्य उवाच –

हरनंदन मे ब्रूहि कथां वैश्वेश्वरीं पुनः । न तृप्तिमधिगच्छामि श्रुत्वा त्वन्मुखपंकजात् ॥ १ ॥
क्व गतः स च सर्वात्मा तपस्तप्तुं वदस्व तत् । अकामेन कथं तप्तं तपः संसारतारकम् ॥ २ ॥
मनुजा दनुजा दैत्या आदितेया दिवौकसः । यत्पदाम्भोजभजनान्निस्तरन्ति भवार्णवम् ॥३॥
अकामाश्च सकामाश्च ध्यात्वा यच्चरणाम्बुजम् । अभीप्सितं फलं सद्यो लभन्ते नाऽत्र संशयः ॥
पूर्णकामः कथं देवस्तपसे धृतमानसः । एतद्विस्तरतो ब्रूहि मह्यं शिवविचेष्टितम् ॥ ५ ॥
सर्वज्ञसूनुस्तच्छ्रुत्वा प्रोवाच जपतां वरम् । अगस्त्यं सुमहात्मानं लोपामुद्रापतिं मुनिम् ॥ ६

---

१ दद्मासि मु. पु. पा. । २ कथामि यं. पु. पा. । ३ स्वबृत्तांताश्रितांद्विजेति यं. मु. चे. गो. पु. पा. । ४ प्रोवाचयामहंस्कंदं पृच्छंतं तत्वहेतवेति यं. पु. पा. । ५ किलस्वयमिति यं. पु. पा. । ६ तयाबहुविप्रलब्धो. य. पु. पा. । ७ द्यूते मद्येस्त्रियांचैवेति यं. पु. पा. । ८ स्वल्पेति यं. पु. पा. । ९ चास्वल्पमात्कृतमिति गो. त्रं. मु. पु. पा. । १० स्पृष्टंयद्दहतेनरः इति मु. को. सि. का. पु. पा. ।

हे महाभागा, लोककल्याणासाठीं तूं चांगला प्रश्न विचारलास. आपल्यासारख्या भगवद्भक्तांना अज्ञात असें काय आहे ? कारण देव, ग्रह, जलचर, भूचर व आकाशस्थ प्राणी या सर्वांचा आत्मा भगवान् विष्णु आहे व तोच तुझ्या हृत्कमलीं वास करीत असल्यानें तूं सर्वज्ञच आहेस. तथापि हे वत्सा, मीं पूर्वी हीच सुंदर पापनाशिनी कथा माझ्या जिज्ञासु पुत्राला (स्कंदाला) सांगितली होती; तीच कथा लोकमुक्तीसाठीं आतां मी तुला सांगतों. १४–१८.

नारदा, कैलास पर्वताच्या रमणीय शिखरावर एकदा पार्वतीसह मी द्यूत खेळूं लागलों; त्या द्यूतांत मी कौतुकानें पार्वतीला विजय मिळूं दिला. १९. पण वत्सा, माझा पराजय होतांच पार्वतीनें कठोर शब्दांनीं माझा छळ केला. २०. मुने, पार्वतीच्या त्या कठोर शब्दांनीं मला फार कष्ट झाले. म्हणून तें स्थान सोडून अन्यत्र जाण्याचा विचार माझ्या मनांत आला. २१. मनुष्याला स्त्री–सहवासांत दुःख हें व्हावयाचेंच ! कारण स्त्रिया व दुर्जन यांचा संसर्ग दुःखकारक असतो. २२. वनिता–सहवासानें मनुष्य दुःखास पात्र होतो. फार काय, स्त्रीसंगामुळें सर्व प्राणी नाश पावले आहेत. २३. इन्द्र, उपेन्द्र इत्यादि श्रेष्ठ देव आणि चंद्र, आदित्य इत्यादि ग्रह हे सुद्धां कलंकित झाले आहेत. म्हणून शहाण्या माणसानें स्त्रियांपासून पूर्ण दूर असावें. २४. कल्याणेच्छु माणसानें द्यूत, मद्य, स्त्री, धूर्त, मूर्ख व लबाड यांवर विश्वास ठेवूंच नये. २५. कारण प्रज्वलित अग्निज्वाला व विष यांचा चुकूनसुद्धां जर संसर्ग घडला तर घात झालाच म्हणून समजा. २६. याप्रमाणें विचार करून मी सर्वसंगमुक्त झालों व पार्वतीचा त्याग करून तपश्चर्येसाठीं वनांत गेलों. २७.

## अध्याय २ रा

## शंकराची तपश्चर्या

अगस्त्य म्हणाला, शिवसुता, तुझ्या मुखकमलांतून कितीही श्रवण केलें तरी तृप्ति होत नाहीं. म्हणून ही विश्वेश्वरकथा पुढें सांग. १. तो सर्वात्मा प्रभु तपश्चर्येसाठीं कोठें गेला ? इच्छाच नाहीं, मग संसारतारक तप त्यानें कसें केलें ? २. मानव, दानव, दैत्य व देव हे सर्व ज्याच्या चरणकमलाच्या भक्तीनें भवसागरांतून पार पडतात, सकाम व निष्काम लोक ज्याच्या चरणकमलाचें ध्यान करून इष्ट फल मिळवितात, तो पूर्णकाम देव शंकर तपश्चर्येला कसा तयार झाला ? हें शिवचरित्र सविस्तर सांग. ३–४. हें ऐकून सर्वज्ञ कुमार स्कंद लोपामुद्रापति अगस्त्यास म्हणाला —

स्कंद उवाच –

तस्मात्स्थानाद्विनिर्गत्य कृष्णावेण्योश्च संगमे । तपश्चकार सुमहत् संगमेश्वरनामतः[1] ॥ ७ ॥
तत्रस्थान् प्राणिनः सर्वान् तारयन्वै[3] स्वदर्शनात् । कंचित्कालं स्थितस्तत्र विचार्य वंशभूतिभृत्[4]
कस्मिंश्चित्समये पूर्वं जामदग्न्यो महामनाः । ब्राह्मणेभ्यो ददौ भूमिं द्रव्यरत्नादिकं च यत् ॥
ततः स चिन्तयामास मम वासः कुतो भवेत् । तदानीमेव निश्चित्य सामुद्रं स्थलमुत्तमम् ॥
विचार्यैवं जगामाऽऽशु पारावारस्य सन्निधिम् । त्रेताद्वापारयोस्सन्धौ समुद्रस्योदरे स्थिताम् ॥
भूमिं ययाचे[5] वासाय पारावारं स्वयं हरिः । आकूपारेण नो दत्ता तदा क्रुद्धः स्वयं हरिः ॥ १२
शरं धनुषि सन्धाय शासनार्थं समुद्यतः । उत्ससर्ज तदा भीत्या समुद्रः परतो गतः ॥ १३ ॥
तत्र रामः स वसति लोकानुग्रहहेतवे[6] । गंतव्यं[7] हि मयाप्यद्य स्वगणैः सह तत्र वै ॥ १४ ॥
इति निश्चित्य स ययौ सागरान्तिकमीश्वरः । हिमाचलसुताजानिर्वासं चक्रे महामतिः ॥ १५

अगस्त्य उवाच –

गते सदाशिवे शंभौ गणैः सह षडाननः । किञ्चकाराथ सा गौरी कथयस्व तपोधन ॥ १६

स्कंद उवाच –

सा निर्वेदं परं प्राप्ता विललाप सखीजने । ज्ञात्वा स्वपूर्ववृत्तांतं स्वपितृगृहसम्भवम् ॥ १७ ॥
हे नीलकंठ वृषभध्वज कामशत्रो हे कांत हे दशभुजाद्यसुरेश्वरेश ।
हे पञ्चवक्त्र मम भाग्यनिधे सुरारे । मामुद्धरोद्धर कृपां कुरु कामतप्ताम् ॥ १८ ॥
अहो कष्टतरं लोके स्त्रीणां जन्म जुगुप्सितम् । प्राप्तो मया यद्भगवानप्राप्यो योगिभिर्ध्रुवम् ॥ १९
यदर्थं तु तपस्तप्यं दुर्भगेन धनेच्छया । दुष्प्राप्यं तत्समादाय यथा[8] मूढो हि नाशयेत् ॥ २० ॥
तथैवैतन्मया कर्म कृतं योषित्स्वभावतः । येन भर्तुर्वियोगो मे जातोऽद्य बहुदुःखदः ॥ २१ ॥
अनृतं साहसं माया काठिन्यमतिलोभता । स्त्रीणां देहेन[9] चोत्पन्ना ह्येते दोषा स्वभावजाः[10] ॥
इति सा बहुजल्पन्ती सखीभ्यां विनिवारिता । निनिन्द्य[11] चात्मनो रूपं विश्वेशेन विना सती ॥
ऊचतुस्तां तदा सख्यौ वयस्यौ ते महाप्रभे[12] । आदौ यत्नः प्रकर्तव्यः स्वकार्यस्य च सिद्धये ॥
यथा चैकेन चक्रेण रथस्य न गतिर्भवेत् । तथा पुरुषयत्नेन विना दैवं न सिध्यति ॥ २५ ॥
यत्नो दैवं च द्वितयं स्वकार्यकरणे[13] क्षमम् । इति संदर्शितः पन्था मुनिभिस्तत्त्वदर्शिभिः[14] ॥ २६
[15]इदं विलपनं देवि न युक्तं ते वरानने । पतिव्रतासु धीरेषु सत्यवादिषु सूरिषु ॥ २७ ॥

---

१ श्चकारतसुमहसंगेश्वरं–श्वराः इति चं. सि. को. पु. पा. । २ भगवान्निति यं. पु. पा. । ३ तारयत्स्वदर्शनादिति यं. पु. पा. । ४ विचार्यैवंभूतियः इति यं. पु. पा. । ५ ययाचेखनिवेशायचार्णवंसस्वयं हरीति यं. यु. पा. । ६ लोकानां ग्रहहेतवेति यं. पु. । ७ तत्रापिहिमयाह्यद्यगन्तव्यन्तुगणैसहेति यं. पु. पा. । ८ यथानाशतिंमूढधी इति यं. गो. च. पु. पा. । ९ स्त्रीणान्देहेनप्रातव्या इति यं. सि. चि. पु. । १० प्रमादतेति यं. पु. पा. । ११ विविन्दचामनोरूपमि यं. पु. पा. । १२ महामहेति यं. पु. पा. । १३ स्वकार्यस्यच सिद्धये इति यं. पु. पा. । १४ सखीभ्यान्तत्वदशिमीति यं. गो. मु. चं. पु. पा. । १५ प्रविलाप्यमिदमिति यं. पु. पा. ।

शंकर तेथून निघाले आणि कृष्णा-वेणीच्या संगमेश्वर नांवाच्या संगमावर येऊन तप करूं लागले. ५–७. तेथें ते आपलें दर्शन देऊन सर्व प्राण्यांचें रक्षण करीत कांहीं काळ राहूं लागले. ८. त्यापूर्वी उदार परशुरामानें पृथ्वी व द्रव्यरत्नें ब्राह्मणांना देऊन टाकलीं होतीं व आतां रहावें कोठें असा त्याला प्रश्न पडला होता. म्हणून समुद्रापासून भूमि संपादन करण्यासाठीं तो समुद्राजवळ गेला व समुद्रांत असलेला कांहीं भूभाग स्वतःसाठीं त्याच्याकडे मागितला. त्रेता-द्वापार युगांचा हा संधिकाल होता. समुद्रानें ती मागणी नाकारली. म्हणून क्रुद्ध परशुराम त्यास शासन करण्यास सिद्ध झाला. हें पाहून भयभीत समुद्र पृथ्वीपासून दूर हटला. ९–१३. त्याच जागीं लोकानुग्रहासाठीं परशुराम राहूं लागला. आपणही आपल्या गणांसह तेथें जावें असा निश्चय करून पार्वतीपति ईश्वर समुद्रतीरीं गेले व तेथें राहूं लागले. १४–१५.

अगस्त्य म्हणाले, हे तपोधन षडानना, गंगेसह शंकर तिकडे गेल्यावर गौरीनें काय केलें ? १६. स्कंद म्हणाला, पूर्वी आपल्या पितृगृहीं घडलेला वृत्तांत आठवून ती फार दुःखी झाली व सखीसह विलाप करूं लागली. १७. हे नीलकंठ, वृषभध्वज, मदनारि, रावणादि श्रेष्ठ राक्षसांच्या ईश्वरा, हे पंचानन मुरारे, तूं माझा भाग्यनिधि आहेस. मी कामतप्त आहे. माझा उद्धार कर. माझ्यावर कृपा कर. १८. जगांत खरोखर स्त्रीजन्म कष्टदायक व निंद्य आहे. कारण दरिद्र्यानें तपश्चर्या करून मिळवलेलें धन घालवावें, त्याचप्रमाणें तूं योगिदुर्लभ भगवान मला प्राप्त झाला असतांही स्त्रीस्वभावाला अनुसरून तसलेंच कृत्य मी केलें ! म्हणूनच मला आज अत्यंत कष्टदायक पतिवियोग झाला. १९–२१. असत्य, साहस, माया, निर्दयता, अतिलोभ हे दोष स्त्रीदेहाबरोबरच जन्मास आले आहेत. २२. मैत्रिणींनी विरोध केला तरी ती पतिव्रता सतत बडबडतच राहिली व आपल्या रूपाची निंदा करूं लागली. २३. त्या सख्या तिला म्हणाल्या, हे भामिनी, कार्यसिद्धीसाठीं प्रयत्न कर. २४. एका चाकानें रथ चालत नाहीं, त्याप्रमाणें उद्योगावांचून दैवाला गति मिळत नाहीं. २५. कार्यसिद्धीसाठीं उद्योग व दैव या द्वैताची आवश्यकता असते, असें तत्त्वज्ञ योग्यांनीं सांगितलें आहे. २६. हे देवी गौरी, विलाप करणें

न शोको विद्यते गौरि गुणवत्सु पतिव्रते । त्वया चैवंविधं कार्यं सदाशिवगवेषणम् ॥ २८ ॥
येनासौ लभ्यते भर्ता दुष्प्राप्यस्तु त्वदन्यया । सदाशिवो महादेवः पतिः शोध्यस्त्वया शिवे ॥
इति श्रीस्कांदे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे स्कंदागस्त्यसंवादे मांगीशमाहात्म्ये शंकरतपःप्रशंसाकथनं नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥

# अथ तृतीयोऽध्यायः ।

## श्रीसप्तकोटीश्वरो देवः ।

सूत उवाच –
इति प्रचोदिता ताभ्यां सखीभ्यां पार्वती तदा । गमनाय मतिं चक्रे सह ताभ्यां द्विजोत्तम ॥
भगवानपि विश्वेशश्चम्पावत्यां समाययौ । तत्र कंचित्स्थितः कालं तपस्तप्तुं महेश्वरः ॥ २ ॥
तपस्तप्त्वाथ विपुलं लिंगं कृत्वा स्वनामकम् । रामेश्वरेति नाम्ना वै प्रार्थितो न्यवसन्मुने ॥
लिंगस्य[1] दक्षिणे भागे स्वयमेव शिवः स्थितः । जीवपापहरः साक्षान्नाम्ना हरिहरेश्वरः ॥ ४ ॥
तिर्यग्योनिगतानां तु मुक्तिदः स सुरेश्वरः । बहुकालं वसन् तत्र जनोद्धाराय शंकरः ॥ ५ ॥
ब्रह्मा विष्णुश्च रुद्रश्च सर्वे देवाः सवासवाः । गायत्री चैव सावित्री रुद्राण्यश्चामलप्रभाः ॥ ६ ॥
ऋषयोऽप्यथ वै सिद्धाः सनकाद्याश्च योगिनः । निवासं चक्रिरे तत्र नाम्ना हरिहरे पुरे ॥ ७ ॥
तस्मिन्नायतनं विष्णोर्बभूव मुनिसत्तम । तत्पुरात् स विनिष्क्रम्य ह्यागतः शशिभूषणः ॥ ८ ॥
गोमा[2]न्तकगिरिं प्राप्तस्तत्रस्थानां च मुक्तये । यत्र विष्णुः स्वयं तस्थौ जरासंधभयार्दितः ॥
तत्र स्थितः स भगवान् पा[3]र्वत्या रहितो मुने । गोमान्तकेश इति वै नाम्ना लोकेषु विश्रुतः ॥१०॥
अत्राऽसौ वसते ब्रह्मा लोकानां हितकाम्यया । तत्र गोमान्तके शैले सागरस्यान्तिके प्रभुः ॥११
स्थितस्तत्र जनानां च मुदे मुक्तिप्रदः सदा । शक्रो देवाश्च ऋषयः सिद्धाश्च कपिलादयः ॥ १२ ॥
तस्य लिंगस्य पूर्वे तु संस्थितास्तत्कृपे[4]च्छया । तस्य पश्चिमभागे तु यमेश इति कीर्तितः ॥१३॥
उत्तरे वसतिं चक्रुर्ऋषयो ब्रह्मवादिनः । दक्षिणे वसतिं चक्रुर्भैरवाद्याश्च तद्गणाः ॥ १४ ॥
स[5]ह्यपादसमुद्भूताः पंच नद्यः समाययुः । सागरेणाथ संगम्य लोकं संतारयंति च ॥ १५ ॥
तासां तीरे तु तपसा मुनयः शुद्धचेतसः । शिवं तोषयितुं वृत्त्या बहुकालं च संस्थिताः ॥ १६ ॥
तपः कर्तुं प्रवृत्तास्ते मिताहारा जितेन्द्रियाः । आसप्तकोटिवर्षाणि तपोमध्ये गतानि च ॥ १७ ॥
तदा देवाधिपः शंभुर्दयालुः शुद्धधीर्विभुः । तेषां प्रत्यक्षतां यातस्तेजोरूपः स शंकरः ॥ १८
तेजःपुंजं ददृशिरे मुनयो रूपमद्भुतम् । पचवक्त्रं दशभुजं त्रिनेत्रं वृषभस्थितम् ॥ १९ ॥
गंगाधरं वरं देवं सर्वाभरणभूषितम् । नीलग्रीवं चंद्रभूषं नागयज्ञोपवीतिनम् ॥ २० ॥

---

१ दक्षिणाद्यांततःप्रापइति यं. गो. को. पु. पा. । २ इतोगोमांतकगिरिं प्राप्तस्सभगवान्हरःइति यं. मु. का. पु. पा. । ३ पार्वत्यागमशंकरेति यं. पु. पा. । ४ स्थितवान्त्रत्रहापुरा इति यं. मु. पु. पा. । ५ विद्यापादसमुद्भूता इ. यं. पु. पा. ।

तुला शोभत नाहीं. कारण पतिव्रता, धैर्यवान्, सत्यवादी, विद्वान् व गुणी लोक कधी विलाप करीत नाहींत. म्हणून तूं सदाशिवाचा शोध करीत रहा. म्हणजे तुला तो निश्चित सांपडेल. शिवे, तुझ्याशिवाय दुसऱ्याला तो महादेव दुर्मिळ आहे. २७-२९.

# अध्याय ३ रा

## सप्तकोटीश्वर देव

सूत म्हणाले, द्विजोत्तमा, याप्रमाणें सख्यांनी तिला कार्यासाठीं प्रवृत्त केल्यावर पार्वतीनें त्यांच्यासह शंकराच्या शोधासाठीं जाण्याचें ठरविलें. १. भगवान् विश्वेश्वरसुद्धां कांहीं काळ तपश्चर्येसाठीं चंपावतींत आले. २. तपश्चर्या करून व आपलें रामेश्वर या नांवाचें विशाल लिंग स्थापन करून लिंगाच्या दक्षिण दिशेला स्वतः शिवशंकर राहूं लागले. हरिहरेश्वर म्हणजे सर्व जीवांचें पाप नाश करणारा व तिर्यग्योनीला मुक्ति देणारा सुरेश्वर होय. तेथें पुष्कळ काळ राहून शंकरानें लोकांचा उद्धार केला. ३-५. ब्रह्मदेव, विष्णु, रुद्र, इंद्रादि देव, गायत्री, सावित्री, अमलप्रभा रुद्राणी, ऋषि, सिद्ध व सनकादि योगी यांनींही त्या हरिहर नगरांत वास केला. ६-७. हे मुनिश्रेष्ठा, पुढें हेंच विष्णूचें स्थान झालें. कारण नंतर येथून निघून शशिभूषण शंकर लोकांना मुक्ति देण्यासाठीं गोमंतक पर्वतावर आले. जेथें पूर्वी जरासंधाच्या भीतीनें स्वतः विष्णु राहिले होते, तेथेंच भगवान् शंकर पार्वतीविरहित राहूं लागले. म्हणून ते गोमंतकेश या नांवानें जगप्रसिद्ध झाले. ८-१०. येथें लोककल्याणासाठीं प्रभु ब्रह्मदेवही सागराजवळ गोमंतक पर्वतावर राहात आहेत. ११. मुक्तिदाता इंद्र, ऋषि, कपिलादि महामुनि या लिंगाच्या पूर्व दिशेला राहतात. पश्चिमेला यमेश, उत्तरेला ब्रह्मवादी ऋषि व दक्षिणेला भैरवादि गण यांची वस्ती आहे. १२-१४. सह्याद्रीच्या पायथ्यापासून उगम पावलेल्या पांच नद्यांचा समुद्राशीं संगम येथेंच झाला आहे, व त्या लोकांना मुक्ति देत असतात. १५. या नद्यांच्या तीरावर तप करून शुद्धात्मे महामुनि शंकराला संतुष्ट करतात. १६. मिताहारी व जितेंद्रिय ऋषींनीं सुमारें ७ कोटी वर्षें तप केलें, तेव्हां दयाळू सर्वव्यापी तेजोरूप शंकर त्यांच्या समोर प्रकट झाले. १७-१८.

त्या मुनींना त्या तेजोराशींत एक अद्‌भुत रूप दिसलें. त्या पंचमुख रूपाला दहा हात व तीन नेत्र होते. वृषभारूढ शंकराच्या मस्तकावर गंगा असून सर्वांगावर आभरणें शोभत होतीं. कंठ निळा होता. मस्तकावर चंद्र होता. नागांचें यज्ञोपवीत, व्याघ्रचर्म, कमंडलु, रुद्राक्ष-माळा, त्रिशूल, दैदीप्यमान पिंगट जटा व भस्म यांनीं ती सर्वज्ञ मूर्ति शोभत होती. इंद्रादि देव तिची स्तुति करीत होते ! अशा त्या हरीसह लिंगरूपी परात्पर शंकराला पाहून मुनींना वाटलें कीं, आपणांस एक साक्षात् श्रेष्ठ स्थान लाभलें आहे. १९-२३.

व्याघ्रचर्मधरं चैव वरेण्यमभयप्रदम् । कमंडल्वक्षसूत्राभ्यां संयुतं शूलपाणिनम् ॥ २१ ॥
ज्वलत्पिंगजटाभारं सर्वज्ञं भूतिसंयुतम् । इंद्रादिदेवतावृन्दैः स्तुतं हरिसमन्वितम् ॥ २२ ॥
लिंगरूपिणमीशानं परात्परतरं हरम् । तं दृष्ट्वा मुनयोऽत्यन्तमास्पदं प्रापुरंजसा ॥ २३ ॥
तस्य लिंगस्य माहात्म्यं मया वक्तुं न शक्यते । स्मरणाद्यस्य लिंगस्य गोदानसदृशं फलम् ॥
एवंविधं स्वरूपं तद् दृष्ट्वा ते मुनयस्तदा । पंचनद्यां ततः स्नात्वा पूजयामासुरीश्वरम् ॥ २५ ॥
पंचनद्यां नरः स्नात्वा सप्तकोटीश्वरं शिवम् । सम्पूज्य विधिवद्देवं स सर्वेप्सितभाग्भवेत् ॥२६॥
सप्तकोटीश्वरं लिंगं पूजयित्वा यथाविधि । ये पश्यन्ति नरास्ते वै मुक्तिभाजो न संशयः ॥२७॥
सप्तकोटीश्वरो देवो दृष्टश्चेद्भुवि मानवैः । धन्यास्ते त्रिषु लोकेषु तेषां मुक्तिः करे स्थिता ॥२८॥
सप्तकोटीश्वरं नाथं ये पश्यन्ति नरोत्तमाः । न तेषां दुर्लभा मुक्तिरैश्वर्यं चापि लभ्यते ॥ २९ ॥
सर्वानुग्राहको रुद्रस्तस्मिन् लिंगे व्यवस्थितः । न तच्छैलमयं लिंगं न तद्धैमं च राजतम् ॥३०॥
न तद्रत्नमयं किन्तु सर्वतेजोमयं परम् । दृष्ट्वाद्भुतं तदा लिंगं सर्वे ते मुनिसत्तमाः ॥ ३१ ॥
स्तुतिमारेभिरे कर्तुं तत्तेजोहतकल्मषाः ।
ऋषय ऊचुः ।
विश्वेश विश्वनिलयस्थितिजन्महेतो विश्वैकवंद्य शिव शाश्वत विश्वरूप ।
विध्वस्तकाम भवभीतिनिवर्तकेश श्रीमन्महेश करुणाकर पुण्यमूर्ते ॥ ३२ ॥
शम्भो शशांककृतशेखर शांतमूर्ते गंगाधरामरवरार्चितपादपद्म ।
नागेन्द्रभूषण नगेन्द्रनिकेतनेश भक्तार्तिहन् सुरगुरो गिरिजाविहार ॥ ३३ ॥
श्रीविश्वनाथ करुणाकर शूलपाणे भूतेश गर्भभुवन श्रुतिगीतकीर्ते ।
मायाविबोध मदनांतक विश्वमूर्ते गौरीश गोद्विजसुरार्तिहरावतार ॥ ३४ ॥
एवं संबोध्य गिरीशं सर्वदुःखनिवारकम् । नमस्कर्तुं प्रवृत्तस्ते मुनयो वीतकल्मषाः ॥ ३५ ॥
नमस्ते विश्वरूपाय नमस्ते शूलपाणये । नमस्ते रुद्ररूपाय नमस्ते ब्रह्मरूपिणे ॥ ३६ ॥
स्मशानवासिने तुभ्यं दुःखहंत्रे नमो नमः । नमस्ते विष्णुरूपाय नमस्ते ब्रह्मरूपिणे ॥ ३७ ॥
नमः पाशुपतास्त्राय निशाकरकरार्चिषे । नमो नमस्ते देवेश त्राहि नः शरणागतान् ॥ ३८ ॥
इति श्रुत्वा स्तुतिं देवो ह्यव्ययः शोकनाशनः । मेघनिर्घोषगम्भीरमिदं वाक्यमुवाच तान् ॥३९
श्रीमहादेव उवाच –
प्रीयतामृषयः सर्वे वरं चेतोऽभिवाञ्छितम् । तं प्रयच्छामि सकलं प्रसन्नो भवतामहम् ॥४०॥
इति श्रुत्वा वचस्तस्य मुनयो ब्रह्मवित्तमाः । ऊचुः परमकल्याणं प्रसन्नं पार्वतीपतिम् ॥४१॥
ऋषय ऊचुः –
यदि देव वरो देयस्त्वयाऽस्माकं महेश्वर । यावत्कालं तपस्तप्तं त्वत्प्रसादाय शंकर ॥ ४२ ॥
[1]वर्षाणि सप्तकोटीनि ह्यस्माभिस्तु महेश्वर । तेन नाम्नाऽत्र सन्तिष्ठ तेजोरूपेण वै प्रभो ॥४३॥

---

१ सप्तकोटिवर्षाणीहास्याभिःसुरेश्वरेति यं. पु. पाठः ।

ज्याचें स्मरण केल्यानें हजारों गोदानाचें पुण्य लाभतें, त्या लिंगाचें माहात्म्य मी वर्णूं शकत नाहीं. २४.

अशा त्या रूपाचें दर्शन घेऊन सर्वांनीं पंचनदींत स्नान केलें व ईश्वरपूजा केली. २५. पंचनदींत स्नान करून सप्तकोटीश्वर शिवाची पूजा केल्यानें मनुष्याच्या सर्व इच्छा सफल होतात. २६. सप्तकोटीश्वराची विधियुक्त पूजा करुन त्याचें जें दर्शन घेतात त्यांना निश्चित मुक्तिलाभ होतो. २७. पृथ्वीवरील ज्या मानवांनीं सप्तकोटीश्वराचें दर्शन घेतलें त्यांना मोक्ष हस्तगत झाला. २८.

तसेंच जे नरोत्तम सप्तकोटीश्वराचें दर्शन घेतात, त्यांना मुक्ति दुर्मिळ नसून ऐश्वर्यसुद्धां मिळतें. २९. कारण त्या लिंगांत सर्वांवर अनुग्रह करणाऱ्या श्रीशंकराचा वास आहे. तें लिंग पत्थर, सोनें, चांदी किंवा रत्न यांपासून बनलेलें असून पूर्ण तेजोमय आहे. असें तें अद्भुत लिंग पाहून त्या श्रेष्ठ मुनींचें सर्व पाप नाश पावलें, व त्यांनीं त्याची स्तुति करण्यास आरंभ केला.

ऋषि म्हणाले, हे विश्वेशा, जगाच्या जन्म-स्थिति-लयाचें कारण तूंच आहेस. हे शाश्वत विश्वरूप शिवा, तूंच एकटा वंदनीय आहेस! भवभय दूर करणाऱ्या निष्काम महेश्वरा, तुझी मूर्ती दयाळू आहे. ३०–३२.

शंभो, तुझ्या मस्तकावर शशांक असून तुझी मूर्ति किती शांत आहे! गंगा व श्रेष्ठ देव तुझ्या चरणकमलांची पूजा करतात. नागेंद्रभूषण ईश्वरा, हिमालय तुझें वसतिस्थान आहे. हे देवगुरो गिरिजाविहारी, तूं भक्तांचें दुःख दूर करतोस. ३३. हे करुणाकर शूलपाणि विश्वनाथ, तूं सर्वभूतेश्वर आहेस व तुझ्या उदरीं चौदा भुवनें आहेत. वेदांनींसुद्धां तुझी कीर्ति गाइली आहे. हे मदनांतक विश्वमूर्ते, मायेमुळें आम्हास तुझें ज्ञान होत नाहीं. हे गौरीशा, गो–द्विज–सुर यांचें दुःख दूर करण्यासाठीं तूं वरचेवर अवतार घेतोस. ३४. याप्रमाणें सर्वदुःखनिवारक शंकराला संबोधून ते निष्पाप मुनि शंकराला नमस्कार करूं लागले, व म्हणाले, हे विश्वरूप, शूलपाणि, रुद्ररूप व ब्रह्मरूप शंकरा, तुला नमस्कार असो. ३५–३६. दुःखहारी व स्मशानवासी शंकरा, तुला नमस्कार असो. विष्णुरूप व ब्रह्मरूप शिवा, तुला नमस्कार असो. ३७. पाशुपतास्त्रधारी शंकरा, तुझी कांति चंद्रकिरणासारखी आहे. हे देवेशा, तुला नमस्कार असो. आम्हां शरणागतांचें रक्षण कर. ३८. त्यांची ती स्तुति ऐकून शोकहारी अव्यय देव त्यांना उद्देशून मेघतुल्य गंभीर वाणीनें म्हणाले, मी प्रसन्न झालों आहे. तुम्ही इच्छित वर मागा, मी देतों. ३९–४०.

हें त्यांचें वचन ऐकून ते ब्रह्मज्ञानी मुनि प्रसन्न झालेल्या पार्वतीपति शंकराला म्हणाले, हे महेश्वरा, जर वर द्यावयाचा असेल तर तुमच्या कृपेसाठीं आम्ही सात कोटी वर्षें तप केलें आहे, तेवढीं वर्षें त्याच नांवानें तेजोरूप होऊन हे प्रभो, तुम्ही येथें रहा. ४१–४३.

इत्येतन्मुनयः प्रोचुर्लोकेशं भवनाशनम्। तत्र स्थितः स भगवान् ऋषिवाक्यानुगौरवात् ॥४४॥
तदाप्रभृति तत्तीरे सप्तकोटीशनामतः। तेजोरूपेण लिंगेन तस्थौ स ऋषिवाक्यतः ॥ ४५ ॥
सह्याचलस्य मध्ये तु सिद्धास्ते कलशोद्भव। सगणा वसतिं चक्रुः शिवध्यानपरायणाः।
नारायणश्च तत्रैत्य न्यवसत् पक्षिवाहनः। बलदेवेन सहितो युक्तः परमया श्रिया ॥ ४६ ॥
इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे स्कंदागस्त्यसंवादे मांगीशमाहात्म्ये सप्तकोटीशाख्यानं नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

# अथ चतुर्थोऽध्यायः।

## ग्राहवधः।

स्कंद उवाच –
अथान्यदपि ते वच्मि विश्वेशस्य कथानकम्। यस्य श्रवणतः पुंसां भक्तिरव्यभिचारिणी ॥१॥
भवत्येव महादेवे ब्रह्मविष्णुस्वरूपिणि। यानि रूपाणि दध्रे स भक्तानां हितकाम्यया ॥ २ ॥
तानि वेद स सर्वात्मा नान्यस्तद्वेद कश्चन। यस्य कृपावलोकेन[1] मोक्षलक्ष्मीरदूरतः ॥ ३ ॥
स वै विश्वेश्वरः साक्षाज्जलरूपी सदाशिवः। अघा[2]शी नाम गंगायाः सागरस्य च संगमे ॥४॥
निवासमगमत् पूर्वं भक्तानुग्रहकाम्यया। अन्तर्जले निवसति मांगीश इति नामतः ॥ ५ ॥
अगस्त्य उवाच –
कथं स भगवान् रुद्रो नदीसागरसंगमे। कस्य भक्तस्य किं कार्यं कृतवान् स[3] सदाशिवः ॥
स्कंद उवाच –
गोमन्ताद्दक्षिणे भागे सागरस्य समीपतः। अघाशी नाम गंगाऽस्ते महाकल्मषनाशिनी ॥७॥
सह्यपादात्समुद्भूता तापत्रयनिवारिणी। तस्या नद्यास्तटे रम्ये नगरी लोकविश्रुता ॥ ८ ॥
कुशस्थलीति नाम्ना वै जनोद्धारकरी वरा। स्थली द्विजन्मनां पुण्या क्षेत्र[4]भूमिर्महामुने ॥९॥
द्वारावतीसमानाऽऽस्ते शम्भोः प्रियतमा मता। पूगनारिंगवृक्षैश्च सफलैर्नारिकेरकैः ॥ १० ॥
बकुलैश्चम्पकैश्चैव दाडिमैश्चबकैस्तथा। ताम्बूलदलवल्लीभिः शोभमाना समन्ततः ॥ ११ ॥
अशोकस्तबकैर्हृद्यैर्जंबीरैः पाटलादिभिः। कीचकैः शालतालैश्च तमालैरसनार्जुनैः ॥ १२ ॥
पनसैर्भूर्जपत्रैश्च खर्जूरैर्बदरादिभिः। संयुता पादपैर्नीपैः कदलीस्तंभशोभिता ॥ १३ ॥
नानापुष्पलताकीर्णा नानातोयसमन्विता। य[5]स्यां वसन्ति विप्राश्च षट्कर्मनिरताः सदा ॥१४॥
यस्यां वसन्ति तिष्ठन्ति यक्षराट्सदृशाः स्त्रियः। तस्यां वसन्ति ये लोकास्ते गन्धर्वोपमाः शुभाः ॥१५॥
यस्यां वसन्ति कामिन्यो हावभावसमन्विताः। देवस्त्रीरूपधारिण्यः संस्थिता लोकमोहिताः॥

---

१ यस्यकृपावलोकनेनेति यं. पु. पा.। २ अघाशीर्षायागंगायासागरस्येति यं. पु. पा.।
३ भगवानशिवेति यं. पु. पा.। ४ कुरुक्षेत्रसमामुनेइति यं. पु. पा.। ५ यस्यांवैआगता विप्रा इति यं. पु. पा.।

याप्रमाणें ते ऋषि भवनाशन शंकराला म्हणाले व भगवान् शंकरही ऋषींच्या वचनाचा आदर करून सतकोटीश या नांवानें तेजोरूप लिंग होऊन तेथें राहिले. ४४–४५. हे अगस्त्य ऋषे, सह्याद्रीवर गणांसह सिद्ध शिवध्यान करीत राहिले. गरुडवाहन नारायणसुद्धां बलदेवासह तेथेंच राहिला. ४६.

## अध्याय ४ था

## मगरीचा वध

स्कंद म्हणाला, मी तुला विश्वेशाची आणखी एक कथा सांगतों. ह्या कथाश्रवणानें पुरुषाची भक्ति ब्रह्म-विष्णुस्वरूप शिवाचे ठिकाणीं शुद्ध बनते. शिवानें भक्तांच्या कल्याणासाठीं जीं अनेक रूपें धारण केलीं, तीं एका सर्वात्म्याशिवाय दुसऱ्या कोणालाही माहीत नाहींत. ज्याच्या कृपाकटाक्षानें मोक्षलक्ष्मी सहज मिळते, त्या जलरूप विश्वेश्वर सदाशिवानें गंगासागराच्या अघाशी नामक संगमावर जाऊन तेथें पाण्यामध्यें भक्तांवर अनुग्रह करण्यासाठीं मांगीश या नांवानें वास केला. १–५.

अगस्त्य म्हणाला, त्या नदी-सागराच्या संगमावर भक्तांवर अनुग्रह करण्यासाठीं भगवान् रुद्रानें कोणतें कार्य केलें ? ६.

स्कंद म्हणाला, गोमन्ताच्या दक्षिणेला समुद्राजवळ अघाशी नांवाची महापापनाशिनी गंगा नदी आहे. ७. तापत्रय दूर करणारी ही नदी सह्याद्रीपासून उगम पावली असून त्या नदीच्या किनारीं जगप्रसिद्ध कुशस्थली नांवाची नगरी आहे. हे महर्षे, लोकांचा उद्धार करणारी ही ब्राह्मणांची पवित्र क्षेत्रभूमि आहे. ८–९. द्वारावतीप्रमाणें शंभूची ही प्रिय नगरी आहे. पोफळ, नारिंग, नारिकेल, बकुल, चंपक, दाडिम, चबक, पानवेल, सुंदर, अशोक, स्तबक, जंबीर, पाटल, कळक, शाल, ताल, तमाल, असन, अर्जुन, फणस, भूर्जपत्र, खर्जूर, बोर, नीव व कदली इत्यादि अनेक फलपुष्पवृक्षांनीं ती नगरी सदैव सुंदर दिसत होती. ती विविध प्रकारच्या पुष्पवेलींनी व विविध जलानीं संपन्न होती. षट्कर्मसंपन्न ब्राह्मण तेथें रहात असत. तेथील स्त्रिया यक्षराजाच्या स्त्रियांसारख्या होत्या व पुरुष गंधर्वांसारखे होते. तेथील हावभावयुक्त कामिनींचें रूप देवस्त्रियांसारखें लोकांना मोहित करणारें होतें. १० – १६.

तस्यामुवास विप्रस्तु लोमशो नाम नामतः। रुद्राध्ययनसंपन्नः शिवमंत्रार्थकोविदः ॥ १७ ॥
अग्निहोत्रपरो नित्यं गुरुशुश्रूषणे रतः। कदाचिद्राहुपर्वेषु रात्रौ स्नानार्थमागतः ॥ १८ ॥
स तु तत्संगमे लोकद्वयजिगीषवः। केचित्[1] चक्रुर्जपं तत्र होमं चक्रुस्तथाऽपरे ॥ १९ ॥
सोऽपि विद्वान् स्थले गत्वा शिवविद्यां जजाप सः। नद्यां स्नानार्थमगमदुदकांतरसंस्थितः ॥ २०
पूर्ववैरानुबंधेन कश्चिद् ग्राहस्तदाऽऽगतः। तं धृत्वा चरणे तत्र समाकृष्य बलान्वितः ॥ २२ ॥
लोमशो भयसंत्रस्तो हाहेति प्रवदन्मुहुः। तन्मोक्तुमसमर्थस्तु तदा सस्मार शंकरम्।
देवाधीशं भोगिभूषमुच्चैः संबोधयन् द्विजः ॥ २२ ॥
लोमश उवाच –
शम्भो शशांककृतशेखर पुण्यमूर्ते गौरीश गोमतिनिवेश हुताशनेत्र।
गंगाधराऽन्धकविदारण शुद्धमूर्ते भूतेश भूधरनिवास सदा नमस्ते ॥ २३ ॥
विश्वेश वंद्य सकालार्तिहरावतार कर्पूरगौर करुणाकर शूलपाणे।
त्रायस्व मां वृषभवाहन कामशत्रो। संसारतारणपरायण नीलकण्ठ ॥ २४ ॥
नमस्ते देवदेवेश[2] गणानां पतये नमः। मृडाय चण्डिकेशाय नमः कैलासवासिने ॥ २५ ॥
नमः कैवल्यनाथाय नमस्ते द्वादशात्मने। नमो विषमनेत्राय नमस्त्रैलोक्यवन्दित ॥ २६ ॥
त्राहि मां गिरिजानाथ ग्राहग्रस्तं वृषाकपे। वसिष्ठो वामदेवश्च भगवान् रक्षितस्त्वया ॥ २७ ॥
अन्येभ्यो बहुविघ्नेभ्यो रक्षितास्ते सदाशिव। त्वद्ध्याननिरतानां तु न पश्यति च भास्करिः ॥२८
यतस्त्वं रक्षिता देव तस्मान्मां रक्ष शंकर। इति[3] श्रुत्वा सकरुणं वचो ब्राह्मणभाषितम् ॥ २९ ॥
तत्क्षणादेव तत्तोये प्रादुरासीन्महाद्युतिः। धनुर्बाणधरो विप्रस्त्रिशूलपरशू दधत् ॥ ३० ॥
भित्त्वा शूलेन तं ग्राहं मोचयामास लोमशम्। तस्मान्मुक्तः स भगवान् ब्राह्मणो भयविह्वलः॥
ददर्श भगवन्तं तं मृतं ग्राहं तथान्तिके। अथोवाच द्विजो रुद्रं दण्डवत् पतितो भुवि ॥ ३२ ॥
धन्योऽहं कृतकृत्योऽहं पूतोऽहं वृषभध्वज। यत्त्वं दृष्टोऽसि भगवन्नदृश्यो ह्यकृतात्मनाम् ॥३३॥
न वै मृत्युरयं ग्राहो ह्युपकारी ममाद्य वै। मोचयैनं महाभाग त्वं त्रिशूलविदारितम् ॥ ३४ ॥
किं वा तप्तं तपोऽनेन तत्तपः फलितं विभो। अद्यैव कृतकृत्योऽसौ तव संदर्शनेन ह ॥ ३५ ॥
मयाप्याचरितं भद्रं किं न जानेऽन्यज्जन्मनि। त्वां हित्वा तु जगन्नाथ योऽन्यदेवमुपासते ॥३६॥
हित्वा करस्थितं रत्नं काचं गृण्हाति मूढधीः। एवमेवानुमानं स्यात् त्वद्भक्ता ह्यकुतोभयाः ॥
तेषां भक्तिश्च लक्ष्मीश्च न दूरे विद्यते क्वचित्। तेनाऽभिहितमाकर्ण्य भगवान् भूतभावनः ॥३८॥
प्राह प्रसादसुमुखस्तं द्विजं शंसितव्रतम्।
श्रीमहादेव उवाच –
सत्यमुक्तं त्वया विप्र नाऽन्यथा यत्त्वयोदितं ॥ ३९ ॥
मद्भक्तिनिरता मर्त्या विष्णुभक्तिरताश्च ये। ते न पश्यन्ति लोकेऽस्मिन् एषां पाता महेश्वरः ॥
मम विष्णोश्चांतरं ये प्रपश्यन्ति नराऽधमाः। पतन्ति नरके घोरे यावदाभूतसंप्लवम् ॥ ४१ ॥
मद्भक्तिनिरता ये तु वैष्णवास्ते प्रकीर्तिताः। विष्णुभक्तिरताश्चैव ते शैवास्तु न संशयः ॥४२॥

---

१ केचित्कृत्वाजयास्तत्रहोमंचकारतदापरेति यं. पु. पा.। २ नमस्तेदेवदेवायोति यं. पु. पा.।
३ इतिश्रुत्वातुकरुणं ब्राह्मणस्योदितमिति यं. पुं. पा.।

त्या नगरींत लोमश नांवाचा रुद्राध्यायसंपन्न ब्राह्मण होता. तो शिवमंत्रार्थप्रवीण अग्निहोत्री असून नेहमीं गुरूच्या सेवेंत गर्क असे. एकदां तो रात्रौ ग्रहणाच्या वेळीं स्नानासाठीं त्या संगमावर आला. १७–१८. उभयलोकांवर विजय मिळविण्याची इच्छा असलेले दुसरे लोकही त्या संगमावर आले. कांहीं जप करूं लागले. कांहींनी होम आरंभिला. १९. त्याही विद्वान् ब्राह्मणानें तेथें शिवविद्येचा जप केला. जेव्हां तो स्नानासाठीं नदींत उतरला, तेव्हां पूर्ववैर आठवून पाण्यांतील एक बलवान् मगरी त्याचा पाय पकडून ओढूं लागली. २०–२१. तेव्हां भयाकुल लोमशानें जोरानें आरडाओरड केली. पण तो पाय सोडवूं शकला नाहीं ! तेव्हां त्या द्विजानें शंकराचें स्मरण केलें, व भोगिभूषण देवाधीशाचा मोठ्यानें धांवा केला. २२.

लोमश म्हणाला, हे चंद्रशेखर पुण्यमूर्ति शंभो, गौरीपति गोमतीवासा, अग्निनयना, हे अन्धकविनाशक शुद्धमूर्ति गंगाधरा, हे भूतपति हिमालयवासी शंकरा, तुला नमस्कार असो. २३. सर्वांचें दुःख निवारण करणाऱ्या वंदनीय विश्वेश्वरा, हे दयाळू कर्पूरधवल शूलपाणे, हे मदनांतक वृषभवाहना, हे संसारतारका नीलकंठा, आज माझें रक्षण कर. २४. हे देवदेवेश, गणांचा पति, मृड चंडिकेश कैलासवासी देवाला नमस्कार असो. २५. कैवल्यनाथ, द्वादशात्मा, विषमनेत्र व त्रैलोक्यवंदित देवा, तुला नमस्कार असो. २६. हे वृषाकपि गिरिजानाथा, मला मगरानें ग्रासलें आहे, माझें रक्षण कर. तूं भगवान् वसिष्ठ व वामदेव यांचें अनेक विघ्नांपासून रक्षण केलें आहेस. २७. शंकरा, तूं सर्वांचा रक्षक आहेस, म्हणून माझेंही रक्षण कर. याप्रमाणें ब्राह्मणाचें करुण वचन ऐकून लगेच त्या पाण्यांत एक धनुर्बाणधारी विप्र प्रकट झाला. त्याच्या हातांत त्रिशूल व परशु होता. २८–३०. विप्रानें मकरास त्रिशुळानें ठार मारून लोमशाला मुक्त केलें. त्या भयाकुल ब्राह्मणाला भगवंताचें दर्शन झालें व जवळच मृत मगरही दिसला. रुद्रास दंडवत् प्रणाम करून तो द्विज म्हणाला, हे वृषभध्वजा, मी आज धन्य, कृतकल्प व पवित्र झालों. कारण मला तुझें दर्शन झालें. दुरात्म्यांना तूं कधी दिसत नाहींस. ३१–३३. हे महाभागा, हा मगर माझा मृत्यु नाहीं, उपकारकर्ता आहे ! त्याला मुक्ति दे. ३५. ह्या मगरानें कोणतें बरें तप केलें असेल, कीं ज्यामुळें तो आज तुझें दर्शन होऊन कृतकृत्य झाला ! ३५. माझेंसुद्धां पूर्वजन्मीं कोणतें सत्कर्म होतें, हें समजत नाहीं. हे जगन्नाथा, तुला सोडून जो अन्य देवाची उपासना करतो, तो हातांतील रत्न टाकून कांचच घेतो ! तुझ्या भक्तांना कशाचीही भीति नसते, हाच तर्क योग्य आहे. ३६–३६. कारण ते नेहमीं भक्तिसंपन्न व श्रीमंत असतात. हें त्या द्विजाचें भाषण ऐकून भूतपावन भगवान् आनंदानें त्यास म्हणाला, हे विप्रा, तूं बोललास तें सत्य आहे. यांत कांहीं खोटें नाहीं. ३८–३९. माझ्या भक्तांना व विष्णुभक्तांना या जगांत दुःख पहावें–भोगावें लागत नाही. कारण त्यांचा रक्षणकर्ता महेश्वर आहे. ४०. आम्हां दोघांकडे जे भेददृष्टीनें पाहतात, ते नराधम प्रलयकालपर्यंत घोर नरकांत पडतात. ४१. विष्णुभक्त हेच शैव आणि शिवभक्त हेच वैष्णव होत, यांत संशय नाहीं. ४२.

वैष्णवानां गुरुरहं मोचिता भवसागरात् । प्रसन्नोऽहं द्विजश्रेष्ठ वरं वरय सुव्रत ॥ ४३ ॥
मयि प्रसन्ने दुःष्प्रापं नराणां नैव विद्यते । त्रिषु लोकेषु विप्राग्र्य यदिष्टं तद्वृणु द्विज ॥४४॥
स्कंद उवाच –
इति रुद्रवचः श्रुत्वा लोमशो द्विजसत्तमः । उवाच जगतामीशं प्रणिपत्य पुनः पुनः ॥ ४५ ॥
लोमश उवाच –
भक्तिर्मे देवदेवेश त्वदंध्र्योर्नितरां भवेत् । किमन्येन वरेणात्र ह्येतावद्धि वृतं मया ॥ ४६ ॥
अन्ये वराः सुलभ्यास्तु भक्त्या त्वत्पद्पंकजे । अत्रैव वासः कर्तव्यो भक्तकामाप्तये सदा ॥४७॥
श्रीमहादेव उवाच –
गोमंतकाद्रौ[1] लिंगानि संति विप्र सहस्रशः । अंशेन वसतिस्तेषु सर्वत्र वसतिर्मम ॥ ४८ ॥
अघाशीनद्यां विप्रेन्द्र मम स्थानं कलौ युगे । यत्र मां संस्मरिष्यन्ति जना विघ्नतिरस्कृताः ॥
तेषां दुःखानि सर्वाणि नाशयिष्ये न संशयः । गच्छ ब्राह्मण भद्रं ते भुंक्ष्व भोगान्यथेप्सितान् ॥
अन्ते यास्यसि मामेव न मे भक्तः प्रणश्यति । इत्युक्त्वा देवदेवोऽपि तेजोरूपी निरंजनः ॥५१
पश्यतस्तस्य विप्रर्षेरन्तर्धानमगाच्छिवः । ग्राहोऽपि शिवसालोक्यमगमत्परमद्युतिः ॥ ५२ ॥
इदं पवित्रमाख्यानं मया ते कथितं मुने ।

इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे मांगीशमाहात्म्ये स्कन्दागस्त्यसंवादे ग्राहवधो नाम चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

# अथ पंचमोऽध्यायः ।

## शंकरस्य व्याघ्ररूपधारणम् ।

स्कन्द उवाच –
एवं बहुगते काले ह्यन्वेषणपरा सती । बभ्राम पृथिवीं सर्वां सशैलवनकाननाम्[2] ॥ १ ॥
यत्र गच्छति सा देवी तत्र न प्राप शंकरम् । अंशेनावस्थिता तत्र निर्वेदं परमं गता ॥ २ ॥
स्त्रीरूपं सा बभाराथ सुन्दरं देवमोहनम् । वीणामादाय गायन्ती चचार वसुधातले ॥ ३ ॥
शिव शंकर सर्वात्मन् नीलकंठ नमोऽस्तु ते । भक्तप्रियोऽसि देवेश मामनाथामुपेक्षसे ॥ ४ ॥
त्वया त्यक्ता न जीवामि तरुं त्यक्त्वा लता इव । किं न स्मरसि कल्याणं मदर्थे यत् कृतं त्वया ॥
दक्षः प्रजापतिः पूर्वं त्वया दग्धः सयज्ञकः । तदा मया पिता चासौ न स्मृतस्त्वद्वियोगतः ॥
पतिं त्वामपहायाथ नान्यं वरमहं वृणे । इत्युक्त्वा सा तदा गौरी शंकरार्थे पर्यभ्रमत् ॥ ७ ॥
क्लेशयुक्ता तदा गौरी वीणया शंकरं जगौ । देवदेवेश[3] वाक्यानीत्येवमादरात् ॥ ८ ॥
एवं दैववशादेव प्राप्ता पश्चिमदिक्पथम् । अघाशिनीनदीतीरे विचचार तदा शिवा ॥ ९ ॥

---

१ गोमान्तकाद्रौलिंगाणिसन्तिसहस्रशाणिचेति यं. पु. पा. । २ वनपत्तनामिति यं. को. गो. चं. का. पु. पा. । ३ देवदेवेशदेवेशेत्युज्जगौसततादरादिति यं. पु. पा. ।

हे व्रती द्विजश्रेष्ठा, मी वैष्णवांचा गुरु आहे. भवसागरांतून त्यांची मुक्तता करणारा आहे. मी प्रसन्न झालों आहे. वर माग. ४४.

स्कंद म्हणाला, हें रुद्रवचन ऐकून द्विजसत्तम लोमश जगदीशाला पुनः पुनः प्रणाम करून म्हणाला, हे देवदेवेशा, तुझ्या चरणकमलीं माझी भक्ती दृढ असावी. मला आणखीं कांहीं नको. एवढीच माझी मागणी आहे. कारण तुझ्या भक्तीमुळें दुसरें सहज मिळतें. म्हणून भक्तांची इच्छा पूर्ण करण्यासाठीं आपण येथेंच वास करावा. ४५–४७.

महादेव म्हणाले, ह्या गोमंतक पर्वतावर हजारों लिंगें आहेत. त्या सर्वांत माझा अंशतः वास असतो. ४८. विशेषतः कलियुगांत हे विप्रेंद्रा, या अघनाशिनी नदींत माझें स्थान आहे. विघ्नांनी गांजलेले जे लोक माझें स्मरण करतील, त्यांची सर्व दुःखें मी नष्ट करीन. जा, ब्राह्मणा, तुझें कल्याण होईल. यथेष्ट ऐश्वर्य भोग. ४९–५०. शेवटीं तूं माझ्याजवळ येशील. माझ्या भक्ताचा नाश कधीं होत नाही. असें बोलून निरंजन तेजोरूपी देव त्या विप्रर्षीच्या देखत अंतर्धान पावला. त्या मगराला सुद्धां शिवसायुज्य मुक्ति मिळाली. ५१–५२. हे मुनें, मी तुला हें पवित्र आख्यान सांगितलें आहे.

# अध्याय ५ वा

## व्याघ्ररूपधारी शंकर

स्कंद म्हणाला, सती पार्वती पृथ्वीवर रानावनांत शंकरास शोधण्यास फिरत होती. याप्रमाणें पुष्कळ काळ निघून गेला. १. ती परम दुःखी देवी पार्वती शंकराला शोधण्यासाठीं जेथें जात असे, तेथें तिला तो भेटतच नसे. २. यास्तव तिनें देवांसही मोहित करणारें स्त्रीरूप धारण केलें व वीणा घेऊन ती पृथ्वीवर गात फिरूं लागली. ३. हे सर्वव्यापी नीळकंठ शंकरा, तुला नमस्कार असो. देवेशा, तुला भक्त प्रिय वाटतात, मग माझी अनाथेची उपेक्षा कां करतोस ? ४. तरुविना लता, तशी तुझ्यावांचून मीं कशी जगेन ? माझ्यासाठीं तूं जें कांहीं मंगल केलें होतेंस, तें तुला आठवतें ना ? ५. पूर्वी तूं यज्ञासह दक्षप्रजापतीस दग्ध केलेंस ! तो माझा पिता ! तरी पण तुझ्या सांनिध्यामुळें मला त्याची आठवण झाली नाहीं ! ६. तुझ्याशिवाय दुसरा पति मी वरणार नाहीं ! असें म्हणत ती गौरी शंकरासाठीं फिरत राहिली. ७. ती कष्टी गौरी वीणा वाजवीत देवदेवेश अशा शब्दांनीं शंकराचें प्रेमपूर्वक गायन करीत करीत सुदैवानें अघाशी नदीच्या पश्चिम तीरावर पोंचली. तेथें तिनें तपश्चर्येनें अति तेजस्वी देवेशाची

तपसाऽऽराधयामास देवेशमतुलद्युतिम् । ततः सः भगवान् रुद्रस्तपसा तुष्टमानसः ॥ १० ॥
व्याघ्ररूपं समासाद्य जगाम च तपोवनम् । यावत्स्नातुमायाता प्रत्यक्षः समजायत ॥११॥
दंष्ट्राकरालवदनः संकुर्वन् घुर्घुरध्वनिम् । मार्गमासाद्य तरसा तिष्ठन्नुग्रमुखस्तदा ॥ १२ ॥
लांगूलमुद्यम्य सुतीक्ष्णदंष्ट्रः कालातिवेगः कवलीकृतांगः । नखैर्विभिंदन्नवनिं तथोग्रैर्यथा महाकालवपुर्धराधरः ॥ १३ ॥
त्रासयामास तान् सर्वान् तपोवननिवासिनः । अद्यापि विद्यते तत्र[1] व्याघ्रेशो भगवान् हरः ॥१४
पीडितान् प्राणिनो दृष्ट्वा सा गौरी विव्हलाऽभवत् । भयाद्विव्हलिता चोमा मांगीशेति च संजगौ ॥ १५ ॥

पार्वत्युवाच –

पंचवक्त्र महादेव त्राहि मां शरणागताम् । त्राहि मां हि गिरीश त्वमित्युक्त्वा विव्हलाऽभवत् ॥
विव्हलत्वे[2] तया ह्युक्तं मांगीशेति पदद्वयम् । तच्छ्रुत्वा स महादेवः परमां करुणां गतः ॥१७॥
व्याघ्ररूपं समुत्सृज्य दध्रे रूपं वृषाकपिः । सिद्धैर्विद्याधरैर्यक्षैर्दक्षकन्याभिरावृतम् ॥ १८ ॥
गन्धर्वैर्गीयमानं तदिंद्रादिभिरभिष्टुतम् । पंचवक्त्रं त्रिनयनं कन्दर्पेण विराजितम् ॥ १९ ॥
नन्द्यादिगणमुख्यैश्च पूज्यमानं सुचामरैः ।

स्कन्द उवाच –

दृष्ट्वा सा पार्वती देवी तत्तेजःपुलकोद्गमा[3] ॥ २० ॥
उवाच देवी कल्याणी गुप्तास्मि तव किंकरी ।

पार्वत्युवाच –

दृष्टोऽसि भगवान् साक्षात् तपःपारे प्रतिष्ठितः ॥
गृण्हन्ति वेदास्ते रूपं ह्यप्राप्यं मनसा सह । मन्यवे ते नमस्कुर्यां येन दग्धो मनोभवः ॥२२॥
नमो विषमनेत्राय येन भिन्नो महासुरः । नमोऽस्तु शूलहस्ताय येन भिन्नो गजासुरः ॥२३॥
प्रसीदेश प्रसीदेश संसारार्णवतारक । कुरु मा बुद्धिवैक्लव्यं मा मे संगोऽस्तु कर्मणि ॥ २४ ॥
त्वदन्यत्र मतिर्मे मा भूयाज्जन्मनि जन्मनि । इति प्रसादितो देव्या भगवान् कमलेक्षणः ॥ २५॥
उवाच श्लक्ष्णया वाचा प्रहसन् वरदः शिवः ।

श्रीमहादेव उवाच –

परीक्षितासि भो देवि बहुवारं मयाऽनघे । स्त्रीषु नैव हि विश्वासो वन्हौ राजकुले तथा ॥२६॥
इदानीं ते प्रसन्नोऽस्मि न त्यक्षामि कदाचन । एहि सार्धं मया गौरि भुंक्ष्व भोगान्यथेप्सितान् ॥

स्कन्द उवाच –

इत्युक्ता सा तदा देवी शङ्करेण महात्मना । उवाच सा महादेवं स्थीयतामत्र शङ्कर ॥ २८ ॥
मांगीशनाम्ना भगवंस्तिष्ठ चात्र महामले । इदं ते नाम भगवन्ये गृण्हन्ति मनीषिणः ॥२९॥
तेषां दुःखानि सर्वाणि नाशयाशु महेश्वर । इति तस्या वचः श्रुत्वा वरपन्नगभूषणः ॥ ३० ॥

---

१ कारयामिति सु. को. चं. पु. पा. । २ विव्हलत्वेतदोवाचमांगीशंसाद्विजोत्तमेति यं. पु. पा. ।
३ द्गमाइति यं. पु. पा.

आराधना केली. त्यामुळें भगवान् रुद्र संतुष्ट झाले व व्याघ्ररूप धारण करून तपोवनांत गेले. पार्वती स्नानासाठीं नदीवर येतांच तिला तो व्याघ्र समोर दिसला. ८–११.

भयंकर दाढा असलेला तो वाघ बुर्रबुर्र असा आवाज करीत होता. वाटेंत तिच्यासमोरच राहून त्यानें जबडा उघडला व शेपटी वर केली! त्याच्या दाढा तीक्ष्ण होत्या, गति जोरदार होती. शरीर संकुचित करून भयंकर नखांनीं पृथ्वी ओरबडणारा तो महाकाय वाघ जणुं एक पर्वतच होता. १२–१३. त्यानें त्या तपोवनवासी सर्व प्राण्यांना घाबरवून सोडलें होतें. तो व्याघ्रेश हर अद्याप तेथें आहे. १४. भयभीत झालेले सर्व प्राणी पाहून ती पार्वती व्याकूळ झाली व लगेच तिच्या मुखांतून मांगीश असे शब्द बाहेर पडले. १५.

पार्वती म्हणाली, हे पंचमुख महादेवा, माझें शरणागताचें रक्षण कर. हे गिरीशा, माझें रक्षण कर, असें म्हणत विव्हळूं लागली. १६. तिनें विव्हळत उच्चारलेले मां गीश हे दोन शब्द ऐकून महादेवाला तिची दया आली, १७. व लगेच त्यानें व्याघ्ररूप टाकून शिवरूप धारण केलें. त्याच्याबरोबर सिद्ध, विद्याधर, यक्ष व रक्षकन्या होत्या. गंधर्व गात होते. इंद्रादि देव पंचमुख शंकराची स्तुति करीत होते.

स्कंद म्हणाला, तें तेज पाहून पार्वती पुलकित झाली व म्हणाली, देवा तुझ्या किंकरीचें तूं रक्षण केलेंस. मला आज तपाच्या पलीकडे असलेले भगवान दिसले. १८–२१. मनालाही न सापडणाऱ्या तुझ्या रूपाचें वेद वर्णन करतात. तूं क्रोधानें मदन दग्ध केलास, तुला नमस्कार असो. २२. ज्यानें महासुराचा वध केला, त्या त्रिनेत्राला नमस्कार असो. ज्यानें गजासुराचा वध केला, त्या त्रिशूलधारी शंकराला नमस्कार असो. २३. भवसागरांतून पार करणाऱ्या देवा, प्रसन्न हो. माझा बुद्धिभ्रंश करूं नकोस व मला कर्मसंग न घडो. २४. जन्मोजन्मीं माझ्या मनांत तुझ्याखेरीज दुसरा विचार न येवो. याप्रमाणें बोलून देवीनें कमलनेत्राला प्रसन्न केलें. २५. मधुर वाणीनें वरदशंकर महादेव म्हणाले, हे निष्पाप देवी, तुझी मी पुष्कळ परीक्षा पाहिली आहे. कारण स्त्रिया, अग्नि व राजवंश यांच्यावर सहसा विश्वास ठेवूं नये. २६. आतां मी संतुष्ट झालों आहे. इतःपर मी तुझा त्याग कधीं करणार नाहीं. ये आणि माझ्यासह यथेष्ट सुखोपभोग घे. २७.

स्कंद म्हणाला, महात्मा शंकर याप्रमाणें बोलल्यावर ती देवी म्हणाली, हे महामते शंकरा, आपण येथें ' मांगीश ' या नांवानें वास करावा. हें तुझें नांव जे बुद्धिमान लोक घेतील त्यांचीं दुःखें तूं सत्वर दूर कर. हें तिचें भाषण ऐकून नागभूषण जगदीशानें देवीसह तेथें वास केला. पूर्वी ठरल्याप्रमाणें मांगीश हेंच नांव प्रसिद्ध झालें. २८–३१.

तत्रैव वसतिं चक्रे देव्या सह जगत्पतिः । मांगीशनाम्ना देवेशः पूर्वोद्दिष्टो जगत्पतिः ॥ ३१ ॥
अघाशिनीनदीतीरे स्वगणैः परिवारितः । संस्थितो भगवान् रुद्रो लोकानां हितकाम्यया ॥

स्कन्द उवाच –

मांगीशनामकं देवं यस्तूच्चरति मानवः । गन्धैर्धूपैश्च नैवेद्यैर्वस्त्रैश्च विविधैस्तथा ॥ ३३ ॥
कोमलैर्बिल्वपत्रैश्च पुष्पैर्नानाविधैरपि । शुद्धाक्षतैश्चाभिषेकैर्विविधैः स्तवनैरपि ॥ ३४ ॥
साष्टांगैश्च नमस्कारैस्तथा प्रार्थनया मुने । एवं सम्पूजितो भक्त्या भगवान् शङ्करस्तदा ॥
तुष्टो महेश्वरस्तस्मै पुत्रपौत्रान् प्रदास्यति । अन्ते तस्य पदं स्मृत्वा स गच्छेच्छाश्वतं पदम् ॥
इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे मांगीशमाहात्म्ये अगस्त्यस्कंदसंवादे व्याघ्ररूपधारणं नाम पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥

# अथ षष्ठोऽध्यायः ।

## मांगीशपूजामाहात्म्यम् ।

स्कन्द उवाच –

घटोद्भव शृणुष्वेदं मांगीशस्य कथानकम् । यच्छ्रुत्वा मनुजाः सर्वे कृतकृत्या भवन्ति हि ॥
अघाशीवारि कलशैरष्टोत्तरशतेन च । संस्नापयति देवेशं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ २ ॥
नारिकेलोद्भवैस्तोयैः प्रत्यहं यो भजेन्नरः[1] । यः स्नापयति भूतेशमपुत्रः पुत्रवान् भवेत् ॥ ३ ॥
तन्नद्यास्तोयमादाय पितॄन् तर्पयति द्विजः । प्रत्यहं तिलसंयुक्तं मोदते दिवि देववत् ॥ ४ ॥
मांगीशसन्निधौ विप्रः गोदानं यः प्रयच्छति । गोरोमसंख्यावर्षाणि मोदते शिवमन्दिरे ॥५॥
स्नानं गंगासमं यस्य अघाश्यां पावनं परम् । यदि लभ्येत हि कलौ बहुतीर्थैः किमन्यकैः ॥
अत्यल्पमात्रमपि यद् व्रतं भवति चाक्षयम् । यत्र मांगीश्वरो देवो यत्र सा जगदम्बिका ॥७॥
यत्राघाशी नदी[2] तत्र मुक्तिरेव न संशयः । स्मृतं मांगीशपादाब्जं श्रुता मांगीशसत्कथा ॥
स्मृतं मांगीशसन्नाम जन्मभाजो न ते नराः । मुने मांगीशसन्नाम यैः कर्णविषयं कृतम् ॥
दुराचारा ह्यधर्मिष्ठा न ते वैवस्वतं ययुः । अत्रैवोदाहरंतीममितिहासं पुरातनम् ॥ १० ॥
अथ कश्चिद् द्विजो नाम कान्यकुब्जसमुद्भवः । देवशर्मेति विख्यातः सपत्नीकः समाययौ ॥
वात्स्यः परमधर्मालुर्भक्तः शिवमुकुन्दयोः । तीर्थयात्रापरो नित्यं सत्यवाग्विजितेंद्रियः ॥ १२ ॥
रामेश्वराजिगमिषुर्वाराणस्यां मुनीश्वरः । गच्छन् मार्गेण चायातो ह्यघाश्याः सन्निधौ द्विजः ॥१३॥
स तत्र संगमं गत्वा स्नात्वा नियतमानसः । तत्र गत्वा नदीतीरे तस्मिन्ग्रामे समाविशत् ॥ १४
तत्र कंचित्स्थितः कालं पुत्रदारासमन्वितः । एकदा देवशर्मा स ह्यपश्यदद्भुतं मुने ॥ १५ ॥
मध्यान्हसमये धेनुर्नदीमध्ये विवेश च । तस्मिन् जले निमज्याथोप्युन्मज्याप्याययौ तदा ॥१६॥
एवं त्रिदिनपर्यन्तं ददर्श स द्विजर्षभः । अन्तर्जले किमत्रास्ति लोकन् प्रपच्छ स द्विजः ॥ १७ ॥

---

१ भवेन्नरइति मु. गो. नि. चं. पु. पा. । २ नदिकाइति यं. मु. न. चं. गो. पु. पा. ।

अशा रीतीनें अघाशी नदीच्या तीरावर लोककल्याणासाठीं भगवान् रुद्र आपल्या गणांसह राहिला. ३२.

स्कंद म्हणाला, जो मानव 'मांगीश' असा नामोच्चार करील, वस्त्र, गंध, धूप, दीप, नैवेद्य, कोमल बिल्वपत्रें, विविध पुष्पें, शुद्ध अक्षता, अभिषेक, विविध स्तवनें, साष्टांग नमस्कार व प्रार्थना अशा षोडशोपचारांनीं भगवान् शंकराची पूजा करील, त्याला शंकराच्या कृपेनें पुत्र-पौत्र प्राप्त होतील. शंकराच्या चरणस्मरणानें शेवटीं त्याला शाश्वतपद मिळेल. ३३–३६.

# अध्याय ६ वा

## मांगीशपूजेचें माहात्म्य

स्कंद म्हणाला, जें श्रवण केल्यानें मानव कृतकृत्य होतो, तें हें मांगीशकथानक ऐक. १. जो १०८ कलशांनीं अघाशी नदीच्या पाण्यानें देवेशाला अभिषेक करतो, तो अमर बनतो. २. जो भक्त प्रतिदिन नारळाच्या पाण्यानें भूतेशाला अभिषेक करतो तो निपुत्रिक असल्यास पुत्रवान् होतो. ३. जो द्विज त्या नदीच्या शीतल जलानें पितृतर्पण करतो, त्याचे पितर स्वर्गांत देवांप्रमाणें आनंदात असतात. ४. मांगीशसानिध्यांत जो विप्र गोदान करतो, तो शिवमंदिरांत गोरोमांएवढी वर्षें आनंद पावतो. ५. कलियुगांत अघाशी नदींत स्नानयोग हा गंगास्नानासारखा मोठा पवित्र आहे. बाकी लहानथोर तीर्थांचा काय उपयोग? ६. जेथें लहान व्रतसुद्धां अक्षय फल देत असतें व मांगिरीश देव व जगदंबा वास करतात, ती ही अघाशी नदी निश्चित मुक्ति देणारी आहे! ज्यांनीं येथें मांगीश चरणकमलांचें स्मरण केलें, मांगीशकथा श्रवण केली, मांगीशस्तोत्र म्हटलें, त्याला पुनर्जन्म नाहीं. येथें ज्यांनीं मांगीश हें नाम श्रवण केलें, त्या दुराचारी व अधर्मी नरांनासुद्धां यमाच्या घरीं जावें लागलें नाहीं. याविषयीं एक प्राचीन कथा आहे. ७–१०. पूर्वी एकदां कनोज देशांतील देवशर्मा नांवाचा प्रसिद्ध ब्राह्मण पत्नीसह येथें पोंहोचला. ११. हरिहरभक्त व परम दयाळू तो वत्सगोत्री द्विज तीर्थयात्रेस निघाला होता. तो सत्यनिष्ठ व जितेन्द्रिय होता. रामेश्वराहून वाराणशीस जातांना मार्गांत सहज तो अघाशी नदीजवळ पोंचला होता. १२–१३. रोज संगमावर स्नान करून तो त्या तीरावरील गांवांत प्रवेश करीत असे. कांहीं काळानंतर तो लोकादरास पात्र झाला. एकदां त्या देवशर्मा ब्राह्मणाला अद्भुत दृश्य दिसलें. १४–१५. दुपारच्या वेळीं एका गाईनें त्या नदींत प्रवेश केला व पाण्यांत बुडूनसुद्धां ती पुनः बाहेर आली! १६. त्या द्विजश्रेष्ठाला असें दृश्य सतत तीन दिवस दिसलें. म्हणून त्या ब्राह्मणानें लोकांना विचारलें, अहो, येथें पाण्यांत काय आहे? १७. ते म्हणाले, पाण्यांत काय आहे हें जाणून घेऊं या. चौथ्याही दिवशीं मध्यान्हीं जेव्हां

ते तमूचुर्न जानीमस्तत्र किं विद्यते जले। अन्यस्मिन् दिवसे जाते मध्यान्हे च गता पुनः ॥ १८ ॥
स गोपुच्छं प्रगृह्याथ गवा सह जगाम ह । जलांतरे निमज्याऽथ ददर्श शिवमव्ययम् ॥ १९ ॥
तेजोरूपेण लिंगेन पार्वत्या सह संस्थितम् । तया स्वपयसा धेन्वा स्नापितं परमेश्वरम् ॥ २० ॥
भूयो भूयो नमस्कृत्य स्तोत्रैस्तुष्टाव शंकरम् । देवदेव जगन्नाथ सर्वज्ञ परमेश्वर ॥ २१ ॥
गौरीश भूतनाथाद्य रक्ष मां शशिशेखर । श्रुत्वा स्तुतिं द्विजाग्र्यस्य प्रसन्नोऽभून्महेश्वरः ॥ २२॥
सुप्रसन्नश्च भगवानुवाच वरदोऽस्म्यहम् । वरं वरय भद्रं ते प्रयच्छामि तव द्विज ॥ २३ ॥
इति तस्य वचः श्रुत्वा देवशर्माऽब्रवीदिदम् । वरदो यदि देवोऽसि वरं देहि ममेश्वर ॥ २४ ॥
किं ते नाम च किं तीर्थं कथयस्व जगद्गुरो । त्वत्पादकमले भूयाद्भक्तिर्मेऽव्यभिचारिणी ॥ २५॥
इति तद्वचनं श्रुत्वा प्रहसन्नाह शंकरः । मांगीश इति मन्नाम कापिलं तीर्थमुत्तमम् ॥ २६ ॥
यतः सा कपिला धेनुर्मां स्नापयति नित्यशः । तस्मात्तस्याथ तज्जातं सर्वतीर्थवरं शुभम् ॥२७॥
इति तस्य वचः श्रुत्वा प्रणिपत्य मुहुर्मुहुः । तदाप्रभृति लोकेऽस्मिन्तल्लिंगं ख्यातिमाययौ ॥२८॥
इच्छया देवदेवस्य तज्जलादुद्धृतं बहिः । पूर्वोक्तविधिना चैव यः स्नापयति शंकरम् ॥ २९ ॥
ईप्सितान् लभते कामानन्ते लोकं च शाश्वतम् । सोऽपि वव्रे द्विजः सर्वां सन्ततिं शाश्वतीं पराम्
तस्मिन् स्थाने स्थितः सोऽथ बहुकालं द्विजोत्तमः । एवमन्येऽपि बहवो लब्धकामास्तु मानवाः॥
मांगीशस्य प्रसादेन परां सिद्धिमुपागताः । तस्मादर्च्यमिदं लिंगं नियतैः प्रयतात्मभिः ॥ ३२ ॥
त्रिकालं पार्वतीशस्य नरैर्धर्मपरायणैः । मृदंगादीनि तूर्याणि यः प्रयच्छति शंकरम् ॥ ३३ ॥
तस्य पुण्यमनन्तं स्यात् तद्धि विद्धि स्वयं हरः । यः प्रयच्छति मांगीशं छत्रचामरपादुकाः ॥३४॥
स सुखी लभते कामानिह लोके परत्र च । यः प्रयच्छति देवेशं यानं शृंगारभूषितम् ॥ ३५ ॥
तस्य पुण्यमनन्तं स्यात् कैलासे वसते चिरम् । यश्चास्य धान्यैः कुरुते पूजनं शंकरस्य च ॥३६॥
तावद्वर्षसहस्रं तु स वसेच्छांकरे पुरे । एवं धूपादिदानेन तत्तत् फलमवाप्नुयात् ॥ ३७ ॥
मांगीशे पार्वतीनाथे विद्धि त्वं कलशोद्भव । यद्यदिच्छति तत्पुण्यमनन्तं स्यान्न संशयः ॥३८॥
अध्यायं सकलं चेमं शृणुयाद्भक्तिसंयुतम् ।
तस्य प्रसन्नो भगवान् भुक्तिं मुक्तिं च यच्छति । सत्यं सत्यं च सत्यं च लभतेऽभीप्सितं फलम् ॥

इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे स्कंदागस्त्यसंवादे मांगीशमाहात्म्ये शंकरपूजनादिमाहात्म्यकथनं नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

## अथ सप्तमोऽध्यायः ।

### कपिलामाहात्म्यम् ।

अगस्त्य उवाच –

विशाख कपिला धेनुः किंवर्णा केन पालिता । कः स्वामी कुत्र लब्धेयं तन्मे ब्रूहि यथातथा ।

स्कन्द उवाच –

पुरा समुद्रतीरे च ब्राह्मणो वेदवित्तमः । देवदत्त इति ख्यातो वेदवेदांगपारगः ॥ २ ॥

ती गाय पाण्यांत जाऊं लागली, त्यावेळीं तो गोपुच्छ धरून पाण्यांत गेला. तेथें त्याला अव्यय शिवाचें दर्शन झालें. १७-१९. तें तेजोरूप लिंग व पार्वतीसह परमेश्वर यांवर गोमातेनें आपल्या दुधाचा अभिषेक केला. त्या द्विजानेंही देवेशास पुनः पुनः नमस्कार करून स्तोत्र म्हटलें---

हे देवाधिदेव, जगन्नाथ, सर्वज्ञ, परमेश्वर, गौरीश, भूतनाथ, चंद्रशेखर, आज माझें रक्षण कर. श्रेष्ठ ब्राह्मणाची ती स्तुति ऐकून महेश्वर प्रसन्न झाले. २०-२२. अत्यंत संतुष्ट होऊन भगवान् म्हणाले, मी वरदाता आहे. इच्छित वर माग, मी तो देतों. तुझें कल्याण असो. २३. हें त्याचें वचन ऐकून देवशर्मा म्हणाला, हे ईश्वरा, जर तूं वरदाता आहेस, तर मला वर दे. २४.

हे जगद्गुरो, तुझें नांव काय व हें तीर्थ कोणतें ? तुझ्या चरणीं माझी एकनिष्ठ भक्ति असावी. २५. हे ऐकून शंकर हंसून म्हणाले, माझे नांव मांगीश आहे व ह्या श्रेष्ठ तीर्थाचें नांव कपिल आहे. २६. कारण कपिला धेनु रोज तेथें दुग्धाभिषेक करीत असे; त्यामुळेंच हें श्रेष्ठ तीर्थ निर्माण झालें. २७. हें ऐकून त्यानें शंकरास प्रणाम केला. तेव्हांपासून जगांत तें लिंग प्रख्यात झालें. २८. पुढें ईश्वरेच्छेनें तें लिंग पाण्याच्या बाहेर आलें. जो पूर्वोक्त प्रकारानें लिंगाला अभिषेक करतो, त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात व त्यास शेवटीं शाश्वत पद मिळतें. त्याही द्विजास संतति व शाश्वत पद मिळालें. २९-३०. यानंतर तो ब्राह्मण पुष्कळ काळ तेथें राहिला. याचप्रमाणें पुष्कळ लोकांच्या इच्छा सफल झाल्या आहेत, ३१. व मांगीश कृपेनें लोकांना मोठी सिद्धी मिळाली आहे. यास्तव निग्रही व धार्मिक लोकांनीं या पार्वतीश लिंगाची त्रिकाल पूजा करावी. जो मृदंगादि वाद्यें शंकरास अर्पण करतो, त्यास अनंत पुण्य प्राप्त होतें. कारण शंकर स्वतः त्या वाद्यांचे रसज्ञ आहेत. जो मांगीश देवाला छत्र चामर पादुका अर्पण करतो, त्याच्या सर्व ऐहिक व पारलौकिक इच्छा पूर्ण होतात. जो शृंगारभूषित वाहन देवेशाला अर्पण करतो, त्याला अनंत पुण्यप्राप्ति होते. त्याचा वास कैलासांत असतो. जो शंकराची धान्यपूजा करतो, तो हजारों वर्षें शंकरनगरींत राहातो. याप्रमाणें धूपादि अर्पण केल्यानें तें तें फळ लाभतें. ३२-३७.

हे कलशोद्भवा, पार्वतीनाथ मांगीश देवतेपासून अनंत पुण्य मिळतें. हा संपूर्ण अध्याय जो भक्तिपूर्वक श्रवण करतो, त्याला भगवान प्रसन्न होऊन भुक्ति-मुक्ति देतात. हें मी तुला त्रिवार सत्य सांगतों. ३८-३९.

## अध्याय ७ वा

## कपिलामाहात्म्य

अगस्त्य म्हणाले, षडानना, कपिलाधेनूचा वर्ण कोणता ? तिचें पालन कोणी केलें ? तिचा स्वामी कोण ? ती कोठें मिळाली ? हें सर्व मला व्यवस्थित सांगा. १. स्कंद म्हणाले, पूर्वी समुद्रतीरीं वेदवेदांगपारंगत असा देवदत्त नांवाचा ब्राह्मण होता. २.

जितेन्द्रियो जितक्रोधः सत्यवाङ् मंत्रवित्तमः । फलपुष्पकुशाद्यर्थं जगाम स महद्वनम् ॥ ३ ॥
तन्मध्ये च स्थलं दृष्ट्वा सुन्दरं जलसंयुतम् । हरिद्भिश्च तृणैर्युक्तं नानामृगगणादिभिः ॥ ४ ॥
कीचकैश्च समाकीर्णं लतापादपसंयुतम् । तत् स्थलं पङ्कबहुलं पक्षिनादैर्युतं सदा ॥ ५ ॥
कपिलां पंकलग्नां च द्विजो दृष्ट्वा व्यचिंतयत् । उपकारसमं पुण्यं श्रुतं केन महीतले ॥ ६ ॥
परोपकरणं येन कृतं तस्य च जीवितम् । सफलं प्रवदन्ति स्म मुनयो ब्रह्मवादिनः ॥ ७ ॥
तस्मादिमां गां कथमुद्धरिष्ये शुभ्रां सुकर्णां बहुदुग्धयुक्ताम् ।
पीनां सुनेत्रां लघुचारुशृंगीं पंकस्थलार्त्तां रमणीयपादाम् ॥ ८ ॥
इति चिंतातुरो विप्रो दृष्ट्वा शूद्रकुमारकम् । कथयित्वा परं धर्मं ताभ्यां पंकान्निराकृता ॥ ९ ॥
गवा सह गृहं गत्वा तामपुष्यद् द्विजोत्तमः । पादजं पालयामास कपिलार्थं घटोद्भव ॥ १० ॥
कस्मिंश्चित्समये धेनुर्गोपालेन समन्विता । वनं जगाम सहसा तृणमध्ये तदाऽचरत् ॥ ११ ॥
मध्यान्हसमये जाते तृषितः शूद्रबालकः । जलं तत्र विचिन्वानः कूपं दृष्ट्वा गतोऽन्तिके ॥ १२ ॥
उदकं विद्यते ह्यत्र दृष्टिः कूपे प्रवेशिता । तदा रत्नमयं लिंगं शूद्रजः स ददर्श च ॥ १३ ॥
किमेतदिति संचिंत्य तत्र दृष्टिं निधाय च । सहसात्र परं रूपं दृष्टं तेन महत्तरम् ॥ १४ ॥
पञ्चवक्त्रं दशभुजं श्वेतांगं चन्द्रशेखरम् । नीलकण्ठं सर्पभूषं भस्मोद्धूलितविग्रहम् ॥ १५ ॥
दृष्ट्वा तन्महदाश्चर्यं दण्डवत् प्रणनाम च । स्वामिन्मयि दयासिन्धो कृपां कुरु महामते ॥१६॥
स्तुत्वा च विविधैस्तोत्रैः प्रणनाम पुनः पुन । कृताञ्जलिपुटो भूत्वा तन्मयस्तद्धृदयेक्षणः ॥१७॥

स्कन्द उवाच –

तदा विश्वेश्वरः शम्भुः स्तुतिं श्रुत्वाऽथ तस्य वै । प्रसन्नः पादजं प्राह यत्ते मनसि वाञ्छितम् ॥
वरं वरय भो पुत्र सन्तुष्टोऽस्मि महामते । चतुर्थस्तु तदोवाच यदि यच्छसि मे वरम् ॥१९॥
तर्हि स्त्रीपुत्रमित्राणां संगमो न सुखाय मे । भवेत्तथा कुरु विभो त्वामहं शरणागतः ॥ २० ॥
त्वत्पादभजने भक्तिस्त्वत्पादनिकटे स्थितिः । त्वत्पादपूजनं देहि त्वत्पादस्य विचिन्तनम् ॥२१॥
इत्युक्तवन्तं तं पुत्रं भगवान् स शिवस्तदा । तथेत्युक्त्वाऽथ तत्कूपान्निर्जगाम हरस्तदा ॥२२॥
तयोस्त्वनुग्रहं कृत्वा नदीसागरसंगमे । जगाम सहसा रुद्रस्तत्रैवांतरधीयत ॥ २३ ॥
तद् दृष्ट्वा कपिला धेनुर्जलमध्ये निरंतरम् । मध्यान्हे पयसा गत्वा स्नापयामास त शिवम् ॥२४
देवशर्माऽथ तद् दृष्ट्वा महदाश्चर्यवानभूत् । धेनोः पुच्छं प्रगृह्याथ जलमध्ये जगाम च ॥ २५ ॥
शिवं स्तुत्वा नमस्कृत्य कृतकृत्योऽभवत्तदा । एतत्ते कथितं सर्वं कपिलायाः कथानकम् ॥२६॥
शृण्वतां सर्वपापघ्नं भुक्तिमुक्तिफलप्रदम् । तस्य श्रवणमात्रेण तुष्यते भगवान् हरः ॥ २७ ॥
इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे स्कन्दागस्त्यसंवादे मांगीशमाहात्म्ये
कपिलामाहात्म्यं नाम सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

तो जितेंद्रिय, जितक्रोध, सत्यवक्ता व मंत्रवेत्ता ब्राह्मण फलपुष्पें व दर्भ आणण्यासाठीं एकदां गहन अरण्यांत गेला होता. ३.

तेथें त्याला एक जलाशय दिसला. हिरवें गवत, विविध पशु, बांबू, वेली व वृक्ष यांनी तो भाग भरलेला होता. त्यांत पुष्कळ चिखल होता व पक्ष्यांचा आवाजही ऐकूं येत होता. तेथें त्या चिखलांत रुतलेली गाय पाहून तो मनांत म्हणाला, उपकारासारखें पुण्य-कारक कार्य ऐकण्यांत नाहीं. ५–६. उपकारी माणसाचें जीवन सफल असतें, असें ब्रह्मवादी मुनीही सांगत आले. ७. यास्तव मी या पुष्ट, शुभ्रवर्णी व दुधाळ गाईला चिखलांतून बाहेर काढतों. हिचे कान, नेत्र व चरण किती सुंदर आहेत. शिंगेंही आंखूड व रमणीय आहेत. ८.

असा विचार करून त्या चिंतातुर विप्रानें एका शूद्र कुमाराच्या मदतीनें त्या गाईला चिखलांतून बाहेर काढलें. ९. हे घटोद्भवा, त्यानें तिला आपल्या घरीं नेऊन तिचें पोषण केलें, व तिच्यासाठीं शूद्रालाही ठेवून घेतलें. १०. एकदा ती कपिला गुराख्यासह वनांत चरत असतां मध्यान्हीच्या वेळीं त्या शूद्र बालकाला तहान लागली म्हणून तो एका विहिरीजवळ गेला. ११–१२. तो पाण्यासाठीं विहिरींत पाहात असतां त्याला एक रत्नखचित लिंग दिसलें. १३. हें काय असावें, असा विचार करून बारकाईनें पाहतांच, त्याला अद्भुत दृश्य दिसलें. १४. ती पंचमुख, दशभुज, श्वेतांग, चंद्रशेखर, नीलकंठ, सर्पभूषण व भस्मचर्चित मूर्ति होती. १५. हें आश्चर्य पाहून त्यानें त्या मूर्तीस प्रणाम केला व हे स्वामिन्, माझ्यावर कृपा करा. तुम्ही दयेचे सागर आहांत, असे म्हणत त्यानें हात जोडले व ईश्वरास आपलें मन व नेत्र अर्पण केले. १६–१७.

स्कंद म्हणाले, ईश्वरानें त्याची स्तुति ऐकली व प्रसन्न होऊन ते शूद्राला म्हणाले, अरे बाळ, मी प्रसन्न झालों आहें, इष्ट वर माग. १८. शूद्र म्हणाला, मला स्त्रीपुत्रांची आसक्ति नसावी व केवळ तुझी भक्ति असावी, हाच वर मला द्या. हे विभो, मी तुला शरण आलों आहें. १९–२०. तुझ्या चरणांचें प्रेम, सांनिध्य, पूजन व चिंतन मला दे. २१. हा वर मागतांच 'तथास्तु' असें म्हणून श्रीशंकर कूपांतून बाहेर आले. २२. नदी व सागर यांच्या संगमावर त्या दोघांवर अनुग्रह करून रुद्र अंतर्धान पावले. २३. कपिलाधेनु पाण्यांत जाऊन शिवलिंगावर दुग्धाभिषेक करीत असते, हें आश्चर्य वाटून देवशर्माही गोपुच्छ धरून पाण्यांत गेला, व तेथें शिवस्तुति करून धन्य झाला ! पूर्वी मी तुला सांगितलेलें कथानक ऐकणाऱ्यांना भोग व व मुक्ति यांचा लाभ होईल. ह्या कथाश्रवणानें भगवान शंकर संतुष्ट होतात. २४–२७.

# अथ अष्टमोऽध्यायः ।

## अघाशीमाहात्म्यम् ।

अगस्त्य उवाच –

कथं जातमिदं नाम ह्यघाशी चेति विश्रुतम्। कस्याहो छिन्नमनया पातकं च षडानन ॥ १ ॥
एतन्मे देवदेवस्य कुमाराऽनन्तविक्रम। वद सर्वं यथा तत्त्वं कुशलो ह्यसि भाषणे ॥ २ ॥

स्कन्द उवाच –

घटजन्म ह्यहं वक्ष्ये यन्मां पृच्छसि चानघ। अघाशी चेति यन्नाम नद्या जातं घटोद्भव ॥ ३ ॥
अत्राप्युदाहरन्तीममितिहासं पुरातनम्। केरलो नाम देशोऽस्ति तद्देशे[1] वैश्यपुत्रकः ॥ ४ ॥
भद्रसेन इति ख्यातः सोऽधर्मनिरतः सदा। अधर्मेणार्जितं वित्तं न च धर्मं चकार सः ॥५॥
तस्यासीत्स्त्री महाभागा सती सर्वगुणान्विता। पतिशुश्रूषणपरा ब्राह्मणी[2] प्रियवादिनी ॥ ६ ॥
नालोकयति द्रष्टारं नाऽस्पर्शीं स्त्रीं समागताम्। सूर्यार्चनरता नित्यं देवताभक्तितत्परा ॥ ७ ॥
तयाऽसौ शिक्षितो भर्ता स्वामिन्देवार्चनं कुरु। नित्यं स्नानं तथा दानं कर्तव्यं भूसुरार्चनम् ॥८
प्रदक्षिणान्नमस्कारान् देवताध्यानमेव च। इत्येवं शिक्षितस्तस्या अवज्ञां च चकार सः ॥९॥
तेन शोकेन संतप्ता मृता लोकान्तरं गता। पातिव्रत्येन धर्मेण परं पदमवाप सा ॥ १७ ॥
सोऽपि वैश्यो ह्यतिस्त्रैणो मत्तो द्रव्यमदेन हि। प्रतिदिनं[3] सुरापाने ह्यकार्यकरणे स्थितः ॥११॥
आसक्तः परदारेषु भद्रसेनोऽतिमूढधीः। पण्यांगनारतो दुष्टः पापात्मा वेदनिन्दकः ॥ १२ ॥
प्रीणयामास वित्तेन पार्थिवान्नहि भूसुरान्। एवं क्रमेण तद्वित्तं व्ययीभूतमधर्मतः ॥ १३ ॥
वित्ते संक्षीयमाणे तु द्रव्यचौर्यं चकार सः। ताडितो राजभृत्यैश्च ततोऽरण्यं समाविशत् ॥१४
तत्रापि स मृगान्दुष्टो ह्याजघान समागतान्। कदाचिद्वनमध्ये तं कृष्णसर्पो ददंश ह ॥१५॥
तदानीं यमदूतैः स ताड्यमानोऽति दारुणम्। पाशैः कण्ठे सुबद्ध्वा तु ततो निन्युर्यमालयम् ॥
यमोऽपि यातनां चक्रे द्रष्टुं श्रोतुं स चाक्षमः। परस्त्रीनखदातारं हस्तच्छेदं चकार सः ॥ १७ ॥
परयोषिन्मुखाम्भोजं चुम्बतश्चास्य वै मुखे। विष्ठा प्रकीर्यतां नित्यमिति दूतान्निवेदयत् ॥ १८
देवद्रव्यापहर्तारं द्विजदेवाग्निनिन्दकम्। करपत्रं गृहीत्वा तु हस्तच्छेदं दुरात्मनम् ॥ १९ ॥
इत्थ्यादि[4] बहुदुःखानि नरके बुभुजे वणिक्। ततः प्राप्तो मृत्युलोकं राक्षसीं तनुमाश्रितः ॥२०
भ्रमतेऽसौ दिवारात्रमाहाराकांक्षया मुने। न किञ्चित् प्राप चाहारं पिशाचः पापपूरुषः ॥२१॥
कदाचिद् वटवृक्षस्य मूलेऽतिष्ठत्स[5] राक्षसः। तत्र तद्वृक्षमूले स नाविन्दद्भक्षणाय च ॥२२॥
तदा कश्चिद् द्विजः स्नात्वा चायाति शिवसन्निधौ। शिवशर्मेति विख्यातः सत्यवाग्विजितेंद्रियः

---

१ केराळोनामदेशोस्ति तत्रदेशोद्भवोवणिक इति यं. पु. पाठः। २ ब्राह्मणीप्रियवादिनी यं. मुं. पु. पा.। ३ देवनेंमदिरापानेंति मु. गो. को. चि. पु. पा.। ४ इत्येवबहुदुःखानीति यं. पु. पा.। ५ समीपगमसेत्तम इति मुं. गो. चें. को. पु. पा.।

# अध्याय ८ वा

## अघाशीचें माहात्म्य

अगस्त्य म्हणाले, हे षडानना, अघाशीतीर्थ कां प्रसिद्ध झालें ? ह्यानें कोणाचें पाप नष्ट केलें ? हे अनन्तविक्रम देवेशपुत्रा, हें सर्व मला यथासांग सांग. तूं बोलण्यांत कुशल आहेस. स्कंद म्हणाले, हे घटजन्मा, तुझ्या प्रश्नाचें उत्तर देऊन अघाशी हें नांव कसें पडलें तेंही सांगतों. ३. याविषयीं प्राचीन इतिहास आहे. केरळ देशामध्यें भद्रसेन नांवाचा एक प्रसिद्ध अधर्मी वैश्यपुत्र होता. त्यानें अधर्मानें धन संपादन केलें, धर्म मात्र कधीं केला नाहीं. ४–५. त्याची भाग्यशाली ब्राह्मणी पत्नी अत्यंत गुणी, पतिसेवापरायण व प्रियवादिनी होती. ६. ती द्वेषकर्त्या पुरुषाकडे किंवा व्यभिचारिणी स्त्रीकडे पहात नसे, व नित्य तत्परतेनें सूर्यपूजा व देवताभक्ति करीत असे. ती आपल्या पतीलाही म्हणत असे, स्वामिन्, नित्य देवब्राह्मणांची पूजा करा, दानधर्म करा, देवांना प्रदक्षिणा व नमस्कार करा. देवांचें ध्यान करा. याप्रमाणें तिनें उपदेश केला असतांही वैश्यानें तिचा तिरस्कारच केला. ९. त्या शोकानें ती ब्राह्मणी संतप्त होऊन मृत झाल्यावर परलोकीं गेली असतां तेथें तिला तिच्या पातिव्रत्यामुळें श्रेष्ठ स्थान लाभलें. १०. इकडे अत्यंत स्त्रैण व गर्विष्ठ असा तो वैश्य रोज दारूंत व कुकर्मांत गर्क असे. ११. त्याचप्रमाणें तो परस्त्रीरत, अतिमूढ, वेश्यासक्त, दुष्ट, पापी व वेदनिंदक होता. १२. ब्राह्मणांना द्रव्य न देतां तो राजे लोकांना द्रव्य देऊन संतुष्ट करीत असे. अशा रीतीनें त्याचें सर्व धन अधर्मांत खर्च झालें. १३. धनाची कमतरता झाली, म्हणून त्यानें द्रव्याची चोरी केली. तेव्हां राजसेवकांनीं त्यास यथेच्छ ताडन केलें. नंतर तो अरण्यांत गेला. १४. तेथें त्या दुष्टानें जवळपास आलेल्या पशूंचा वध केला ! शेवटीं त्याला वनांत काळसर्पानें दंश केला. १५. तेव्हां यमदूतांनीं त्याला भयंकर ताडन करून व पाशबद्ध करून यमालयीं नेलें. १६. तेथें यम करीत असलेली यातना त्याच्यानें पाहवेना व ऐकवेना ! तेथें यम परस्त्रीस नखें लावणाऱ्याचे हात तोडीत होता ! १७. परस्त्रीच्या मुखाचें चुंबन घेणाऱ्याच्या तोंडांत नित्य विष्ठा घाला, असें तो आपल्या दूतांना सांगत होता. १८. देवद्रव्याचा अपहार करणाऱ्या, देव, द्विज व अग्नि यांची निंदा करणाऱ्या दुष्टांचा करवतीनें हस्तच्छेद करण्यांत येत होता. १९. अशा रीतीनें त्या वैश्यानेंही नरकांत पुष्कळ दुःखें भोगलीं व तो राक्षस होऊन पुनः मृत्युलोकांत जन्मास आला. २०.

हे मुने, तो पिशाच्च राक्षस भक्ष्य मिळविण्यासाठीं रात्रंदिवस भटकूं लागला. पण त्याला कांहींही भक्ष्य मिळालें नाहीं. २१. असाच एकदा तो बुभुक्षित वटवृक्षाच्या खालीं उभा असतां शिवशर्मा नांवाचा एक द्विज शिवसंनिध आला. तो सत्यवक्ता व जितेंद्रिय होता. २२–२३.

कौंडिन्यगोत्रजोत्पन्नः शंकरध्यानतत्परः। तदा कश्चिद् द्विजः स्नात्वा जगाम शिवमंदिरम् ॥२४
जपन् स्तोत्राणि विष्णोश्च शंकरस्य तथैव च। राक्षसश्चागतस्तूर्णं भक्षितुं ब्राह्मणं तदा ॥२५॥
[1]आसिषेच जलेनाशु तुलसीमिश्रितेन तम्। तत्संसर्गात्पिशाचोऽसौ तत्क्षणाज्ज्ञानमाप्तवान् ॥
सदैव क्रूरतां त्यक्त्वा ववन्दे चरणौ मुनेः। द्विजः सोऽपि तमालोक्य विस्मयं परमं ययौ ॥

शिवशर्मोवाच –

तमुवाच ततः सोऽथ कुतस्त्वं कोऽसि तद्वद। केन कर्मविपाकेन जातस्त्वं ब्रह्मराक्षसः ॥२८॥
इति पृष्टो ह्यकथयत्स्ववृत्तांतं पुराभवम्।

राक्षस उवाच –

पुनरूचे द्विजं रक्षः क्व गच्छसि महामुने ॥ २९ ॥
स प्रोवाच द्विजस्तं हि राक्षसं पापरूपिणम्।

शिवशर्मोवाच –

अहं शिवस्य पूजार्थं गच्छामि सहपुष्पकः ॥ ३० ॥
मांगीश इति नाम्नाऽत्र विद्यतेऽसौ स्वयं शिवः। इत्याख्यातः स्ववृत्तांतः शिवस्य द्विजसूनुना ॥

राक्षस उवाच –

देहश्चायं मया प्राप्त एनसा सञ्चितेन हि। मामपि नय विप्रस्त्वं तारकोऽसि स्वयं हरः ॥ ३२
[2]तस्येदं वचनं श्रुत्वा स्नानार्थमाव्हयद् द्विजः। अघाशीमगमद्रक्षो ब्राह्मणेन प्रचोदितम् ॥
यावत्स्नानं चकाराथ कपिले शिवसन्निधौ। तावद्विमानं ददृशे शिवदूतैरधिष्ठितम् ॥ ३४ ॥
तस्मिन् विमानरत्ने स उपविष्टस्तदा वणिक्। [3]तामसं तत् स्वरूपं तु हित्वा विस्मयकारकम्
स तस्मिंश्चोपविष्टस्तुशिवदूतैश्च सेवितः। रुद्ररूपधरो भूत्वा कैलासमगमत्तदा ॥ ३६ ॥
अन्ये च बहवस्तत्र मानवा मुक्तकल्मषाः। स्वर्गलोकमितो जग्मुर्दिव्यरूपधरा मुने ॥ ३७ ॥
तदारभ्य नदी नाम ह्यघाशीति च विश्रुता। इत्येतत्ते मया ख्यातं यथा पृष्टं त्वयाऽनघ ॥
तस्या नद्यास्तु महिमा कलौ कोऽपि न मन्यते। यश्च कश्चित् स्वयं वेद विश्वेशानुग्रहो यदि
भवेत्तर्ह्यघनाशिन्या माहात्म्यं लोकविश्रुतम्। अघाशीनद्या माहात्म्यं ये पठन्ति द्विजोत्तमाः ॥
तेषां भवति वै पुंसां गंगास्नानसमं फलम्।
स्नातोऽत्र यः कश्चन मर्त्यलोके जलैः पवित्रैरघनाशिनीभवैः।
विलोकयेत्पादयुगं शिवस्य किं तीर्थवृन्दैर्बहुसेवितैश्च यत् ॥ ४१ ॥

सूत उवाच –

इत्येतत् पुण्यमाख्यानं मया ते ह्यनुवर्णितम्। यः श्रावयेत्पठेद्वापि सद्यो मुच्येत पातकात् ॥
योऽध्यायं सकलं विप्र शृणुयाद्भक्तिसंयुतम्। तस्य प्रसन्नो भगवान् मुक्तिं कीर्तिं च यच्छति ॥४३॥

इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे स्कन्दागस्त्यसंवादे मांगीशमाहात्म्ये अघनाशिनी माहात्म्यकथनं नामाष्टमोध्यायः ॥ ८ ॥

---

१ असिषेइति मु. गो. पु. पा. । २ तस्येतिचवचःश्रुत्वेति यं. पु. पा. । ३ तदसंतत्स्वरूपन्तुइति यं. पु. पा. ।

तो शिवभक्त ब्राह्मण कौण्डिन्यगोत्रोत्पन्न होता. स्नान करून शिव-विष्णुस्तोत्रें म्हणत तो शिवमंदिरांत जाऊं लागला, तोंच तो राक्षस त्यास खाण्यासाठीं त्याच्याजवळ गेला. लगेच त्या ब्राह्मणानें आपलेकडील तुलसीमिश्रित जल त्याच्यावर टाकलें. त्या जलाचा संसर्ग होतांच त्या पिशाचाला ज्ञानप्राप्ति झाली. २४–२६. त्याचें क्रौर्य नष्ट झालें व त्यानें मुनिचरणांना वंदन केलें. हें पाहून त्या द्विजालाही फार आश्चर्य वाटलें. २७. शिवशर्म्यानें त्याला विचारलें, तूं कोण आहेस? कोठून आलास व कोणत्या कर्मानें तूं ब्रह्मराक्षस झालास, हें सर्व सांग. २८. त्या राक्षसानें आपला पूर्ववृत्तांत निवेदन केला व विचारलें, हे महामुने, आपण कोठें जात आहांत? २९. शिवशर्मा त्या पापरूपी राक्षसाला म्हणाला, मी हीं फुलें घेऊन शिवपूजेसाठीं जात आहें. येथें प्रत्यक्ष शंकराचा मांगीश या नांवानें वास आहे. याप्रमाणें ब्राह्मणानें त्याला शिवकथा सांगितली. ३०–३१.

राक्षस म्हणाला, संचित पापामुळें मला हा देह मिळाला आहे. हे विप्रा, मलाही तूं तुझ्याबरोबर ने. तूं तारक शंकर आहेस. ३२. त्याचें तें भाषण ऐकून ब्राह्मण त्याला आपल्याबरोबर अघाशी नदीवर घेऊन गेला. तेथें त्यानें ब्राह्मणाच्या उपदेशाला अनुसरून शिवसंनिध कपिल तीर्थांत स्नान केलें, तोंच त्याला एक विमान दिसलें, त्यांत शिवदूत बसले होते. ३३–३४. तो वाणी त्या श्रेष्ठ विमानांत बसतांच त्याचे तमोगुणी शरीर नाश पावलें व त्यास रुद्ररूप प्राप्त झालें. शिवदूत त्याची सेवा करूं लागले व अशा रीतीनें तो कैलासास गेला. ३५–३६. असेच पुष्कळ मानव निष्पाप व दिव्यरूप होऊन स्वर्गलोकीं गेले. ३७. तेव्हांपासून ह्या नदीचें अघाशी हें नांव जगांत प्रसिद्ध झालें. ३८. कलियुगांत हा अघाशी नदीचा महिमा कोणाच्याही लक्षांत येत नाहीं. तो समजल्यास विश्वेश्वराचा अनुग्रहच होय. ३९.

अघाशी नदीचें हें लोकप्रसिद्ध माहात्म्य जे ब्राह्मण पठन करतात, त्यांना गंगास्नानाचें फल मिळतें. ४०. मृत्युलोकांत जो मानव अघनाशी जलानें स्नान करतो, त्याला शिवचरणांचें दर्शन होतें. यानतर अनेक तीर्थांचें वारंवार सेवन करणें व्यर्थ आहे. ४१.

सूत म्हणाला, मी वर्णन केलेलें हें पवित्र आख्यान जो पठन करतो व श्रवण करवितो, तो तत्काळ पापमुक्त होतो. ४२. हे विप्रा, हा संपूर्ण भक्तिरसप्रधान अध्याय जो ऐकतो, त्याला भगवान शंकर संतुष्ट होऊन मुक्ति व कीर्ति देत असतात. ४३.

# अथ नवमोऽध्यायः ।

## शंखावलीमाहात्म्यम् ।

स्कन्द उवाच –
गोमान्ताद्दक्षिणे भागे पारावारसमीपतः । स्फुरंती च पवित्राऽऽस्ते नाम्ना शंखावलीति च ॥ १
अनेकवसुसम्पूर्णा स्वर्गस्यापि तिरस्करी । यस्यां वसन्ति विप्राग्र्या व्यग्रचित्ता न ते क्वचित् ॥२
चातुर्वर्ण्यजनोपेता चतुराश्रमसंयुता । आम्रातकैश्चूतनिंबैर्नारिकेरैर्विराजिता ॥ ३ ॥
वीजिता कल्पवृक्षाणां पल्लवैश्चेव नित्यशः । बकुलैः कर्णिकारैश्च माधवीभिर्विराजिता ॥ ४ ॥
पयोधिवीचिकल्लोलैर्गंगाजलसमन्वितैः । वीज्यते सा सदात्यंतं वायुनोद्यानशालिना ॥ ५ ॥
कुशाः काशाश्च नीपाश्च निचुलाः खदिरास्तथा । पलाशिनो विराजन्ते यस्यामन्तरकानने ॥६॥
यत्र सन्त्यग्रजन्मानो वेदवेदांगपारगाः । मन्त्रौषधितपोयोगबलेन जितमृत्यवः ॥ ७ ॥
सेतवो धर्मनीरस्य हेतवो जगतामपि । यत्र तिष्ठन्ति कामिन्यः पातिव्रत्यपरायणाः ॥ ८ ॥
गृहधर्मार्णवे दक्षाः किं च दक्षसुता इमाः । आढ्या यत्र विराजन्ते राजराजाधिकश्रिया ॥ ९
सौधानि यत्र दृश्यन्ते सुधाधवलितान्यहो । हसन्तीव निशानाथं नाथितानि विभागशः ॥१०॥
इषुपाताऽभिधानस्य रामक्षेत्रस्य मण्डनम् । दण्डनं चैव मर्त्यानां चित्रगुप्तस्य मन्दिरम् ॥११॥
आवलिर्यत्र शंखानां नित्यमायाति सागरात् । शंखावलीति विख्यातं तस्या नाम बभूव ह ॥१२
मुने किं बहुनोक्तेन मुक्तिक्षेत्रमिदं परम् । मुक्तिपुर्यस्तु याः प्रोक्तास्ताभ्योऽप्यनवमा हि सा ॥
यस्यामागत्य भगवान् वैकुण्ठः कमलेक्षणः । भक्तानुग्राहको देवो विष्णुस्तस्थौ सनातनः ॥१४
यस्य सन्दर्शनाज्जन्तुर्मुच्यते भवबन्धनात् । सोऽस्ति यत्र महाविष्णुः संसाराब्धेस्तु पारदः ॥
दैत्यराट् निहतो येन कालकल्पोऽतिमत्सरी । मृडानीपतिरत्युग्रस्त्र्यम्बको यत्र कामदः ॥१६॥
यत्कथाया विलोकेन मल्लोकं विशते पुमान् । सुराणामसुरेन्द्राणां मानवानां च योगिनाम् ॥
द्वेषिणां तापसानां च फलदो निर्विकल्पकम् । सोऽस्ति सिद्धेश्वरो यत्र भवानीवल्लभो हरः ॥१८॥
भवान्या कान्तया सार्धं कांक्षितार्थप्रदो विभुः । मुनिवर्याश्रमो यत्र दर्शनात्पापनाशनः ॥१९॥
बदर्याद्याश्रमा यत्र पैंग्यस्यापि विराजते । यस्याश्रमे महापुण्ये बदरीखण्डमण्डिते ॥२०॥
आसीत्परमधर्मात्मा सिद्धः कश्चन सुव्रतः । आराधयंश्छिवं साक्षान्मसा ध्याननिष्ठया ॥ २१ ॥
तपस्तेपे महाभागो बदर्यां सिद्धसत्तमः । केनचित्त्वथ कालेन राक्षसीरूपधारिणी ॥ २२ ॥
कस्यचित्त्वथ विप्रस्य सुमुखी नाम कन्यका । पतिविद्वेषणकरी विट्कथानिरता सदा ॥ २३॥
बन्धकी संगरहिताऽसती विप्रविनिन्दका । तेन कर्मविपाकेन राक्षसी समजायत ॥ २४ ॥

---

१ पुण्यतीर्था पवित्रास्ते इति मु. को. गो. चें. सि. का. पु. पा. ।

# अध्याय ९ वा

## शंखावली नगरीचें माहात्म्य

स्कन्द म्हणाला, गोमन्ताच्या दक्षिणभागीं समुद्राजवळ शंखावली नांवाची एक शोभायमान व पवित्र नगरी आहे. १. स्वर्गालाही तुच्छ करणाऱ्या या धनसंपन्न नगरींत श्रेष्ठ द्विज रहात असत. ते कधीं व्यग्रचित्त नव्हते. २. तेथें चार वर्णांचे व चार आश्रमांचे लोक रहात असत. ती नगरी आंबाडा, आंबा, निंब व माड या वृक्षांनी सुंदर दिसत होती. ३. कल्पवृक्षाचे पल्लव, बकुल, पांगारा व कस्तुरमोगरा हे वृक्ष तिला वारा घालीत होते. ४. समुद्रही आपल्या गंगामिश्रित तरंगांनीं तिला वारा घालीत होता व तो वारा तेथील उद्यानांतून सतत वहात होता. ५. तेथील अरण्यांत कुश, काश, नीप, निचुळ, खैर व पळस हे वृक्ष शोभत होते. ६. तेथील वेदपारंगत ब्राह्मणांनी मंत्र, औषधि, तप व योग यांच्या सामर्थ्यानें मृत्यूलाहि जिंकलें होतें. ७. तेथील श्रेष्ठ पतिव्रता स्त्रिया अधर्मरूप[1] पाण्यावरील सेतु व जगत्कारण होत्या. ८. जणुं दक्षकन्यांप्रमाणें असलेल्या त्या स्त्रिया गृहस्थधर्मांत तत्पर असून त्यांच्याजवळ कुबेरापेक्षांही अधिक संपत्ति होती. ९. त्या त्या विभागाची सत्ता असलेले व अमृतधवल असे तेथील चुनेगच्ची वाडे जणुं चंद्राला हसत होते. १०. ती नगरी इषुपात नामक रामक्षेत्राचा एक अलंकार होता व ( अधर्मी ) मर्त्यांना दण्ड करणारें चित्रगुप्ताचें मंदिर[2] होतें. ११. येथें रोज समुद्रांतून शंखांची एक आवली ( पंक्ति ) येत असे म्हणून तिला शंखावली हें नांव पडलें होतें. १२. हे मुने, अधिक काय सांगावें ! हें एक मोठें मुक्तिक्षेत्र आहे. ज्या प्रख्यात मुक्तिपुरी आहेत, त्यांहून ही कमी प्रतीची नाहीं. १३. कारण या नगरींत कमलनयन सनातन भगवान् विष्णु भक्तांवर अनुग्रह करण्यासाठीं स्वतः येऊन राहिले आहेत. १४.

ज्याच्या दर्शनानें प्राणी संसारबंधनांतून मुक्त होतो तो मुक्तिदाता महाविष्णु येथें आहे. १५. ज्यांनीं कालसदृश अतिमत्सरी दैत्यराजाचा वध केला ते मृडानीपति, उग्र कामना पूर्ण करणारे शंकर येथेंच वास करतात. १६. त्याची कथा केवळ ऐकल्यानें पुरुष माझ्या लोकांत येतो. देव, असुरेंद्र, मानव, योगी, द्वेष्टे व तपस्वी या सर्वांना जो निर्विकल्प फल देतो तो भवानीपति सिद्धेश्वर शंकर येथेंच असतो. १७–१८. इच्छित अर्थ देणारा विभुशंकर अर्धांगी भवानीसह येथेंच असतो. येथें श्रेष्ठ मुनींचे अनेक आश्रम असून त्यांच्या केवळ दर्शनानें पापनाश होत असे. १९. येथेंच विष्णुक्रांतादि वनस्पतींमुळें सुंदर दिसणारे बदर्याश्रम व पैंग्यऋषीचा आश्रम होता. यांत मोठा धर्मात्मा व सुव्रत असा एक सिद्ध पुरुष एकाग्र मनानें शंकराची आराधना करीत होता. तो भाग्यशाली श्रेष्ठ सिद्ध एका बोरीच्या झाडाखालीं तप करीत बसला असतांना एक दिवस एक राक्षसी आली. ती राक्षसी पूर्वजन्मीं सुमुखी नांवाची ब्राह्मणकन्या होती. पण ती पतिद्वेष्टी नेहमी जारकर्मांत गर्क असे. ती व्यभिचारिणी नेहमीं ब्राह्मणनिंदा करीत असे. या सर्व कर्मांचा परिणाम म्हणून ती राक्षसी झाली होती. २०–२४.

---

१ अधर्मतीरस्य । २ मंदिरम् ।

तत्रापि वसतिं चक्रे धर्षयंती स्त्रियः सदा । कदाचिद्धर्षयामास स्वसमीपगताः स्त्रियः ॥ २५ ॥
व्याघ्रीभूतस्वरूपेण दुर्धर्षेण च सा तदा । ततस्ता भयसंविग्नाश्चक्रुः कोलाहलं भृशम् ॥२६॥
तन्निनादमुपश्रुत्य सिद्धोऽतीव सुदुःखितः । विश्वेशं शरणं गत्वा रक्ष रक्षेति चाऽब्रवीत् ॥२७॥
विश्वेशाऽमरवर्येश त्राहि मां भयविह्वलम् । तत्तस्य वचनं श्रुत्वा करुणं दीनवत्सलः ॥ २८ ॥
प्रादुरासीत्स भगवान् शूलपाणिः पिनाकधृक् । हुंकाराऽभिहता भूमौ पपात द्विजकन्यका ॥२९
सिद्धेनाराधितो यस्मात्तस्मात्सिद्धेश ईरितः । तदाप्रभृति लोकेऽस्मिन्सिद्धेश इति कीर्तितः ॥
निवासं रोचयामास सिद्धेशो बदरीवने । मुने सिद्धेशपादाब्जे रतिमुद्वहतां नृणाम् ॥ ३१ ॥
पतनं न भवाम्भोधौ कल्पानामयुतैरपि । पिपीलिका पतंगो वा मातंगो वा नरोऽपि वा ॥३२
दृष्ट्वा सिद्धेशलिंगं तु मनोरथमवाप्नुयात् । अध्यायं सकलं भक्त्या यः पठेत् श्रावयेन्नरः ॥
सर्वपापविनिर्मुक्तः स याति परमां गतिम् ॥

इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे स्कन्दागस्त्यसंवादे मांगीशमाहात्म्ये सिद्धेश्वर-प्रादुर्भावो नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

# अथ दशमोऽध्यायः ।

## शंखासुरवधः ।

अगस्त्य उवाच –

अपर्णाहृदयाब्जेंदो सर्वज्ञ भगवान् प्रभो । श्रुत्वाऽऽख्यानमिदं ब्रह्मन् न तृप्तिरधिजायते ॥ १ ॥
यदुक्तं भवता पूर्वं वैकुण्ठः कमलेक्षणः । पुरिं स्थितं शंखनाम्नि न्यहन् शंखासुरं रिपुम् ॥ २ ॥
तदाद्यन्तं समाख्याहि विष्णोरतुलतेजसः । शंखासुरेण संग्रामः कथं जातो वदस्व मे ॥ ३ ॥
कम्बूनामागमं चैव मृडान्याश्च कथानकम् । एतद्विस्तरतो ब्रूहि सर्वज्ञोऽसि यतो भवान् ॥४॥
इत्थं हि पाथोधिरिपोर्वरिष्ठं प्रश्नं निशम्याऽथ महेशसूनुः ।
ध्यात्वा परं श्रीरमणांघ्रिपद्मं कुम्भोद्भवं वाक्यमिदं बभाषे ॥ ५ ॥

स्कंद उवाच –

मुनिवर्य निबोधेदं वक्ष्यमाणं विशेषतः । चरितं पद्मनाभस्य पद्मार्चितपदस्य च ॥ ६ ॥
पुरेयं धरणी साधो दैत्यैर्बहुनिपीडिता । आक्रान्ता दैत्यभारेण विरिंचिं शरणं ययौ ॥ ७ ॥
गोरूपमवलंब्यासौ व्यसनं सा न्यवेदयत् । तदुपाकर्ण्य लोकेशश्चतुर्वक्त्रः स शंकरः ॥ ८ ॥
लोकपालैः परिवृतो वन्हीन्द्रपितृनायकैः । निर्ऋत्यंबुपवातेशसर्वैरखिलैः शुभैः ॥ ९ ॥
धरण्या सहितः प्राप कूलं क्षीरनिधेरसौ । तत्र श्रीरमणं दृष्ट्वा शेषतल्पशयं विभुम् ॥ १० ॥
स्तोत्रैस्तुष्टाव लोकेशं रजोमूर्तिर्विशुद्धधीः । चतुर्निगमसारैस्तत् समाकर्ण्य च केशवः ॥ ११ ॥
वीक्ष्य सर्वान् सुरेशान् वै ब्रह्मेंद्रत्र्यक्षनायकान् । उवाच वचनं तेषां दुःखनाशं तदाऽकरोत् ॥

तेथेंही ती सर्व स्त्रियांना भीतिप्रद बनली होती. एकदां ती वाघ बनून स्त्रियांना घाबरवूं लागली. तेव्हां तिचें तें भयंकर रूप पाहून स्त्रियांनी आक्रोश केला. त्यांचा तो आवाज ऐकून सिद्धपुरुषाला फार दुःख झालें. तो विश्वेशाला शरण गेला व म्हणाला, हे विश्वेशा, रक्षण कर, रक्षण कर. मी भयानें व्याकुळ झालों आहें, माझें रक्षण कर. हें त्याचें करुण वचन ऐकून दीनवत्सल शूलपाणि पिनाकधारी भगवान् शंकर तेथें प्रकट झाला व त्याच्या केवळ हुंकारानें ती द्विजकन्या जमिनीवर पडली. २५–२९.

सिद्धपुरुषानें आराधना केल्यामुळें त्या ईश्वराचें सिद्धेश हें नांव जगांत प्रसिद्ध झालें. ३०. त्या सिद्धेशाला बदरीबननिवास आवडला. हे मुने, सिद्धेशाच्या चरणकमलीं भक्ति जडलेल्या मानवांचा अधःपात भवसागरांत हजारों कल्पकालानींही होणार नाहीं. मुंगी, हत्ती किंवा मनुष्य असो, सर्वांचे मनोरथ या सिद्धेशलिंगाच्या दर्शनानें सफल होतात. ३१–३२. जो मनुष्य हा संपूर्ण अध्याय पठन करील किंवा ऐकवील तो सर्वपापमुक्त होऊन श्रेष्ठ गतीला जाईल. ३३.

# अध्याय १० वा

## शंखासुर–वध

अगस्त्य म्हणाले, हे सर्वज्ञ प्रभो भगवन्, तूं पार्वती हृदयकमलाचा चंद्र आहेस. हे ब्रह्मन्, हें आख्यान ऐकूनही माझी तृप्ति झाली नाहीं. १. आपण पूर्वी सांगितलें होतें कीं, कमलनयन विष्णूनें शंख नांवाच्या नगरींत राहणाऱ्या शंखासुराला ठार मारलें. २. अद्वितीय पराक्रमी विष्णूचा शंखासुराशीं युद्ध केल्याचा आद्यन्त इतिहास आपण मला सांगा. ३. शंखासुराचें आगमन व मृडानीची कथा हें सर्व विस्तारपूर्वक सांगा, कारण आपण सर्वज्ञ आहांत. ४. याप्रमाणें अगस्त्याचा तो मोठा प्रश्न ऐकल्यावर षडानन लक्ष्मीपतीच्या चरणकमलांचें ध्यान करून कुंभोद्भवाला म्हणाला, ५. हे मुनिवर्या, लक्ष्मी ज्याच्या चरणकमलांचें अर्चन करते त्या विष्णूचें चरित्र मी तुला सांगतों, ऐक. ६.

हे साधो, पूर्वी एकदां दैत्यांनीं या धरणीला फारच पीडा दिली म्हणून दैत्यभारानें आक्रांत झालेली पृथ्वी ब्रह्मदेवाला शरण गेली. ७. गोरूप धारण करून तिनें आपलें सर्व दुःख त्याला निवेदन केलें. तें ऐकून लोकेश ब्रह्मदेव व शंकर पृथ्वीसह क्षीरसागराच्या तीरावर गेले. त्यांच्याबरोबर वह्नि, इंद्र, यम, निर्ऋति, वरुण, वायु, ईश इत्यादि सर्व चांगले लोकपालही होते. तेथें शेषशायी लक्ष्मीपतीला पाहून त्यांनीं चारही वेदांच्या सारभूत स्तवनांनीं त्याची स्तुति केली. रजोमूर्ति व शुद्धज्ञानरूप केशवानें ती स्तुति ऐकली व ब्रह्मा, इंद्र, त्र्यंबकप्रभृति सर्व देवांकडे पाहून विष्णूनें केवळ आपल्या शब्दांनींच त्यांचा दुःखनाश केला. ८–१२.

श्रीभगवानुवाच –

ज्ञातं वो हृद्गतं देवा महीऽयं भारपीडिता। यदर्थमागता यूयं तमर्थं साधयाम्यहम् ॥ १३ ॥
सम्भूयाऽहं यदोर्वंशे गृह आनकदुंदुभेः। भोगिनानेन शेषेण हृच्छल्यं चोद्धरामि वः ॥ १४ ॥
उद्धरेयं धराभारं हनिष्ये दैत्यनायकान्। निर्वैरां च करिष्ये गां हत्वा दैत्यगणान् बहून् ॥ १५
भवन्तोऽपि मया सार्कं भूर्लोकं गन्तुमर्हथ। ममाभीष्टस्य सिध्यर्थं सम्भवन्ति सुरस्त्रियः ॥
इति देवान् समाभाष्य तत्रैवान्तर्दधे हरिः। सुपर्वाणश्च ते प्राप्ताः सर्वे स्वस्वनिकेतनम् ॥१७॥
अथ कालेन महता पद्मनाभः प्रतापवान्। वसुदेवाच्च देवक्यां जातो भोजेन्द्रबंधने ॥ १८ ॥
आराधितः कश्यपेन अदित्या पूर्वजन्मनि। तत्तपःफलसिध्यर्थं जातोऽसौ यादवे कुले ॥१९॥
वसुदेवसुतः श्रीमान् कृष्ण इत्यभिविश्रुतः। शेषोऽपि बलदेवोऽपि संकर्षणमुशन्ति तम् ॥२०
देवाः संजज्ञिरे सर्वे यदुवंशे महाबलाः। सुरांगना बभूवुश्च राजपुत्र्यो महामुने ॥ २१ ॥
विक्रम्य ता हृताः सर्वा नरकाच्च स्ववेश्मनि। काश्चिद् गोपेषु संजाता भगवत्प्रियकाम्यया ॥
युगान्तोदैर्निपीयाऽऽस्ते स्वसृष्टपुरुशक्तिधृक्। शेषैः स्वल्पमतिभिर्न ज्ञातं यच्चिकीर्षितम् ॥२३
धृत्वा कृष्णं वपुः सोऽथ भुवो भारं हरन् विभुः। पूतनारिष्टऽकंसादीन् सर्वांश्चैवाहनद्बलीन् ॥
चिक्रीडे व्रजयोषिद्भिः क्षपानाथसहायवान्। क्षणदायां महासत्त्वो ह्यासीद्रासोत्सवो मुने ॥
श्रुतप्रायं त्वया सर्वं मुने कृष्णविचेष्टितम्। अथाप्युक्तं प्रसंगेन शंखासुरनिबर्हणे ॥ २६ ॥
हत्वा कंसं गोपवेषो रंगमध्येऽतिसन्मतिः। मोचयामास पितरं देवकीं स्वप्रसूं हरिः ॥ २७ ॥
उग्रसेनादिकान् सर्वान् निरुद्धान् भोजवेश्मनि। मोचयामास निगडाद्गोपमण्डनमण्डितः॥२८
प्रसादयामास विभुर्वसुदेवं विनीतवत्। वसुदेवोऽपि तं मेने प्राकृतं स्वसुतं हरिम् ॥ २९ ॥
राज्यं दत्वा चोग्रसेनायानिनाय सुरोत्तमान्। शशास वसुधाचक्रं स्वयं चक्रधरो मुने ॥३०॥
वसुदेवश्च तं मत्वा प्राकृतं तनयं स्वकम्। स चकारोपनयनादिकं च सुतयोः शुभम् ॥ ३१ ॥
उभौ तौ संस्कृतौ पुत्रौ वसुदेवेन धीमता। गायत्रीव्रतमास्थाय गतौ सांदीपनेर्गृहम् ॥ ३२ ॥
शुश्रूषणपरौ दान्तौ मिताहारौ बभूवतुः। सान्दीपनिं चार्चयन्तौ परं दैवमिवादृतौ ॥ ३३ ॥
उभौ तौ विबुधश्रेष्ठौ सर्वविद्याप्रवर्तकौ। चतुर्दशानां विद्यानां पारं प्राप्तौ मनीषिणौ ॥ ३४ ॥
गुरुदक्षिणयाऽऽचार्यमूचतुस्तौ महामती। सान्दीपनिं बभाषाते सुप्रसन्नेन चेतसा ॥ ३५ ॥
दृष्ट्वाप्युवाच परमं तयोरत्यद्भुतं द्विजः। गुरुश्च निष्क्रयः कार्यो विद्यानां विबुधोत्तमौ ॥ ३६ ॥
तद्याचेऽहं वरं वत्सौ मृतं पुत्रं प्रयच्छताम्। तच्छ्रुत्वा भगवानाह किमेतत्कथ्यते गुरो ॥ ३७
सुतो वः कीदृशः कस्मान्मृतस्तन्मे निवेद्यताम्। तदैव सोऽश्रुनेऽत्रोभूत्पत्न्या सान्दीपनिः सह ॥

भगवान म्हणाले, देवहो, तुमचें हृद्गत मला समजलें. ही पृथ्वी दैत्यभारानें व्याकुळ झाली आहे. ज्या कार्यासाठीं तुम्ही आलांत, तें कार्य मी करतों. १३. यदुवंशीय आनकदुंदुभीच्या घरीं जन्म घेऊन मी ह्या शेषाच्या द्वारा तुमचें तें शल्य उपटून टाकतों. १४. मी पृथ्वीचा उद्धार करणार व पुष्कळ दैत्यनाश करून पृथ्वीचा तापही नष्ट करणार. १५. यासाठीं आपणही माझ्यासह पृथ्वीवर चला. देवस्त्रियासुद्धां माझ्या इष्टसिद्धीसाठीं जन्म घेणार आहेत. १६. याप्रमाणें देवांना सांगून हरि तेथेंच अंतर्धान पावला. सर्व देवही आपआपल्या घरीं निघून गेले. १७. पुष्कळ काळानंतर भोजराजा बंदिवासांत असतां प्रतापी विष्णूनें वसुदेव देवकीच्या ठिकाणीं जन्म घेतला. १८. कश्यप व अदिति यांनी पूर्वजन्मीं विष्णूची आराधना केली होती. त्या तपाचें फळ म्हणून विष्णूनें यादव कुळांत जन्म घेतला. १९.

तो वसुदेवसुत श्रीकृष्ण या नांवानें प्रसिद्ध झाला. शेष हा बलदेव झाला. त्यालाच संकर्षण म्हणतात. २०. सर्व बलवान देव यदुवंशांत जन्मले. हे महामुने, सर्व देवांगनांनीं राजकन्यारूपानें जन्म घेतला. २१. कृष्णानें नरकासुराला ठार मारून त्या सर्व राजकन्यांना आपल्या मंदिरांत नेलें. कांहीं देवांगनांनीं भगवंताच्या प्रेमासाठीं गोपगृहीं जन्म घेतला. २२. अत्यंत अल्पमति देवांना मात्र हा बेत बिलकुल समजला नाहीं. २३. नंतर भगवान् विष्णूनें श्रीकृष्णशरीर धारण करून भूभार कमी करण्यासाठीं पूतना, अरिष्ट, कंस इत्यादि बलवान् शत्रूंना ठार केलें. २४. चांदण्या रात्रीं महासत्त्व कृष्णानें व्रजस्त्रियांसह रासक्रीडा केली. २५. हें सर्व कृष्णचरित्र तूं ऐकलेंच असशील. तथापि शंखासुराचा प्रसंग म्हणून मी तें पुनः सांगितलें आहे. २६. अत्यंत बुद्धिमान् गोपवेषधारी कृष्णानें भर सभेंत कंसवध करून आपली माता देवकी व पिता वसुदेव यांची मुक्तता केली. २७. भोजगृहीं शृंखलाबद्ध करून ठेवलेल्या उग्रसेन इत्यादिकांना गोपभूषण कृष्णानें सोडविलें. २८. विश्वव्यापी विष्णूनें नम्र होऊन वसुदेवाला संतुष्ट केलें व वसुदेवालाही हरि आपला सामान्य पुत्रच वाटला. २९. त्या चक्रधारी विष्णूनें उग्रसेनाला राज्य दिलें. सर्व देवश्रेष्ठांना पृथ्वीवर आणलें व पृथ्वीचें राज्य केलें. ३०. त्याला आपला सामान्य पुत्र समजून वसुदेवानें त्या उभयतांचे उपनयनादि मंगल संस्कार केले. ३१.

उभय पुत्रांचा गायत्री व्रताचा शुभ संस्कार झाल्यावर ते दोघेही सांदीपनी गुरूच्या घरीं गेले. ३२. निग्रही व मिताहारी असे ते दोघे गुरुसेवेंत तत्पर राहून व सांदीपनीला मोठें दैवत समजून त्याची पूजा करीत होते. ३३. सर्व विद्यांचे मूळ प्रवर्तक असे ते ज्ञानी देवश्रेष्ठ चौदा विद्यांमध्यें पारंगत झाले ! ३४. त्या महामति कुमारांनीं सांदीपनी गुरूची आनंदित मनानें गुरुदक्षिणेसाठीं प्रार्थना केली. ३५. त्या ब्राह्मण गुरूनें त्यांचें तें अति अद्भुत तेज पाहून म्हटलें, देवोत्तमांनो, चौदा विद्यांचें शुल्क द्या. ३६. बाळांनो, तुम्ही माझा मृतपुत्र मला द्यावा, हीच मी तुमच्याकडे याचना करतों. हें ऐकून भगवान् कृष्ण म्हणाले, गुरुजी, तुम्ही हें काय बोलतां ? ३७. तुमचा मुलगा कसा होता, व त्याला मृत्यु कसा आला, तें मला सांगा. लगेच सांदीपनी गुरुजी व गुरुपत्नी यांच्या डोळ्यांत अश्रु आले. ३८.

---

१ आनिनाय

उवाच शिष्यवर्यं तं स्वोदन्तं सकलं मुने । कृष्ण मे शृणु चाभाग्यं वक्ष्यमाणं मयाखिलम् ॥३९
उपरागः पुरा ह्यासीद् भास्करस्य सुतेजसः । भारतीयाः प्रजा आसन्प्रभासे संगतास्तु ताः ॥४०
ससुतः सकलत्रोऽहं रतभाग्योऽपि निर्गतः । दृष्ट्वा जलनिधिं लोकाः कृतार्था इव मेनिरे ॥४१॥
प्लवन्तश्चार्णवे चैके मज्जन्तश्चार्णवेऽपरे । द्रोणिभिश्चापि बव्हीभिः क्रीडाकौतुकलालसाः ॥४२
तत्र मे तनयः साधुः सर्वलक्षणलक्षितः । स्नातुं गतोऽर्णवे मग्नो नादृश्यत ततः परम् ॥ ४३ ॥
ततो दुखार्णवे मग्नो ह्यहं चैवाभवंस्तदा । शिलां बद्ध्वा तु कण्ठेऽहं मर्तुकामः सुतं ह्यनु ॥ ४४
जना मां वारयामासुर्मोचयित्वा महाशिलाम् । तदारभ्याहमात्मानं मन्ये पापिनमच्युत ॥४५
तव सन्दर्शनेनाऽहं कृतार्थोऽस्मि जगत्पते । पुत्रं दातुं समर्थोऽसि गतं वैवस्वतालयम् ॥ ४६

स्कन्द उवाच –

तस्य तद्वचनं श्रुत्वा शामयित्वा द्विजोत्तमम् । सस्मार दारुकं कृष्णः स रथं सायुधं मृधे ॥
स तत्स्मरणमात्रेण दारुकोऽप्याययौ क्षणात् । गृहीत्वा परमास्त्राणि दैत्यानां भयदान्यलम् ॥
आरुह्य स रथं कृष्णः प्रभासं साग्रजो ययौ । सान्दीपनेर्गुरोः पुत्रो मृतो यत्र पुरा द्विज ॥ ४९

इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे स्कन्दागस्त्यसंवादे मांगीशमाहात्म्ये शंखावलि-वर्णनं नाम दशमोऽध्यायः ॥ १० ॥

# अथ एकादशोऽध्यायः ।

## शंखावल्याख्यानकथनम् ।

स्कन्द उवाच –

प्राप्तमाकर्ण्य दाशार्हं प्रांजलिः सागरोऽब्रवीत् । गुरुपुत्रं प्रयच्छेति तं बभाषे सुरेश्वरः ॥ १ ॥
तदाकर्ण्याप्रमेयस्य वचनं सोऽर्णवोऽब्रवीत् । दैत्यः पंचजनो नाम ममाप्यन्तर्जलेचरः ॥ २ ॥
जलं कल्लोलयन्नेव पीडयत्यनिशं हि माम् । तेन नीतोऽस्ति पापेन गुरुपुत्रोऽतिमन्युना ॥३॥
जहि तं युद्धशौंडीरं महाबलपराक्रमम् । ततस्तद्वचनं श्रुत्वा विवेशान्तर्जलं हरिः ॥ ४ ॥
पाञ्चजन्यं महासत्त्वं ददर्शामोघविक्रमः । स्वगोत्रैरप्यसंख्यातैर्युयुधे सोऽसुरो हरिम् ॥ ५ ॥
अद्भुतं रूपमास्थाय क्षिपन् भगवतो ह्युरः । तद्वंशप्रभवाः शंखा युयुधुर्मधुसूदनः ॥ ६ ॥
तेषामापततां वेगं भगवानतिविक्रमः । न सेहे वारिधेस्तोये युद्धमासीत्सुभैरवम् ॥ ७ ॥
तं पाञ्चजन्यं भगवान् गदाग्रजो विदारयामास शुभैः कराग्रजैः ।
नालोकयत्तं जठरे कुमारं सद्गंकं पाणितले वहन्ययौ ॥ ८ ॥
उन्ममज्जाऽथ सलिलात्कम्बूपाणिर्गदाग्रजः । पुनर्भूतलमायातस्तर्जयन्नसुरान् विभुः ॥ ९ ॥
यत्रोन्ममज्ज भगवान् रामक्षेत्रं तु तन्मुने । सह्याद्रिशिखरं रम्यं गोमन्ताचलसंज्ञकम् ॥१०॥
इषुपाताभिधं पुण्यं नाम्ना बदरिकाश्रमः । तत्पृष्ठतो महाशंखाः पाञ्चजन्यकुलोद्भवाः ॥ ११॥
आवलीभिः समाजग्मुर्योद्धुं यदुपतिं तदा ।

ते त्याला म्हणाले, कृष्णा, मी तुला सर्व वृत्तांत सांगतों, ऐक. ३९. एकदां सूर्यग्रहण होतें. सर्व भारतीय प्रजा प्रभास तीर्थावर जमल्या होत्या. ४०. दुर्दैवी मीसुद्धां पत्नी व मुलांना बरोबर घेऊन तेथें गेलों. तेथें जमलेला तो जनसमुद्र पाहून मला धन्यता वाटली. ४१. समुद्रांत कांहीं लोक बुड्या मारीत होते, कांही पोहत होते व कांहीं होडींत बसून मौज करीत होते. ४२. त्यांमध्यें माझा सुलक्षणी मुलगा स्नान करण्यास गेला पण तो पुनः दिसलाच नाहीं ४३. मी दुःख-सागरांत बुडून गेलों व गळ्यांत शिळा बांधून पुत्रामागून मरण्यास सिद्ध झालों. ४४. पण लोकांनीं माझ्या गळ्यांतील तो दगड सोडवून मला त्या कर्मापासून परावृत्त केलें. अच्युता, तेव्हांपासून मी स्वतःस पापी समजतों ४५. हे जगत्पते, तुझ्या दर्शनानें मी कृतार्थ झालों, कारण यमाच्या घरीं गेलेला पुत्र परत देण्यास तूं समर्थ आहेस. ४६.

स्कंद म्हणाले, त्याचे तें भाषण ऐकून कृष्णानें द्विजोत्तमाचें सान्त्वन केलें, आणि रथयुक्त व सशस्त्र दारुकाचें स्मरण केलें. ४७. स्मरण करतांच एका क्षणांत दैत्यांना भयावह अशीं अस्त्रें घेऊन दारुक उपस्थित झाला. ४८. नंतर कृष्ण ज्येष्ठ बंधूसह रथांत बसून जेथें सांदीपनीपुत्र पूर्वी मेला होता त्या प्रभास तीर्थावर गेला. ४९.

## अध्याय ११ वा

## शंखावलीची कथा

स्कन्द म्हणाला, कृष्ण आल्याचें ऐकून समुद्रानें त्याच्याशीं भाषण केलें. तेव्हां सुरेश्वर कृष्णानें समुद्रास गुरुपुत्र आपल्या स्वाधीन करण्याबद्दल बजाविलें. १. अप्रमेय कृष्णाचें तें वचन ऐकून सागर म्हणाला, माझ्या पाण्यांत पंचजन्य नांवाचा दैत्य आहे. २. तो वरचेवर माझ्या पृष्ठभागावर मोठ्या लाटा आणून मला पीडा देत असतो. त्याच रागीट प्राण्यानें तुझा गुरुपुत्र नेला आहे. ३. त्या महाबलिष्ठ युद्धखोराला ठार मार. तें ऐकून हरीनें पाण्यांत प्रवेश केला. ४. तेथें त्या अमोघविक्रमी कृष्णाला शक्तिशाली पांचजन्य दिसला. तो असुर आपल्या असंख्य बांधवांसह कृष्णाबरोबर युद्ध करूं लागला. ५. अद्भुत रूप घेऊन तो भगवंताच्या छातीवर आपल्याच वंशाचे शंख फेकूं लागला. अतिपराक्रमी भगवान् मधुसूदनालासुद्धां जोरानें आदळणाऱ्या त्या शंखांचा वेग सहन झाला नाहीं. याप्रमाणें पाण्यांत त्यांचें भयंकर युद्ध जुंपलें. ६–७.

कृष्णानें शेवटीं पांचजन्याला आपल्या सुंदर नखांनीं फाडलें. त्याच्या उदरांत त्याला गुरुपुत्र दिसला नाहीं; पण त्याचे अवयव व हाताचे तळवे दिसले. ८. नंतर श्रीकृष्ण हातांत शंख घेऊन सर्व असुरांना धमकी देत पाण्याबाहेर ज्या भूतलावर आला तेंच रामक्षेत्र होय व तेंच गोमन्ताचल नांवाचें रमणीय सह्याद्रिशिखर होय. ९–१०. पवित्र इषुपात क्षेत्र, बदरिकाश्रम येथें असून कृष्ण बाहेर येतांच त्याच्या मागून पांचजन्य वंशांतील महाशंखही

श्रीभगवानुवाच –
शृणु मे परमं वाक्यं प्रीतियुक्तं विमुक्तिदम् ॥ १२ ॥
मया यः समरे क्षिप्तः पाञ्चजन्यो निपातितः । यदंगं च करेन्यस्तं तत्कुलं पावितं मया ॥१३॥
स्वकर्मवशगः सोऽपि गुरुपुत्रो यमालयम् । गतः कालेन केनापि तनयोऽप्यनुयाचितः ॥ १४
अद्यप्रभृति भो शंखा अत्रागत्य तनुत्यजः । मत्सानिध्यं भवन्तोऽपि संयांतु मम चाज्ञया ॥१५
ततः प्रभृति ते शंखाः पूज्यास्त्रिभुवनेऽभवन् ।
स्कंद उवाच –
इति तेभ्यो वरं दत्वा शंखेभ्यो जगतां पतिः ॥ १६ ॥
तत्रैव स्थितवान् कृष्णः स्वांशेन मधुसूदनः । तदारभ्य मुने क्षेत्रं पवित्रं लोकविश्रुतम् ॥१७॥
अद्यापि शंखाः संयांति त्यक्त्वा देहान् व्रजन्ति ते ।
पदं भगवतो रम्यं वैकुण्ठस्याप्यनुत्तमम् ॥ १८ ॥
तदारभ्य पुरी रम्या नाम्ना शंखावलीति सा । अतीव पावना जाता विष्णुपादाम्बुसेवनात् ॥
यत्र लोकासुरो दैत्यो महिषासुरवंशजः । कोलरूपं समासाद्य त्रासयामास मानवान् ॥ २० ॥
हते गिरिजया शंखे शंखक्षेत्रेऽति पावने । सालोक्यमगमद्विष्णोस्तस्मिन्दैत्योऽपि भो मुने ॥
तन्नाम्ना चाकरोत् क्षेत्रं शंखकोलमिति स्फुटम् । श्रीमत्परमकल्याणं क्षेत्रमेतद्धि मुक्तिदम् ॥२२
श्रीनालमिति यत्संज्ञा श्रिया यच्चास्पदं परम् । तत्र श्रीः कामरूपेण स्थिता वैकुण्ठदर्शने ॥
तदारभ्य भवत् क्षेत्रं श्रीनालं कमलोपमम् । तत्संकेतगृहं लक्ष्म्याः पद्मनाभस्य चोत्तमम् ॥२४
अतीव पुण्यं विप्रेन्द्र विद्धि मानवदुर्लभम् । तत्र श्रीरमणं देवं येऽर्चयन्ति मुने हरिम् ॥२५॥
कोटिजन्मार्जितात्पापान्मुच्यंते पापिनोऽपि हि ।
अगस्त्य उवाच –
कथं षण्मुख तत्क्षेत्रं श्रीनालमिति कीर्तितम् । एतदाचक्ष्व मे साधो क्षेत्रमाहात्म्यमुत्तमम् ॥
स्कंद उवाच –
पुरा सप्तर्षयस्तत्र तपस्तेपुर्महत्तरम् । द्रष्टुं पद्मालयाकान्तं वाञ्छितार्थप्रदं हरिम् ॥ २७ ॥
श्रीनालाख्ये महाक्षेत्रे क्षेत्रसंन्यासिनश्च ये । कश्यपाद्या महाभागा भगवत्यर्पिताशयाः ॥२८॥
प्रभञ्जनकृताहाराः परमेण समाधिना । तपसाऽऽराधयामासुश्चक्रपाणिं तपोधनाः ॥ २९ ॥
एवं तु तपतां तेषां वर्षाणामयुतत्रयम् । गतमासीन्महाक्षेत्रे श्रीनाले च तदा मुने ॥ ३० ॥
ततः कदाचित् सन्ध्यायां कृतनित्यविधिक्रियाः । मुनयः सत्कथां चक्रुरुपविष्टाः परस्परम् ॥
प्रादुरासीदृषेस्तत्र पवमानः सुगन्धिमान् । आन्दोलयन्नाश्रमस्थान् पादपानृषिसेवितान् ॥३२॥
पुष्पवृष्टिः पपातोच्चैः खाच्च्युता वायुना हृता । आघ्राय ते महागन्धं पवित्रं वायुना हृतम् ॥३३
संतृप्तमनसः सर्वे ऋषयः संबभूविरे । तृप्तानां तपसाऽत्यन्तं मुनीनां स समीरणः ॥ ३४ ॥
नाशयामास संक्लेशं वैनतेयांगसम्भवः । दिशो विलोकयांचक्रुः किमेतदिति विस्मिताः ॥ ३५ ॥
ऊर्ध्वं ते ददृशुर्देवं वैनतेयकृतासनम् । व्यसनार्णवमग्नानां करदं वरदं मुने ॥ ३६ ॥
शंखचक्रगदापद्मैर्विभूषिततनुं हरिम् । पीतांबरावृतोरस्कं विरजस्कं श्रिया युतम् ॥ ३७ ॥
लसत्कुण्डलनिर्भातवदनाम्बुरुहश्रियम् । श्रिया तुष्टया विभूत्या च पुष्टया धृत्या विभूषितम् ॥

क्रमानें यदुपतीबरोबर लढण्यासाठीं आले. श्रीभगवान् म्हणाले, माझें प्रेमाचें मुक्तिदायक वचन ऐका. मी रणांत ठार मारलेला पांचजन्य, त्याच्या हातांत असलेले अवयव ज्यांचे असतील त्यांच्या वंशाचाही मी उद्धार केला आहे. ११–१३. आपल्या कर्मानुसार यमलोकीं यातना अनुभवीत असलेल्या गुरुपुत्रालाही कांहीं कालानंतर मागून घेतलें आहे. १४. शंख हो, जे कोणी आजपासून येथें येऊन प्राणत्याग करतील ते सर्व माझ्या संनिध येतील. १५. तेव्हांपासून ते शंख त्रिभुवनांत पूज्य झाले. स्कन्द म्हणाला, याप्रमाणें जगत्पतीनें त्या शंखांना वर दिला. १६. श्रीकृष्णही तेथेंच अंशभूत राहिला. हे मुने, तेव्हांपासून तें पवित्र क्षेत्र जगप्रसिद्ध झालें. अद्यापही शंख आपला देह टाकून भगवंताच्या रमणीय वैकुंठपदीं जातात. १७–१८.

तेव्हांपासून शंखावली नांवाची रमणीय नगरी श्रीविष्णूच्या चरणजलाच्या स्पर्शानें अतिपावन झाली. १९. जेथें महिषासुराच्या वंशांतील लोकासुरानें डुकराचें रूप घेऊन लोकांना त्रास दिला, त्या शंखक्षेत्रांत शंखाला गिरिजेनें ठार मारल्यावर तो दैत्यही विष्णुस्वरूप बनला. २०–२१. म्हणून त्याच्याच नांवानें शंखकोल हें क्षेत्र अत्यंत कल्याणकारक व मुक्तिदायक झालें. २२. श्रीनाल अशी श्रींची एक संज्ञा असून त्यांचें तें मोठें स्थान आहे. कारण तेथें वैकुंठदर्शनासाठीं श्री कामरूपानें राहते. २३. तेव्हांपासून कमळासारखें श्रीनालक्षेत्र हें लक्ष्मीचें व नारायणाचें उत्तम संकेतगृह झालें आहे. २४. हे विप्रेन्द्रा, तें पवित्र क्षेत्र मनुष्यांना दुर्मिळ असें आहे. श्रीरमण हरीची जे पूजा करतात, ते पापी लोकसुद्धां कोट्यवधि जन्मांतील पापांतून मुक्त होतात.

अगस्त्य म्हणाले, हे साधो, श्रीनाल हें नांव त्या क्षेत्राला कसें प्राप्त झालें ? त्या श्रीनाल-क्षेत्राचें श्रेष्ठ माहात्म्य कोणतें ? हें सर्व मला सांगा. २५–२७.

स्कंद म्हणाले, पूर्वी सर्व कामना पूर्ण करणाऱ्या लक्ष्मीकांताच्या दर्शनासाठीं सप्तर्षीनीं फार मोठी तपश्चर्या केली. २७. महाक्षेत्र श्रीनाल येथें भगवंताचे ठिकाणीं चित्त ठेवून व वायुभक्षण करून महाभाग कश्यपादि क्षेत्रसंन्याशांनीं विष्णूची आराधना केली. २८–२९. हे मुने, याप्रमाणें त्या श्रीनाल महाक्षेत्रांत तपश्चर्या करण्यांत तीस हजार वर्षें निघून गेलीं. ३०. एकदां सायंकाळीं नित्यविधि आटोपल्यावर सर्व ऋषि आपसांत गोष्टी करीत बसले होते. ३१. इतक्यांत सुगंधी वारा सुटला. त्यामुळें आश्रमांतील वृक्ष कंपित झाले. ३२. आकाशांतून पुष्पवर्षाव होऊं लागला. त्यांचा सुगंध वाऱ्यामुळें सर्वत्र दरवळला. त्या सुगंधामुळें ऋषींचें मन संतुष्ट झालें. तो वारा गरुडाच्या शरीरापासून उत्पन्न झाला होता. हें काय आहे म्हणून विस्मित झालेले ते मुनि चोहोंकडे पाहूं लागले. ३३–३५. तेव्हां त्यांना आकाशांत दुःख-सागरांत बुडणाऱ्या भक्तांना आधार देणारा वरद विष्णु दिसला. तो गरुडावर बसला होता. ३६. त्याचें अतिशुद्ध शरीर शंखचक्रगदापद्म यांनी सुंदर दिसत होतें. त्यानें पीतांबर परिधान केलें होतें. ३७. सुंदर कुंडलांमुळें त्याच्या मुखकमलाची शोभा अधिकच खुलून दिसत होती. श्री, तुष्टि, विभूति, पुष्टि व धृति यांनीं त्याचें शरीर सुशोभित झालें होतें. ३८.

अन्याभिर्दक्षकन्याभिर्नीराजितपदाम्बुजम् । जीमूतावलिवत्कान्तं कान्तकौस्तुभवक्षसम् ॥३९
प्रसन्नवेषं गतसर्वदोषं दैत्येंद्ररोषं कृतकृत्यशेषम् ।
पर्यंकशेषं विषमाक्षभूषं जयेति नेमुर्मुदिता मुनीन्द्राः ॥ ४० ॥
तत्र ब्रह्मात्मजैः साकं भवश्च भवनाशनः । पुरुहूतादयो देवाः समाजग्मुस्ततस्ततः ॥ ४१ ॥
गन्धर्वाप्सरसो यक्षाः किन्नराः सिद्धगुह्यकाः । ऋषयो नारदाद्याश्च सत्वरं समुपागताः ॥४२
स्वानुग्रहाय संप्राप्तान् विष्णुना सकलान् सुरान् । विधिवत् पूजयामासुः कश्यपाद्यास्तपोधनाः ॥
देवाश्च पूजयामासुर्नानाद्रव्यविभूषणैः । ततो वरदराट् देवो हरिर्नारायणो मुनीन् ॥ ४४ ॥
धृतनालेन हस्तेन श्रीमता चारुगन्धिना । पस्पर्श मुनिमुख्यांस्तान्दिव्यतेजोपलब्धये ॥४५॥
पंकजेन सुनालेन स्पृष्टास्ते दिव्यरूपिणः । बभूवुस्तापसाः सप्त सूर्यायुतसमप्रभाः ॥ ४६ ॥
तदाप्रभृति तत् क्षेत्रं श्रीनालमिति कीर्तितम् । आसीद् भार्गवमेदिन्यां विशिष्टः
कलशोद्भव ॥ ४७ ॥
श्रीनालाख्ये महाक्षेत्रे स्थितो विष्णुः सनातनः । नाशयेत् क्षत्रिणां पुंसां महापातकसंचयम् ॥
अथोवाच हरिर्विप्रान् कश्यपाद्यांस्तपोधनान् । तपसा द्योतितांश्शुद्धान् साक्षात्
सूर्यसमप्रभान् ॥ ४९ ॥

श्रीभगवानुवाच –

वरं वृणुध्वमृषयस्तपसाऽनेन तोषिताः । ददाम्यहमतिप्रीत्या भवताममलात्मनाम् ॥ ५० ॥
ब्राह्मणा मत्तनुर्विप्राः प्रिया मे हृदयं गताः । गावो मे निलयं शश्वत् तस्माच्छ्रेष्ठो न विद्यते ॥
विद्यया तपसा योगबलेन नियमेन च । ममाऽपि पूज्यवत्पूज्यास्तेभ्यः किं विद्यते परम् ॥५२
यैरिदं तपसा सृष्टं यद्बलेन बिभर्म्यहम् । यत्कोपाद् दह्यते सर्वं तेभ्यः के बलवत्तराः ॥ ५३ ॥
विनाऽपि तपसा येषां सन्तुष्टोऽहं सनातनः । किं पुनस्तपसा भक्त्या यमेन नियमेन च ॥५४
तस्माद्यत् प्रार्थनीयं स्यान्मत्तस्तत् प्रार्थ्यतां द्विजाः । त्वरितं संवदध्वं भो मुनयो गतकल्मषाः ॥

ऋषय ऊचुः –

भवान् प्रमाणं सर्वेषां जनानां करुणानिधे । निगमागमसांख्यानां तद्वचः प्रतिपादकम् ॥५६॥
तर्केतिहासमीमांसायोगो ज्ञानं परं च यत् । त्वत्पादाब्जोदकं चेत्स्यात्सदसच्चान्यथा वृथा ॥
भवान् सत्त्वगुणाधीशः शास्त्रं तद् व्याहृतं विदुः । तस्माच्छास्त्रतरः किं स्यादावेद्यं
शास्त्रनिर्णयैः ॥ ५८ ॥
वरदो यदि चास्माकं भगवानखिलार्थदः । व्याहृतं देहि भो नाथ यत्त्वां ब्रूम रमापते ॥५९॥
अस्माभिर्यत्तपस्तप्तं तत्तपः सफलं च नः । नातः परतरो लाभो यत्त्वांघ्रिनिदर्शनम् ॥ ६० ॥
भवत्पादयुगं चात्र क्षेत्रे तिष्ठतु नित्यदा । पूजयामः परं तत्त्वमस्माकमिति चादृताः ॥ ६१ ॥
क्षेत्रमेतत् पवित्रं स्यादद्यप्रभृति भूतिदम् । करेण यत्र यन्नालं पंकजं पंकजेक्षण ॥ ६२ ॥
स्पृष्ट्वा वयं वारिजेन तदर्थप्रतिपादकम् । भवत्वेतन्महाक्षेत्रं वरमेनं प्रदेहि नः ॥ ६३ ॥

---

१ ततः प्रवोपगतै–गता–गैताः इति मु. को. गो. चं. पु. पाठः ।

अन्य दक्षकन्या त्याच्या चरणकमलांजवळ बसल्या होत्या. विष्णूचा वर्ण मेघाप्रमाणें सुंदर असून त्याच्या वक्षस्थलावर कौस्तुभ शोभत होता. ३९. प्रसन्नवेष, पूर्ण निर्दोष, दैत्येंद्राचा रोष असलेले, सर्व कार्यें पूर्ण केलेले असे शेषशायी विष्णु व त्रिनयन शंकर यांचा जयजयकार असो, असें म्हणून आनंदित मुनींनी त्यांना प्रणाम केला. तेथें ब्रह्मसुतांसह भवनाशक शंकर व इंद्रादि देव आले होते. ४०–४१. गंधर्व, अप्सरा, यक्ष, किंनर, सिद्ध, गुह्यक, नारदादि मुनि सत्वर उपस्थित झाले. ४२. कश्यपादि तपोधन मुनींनीं विष्णूसह आलेल्या सर्व देवांची अनुग्रहासाठीं पूजा केली. ४३. वरदराज नारायण व अन्य देव यांनींही सर्व मुनींचा विविध द्रव्य विभूषणें देऊन सत्कार केला. ४४. श्रीविष्णूनें प्रमुख मुनींना दिव्य तेज देण्यासाठीं आपल्या सुवासिक व सुंदर कमलयुक्त हस्तानें स्पर्श केला. ४५. त्या सुनाल कमलाचा स्पर्श होतांच ते तपस्वी सप्तर्षि हजारों सूर्यांसारखे तेजस्वी दिसले. ४६. हे कलशोद्भवा, तेव्हांपासून परशुरामाच्या या भूमीवर तें क्षेत्र श्रीनाल या नांवानें प्रसिद्ध झालें. ४७. महाक्षेत्र श्रीनालवासी भगवान् विष्णु क्षत्रिय पुरुषांचें सर्व पाप नाश करीत आहे. ४८. नंतर सूर्यवत् तेजस्वी, तपानें प्रकाशमान व शुद्ध अशा कश्यपादि तपस्वींना उद्देशून भगवान् विष्णु म्हणाले,

ऋषि हो, तुम्ही आपल्या तपानें मला संतुष्ट केलें आहे. मी तुम्हांला इच्छित वर देतों. कारण तुमचें अंतःकरण शुद्ध झालें आहे. ४९–५०. ब्राह्मण हे माझें शरीर आहे. प्रिय विप्र माझ्या शरीरांत असतात. गाय हें माझें शाश्वत स्थान आहे. याहून श्रेष्ठ कोणी नाहीं. ५१. विद्या, तप, यौगिक बल व व्रत यांच्यामुळें ब्राह्मण मलाही पूज्य होत. त्यांच्याहून मोठें काय आहे ? ५२. ज्यांनी आपल्या तपानें हें निर्माण केलें, ज्यांच्या सामर्थ्यानें मी सर्वांचे धारण–पोषण करतों व ज्यांच्या कोपामुळें सर्व जळून जातें, त्यांच्याहून बलवत्तर कोण असूं शकतो ? ५३. त्यांनीं तप केलें नाहीं तरी मी त्यांच्यावर प्रसन्न आहें. मग त्यांनीं तप, भक्ति, मनोनिग्रह व व्रत केल्यावर मी कां प्रसन्न होणार नाहीं ? ५४. म्हणून द्विज हो, तुम्हांला पाहिजे असेल, तें तुम्ही मागून घ्या. निष्पाप मुनींनो, लवकर बोला. ५५.

ऋषि म्हणाले, हे दयानिधे, आपण सर्व लोकांना प्रमाण आहांत. कारण, निगम, आगम, सांख्य, तर्क, इतिहास, मीमांसा, योग व दुसरें ज्ञान हीं सर्व तुलाच प्रतिपादित असतात. म्हणून तुझें पादोदक हेंच सत्य आणि बाकी सर्व असत् व वृथा आहे. ५६–५७. आपण सत्त्वगुणाधीश आहांत, असें शास्त्र सांगतें, व हें सर्व लोकांना माहीत आहे. याहून मोठें शास्त्र तें कोणतें ? सर्व शास्त्रनिर्णयांनीं दुसरें काय समजून घ्यावयाचें ? ५८. जर आपण आम्हांस वर देणारे व सर्व कांहीं देणारे भगवान् आहांत, तर हे रमापते नाथा, जें आम्हीं मागूं तें द्या. ५९. आम्ही जी तपश्चर्या केली, ती सफल झाली आहे. तुमचें चरणदर्शन झालें आहे. याहून मोठा लाभ तो कोणता ? ६०. आपले चरण या क्षेत्रांत सदैव असावें. आम्ही या श्रेष्ठ तत्त्वाची आदरानें पूजा करूं ! ६१. आजपासून हें पवित्र क्षेत्र ऐश्वर्यदायक होवो ! कमलाक्ष देवा, जेथें कमळास आपण हातांतील सुनाल कमळानें स्पर्श केला, त्याच अर्थाचें हें महाक्षेत्र व्हावें, हा वर आम्हास द्या. ६२–६३.



स्कन्द उवाच –

तत्तथेति वचस्तेषां मुनिकृत्यं जनार्दनः । सांनिध्यं कल्पयामास तस्मिन् क्षेत्रे श्रियः पतिः ॥
तेऽपि सप्तर्षयस्तत्र श्रीनाले संस्थिता मुने । तस्यैवानुग्रहादेव कलत्रैः स्वैस्तु संवृताः ॥ ६५ ॥
स्ववंशोद्धरणं कृत्वा संभूय बहुशः स्वयम् । आपुर्गतिमदृश्यां ते तपसे कृतनिश्चयाः ॥ ६६ ॥
इत्येतत्ते मयाऽऽख्यातं क्षेत्रमाहात्म्यमुत्तमम् । तस्मात् पवित्रं परमं क्षेत्राणामुत्तमं मुने ॥६७
इतिहासमिमं श्रुत्वा श्रद्धाभक्तिसमन्वितः । नरो न याति दुष्प्रापं संसारं सारसंग्रही ॥ ६८ ॥
इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे स्कन्दागस्त्यसंवादे मांगीशमाहात्म्ये शंखावल्याख्यानकथनं नामैकादशोऽध्यायः ॥ ११ ॥

# अथ द्वादशोऽध्यायः ।

## कालन्तकवधः । विजयामाहात्म्यम् ।

अगस्त्य उवाच –

पार्वत्याश्चरितं स्कंद कथयस्व ममाग्रतः । यस्य स्मरणतः पुंसां संभवेद्वाञ्छितं फलम् ॥ १ ॥

स्कन्द उवाच –

मांगीशाज्ञां समादाय साऽघाश्या दर्शनोत्सुका । सागरं द्रष्टुकामा सा शांकरी शंकरप्रिया ॥
सखीद्वयेन संयुक्ता विचचार सरित्तटे । पश्यन्ती मुनिसंघानामाश्रमांश्छ्रमदारणान् ॥ ३ ॥
वीक्ष्य सागरगां गंगामघाशीं तां सरिद्वराम् । रराम भववामार्धधारिणीं भयहारिणीम् ॥ ४
किञ्चिदानंदसन्दोहनिमग्ना चेदमब्रवीत् । अहो धन्याऽस्मि लोकेऽस्मिन् पतिं प्राप्य च शंकरम् ॥५॥
वितर्कयंति मुनयो हृदये ध्याननिष्ठया । अहो जन्म च मे धन्यं सत्प्रिये चारुहासिनि ॥ ६ ॥
कामारिः स मया सार्द्धं रमते स्वेच्छया सुखम् । यत्संसर्गादहं लोके कीर्तिं प्राप्ता महोत्तमाम् ॥
यत्संसर्गादिमे लोकाः शर्वाणीमिति मां विदुः । गणाऽधिपत्यं संप्राप्ता यस्य देहार्धधारिणी ॥८
अहो स्त्रियां सत्पतये तप एव हि कारणम् । येनाहमीश्वरं प्राप्ता पत्नीभावेन शंकरम् ॥ ९ ॥
अहो यस्याः पिताः साधुर्दक्षः सर्वगुणान्वितः । सैव धन्यतरा लोके शंकरेण यथा त्वहम् ॥१०
इत्येवं हर्षिता साध्वी क्रीडन्ती तन्नदीतटे । वायुना वीज्ययाना सा सागरोत्थेन सुव्रता ॥११
क्वचिद्ध्यानपरा लोके हृद्याधाय च शंकरम् । आनन्दपूरिता पश्य प्राप्ता सिद्धाश्रमं मुने ॥ १२॥
सिद्धेश्वरं प्रदृश्याथ संतोषं परमं गता । सिद्धेश्वरसमीपे सा गानं चक्रेऽतिसुन्दरम् ॥ १३ ॥
पूजयित्वाऽथ सिद्धेशं नमस्कृत्याऽतियत्नतः । ततः सा बहिरागत्य सखीभ्यां संयुता मुने ॥१४
गन्तुं कृतमतिर्देवी मांगीशचरणान्तिके । अथैको राक्षसः कश्चित् स्थूलदेहो नगोपमः ॥१५
प्रेताम्बरसमायुक्तो धूम्राक्षो धूलिधूसरः । प्रेतमालाधरो भोगी भयानकमुखो मुने ॥ १६ ॥
नीलजीमूतसंकाशः सम्भूतो बाष्कलान्वये । नाम्ना कालान्तको नाम त्रैलोक्ये ह्यपराजितः॥१७
हस्ते लांगलमादाय ययौ सिद्धाश्रमं खलः । कियंत्यो गा विनिहताः कियन्तो ब्राह्मणा हताः ॥१८॥

स्कन्द म्हणाले, त्यांच्या त्या वचनास ‘ तथास्तु ’ असा वर देऊन श्रीपति जनार्दनानें तेथें आपलें सांनिध्य निश्चित केलें. ६४. हे मुने, सपत्नीक सप्तर्षिसुद्धां त्यांवर अनुग्रह करण्यासाठीं तेथेंच राहिले. ६५. तपश्चर्या करून व स्वतःच्या वंशाची उन्नति करून ते ऋषि अदृश्य गतीला गेले. ६६.

याप्रमाणें मी हें उत्तम माहात्म्य तुला सांगितलें आहे. क्षेत्रमाहात्म्याचा हा परमपवित्र इतिहास भक्तीनें ऐकणाऱ्या मनुष्यास पुनर्जन्म नाहीं. ६७–६८.

# अध्याय १२ वा

## कालांतकाचा वध, ‘ विजया ’ माहात्म्य

अगस्ति म्हणाले, हे स्कन्दा, ज्याच्या स्मरणानें पुरुषांची इच्छा सफल होते, तें पार्वती-चरित्र मला सांगा. १.

स्कंद म्हणाले, ती शंकरप्रिया शांकरी समुद्रदर्शनासाठीं उत्सुक होऊन मांगिरीशाची आज्ञा घेऊन अघाशीहून निघाली. २. श्रमपरिहार करणारे आश्रम पहात पहात ती सर्वांसह नदीच्या किनाऱ्यावर फिरूं लागली. ३. समुद्राकडे जाणारी ती नदीश्रेष्ठ अघाशीगंगा पाहून शंकराची भयहारिणी अर्धांगी पार्वती अत्यंत आनंदित होऊन म्हणाली, शंकर पति लाभल्यानें मी या जगांत किती धन्य आहें! कारण मुनिलोक ज्याचें सतत चिंतन करतात, तो मदनारी यथेच्छ सुखानें माझ्याशीं रमलेला असतो व या सत्संगामुळें जगांत माझी सर्वोत्तम कीर्ति झाली. ४–७. त्यांची मी अर्धांगी झाल्यें म्हणून लोक मला शर्वाणी समजतात. ८. तपश्चर्ये-मुळेंच स्त्रियांना चांगला पति मिळतो, म्हणूनच मला शंकर पति मिळाला. ९. अहो, जिचा पति साधु, दक्ष व सर्वगुणसंपन्न असतो ती स्त्री मोठी धन्य होय. म्हणून माझा पति शंकर असल्यानें मीही धन्य आहें. १०. याप्रमाणें आनंदित होऊन ती नदीकिनारीं खेळत होती, व समुद्रावरून वाहणारा वारा तिला सुखवीत होता. ११.

हे मुने, याप्रमाणें ती शंकराचें चिंतन करीत करीत आनंदित होऊन सिद्धाश्रमांत पोंहोंचली. १२. तेथें सिद्धेश्वराच्या दर्शनानें तिला फारच संतोष झाला. सिद्धेश्वरासमोर जाऊन तिनें सुंदर गायन केलें. १३. सिद्धेश्वराची पूजा करून त्याला नमस्कार केला व मंदिराच्या बाहेर येऊन ती सर्वांसह मांगीशचरणाजवळ जाण्याच्या तयारींत होती, इतक्यांत पर्वतप्राय धिप्पाड शरीराचा एक कालांतक नांवाचा राक्षस सिद्धाश्रमावर हातांत नांगर घेऊन चाल करून आला. तो प्रेतवस्त्रधारी, धूम्रलोचन, धूलिधूसर, प्रेतमालाधारी, सर्पधारी दिसण्यांत भयानक होता. बाष्कलवंशांत जन्मलेला तो निळ्या मेघासारखा होता. त्यानें कित्येक गाई व कित्येक ब्राह्मण ठार केले. १४–१८.

उत्पाटयामास गृहांल्लांगलाग्रेण राक्षसः। काश्चित् स्त्रियस्तेन हता भक्षितास्तेन बालकाः ॥१९
केचन ब्राह्मणा जग्मुः शंकरं शरणं तदा। रक्ष रक्षेति भाषन्तो दण्डवत् पतिता भुवि ॥२०॥
तान् विषणोन्मुखान् देवी वाक्यमूचे तदा द्विजान्। भो विप्रा ब्रूत वृत्तांतमित्युंक्तास्तेऽपि शंकरम् ॥ २१ ॥
वक्तुं नाऽवसरोऽस्माकं दुःखितांस्त्राहि भो उमे। दुर्गे त्राहि महाभागे वक्तुमायाति नो वचः ॥२२
सा हि कोपं तदा कृत्वा तद्वधायाकरोन्मतिम्। यत्र तिष्ठति दैत्यः स तत्राऽगच्छत शाम्भवी ॥ २३
वृक्षमुत्पाट्य वेगेन विव्याध हृदये तदा। स गतासुः पपातोर्व्यां तद्वलीकसमन्वितः ॥ २४ ॥
नेत्रास्यनासिकाश्रोत्रैर्वमन् रक्तं महासुरः। निहतं राक्षसं दृष्ट्वा ब्राह्मणा हर्षनिर्भराः ॥ २५ ॥
तुष्टुवुस्तां तदा देवीं स्तोत्रवृन्दैरनेकशः। हर्षितास्तु महात्मानो वेदघोषैस्तथाऽपरे ॥ २६ ॥
नमो देव्यै महेशान्यै सौम्यायै सततं नमः। नमो जगत्प्रतिष्ठायै दिव्यायै ते नमो नमः ॥ २७ ॥
नमामि ते पदद्वंद्वं मुनिभ्रमरचुम्बितम्। वन्दितं लोकपालाद्यैरनेकैः सुरसत्तमैः ॥ २८ ॥
नमस्तेऽस्तु महारौद्रे दैत्यकोपमहामखे। निधानकल्पे कल्पेऽसि शंस नः स्वचरित्रकम् ॥२९॥
काऽसि त्वं दिव्यरूपेण न जानीमो यथार्थतः। प्रसन्ना भव कल्याणि नमस्कुर्मो भवप्रिये ॥३०॥
विजितोऽयं महासत्त्वो दैत्यराजोऽतिदारुणः। विजयाऽसि महाभागे गीर्वाणपतिवन्दिते ॥ ३१
मनोरमेण नाम्नाऽत्र विजये प्रतिकाशिता। तिष्ठाऽत्र त्वं महेशानि ऋषीणां भयशान्तये ॥३२॥
तानुवाच ततो देवी गम्भीरान्तःस्थिता सती। वरं ददामि भो विप्रा यो वो मनसि वर्तते ॥
तुष्टायां मयि विप्रेन्द्रा दुर्लभं किं जगत्त्रये।
द्विजा ऊचुः –
वयं ऋषिकुलोद्भूतास्तापसा शरणार्थिनः ॥ ३४ ॥
तस्मात्त्वां शरणं प्राप्तानस्मात् रक्ष सदाशिवे। वरदाऽसि यदा देवि वरोऽस्माकं प्रदीयताम् ॥
सागरस्यान्तिके ह्येषा पुरी शंखावली शुभा। स्थानं ते रोचतां देवि निवासार्थं सदाऽनघे ॥
त्वया ह्यत्रैव स्थातव्यं लोकानां हितकाम्यया। विजयेति च दुर्गेति नाम्ना विख्यातविक्रमा ॥३७
अत्र दैत्यभयं नित्यं तदपाकुरु सर्वदा।
देव्युवाच –
अत्रैव निवसाम्यद्य सर्वेषां च हिताय वै ॥ ३८ ॥
विजयेति च मे नाम लोके ख्यातिं गमिष्यति। मम भक्तिरता यूयमृषिवर्यसुता द्विजाः ॥ ३९
भवन्तो मम सान्निध्यमचिराद्धि गमिष्यथ। मम ये भावनिरताः पुरुषाश्च स्त्रियोऽपि वा ॥४०॥
तेषां तथाविधान् कामान् पूरयिष्ये न संशयः। येषां मुखे तु ये नाम विजया जयार्थदम् ॥४१
बन्धछेदं कराम्येषां बान्धवानां द्विजोत्तमाः। संग्रामे विजयस्थाने पर्वते राष्ट्रविप्लवे ॥ ४२ ॥

त्या राक्षसानें नांगराच्या फाळानें घरें मोडलीं, कित्येक स्त्रिया ठार केल्या व मुलेंही खाल्लीं. १९. तेव्हां कांहीं ब्राह्मण शंकराला शरण गेले व रक्षण कर, रक्षण कर असें म्हणून त्यानीं त्याला दण्डवत प्रणाम केला. २०. तेव्हां त्या ब्राह्मणांचें दुःखी वदन पाहून देवी त्यांना म्हणाली, विप्रहो, काय घडलें आहे तें सांगा. द्विज म्हणाले, हे श्रीशंकरा, विशेष बोलण्यास अवकाश नाहीं. हे उमे, दुःखितांचें रक्षण कर. महाभाग दुर्गे, आमच्यानें बोलवतही नाहीं. २१-२२. तेव्हां क्रुद्ध शांभवीनें दैत्यवध करण्याचा निश्चय केला, व जेथें तो दैत्य होता तेथें ती गेली. २३. तिनें एक वृक्ष उपटून त्याच्या छातीवर मारला. लगेच तो गतप्राण होऊन जमिनीवर संपूर्ण कोसळला. २४. त्या महासुराचे डोळे, तोंड, नाक व कान यांमधून रक्त वहात होतें. राक्षसाला ठार मारल्याचें पाहून ब्राह्मण आनंदित झाले. २५. त्यांनी स्तोत्रें म्हणून देवीची स्तुति केली. दुसऱ्या महात्म्यांनीं हर्षभरित होऊन वेदघोष केला. २६.

देवी महेशानीस नमस्कार असो. सौम्या देवीस नमस्कार असो. जगाची प्रतिष्ठा जिच्यावर अवलंबून आहे त्या दिव्य देवीस नमस्कार असो. २७. हे देवी, मुनिजन भ्रमर होऊन तुझ्या चरणांचें चुंबन घेतात. लोकपालादि देवश्रेष्ठ तुला वंदन करतात. दैत्यांविषयींचा तुझा क्रोध हा एक प्रलयकाळचा महायज्ञ आहे. तूं एक (सुख) निधान आहेस. हे महारौद्र देवि, मला आपलें चरित्र सांग. २८-२९. तूं दिव्यरूपी कोण आहेस? तुझें यथार्थ स्वरूप आम्हांस कळत नाहीं. हे कल्याणी, प्रसन्न हो. हे शंकरप्रिये, आम्ही तुला नमस्कार करतों. ३०. महाशक्तिशाली व महाभयंकर अशा दैत्यराजाला तूं जिंकलेंस. यासाठीं हे इंद्रवंदिते, तूं विजया आहेस. ३१. विजये, तूं मनोरमा या नांवानें प्रसिद्ध आहेस. महेशानी, तूं ऋषिभय दूर करण्यासाठीं येथें रहा. ३२. तेव्हां ती हृदयस्थ गंभीर देवी म्हणाली, विप्रहो, मी तुम्हांस मनोवांछित वर देत आहें. ३३. मी प्रसन्न असल्यावर त्रैलोक्यांत दुर्मिळ असें काय आहे?

द्विज म्हणाले, आम्ही ऋषिवंशज तपस्वी तुला शरण आलों आहोंत. यासाठीं सदाशिवे, आमचें शरणागतांचें रक्षण कर. देवी, तूं वरदा आहेस. आम्हांस वरदान दे. ३४-३५. हे देवी, सागराजवळ ही सुंदर शंखावली नगरी आहे. येथें हे अनघे, तूं आनंदानें रहा. ३६. तुझा पराक्रम प्रख्यात आहे. लोककल्याणासाठीं तूं येथेंच विजया व दुर्गा या नावानें रहा. ३६. येथें दैत्यांची भीति नेहमींच असते. ती तूं दूर कर. देवी म्हणाली, सर्वांच्या हितासाठीं मी येथेंच वास करतें. जगांत विजया हें नांव प्रसिद्ध होईल. हे द्विजपुत्रांनों, माझी भक्ति करून तुम्ही येथेंच रहा. माझ्या सर्व स्त्री-पुरुष भक्तांच्या कामना मी नेहमींच सफल करणार. ज्यांच्या मुखीं जय मिळवून देणारे विजया हें नांव असेल अशांच्या बांधवांना मी बंधनांतून मुक्त करीन; संग्राम, पर्वत व राष्ट्रीय संकट यांमध्यें विजयासाठीं जो माझें नामस्मरण करील, त्याला निश्चित विजय मिळेल. ३८-४२.

मम नाम स्मरेद्यस्तु विजयस्तस्य जायते। मम नामामृतं पीतं येन केनापि जन्तुना ॥ ४३ ॥
तस्याहं नाशयिष्यामि तत्क्षणात् परमापदः। येषां कुलेऽस्ति मत्पूजा विवर्धंते च ते नराः ॥ ४४
तेषां कुले नैव वैरं दुःखं चोराग्निसम्भवम्। इति दत्त्वा वरान् देवी तत्रैवांतरधीयत ॥ ४५ ॥
सान्निध्यं कल्पयामास तस्मिन् सिद्धाश्रमे सती। तदारभ्य महागौरी तस्मिन् सिद्धाश्रमे स्थिता
विजयेति परिख्याता भक्तकामार्थसिद्धये। य इदं शृणुयाद् देव्या ह्याख्यानं सुमनोहरम् ॥४७॥
दुर्गा ददाति सन्तुष्टा मनसा वाञ्छितं फलम्।

इति श्रीस्कान्दे उत्तररहस्ये सह्याद्रिखण्डे स्कन्दागस्त्यसंवादे मांगीशमाहात्म्ये विजया-
दुर्गाख्यानं नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

॥ इति मांगीशमाहात्म्यं समाप्तम् ॥



जो कोणी माझें नामामृत घेईल, त्याच्या सर्व आपत्ति लगेच दूर होतील. ज्यांच्या घरीं माझी पूजा होत असेल, त्या माणसांची भरभराट होईल. त्यांना चोर, अग्नि व शत्रु यांपासून भीति असणार नाहीं. याप्रमाणें वर देऊन देवी तेथेंच अंतर्धान पावली. ४३–४५.

त्या सतीनें त्या सिद्धाश्रमांत आपलें सान्निध्य निश्चित केलें व ती महागौरी भक्तांच्या इच्छा पूर्ण करण्यासाठीं विजया नांवानें राहूं लागली. देवीचें हें अत्यंत मनोहर आख्यान जो श्रवण करतो त्याला देवी संतुष्ट होऊन मनोवांछित फल देत असते. ४६–४७



H07
N→Dev.

# शुद्धिपत्रक

| अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ/ओळ |
|---|---|---|
| धार्मिक | धार्मिकः | ८–११ |
| सूतेशं | भूतेशं | १०– ४ |
| काम एवं | काममेवं | १८– १ |
| पाहतांत | पाहतांच | २५–१४ |
| संस्थिस्तौ | संस्थितौ | ४२– ५ |
| तस्याश्रे | तस्याश्रमे | ४२–२२ |
| आहतो | आहूतो | ४४– ६ |
| वैश्रवण...क्रीडा | भागीरथीवर्णन | ४५–२१ |
| त्यास...त्याचें | स्वतःस...स्वतःचें | ४५–१० |
| कुर्यगं० | कुर्युर्गं० | ४६–१० |
| रेणुका...कारण | जमदग्नीचा क्रोध | ४७–२१ |
| – क्रोधः | – क्रोधयोः | ५८–२२ |
| – तर्गस्थित | – तर्गतस्थित | ६०– ७ |
| क्रोधेण | क्रोधेन | ६२– ९ |
| जमदग्नि...कथा | रावणाचा पराजय | ६३– २ |
| क्षिता | क्षितौ | ६४–१७ |
| देवस्त्रिया | स्वर्गस्थ देव | ६५–१७ |
| हृद्य | हृद्य | ८८– ९ |
| श्रौद्य | श्रौध | १०३– ८ |
| दत्रात्रेय | दत्तात्रेय | १०५– ५ |
| न्निवेदयत् | न्यवेदयत् | ११०– ८ |
| भुंडं | मुंडं | ११०–१० |
| विस्फाट | . विस्फोट | ११२–१७ |
| देशः...पूर्वयोः | पूर्व देशात्रिहोत्रके | १२८–२० |
| ढ्वंरते | ढ्वरते | १२८–२५ |

| अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ/ओळ |
|---|---|---|
| दीप...च | दीपवत्यां कुलान्यष्टौ स्थापितानि यथाविधि | १२२– ३ |
| ब्राह्म...पुत्रः | ब्राह्मण्यां क्षत्रियात्पुत्रश्चागरो नाम तूच्यते ॥ | १३२– ८ |
| अंतकायतयः | अंतकायतयः* | १३२–१० |
| ग्रामां | ग्रामा | १३४– ३ |
| भूदेव | भूदेवः | १३४– ६ |
| ब्राह्मण्य० | ब्राह्मण्या० | १३६ –७ |
| बवह० | बहव० | १३६–२५ |
| विविधाधि० | विविधधि० | १३८– ३ |
| विडंति हि | विडंति हि* | १३८– ९ |
| परे | परे* | १३८–१० |
| शक्ति | शुक्ति | १४०–१९ |
| भवंति | तुष्यन्ति | १४२– १ |
| दहाम्य | ददाम्य | १४२–११ |
| तं वै | तां तस्मै | १४४– २ |
| यायब्ज | यावब्ज | १४४– ९ |
| म्याक्रम्य | माक्रम्य | १५०– २ |
| चिक्षेपः | चिक्षेप | १५०– ५ |
| जमदग्न्या० | जमदग्ने० | १५०–१२ |
| प्रदत्त्वा० | प्रदाया० | १५२–२३ |
| मानीयता० | मानयता० | १७४– ३ |
| परित्यागपरि० | परित्यक्तपरि० | १७६– २ |
| अस्तुवज्जा | अस्तुवज्ञा० | २०२–२४ |
| चतुरा० | चतुर० | २१०–२० |
| मा | न | २१०–२७ |

| अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ/ओळ | अशुद्ध | शुद्ध | पृष्ठ ओळ |
|---|---|---|---|---|---|
| प्रथतो | प्रयतो | २२०–१५ | तस्य | तस्या | २७२–११ |
| यातेनि | यांतीत | २२६– ४ | प्रवृत्तस्ते | प्रवृत्तास्ते | २८६–२० |
| वरातप | वरास्तप | २३०–१९ | मसा | मनसा | ३०६–२४ |
| हेत्ति | हेति | २३२–१९ | रत | गत | ३१२– ३ |
| यर्त्तपि० | यत्तृपि० | २३८–१५ | तरः | तरं | ३१६–२५ |
| नमस्कुर्यो | नमस्कार्यो | २६०–२२ | | | |



# धर्मबोध

रुढीच्या दडपणाखालीं धर्मतत्त्वें नष्टप्राय झालीं व धर्मभावना विकृत झाली कीं समाजांत स्वैराचाराचा प्रादुर्भाव होतो, माणसांतील माणुसकी नष्ट होते आणि धर्म व नीति यांची फारकत होते. अशा सामाजिक अवनतीच्या काळांत श्रीपरशुरामाचा क्रांतिकारक अवतार झाला. निष्ठावंत धर्माचाराचें पुनरुत्थान करून परशुरामानें कोंकण प्रांतांत आदर्श समाजाची स्थापना केली व श्रद्धेचें अधिष्ठान म्हणून दैवतांची स्थापना केली.

श्रीपरशुरामानें स्थापिलेला हा सद्धर्म ' कालेन
ासला गेला आहे. धर्मतत्त्वें,
वना व धर्मरुढि यांचें सत्यस्वरूप
ास यावें, खऱ्या सनातन धर्माची
ही आधुनिक भारताची अत्यंत
ाहे.

विणाऱ्या ग्रंथांचा खरोखर पाहतां
ाण आजकालच्या धांवपळीच्या
ंथांचा यथासांग अभ्यास करण्यास
सत नाहीं. जनसेवा करावयाची तर
लकालाच्या मर्यादा लक्षांत घेऊनच
ा नीतीस अनुसरून व्याकरणा-
त्री गायतोंडे यांनीं ' **धर्मबोध** '
, रसाळ व संक्षिप्त ग्रंथ लिहिला
खंडांत ' दर्शविलेल्या श्रीपरशु-
रकथेची ' धर्मबोध ' ही पुरवणी
य असू नये.

त केवळ चार रुपये ठेवली आहे.

**श्रीकात्यायनी पब्लिकेशन्स**
६०३, अरुण चेंबर्स,
ताडदेव रोड, मुंबई ३४

